॥ ७ ॥

वाळो जन मज ह्मणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥
सांडूनि लौकिक जालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥
नाइकें वचन बोलतां या लोकां । ह्मणे जालों तुका हरिरता ॥ ३ ॥

॥ ८ ॥

आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । ह्मणोनि व्यभिचारा टेकलियें ॥ १ ॥
रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण त्यानिराळी न गमे घडी ॥ २ ॥
नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रातलें अनंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ९ ॥

हाचि नेम आतां न फिरें माघारी । बैसलें सेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥
घररिघी जालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥
बळियाचा अंगसंग जाला आतां । नाहीं भय चिंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १० ॥

नाहीं काम माझें काज तुह्मांसवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥ १ ॥
व्यभिचार माझा पडिला ठाउका । न सर ती लोकांमाजी जालें ॥ २ ॥
न धरावा लोभ कांहीं मजविशीं । जालें देवपिशी तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ११ ॥

विसरलें कुळ आपुला आचार । पती भावे दीर घर सोय ॥ १ ॥
सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माझें ॥ २ ॥
मज आतां कोणी आळवाल झणी । तुका ह्मणे कानीं बहिरी जालें ॥ ३ ॥

॥ १२ ॥

न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ १ ॥

सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥ २ ॥
आळ आला होता आह्मी भांडखोरी । तुका ह्मणे खरी केली मात ॥ ३ ॥

॥ १३ ॥

दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंता पासूनिया ॥ १ ॥
बळियाच्या आह्मी जालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जिवाच्या उदारा । जालों प्रीतिकरा गोविंदासी ॥ ३ ॥

॥ १४ ॥

क्षणभरी आह्मीं सोसिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥ १ ॥
सांडी मांडी मार्ग केल्या भरोवरी । अधिक चि परी दुःखाचिया ॥ २ ॥
तुका ह्मणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ ३ ॥

॥ १५ ॥

आह्मां आह्मी आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठी पोटीं कोणी दुजें ॥ १ ॥
फावला एकांत एकविध भाव । हरि आह्मांसवें सर्व भोगी ॥ २ ॥
तुका ह्मणे अंगसंग एके ठायीं । असो जेथें नाहीं दुजें कोणी ॥ ३ ॥

॥ १६ ॥

सर्व सुख आह्मी भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥ १ ॥
याचसाठीं सांडियेले भरतार । रातलों या परपुरुषाशीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

॥ १७ ॥

एका जीवें आतां जिणें जालें दोहीं । वेगळिक कांहीं नव्हे आतां ॥ १ ॥
नारायणा आह्मां नाहीं वेगळिक । पुरविली हे भाक सांभाळिली ॥ २ ॥
तुका ह्मणे जालें सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ ३ ॥

॥ १८ ॥

हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥ १ ॥
सेवा सुखें करूं विनोदवचन । आह्मी नारायण एकाएकीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जालों उदासीन । आपुल्या आधीन केला पति ॥ ३ ॥

॥ १९ ॥

मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयानो ॥ १ ॥
न साहवे तुह्मां या जनाची कूट । बोलती वाईट ओखटें तें ॥ २ ॥
तुका ह्मणे जालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आह्मी ॥ ३ ॥

॥ २० ॥

शिकविलें तुह्मी तें राहे तोंवरी । मज आणि हरी वियोग तों ॥ १ ॥
प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥ २ ॥
तुका ह्मणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ ३ ॥

॥ २१ ॥

सांगतों तें तुह्मीं आइकावें कानीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ १ ॥
जोंवरी या तुह्मां मागिलांची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥ २ ॥
तुका ह्मणे काय वांयांविण धिंद । पति ना गोविंद दोन्हीं नाहीं ॥ ३ ॥

॥ २२ ॥

आजिवरी तुह्मां आह्मां नेणपण । कौतुकें खेळणें संग होता ॥ १ ॥
आतां अनावर जालें अगुणाची । करूं नये तें चि करीं सुखें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां बुडविलीं दोन्ही । कुळें एक मनीं नारायण ॥ ३ ॥

॥ २३ ॥

सासुरियां वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावें चि ॥ १ ॥

सांडवर कोणीं न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥ २ ॥
न व्हावी ते जाली आमची भंडाई । तुका ह्मणे काई लाजों आतां ॥ ३ ॥

॥ २४ ॥

मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ १ ॥
आतां तुह्मी पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वांयांविण ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी भयाभीत नारी । कैसी संग सरी तुह्मां आह्मां ॥ ३ ॥

॥ २५ ॥

परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ १ ॥
संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनि मागुतें पाहूं नये ॥ २ ॥
तुका ह्मणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपासोई ॥ ३ ॥

॥ २६ ॥

आइकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडा या सोई भ्रताराची ॥ १ ॥
नव्हे आराणुक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥ २ ॥
तुका ह्मणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥ ३ ॥

॥ २७ ॥

आहांच वाहांच आंत वरी दोन्ही । न लगा गडणी आह्मां तैशा ॥ १ ॥
भेऊं नये तेथें भेडसावूं कोणा । आवरूनि मना बंद द्यावा ॥ २ ॥
तुका ह्मण कांहीं अभ्यासावांचुनी । नव्हे हे करणी भलतीची ॥ ३ ॥

॥ २८ ॥

बहुतांच्या आह्मी न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥ १ ॥
विचार करितां वांयां जाय काळ । लटिकें तें मूळ फजितीचें ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥ ३ ॥

॥ २९ ॥

त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा। कठिण हें जिवा तोंचिवरी ॥ १ ॥
मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा । अंतर हें संगा नेदी पुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्वाविशीं हा संपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसें ॥ ३ ॥

॥ ३० ॥

न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ १ ॥
मानेल त्या तुह्मी आइका स्वभावें । मी तों माझ्याभावें अनुसरलें ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी फिरावें बहुतीं । माझी तों हे गती जाली आतां ॥३॥

॥ ३१ ॥

न बोलतां तुह्मां कळों न ये गुज । ह्मणउनी लाज सांडियेली ॥ १ ॥
आतां तुह्मां पुढें जोडितसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी बैसलों शेजारीं । करील तें हरी पाहों आतां ॥ ३ ॥

हे अभंग सरतात तों असा चमत्कार झाला कीं, पुष्पक नांवाच्या विमानांत बसून ब्रह्मा, विष्णु, महेश्वर प्रभृति सर्व देव, यक्ष, गंधर्व, किन्नर, अप्सरा वगैरे तेथें आल्या. तुकारामाचें शरीर दिव्य व तेजःपुंज ह्मणजे केवळ "ब्रह्मरूप" झालें. तुकारामाच्या अनुयायिजनांमध्यें व विमानांतल्या सुरलोकांमध्यें भगवन्नामस्मरणाचा व जयजयकाराचा एकसारखा मोठा घोष चालला होता. त्या देदीप्यमान विमान वगैरेच्या अद्भुत तेजानें तुकारामाच्या अनुयायिजनांचे नेत्र दिपून झांकून गेले. इतक्यांत देवांनीं तुकारामास सदेह विमानांत बसाविलें, आणि विमान चालू झालें. विष्णूनें तुकारामास आपलें क्षीराब्धींतील निवासस्थान व तेथील सर्व ऐश्वर्य दाखवून मग वैकुंठास जाऊं असें सांगितलें. हें ऐकून सर्व देवांनीं जयजयकार केला. विमानाच्या घंटांच्या नादानें सर्व आकाश भरून गेलें होतें. कांहीं वेळानें पुष्पकाचा प्रकाश गेल्यावर लोकांनीं नेत्र उघडून पाहिलें तों तुकाराम कोठेंच दिसत नाहीं असें पाहून सर्वजन शोकनिमग्न होऊन त्यांनीं व तें वर्तमान कळल्यावर तुकारामाची पत्नी जिजाबाई इनेंही नाना प्रकारें बहुतच विलाप केला तो ग्रंथीं लिहितां पुरवत नाहीं, असें महीपति ह्मणतो. याप्रमाणें तुकाराम गुप्त होण्याची हकीकत शाके

१५७१ विरोधिनाम संवत्सरीं फाल्गुन वद्य द्वितीयेस सकाळीं चार घटिका दिवसास चढून आली. तुकारामास महादेव व विठोबा या नांवानें दोन मुलगे होते, तेही अतिशय शोक करूं लागले. तुकाराम कदाचित् परत येईल म्हणून लोक इंद्रायणीच्या तीरीं संध्याकाळपावेतों बसले, नंतर उठून आपआपल्या घरीं चालते झाले. तुकारामाच्या दर्शनार्थ पुष्कळ दुरून यात्रा आली होती, तीही परतून जिकडच्या तिकडे माघारी गेली व देशांत चोहोंकडे पसरली. तेणेंकरून तुकारामाची वर लिहिलेली शेवटील हकीकत सर्व देशांत गावढगांव पसरली. त्याचवेळेस तुकाराम सदेह वैकुंठास गेला हें कित्येकांनीं खरें व कित्येकांनीं खोटें मानिलें. देहू मुक्कामीं विठोबाचा एक अत्यंत प्रेमळ, निःसीम, व लोकोपदेशक असा वाणेदार भक्त होऊन तो वर लिहिल्याप्रमाणें गुप्त झाला. तुकारामाच्या वंशांत जें डोहांतून निघालेलें पुस्तक आहे व ज्याची त्या कुळांत पूजा करीत असतात त्यांत "तुकोबांनीं तीर्थास प्रयाण केलें" असें साफ लिहिलें आहे. सदेह वैकुंठास गेल्याचें लिहिलें नाहीं. तुकाराम गेल्यानंतर त्याचे निःसीम चवदा भक्त निश्चयानें तेथें बसून राहिले. त्यांत रामेश्वरभट्ट, तुकारामाचा सख्खा बंधु कान्हया, गंगाजीमवाळ कडुसकर, कोंडोबा विप्र लोहकऱ्या, संताजी तेली जगनाडचा, व दुसरे ९ असामी इतके होते. हे एकवेळ आपणास तुकारामाचें दर्शन होईल तरच आपण प्राण राखूं, अशा निश्चयानें बसले. कान्हयानें त्या वेळेस शोकपर असे बहुत अभंग केले.

तुकारामाच्या नेहमींच्या वर्तनक्रमांत मित आहार, सर्वदा नामस्मरण, संसाराविषयीं व इतर ऐहिक गोष्टींविषयीं औदासीन्य, परोपकाराविषयीं तत्परता, द्रव्य, मान इत्यादिकांविषयीं निःस्पृहता, निरभिमानपणा, निर्भय, एकांतवासाची आवड, कीर्तनाची व भजनाची अतिशय प्रीति, उपदेश करण्याविषयीं सिद्धता, मुख्यत्वें सगुणरूपावर हातमयभाव, स्पष्टवक्तृत्व या गोष्टी ठळठळीत दिसून येतात. त्याचे परमभक्त असे एकंदर चौदा असामी होते ते कधींत नेहमीं त्याच्या मागें उभे राहून ध्रुपद म्हणत असत.

तुकाराम गुप्त होण्याच्या अगोदर त्यानें कांहीं दिवस असें आरंभिलें होतें कीं, या चौदाही असामींतून कोणास न पुसतां एकाएकीं उठून कोठें तरी चालतें व्हावें आणि कोणी विचारल्यास " आम्ही वैकुंठपुरास जातों " असें सांगावें. आणि कोणी कांहीं विचारलें तरी त्यानें अभंगरूप कवितेंतून उत्तर देऊं नये.

या प्रसंगीं त्या चौदा भक्तांचीं मनें अगदीं उद्विग्न होऊन ते सारखे तीन दिवस तेथें बसले होते.

---

१ "सकें १५७१ वीरोधीनाम संवछरः सीमगा वद्य द्वीतीयाः वार सोमवारः ते दीवसीः प्रातःथ काळीः तुकोबानीः तीर्थास प्रयाणं केलें शुभ भवतुः मंगळं" ॥ ॥ ॥ ॥ ॥

तों चवथ्या दिवशीं म्हणजे पंचमीच्या दिवशीं सकाळीं तुकारामाच्या हातचा नेहमींचा टाळ व त्याच्या अंगावरील गोदडी हीं दोन्हींवरून खालीं पडलीं. याखेरीज तुकारामाकडून कांहीं अभंगही लिहून आले ते वाचून सर्व भक्तलोक आनंद पावले. गोदडी व टाळ पाहण्याकरितां दूरदूरचे लोक बहुत आले होते ते तीं पाहून फार समाधान पावले आणि "हेंच तुकारामबावांचें दर्शन" असें ह्मणाले व त्यांस अद्भुत चमत्कार वाटला. कान्हयानें रामेश्वरभट्ट यास विचारिलें कीं, "तुकारामबावांची पुण्यतिथि कोणती धरावी?" रामेश्वरभट्ट ह्मणाला कीं, तुकाराम हा क्रियाकर्मविरहित होता आणि त्याच्या देहाचें येथें पतन नहोतां तो "तुका श्रीविष्णुलोकाप्रत गेला." तो जरी वैकुंठवासास फाल्गुन वद्य द्वितीयेस गेला तरी टाळ, गोदडी व निरोप हीं फाल्गुन वद्य पंचमीस परत आलीं; यास्तव ती पंचमीच पुण्यतिथि मानून त्या दिवशीं साधुसंत जमवून हरिकीर्तन करावें व ब्राह्मणसंतर्पण करावें. त्याचा देहपातच झाला नाहीं त्यापक्षीं त्याचें क्रियाकर्मांतर वगैरे कांहीं एक करण्यास अधिकार नाहीं. ही रामेश्वर भट्टाची योजना ऐकून सर्व संतमंडळीनें मोठा जयजयकार केला. त्यानंतर त्या पंचमीपासूनच मोठा उत्साह व ब्राह्मणभोजन चालू केलें. पंचमी व षष्ठी या दोन दिवशीं कीर्तनें झालीं आणि सप्तमीस ललित झालें. जिकडे तिकडे आनंद झाला. तुकारामाच्या पुण्यतिथीचा त्या वेळेस जो क्रम जसा चालू झाला तो क्रम तसा आजपर्यंत देहूस चालू आहे.

तुकारामास महादेव व विठोबा हे दोघे पुत्र होते हें पूर्वीं लिहिलेंच आहे. आणि त्याशिवाय तुकारामाची पत्नी जिजाबाई गर्भिणी होती ती पूर्णकाळ गेल्या नंतर प्रसूत होऊन पुत्र झाला त्याचें नांव नारायण असें ठेविलें. हा पुत्र दिसेंमासें मोठा झाला. पुढें राजा शिवाजी त्याच्या दर्शनार्थ येऊन त्यानें त्यास चार गांव इनाम दिले व विठोबाच्या देवळास शिखर बांधिलें. नारायणबावा हाही वयांत आल्यावर मोठा भगवद्भक्त निघाला. त्यास वैराग्य उपजलें त्याकाळीं त्यानें सर्वस्व दान करून बहुत दूरदूरच्या यात्रा केल्या. भागीरथीच्या अकरा कावडी रामेश्वरास नेऊन घातल्या. त्याच्या पाठांत तुकारामाचे बहुत अभंग असून तो कीर्तन करणारा फार चांगला होता.

तुकाराम गुप्त झाल्यानंतरही त्याच्या कितीएक परम भक्तांस त्याचें साक्षात् किंवा स्वप्नांत दर्शन झालें असें महीपति ह्मणतो. त्यांत त्याची येलवाडी येथील कन्या, एक संन्यासी, बहिणाबाई नांवाची एक ब्राह्मणी, सुदुंबऱ्यास राहणारा एक लिंगायत वाणी, निळोबा गोसावी पिंपळनेरकर यांस अशीं दर्शनें झाल्याचें महीपतीनें लिहिलें आहे.

---

# ॥ तुकारामाचे अभंग ॥

## ॥ श्रीविठ्ठलाय नमः ॥

॥ श्रीनिवृत्तिनाथाय नमः ॥ श्रीज्ञानेश्वराय नमः ॥

॥ श्रीराघवचैतन्यश्रीकेशवचैतन्य--॥

॥ श्रीबाबाचैतन्यसद्गुरुभ्यो नमः ॥

### मंगलाचरण---अभंग ६.

॥ १ ॥

समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरि वृत्ति राहो ॥ १ ॥
॥ध्रु.॥ आणीक न लगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ॥ध्रु॥
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें दुश्चित[1] झणी जडों देसी ॥ २ ॥
तुका ह्मणे त्याचें कळलें आम्हां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥ ३ ॥

॥ २ ॥

सुंदर तें ध्यान उभें[2] विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥ १ ॥
॥ध्रु.॥ तुळसीहार[3] गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर[4] तें चि रूप ॥ध्रु॥
मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें हें चि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ३ ॥

---

१ पं. तेथें चित्त झणी—२ उभा विटेवरी असें बहुतांच्या ह्मणण्यांत आहे, परंतु तसें कोणत्याही पुस्तकांत आढळत नाहीं.—३ दे. त. तुळसीचे हार.—गळां तुळसीहार हाही पाठ ऐकण्यांत आहे.—४ पं. आवडे निरंतर हेंचि ध्यान.

॥ ३ ॥

सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥ १ ॥
॥ध्रु०॥ गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ ध्रु ॥
विठो माउलिये हा चि वर देईं । संचरोनि[१] राहीं ह्रदयामाजी ॥ २ ॥
तुका ह्मणे कांहीं न मागें आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥ ३ ॥

॥ ४ ॥

राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥ १ ॥
॥ध्रु.॥ कस्तुरीमळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ ध्रु ॥
मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळ ही ॥ २ ॥
कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयानो ॥ ३ ॥
सकळ ही तुह्मी व्हा गे एकीसवा । तुका ह्मणे जीवा धीर नाहीं ॥ ४ ॥

॥ ५ ॥

कर कटावरी तुळसीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावीं हरी ॥ १ ॥
॥ध्रु.॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरी दावीं डोळां ॥ ध्रु ॥
कटीं पीतांबर कास मिरवली । दाखवीं वहिली ऐसी मूर्ती ॥ २ ॥
गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तें चि रूप ॥ ३ ॥
झुरोनि पांजरा होऊं पाहें आतां । येईं पंढरीनाथा भेटावया ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझी पुरवावी आस । विनंती उदास करूं नये ॥ ५ ॥

॥ ६ ॥

गरुडाचें वारिकें कासे पीतांबर । सांवळें मनोहर कैं देखेन ॥ १ ॥
॥ध्रु.॥ बरवया बरवंटा घनमेघ सांवळा । वैजयंतीमाळा गळां शोभे ॥ध्रु॥

१ पं. येऊनियां.

मुगुट माथां कोटि सूर्यांचा झळाळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ॥ २ ॥
ओतींव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ॥ ३ ॥
उद्धव अक्रूर उभे दोहींकडे । वर्णिती पवाडे सनकादिक ॥ ४ ॥
तुका ह्मणे नव्हे आणिकांसारिखा । तो चि माझा सखा पांडुरंग ॥ ५ ॥
॥ ६ ॥

---

## विराण्या---अभंग २५.

॥ ७ ॥

वाळो जन मज ह्मणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥
सांडूनि लौकिक जालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥
नाइकें वचन बोलतां या लोकां । ह्मणे जालों तुका हरिरता ॥ ३ ॥

॥ ८ ॥

आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । ह्मणोनि व्यभिचारा टेकलियें ॥ १ ॥
रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण त्यांनिराळी न गमे घडी ॥ २ ॥
नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रातलें अनंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ९ ॥

हाचि नेम आतां न फिरें माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥
घररिघी जालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥
बळियाचा अंगसंग जाला आतां । नाहीं भय चिंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १० ॥

नाहीं काम माझें काज तुह्मांसवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥ १ ॥
व्यभिचार माझा पडिला ठाउका । न सर ती लोकांमाजी जालें ॥ २ ॥
न धरावा लोभ कांहीं मजविशीं । जालें देवपिशी तुका ह्मणे ॥ ३ ॥

---

१ पं. क्षण एक निराळी.

॥ ११ ॥

विसरलें कुळ आपुला आचार । पती भावे दीर घर सोय ॥ १ ॥
सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माझें ॥६॥
मज आतां कोणी आळवाल झणी । तुका ह्मणे कानीं बहिरी जालें ॥३॥

॥ १२ ॥

न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ १ ॥
सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥ २॥
आळ आला होता आह्मी भांडखोरी । तुका ह्मणे खरी केली मात ॥३॥

॥ १३ ॥

दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंता पासूनिया ॥१॥
बळियाच्या आह्मी जालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जिवाच्या उदारा । जालों प्रीतिकरा गोविंदासी ॥३॥

॥ १४ ॥

क्षणभरी आह्मीं सोसिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥ १ ॥
सांडी मांडी मागें केल्या भरोवरी । अधिक चि परी दुःखाचिया ॥२॥
तुका ह्मणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ ३ ॥

॥ १५ ॥

आह्मां आह्मी आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठीं पोटीं कोणी दुजें ॥१॥
फावला एकांत एकविध भाव । हरि आह्मांसवें सर्व भोगी ॥ २ ॥
तुका ह्मणे अंगसंग एके ठायीं । असों जेथें नाहीं दुजें कोणी ॥ ३ ॥

॥ १६ ॥

सर्व सुख आह्मी भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥ १ ॥

याचसाठीं सांडियेले भरतार । रातलों या परपुरुषाशीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

॥ १७ ॥

एका जिवें आतां जिणें जालें दोहीं । वेगळीक कांहीं नव्हे आतां ॥ १ ॥
नारायणा आह्मां नाहीं वेगळीक । पुरविली हे भाक सांभाळिली ॥ २ ॥
तुका ह्मणे जालें सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ ३ ॥

॥ १८ ॥

हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥ १ ॥
सेवासुखें करूं विनोदवचन । आह्मी नारायण एकाएकीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जालों उदासीन । आपुल्या आधीन केला पति ॥ ३ ॥

॥ १९ ॥

मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयानो ॥ १ ॥
न साहवे तुह्मां या जनाची कूट । बोलती वाईट ओखटें तें ॥ २ ॥
तुका ह्मणे जालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आह्मी ॥ ३ ॥

॥ २० ॥

शिकविलें तुह्मीं तें राहे तोंवरी । मज आणि हरी वियोग तों ॥ १ ॥
प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥ २ ॥
तुका ह्मणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ ३ ॥

॥ २१ ॥

सांगतों तें तुह्मी अइकावें कानीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ १ ॥

१ त. आपुलें.—२ पं. माजी.

जोंवरी या तुह्मां मागिलांची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥ २ ॥
तुका ह्मणे काय वांयांविण धिंद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ ३ ॥

॥ २२ ॥

आजिवरी तुह्मां आह्मां नेणपण । कौतुकें खेळणें संग होता ॥ १ ॥
आतां अनावर जालें अगुणाची । करूं नये तें चि करीं सुखें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां बुडविलीं दोन्ही । कुळें एक मनीं नारायण ॥ ३ ॥

॥ २३ ॥

सासुरियां वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावें चि ॥ १ ॥
सांडवर कोणी न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥ २ ॥
न व्हावी ते जाली आमुची भंडाई । तुका ह्मणे काई लाजों आतां ॥ ३ ॥

॥ २४ ॥

मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ १ ॥
आतां तुह्मी पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वांयांविण ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी भयाभीत नारी । कैसी संग सरी तुह्मां आह्मां ॥ ३ ॥

॥ २५ ॥

परपुरूषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ १ ॥
संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनि मागुतें पाहूं नये ॥ २ ॥
तुका ह्मणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपासोई[1] ॥ ३ ॥

॥ २६ ॥

अइकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडा या सोई भ्रताराची ॥ १ ॥
नव्हे आराणुक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥ २ ॥

---

१ प. दीपावरी.

तुका ह्मणे मन करावें कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥ ३ ॥

॥ २७ ॥

आहांच वाहांच आंत वरी दोन्ही । न लगा गडणी आह्मां तैसा ॥ १ ॥
भेउं नये तेथें भेउसावें कोणा । आवरूनि मना वंद्य व्हावा ॥ २ ॥
तुका ह्मणे कांहीं अभ्यासावांचुनी । नव्हे हे करणी सकळांची ॥ ३ ॥

॥ २८ ॥

बहुतांच्या आह्मी न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥ १ ॥
विचार करितां वांयां जाय काळ । लटिकें तें मूळ फजितीचें ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥ ३ ॥

॥ २९ ॥

त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा । कठिण हें जिवा तोंचिवरी ॥ १ ॥
मागिल्यांनें दुःख व्यापीं नेदी अंगा । अंतर हें गंगा नेदी पुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्वसिद्धी हा संपन्न । जाणती महिमान श्रुति पुरें ॥ ३ ॥

॥ ३० ॥

न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ १ ॥
मानेल त्या तुह्मी अइका स्वभावें । मी तों माझ्याभावें अनुसरलें ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी सिणलें बहुतीं । माझी तों हे गती जाली आतां ॥ ३ ॥

॥ ३१ ॥

न बोलतां तुह्मां कळों नये गुज । ह्मणउनी लाज सांडियेली ॥ १ ॥
आतां तुह्मां पुढें जोडीनसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी बैसलों शेजारीं । करील तें हरी पाहों आतां ॥ ३ ॥

॥ २५ ॥

---

॥ ३२ ॥

नये जरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥ १ ॥
॥ध्रु.॥ नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल । येइल तैसा बोल रामकृष्ण ॥ध्रु॥
देवापाशीं मागें आवडीची भक्ति । विश्वासेंशीं प्रीति भावबळें ॥ २ ॥
तुका ह्मणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिस ॥ ३ ॥

॥ ३३ ॥

सावध जालों सावध जालों । हरिच्या आलों जागरणा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेथें वैष्णवांचे भार । जयजयकार गर्जतसे ॥ ध्रु ॥
पळोनियां गेली झोप । होतें पाप आड तें ॥ २ ॥
तुका ह्मणे तया ठाया । ओल छाया कृपेची ॥ ३ ॥

॥ ३४ ॥

आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ॥ १ ॥
॥ध्रु.॥ कुळीं कन्यापुत्र होतीं जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥ध्रु॥
गीता भागवत करिती श्रवण । आणीक चिंतन विठोबाचें ॥ २ ॥
तुका ह्मणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥ ३ ॥

॥ ३५ ॥

अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ ध्रु ॥
आपुल्या वैभवें । शृंगारावें निर्मळ[1] ॥ २ ॥
तुका ह्मणे जेवी सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥ ३ ॥

---

१ पं. अखंड.

॥ ३६ ॥

सुखें बोळव दावी गोहा । माझें दुःख नेणा पाहा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ आवडीचा मारिला वेडा । होय होय कैसा ह्मणे भिडा ॥छ॥
निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तानि ॥ २ ॥
गेले वारीं तुह्मीं आणिली साकर । सातदी गेली साडेदहा शेर ॥ ३ ॥
अखंड मज पोटाची व्यथा । दुधभात साकर तूप पथ्या ॥ ४ ॥
दो पाहरा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपती ॥ ५ ॥
नीज नये घाली फुलें । जवळीं न साहती मुलें ॥ ६ ॥
अंगीं चंदन लाविनें भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ७ ॥
हाड गळोनि आलें मास । माझें दुःख तुह्मां नेणवे कैसें ॥ ८ ॥
तुका ह्मणे जिना गाढव केला । मेलियावरि नरका नेला ॥ ९ ॥

॥ ३७ ॥

पावलें पावलें तुझें आह्मां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥
॥ध्रु.॥ जेथें तेथें देखें तुझी च पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥छ॥
भेदाभेदमतें भ्रमाचे संवाद । आह्मां नको वाद त्यांशीं देऊं ॥ २ ॥
तुका ह्मणे अणु तुजविण नाहीं । नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥ ३ ॥

॥ ३८ ॥

वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्वकर्मा होळी करुनी सांडूं ॥ १ ॥
॥ध्रु.॥ अमुप हें गांठीं बांधूं भांडवल । अनाथा विठ्ठल आह्मां जोगा ॥छ॥
अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥ २ ॥
जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥ ३ ॥

१ पं. साकर पथ्या.—२ पं. सात दिवसा दाहा शेर.

गेले पुढें त्यांचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आह्मी ॥ ४ ॥
तुका ह्मणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥ ५ ॥

॥ ३९ ॥

जेविले ते संत मागें उष्टावळी । अवघ्या पत्रावळी करुनी झाडा ॥१॥
॥ध्रु.॥ सोवळ्या ओंवळ्या राहिलों निराळा॥पासूनि सकळां अवघ्यां दुरी॥ध्रु॥
परें परतें मज न लगे सांगावें । हें तों देवें बरें शिकविलें ॥ २ ॥
दुसऱ्यातें आह्मी नाहीं आतळत । जाणोनि संकेत उभा असे ॥ ३ ॥
येथें कोणीं कांहीं न धरावी शंका । मज चाड एका भोजनाची ॥ ४ ॥
लांचावला तुका मारितसे झड । पुरविलें कोड नारायणें ॥ ५ ॥

॥ ४० ॥

देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥१॥
॥ध्रु.॥ ब्रह्मादिकांसि हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ध्रु॥
अवघियां पुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ २ ॥
इच्छादानी येथें वळला समर्थ । अवघे चि आर्त पुरवितो ॥ ३ ॥
सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ॥ ४ ॥
तुका ह्मणे पाक लक्षुमीच्या हातें । कामारीसांगातें निरुपम ॥ ५ ॥

॥ ४१ ॥

अवगुणांचे हातीं । आहे अवघी फजीती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिकें गोड ॥ ध्रु ॥
विष तांब्या वाटी । भरली लावूं नये होटीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भाव । शुद्ध बरा सोंग वाव ॥ ३ ॥

---

१ पं. पुढें गेले.

॥ ४२ ॥

हरीच्या जागरणा । जातां कां रे नये मना ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कोठें पाहासील तुटी । आयुष्य वेचे फुकासाटीं ॥ छ ॥

ज्यांची तुज गुंती । ते तों मोकलिती अंतीं ॥ २ ॥

तुका ह्मणे बरा । लाभ काय तो विचारा ॥ ३ ॥

॥ ४३ ॥

धर्माची तूं मूर्ती । पाप पुण्य तुझे हातीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा ॥ छ ॥

करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥ २ ॥

जिवींच्या जीवना । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

॥ ४४ ॥

ब्रह्मादिक जया लाभासि ठेंगणे । बळिये आह्मी भले शरणागत ॥ १ ॥

॥ध्रु.॥ कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । झाला पद्मनाभ सेवाऋणी ॥छ॥

कामधेनूचिया क्षीरा पार नाहीं । इच्छेचिये वाही वरुषावें ॥ २ ॥

बैसलिये ठायीं लागलें भरतें । त्रिपुटीवरतें भेदी ऐसें ॥ ३ ॥

हरि नाहीं आह्मा विष्णुदासां जगीं । नारायण अंगीं विसावला ॥ ४ ॥

तुका ह्मणे बहु लाटे हें भोजन । नाहीं रिता कोण राहत राहों ॥ ५ ॥

॥ ४५ ॥

दुजें खंडे तरी । उरला तो अवघा हरि ॥

आपणाबाहेरी । न लगे ठाव धुंडावा ॥ १ ॥

॥ धु. ॥ इतुलें जाणावया जाणा । कोंडें तरी मनें मना ॥

१ पं. केला.

पारधीच्या खुणा । जाणंतें चि साधावें ॥ ध्रु ॥
देह आधीं काय खरा । देहसंबंधपसारा ॥
बुजगावणें चोरा । रक्षणसें भासतें ॥ २ ॥
तुका करी जागा । नको वोसपूं वाउगा ॥
आहेसि तूं आगा । अंगीं डोळे उघडी ॥ ३ ॥

॥ ४६ ॥

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रमें अमंगळ ॥ १ ॥
॥ध्रु.॥ अइका जी तुह्मी भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ ध्रु
कोणा ही जिवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ २ ॥
तुका ह्मणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ३

॥ ४७ ॥

आह्मी तरी आस । जालों टाकोनि उदास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥ ध्रु ॥
भलते ठायीं पडों । देह तुरंगीं हा चढो ॥ २ ॥
तुमचें तुह्मांपाशीं । आह्मी आहों जैसीं तैसीं ॥ ३ ॥
गेले मानामान । सुखदुःखाचें खंडन ॥ ४ ॥
तुका ह्मणे चित्तीं । नाहीं वागवीत खंती ॥ ५ ॥

॥ ४८ ॥

निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥
॥ध्रु.॥ मज हें ही नाहीं तें ही नाहीं । वेगळा दोहीं पासुनी ॥ ध्रु
देहभोग भोगें घडे । जें जें जोडे तें बरें ॥ २ ॥

---

१ पं. जाणे तेणेंचि साधाव्या.—२. दे. त. चाचपूं.—३ त. भेदाभेदश्रम.

अवघें पात्र नारायणीं ॥ जनार्दनीं तुक्याचें ॥ ४ ॥

॥ ४९ ॥

जन विजन जालें आह्मां । विठ्ठलनामा प्रमाणें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाहें तिकडे बापमाय । विठ्ठल आहे रखुमाई ॥छ॥
वन पट्टण एकभाव । अवघा ठाव सरता जाला ॥ २ ॥
आठव नाहीं सुखदुःखा । नाचे तुका कौतुकें ॥ ३ ॥

॥ ५० ॥

हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥छ॥
मोहरा होय तोचि अंगें । सूत न जळे ज्याचे संगें ॥ २ ॥
तुका ह्मणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥ ३ ॥

॥ ५१ ॥

आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा संताचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥छ॥
तीर्थे पर्वकाळ । अवघीं पायांपें सकळ ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ३ ॥

॥ ५२ ॥

माझिया मीपणा । जाला यावरी उगाणा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसविलें अंग ॥छ॥
टाळिलें निमित्त । फार थोडें घात हित ॥ २ ॥
यावें कामावरी । तुका ह्मणे नाहीं उरी ॥ ३ ॥

॥ ५३ ॥

सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार आशा समूळ ॥

निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मोक्षाचें तीर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघीं जनें ॥
तीर्थांसी तीर्थ जाला तो चि एक । मोक्ष तेणें दर्शनें ॥ध्रु॥
मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळा भूषणांसी ॥
हरिच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥ २ ॥
तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची ॥
तुका ह्मणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥ ३ ॥

॥ ५४ ॥

आहे तें सकळ कृष्णा चि अर्पण । न कळतां मन दुजें भावी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणउनी पाठी लागतील भूतें । येती गवसीत पांचजणें ॥ध्रु॥
ज्याचें त्या वंचलें आठव न होतां । दंड या निमित्ताकारणें हा ॥ २ ॥
तुका ह्मणे काळें चेंपियेला गळा । मी मी वेळोवेळा करीतसे ॥ ३ ॥

॥ ५५ ॥

महारासि सिवे । कोपें ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥ध्रु॥
नातळे चांडाळ । त्याचा[1] अंतरीं विटाळ ॥ २ ॥
ज्याचा संग चित्तीं । तुका ह्मणे तो त्या यातीं ॥ ३ ॥

॥ ५६ ॥

तेलनीशीं रुसला वेडा । रागें कोरडें खातो भिडा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आपुलें हित आपण पाही । संकोच तो न धरी कांहीं ॥ध्रु॥
नावडे[2] लोकां टाकिला गोहो । बोडिलें डोकें सांडिला मोहो ॥ २ ॥

१. त. त्याचा.–२. पं. नाडिलें.

शेजारणीच्या गेली रागें । कुतऱ्यांनीं घर भरिलें मागें ॥ ३ ॥
पिसोरागें भाजिलें घर । नागविलें तें नेणे फार ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्यांच्या रागें । फेडिलें सावलें देखिलें जगें ॥ ५ ॥

॥ ५७ ॥

मज दास करी त्यांचा । संतदासांच्या दासांचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥ ध्रु ॥
नीचवृत्तिकाम । परी मुखीं तुझें नाम ॥ २ ॥
तुका ह्मणे सेवे । माझे संकल्प वेचावे ॥ ३ ॥

॥ ५८ ॥

सदा तळमळ । चित्ताचिये हळहळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचें दर्शन न व्हावें । शव असतां तो जिवे ॥ ध्रु ॥
कुशब्दाची वाणी । अमंगळविली वाणी ॥ २ ॥
नेणे शब्द पर । तुका ह्मणे परउपकार ॥ ३ ॥

॥ ५९ ॥

जया नाहीं नेम एकादशीव्रत । जाणावें तें प्रेत शव लोकीं ॥ १ ॥
॥ध्रु.॥ त्याचें वय नित्य काळ लेखीताहे । रागें दांत खाय करकरा ॥ध्रु॥
जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन । नाहीं तें स्मशान गृह जाणां ॥ २ ॥
जये कुळीं नाहीं एक ही वैष्णव । त्याचा बुडे भवनदीतारा ॥ ३ ॥
विठोबाचें नाम नुच्चारी जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड रजकांचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्याचे काष्ठ हातपाय । कीर्तना नव जाय हरीचिया ॥ ५ ॥

---

१ पं. पिसाभेणें.— २ पं. त्याचे दिवस.— ३ पं. चर्मकाचें.— ४ पं. हरीच्या जो.

॥ ६० ॥

आह्मी सदैव सुडके । जवळीं येतां चोर धाके ॥
जाऊं पुढी भिकें । कुतरीं घर राखती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नांदणूक ऐसी सांगा । नाहीं तरी वांयां भागा ॥
थोरपण अंगा । तरी ऐसें आणावें ॥ ध्रु ॥
अक्षय साचार । केलें सायासांनीं घर ॥
एरंडासिंवार । दुजा भार न साहती ॥ २ ॥
धन कण घरोघरीं । पोट भरे भिकेवरी ॥
जतन तीं करी । कोण गुरें वासरें ॥ ३ ॥
जाली सकळ निश्चिंती । भांडवल शेण माती ॥
झळझळीत भिंती । वृंदावनें तुळसीचीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे देवा । अवघा निरविला[1] हेवा ॥
कुटुंबाची सेवा । तो चि करी आमुच्या ॥ ५ ॥

॥ ६१ ॥

पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥
॥ध्रु.॥ न करितां परनिंदा परद्रव्य[2] अभिलाष। काय तुमचें यास वेचे सांगा ॥ध्रु॥
बैसलिये ठायीं ह्मणतां रामराम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥ २ ॥
संताचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ३ ॥
खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेचे यास ऐसें[3] सांगा ॥४॥
तुका ह्मणे देव जोडे याचसाटीं। आणीक ते आटी न लगे कांहीं ॥ ६ ॥

---

१ पं. निरसला.— २ पं. द्रव्य.— ३ पं. तुमचें.

॥ ६२ ॥

शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मुखीं अमृताची वाणी । देह वेचावा कारणीं ॥ ध्रु ॥

सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥ २ ॥

तुका ह्मणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ३ ॥

॥ ६३ ॥

चित्त समाधानें । तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ बहु खोटा अतिशय । जाणां भले सांगों काय ॥ ध्रु ॥

मनाच्या तळमळें । चंदनें ही अंग पोळे ॥ २ ॥

तुका ह्मणे तुजा । उपचार पीडा पूजा ॥ ३ ॥

॥ ६४ ॥

परिमळ ह्मण चोळूं नये फूल । खाऊं नये मूळ आवडतें ॥ १ ॥+

मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥

कर्मफळ ह्मणुनी इच्छूं नये काम । तुका ह्मणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

॥ ६५ ॥

माया तें चि ब्रह्म ब्रह्म तें चि माया । अंग आनि छाया तया परी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणांतळीं हारपते ॥ ध्रु ॥

दुजें नाहीं तेथें बळ कोणामाळीं । आणिक ते आटी विचाराची ॥ २ ॥

तुका ह्मणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैसीं तैसीं ॥ ३ ॥

॥ ६६ ॥

दुर्जनासि करी साह्य । तो ही लोंहे दंड हे ॥ १ ॥

१ पं. देवानें.—२ त. तीच्या.—३ हें. दंड हे आहे.

+ “काय एक नव्हे भक्तिता अंतरीं । कासवीचे परी वेळोवेळां” ॥ हें कडवें पंढरपूरच्या प्रतींत अधिक आहे.

॥ ध्रु. ॥ शिंदळीच्या कुंटणी वाटा । संग खोटा खोटयाचा ॥ ध्रु ॥
येर येरा कांचणी भेटे । आगी उठे तेथूनी ॥ २ ॥
तुका ह्मणे कापूं नाकें । पुढें आणिकें शिकविती ॥ ३ ॥

॥ ६७ ॥

वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चिती देव नाहीं ॥ १
॥ ध्रु. ॥ भाडेकरी वाहे पाठीवरी भार । अंतरींचें सार लाभ नाहीं ॥ध्रु
देवपूजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥ २ ॥
तुका ह्मणे फळ चिंतिती आदरें । लाघव हे चार शिंदळीचे ॥ ३ ॥

॥ ६८ ॥

पवित्र सोंवळीं । एक तीं च भूमंडळीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥ ध्रु ॥
तीं च भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धनवित्तें ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । त्यांची केल्या पावे सेवा ॥ ३ ॥

॥ ६९ ॥

आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करी इंद्रियांची सेवा । पाहे आवडीचा हेवा ॥ ध्रु ॥
भ्रमलें चावळे । तैसें उचित न कळे ॥ २ ॥
तुका ह्मणे विषें । अन्न नाशियेलें जैसें ॥ ३ ॥

॥ ७० ॥

ढेकरें जेवण दिसे साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हे ही बोल ते ही बोल । कोरडे फोल रुचीविण ॥ ध्रु ॥
गव्हांचिया होती परी । फके वरी खाऊं नये ॥ २ ॥
तुका ह्मणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ॥ ३ ॥

॥ ७१ ॥

करावी ते पूजा मनें चि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥ १ ॥
॥ध्रु.॥ कळावें तयासि कळे अंतरींचें । कारण तें साचें साचा अंगीं ॥ध्रु.॥
अतिशया अंतीं लाभ किंवा घात । फळ देतें चित्त बीजा ऐसें ॥ २ ॥
तुका ह्मणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥ ३ ॥

॥ ७२ ॥

एकादशीव्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ १ ॥
॥ध्रु.॥ काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥ ध्रु.॥
हरिहरां नाहीं बोटभरी वाती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ३ ॥

॥ ७३ ॥

नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हा चि धंदा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥ ध्रु. ॥
रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥ २ ॥
तुका ह्मणे आत्महत्या रे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥ ३ ॥

॥ ७४ ॥

स्मशान ते भूमि प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी ॥ १ ॥
॥ध्रु.॥ भरतील पोट श्वानाचिया परी । वस्ति दिली घरीं यमदूतां ॥ ध्रु.॥
अपूज्य लिंग तेथें अतित न घे थारा । ऐसी वस्ती चोरां कंटकांची ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं ठावी स्थिति मती । यमाची निश्चिती कुळवाडी ॥ ३ ॥

॥ ७५ ॥

आहाकटा त्याचे करिती पितर । वंशीं दुराचार पुत्र जाला ॥ १ ॥

॥धु.॥ गळे चि ना गर्भ नव्हे चि कां वांज। माता त्याची लाजलावा पापी ॥ध्रु॥
परपीडे परद्वारीं सावधान। सादर चि मन अभाग्याचें ॥ २ ॥
न मिळतां निंदा चाहडी उपवास। संग्रहावे दोष सकळ ही ॥ ३ ॥
परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचें तें कीडें दुग्धीं मरे ॥ ४ ॥
तुका ह्मणे विटाळाची च तो मूर्ति। दया क्षमा शांति नातळे त्या ॥ ५ ॥

॥ ७६ ॥

श्वान शीघ्रकोपी। आपणा घातकर पापी ॥ १ ॥
॥ध्रु.॥ नाहीं भीड आणि धीर। उपदेश न जिरे क्षीर ॥ ध्रु ॥
माणसांसि भुंके। विजातीनें द्यावे थुंके ॥ २ ॥
तुका ह्मणे चित्त। मळिण करा तें फजित ॥ ३ ॥

॥ ७७ ॥

देखोनि हरखली अंड। पुत्र जाला ह्मणे रांड ॥
तंव तो जाला भांड। चाहाड चोर शिंदळ ॥ १ ॥
॥ध्रु.॥ जाय तिकडे पीडी लोकां। जोडी भांडवल थुंका ॥
थोर जाला चुका। वर कां नाहीं घातली ॥ ध्रु ॥
भूमि कांपे त्याच्या भारें। कुंभपाकाचीं शरीरें ॥
निष्ठुर उत्तरें[1]। पापदृष्टी मळिणचित्त ॥ २ ॥
दुराचारी तो चांडाळ। पापसांगातें विटाळ ॥
तुका ह्मणे खळ। ह्मणोनियां निषिद्ध तो ॥ ३ ॥

॥ ७८ ॥

नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर। घालूं तुज भार पांडुरंगा ॥ १ ॥

---

१. पं. बोले निष्ठुर उत्तरें.

नेणें राग वेळ काळ घात मात ॥ तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥
तुका ह्मणे मज चाड नाहीं जना ॥ तुज नारायणा वांचूनिया ॥ २ ॥

॥ ७९ ॥

माझी पाठ करा कवी । उट लावी दारोदार ॥ १ ॥
॥ध्रु.॥ तंव तया पारखी सिव । लाजे ठाव सांडितां ॥ ध्रु ॥
उष्टावळी करूनि जमा । कुंथुनि प्रेमा आंणितसे ॥ २ ॥
तुका ह्मणे बाहेरमुदी । आहा च गोविंदीं न सरती ॥ ३ ॥

॥ ८० ॥

उपाधीच्या नांवें घेतला सिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काशासाठीं हात भरूनि धुवावे । चालतिया गोवे मारगासि ॥ध्रु॥
काय नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें ते ते ठायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपेपर बोळविले ॥ ३ ॥

॥ ८१ ॥

योगाचें तें भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रियें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा जालिया ॥ ध्रु ॥
मिरासीचें ह्मूण सेत । नाहीं देत पीक उगें ॥ २ ॥
तुका ह्मणे उचित जाणां । उगीं सिणा काशाला ॥ ३ ॥

॥ ८२ ॥

न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तों हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥ ध्रु ॥
न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥ २ ॥
तुका ह्मणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ३ ॥

---

१ पं. आणितो.—२त्र. आप आणि पर.

॥ ८३ ॥

बाईल सवासिण आई ॥ आपण पितरांचे ठायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ थोर वेच जाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥ छ्र ॥
विषयांचे चर्वणीं । केली आयुष्याची गाळणी ॥ २ ॥
तुका ह्मणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥ ३ ॥

॥ ८४ ॥

दानें कांपे हात । नावडे तेविशीं मात ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कथी चावटीचे बोल । हिंग क्षीरीं मिथ्या फोल ॥ छ्र ॥
न वजती पाय । तीर्था ह्मणे वेचूं काय ॥ २ ॥
तुका ह्मणे मनीं नाहीं । न ये आकारातें कांहीं ॥ ३ ॥

॥ ८५ ॥

वळितें जें गाई । त्यासि फार लागे काई ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ निवे भावाच्या उत्तरीं । भलतें एके भणी वरी ॥ छ्र ॥
न लगती प्रकार । कांहीं मानाचा आदर ॥ २ ॥
सांडी थोरपणा । तुका ह्मणे सर्व दीना ॥ ३ ॥

॥ ८६ ॥

मैत्र केले महा बळी । कामा न येती अंतकाळीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आधीं घे रे रामनाम । सामा भरीं हा उत्तम ॥ छ्र ॥
नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥ २ ॥
धन मेळविलें कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥ ३ ॥
कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥ ४ ॥
तंववरि मिरविसी बळ । जंव आला नाहीं काळ ॥ ५ ॥

---

१ त. चरणीं.—२त. ये.

तुका ह्मणे बापा । चुकवीं चौऱ्याशींच्या खेपा ॥ ६ ॥

॥ ८७ ॥

कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका न ये ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तैसें मज नको करूं कमळापति । देई या संगति सज्जनांची ॥ ध्रु॥

तिनें पाचारिलें इल बा ह्मणोन । येरु पळे आण जाली आतां ॥ २ ॥

तुका ह्मणे येर येरा जें विच्छिन्न । तेथें वाढे सीण सुखा पोटीं ॥ ३ ॥

॥ ८८ ॥

सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वता एवढें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धरीं धरीं आठवण । मानीं संतांचें वचन ॥ ध्रु ॥

नेलें रात्रीनें तें अर्धें । बाळपण जराव्याधें ॥ २ ॥

तुका ह्मणे पुढा । घाणा जुंती जसा मूढा ॥ ३ ॥

। ८९ ॥

बोलायाचा त्यासीं । नको संबंध मानसीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जया घडली संतनिंदा । तुज विसरूनि गोविंदा ॥ ध्रु ॥

जळो त्याचें तोंड । नको दृष्टीपुढें भांड ॥ २ ॥

तुका ह्मणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥ ३ ॥

॥ ९० ॥

तांदुळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसे चि खळ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कां रे सिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥ ध्रु ॥

मानदंभासाठीं । केली अक्षरांची आटी ॥ २ ॥

तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ॥ ३ ॥

---

१ त. जाच चुकवीं या खेपा—२ पं. मान दंभ पोटासाठीं.

वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ ४ ॥
तुका ह्मणे चुकलें वर्म । केला अवघा चि अधर्म ॥ ५ ॥

॥ ९१ ॥

संवसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनी तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ध्रु.॥
बहुतां जन्मींचा जालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ २ ॥
वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ३ ॥
बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दिवस जालों कासाविस ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीननाथा ॥ ५ ॥

॥ ९२ ॥

भक्तऋणी देव बोलती पुराणें । निर्धार वचनें साच करीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मागें काय जाणों अइकिली वार्त्ता । कबिर सातें जातां घडिया वांटी ॥ध्रु.॥
माघारिया धन आणिलें घरासि । ने घे केला त्यासि त्याग तेणें ॥ २ ॥
नामदेवाचिया घरासि आणिलें । तेणें लुटविलें द्विजां हातीं ॥ ३ ॥
प्रत्यक्षासि काय द्यावें हें प्रमाण । व्यंकोबाचें ऋण फेडियेलें ॥ ४ ॥
बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥ ५ ॥
तुका ह्मणे नाहीं जयासि निर्धार । नाडला साचार तो चि एक ॥ ६ ॥

॥ ९३ ॥

भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगीं च अधर्म ॥ ध्रु. ॥
देव अंतरे तें पाप । खोटे उगवा संकल्प ॥ २ ॥

१ त. पं. खरीं—२ पं. एकोबाचें.

तुका ह्मणे भीड खोटी । लाभ विचारावा पोटीं ॥ ३ ॥

॥ ९४ ॥

भोरप्यानें सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदि जगीं फांसे जैसे ॥ ध्रु ॥
ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ॥ २ ॥
खाटिक हा स्नेहवादें पशु पाळी । कापावया नळी तया साठीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैसा भला मी लोकांत । परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ९५ ॥

गेली वीरसरी । मग त्यासि रांड मारी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मग नये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ॥ ध्रु ॥
भंगलिया चित्ता । न ये काशानें सांदितां ॥ २ ॥
तुका ह्मणे धीर । भंगलिया पाठीं कीर ॥ ३ ॥

॥ ९६ ॥

युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देइल भेटी ॥ ध्रु ॥
न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । ध्यावें वनांतर भस्म दंड ॥ २ ॥
तुका ह्मणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामाविण ॥ ३ ॥

॥ ९७ ॥

कंठीं कृष्णमणी । नाहीं अशुभ ते वाणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हो का नर अथवा नारी । रांड तयें नावें खरी ॥ ध्रु ॥
नाहीं हातीं दान । शूरपणाचें कांकण ॥ २ ॥

---

१ पं. विचाराच्या पोटीं.—२ पं. सांधितां.—३ पं. (छापी प्रतींत) कर.—४ पं. पुरुष.

वाळियेली संतीं । केली बोडोनि फजिती ॥ ३ ॥
तुका ह्मणे ताळा । नाहीं त्याची अवकळा ॥ ४ ॥

॥ ९८ ॥

माया ब्रह्म ऐसें ह्मणती धर्मठक । आपणासरिसे लोक नागविले ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विषयीं लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नांगा होऊनि फिरे ॥ छ
करूनी खातां पाक जिरे सुरण राई । करितां अतित्याई दुःख पावे ॥२॥
औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनियां गुळा दृष्टीपुढें ॥ ३ ॥
तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांजट बोलणीं वारा त्यांचीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे जयां पिंडाचें पाळण । न घडे नारायणभेट तयां ॥ ५ ॥

॥ ९९ ॥

मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ॥छ॥
संचित सांगातीं बोळवणें सवें । आचरलें द्यावें फळ तेणें ॥ २ ॥
तुका ह्मणे शेखी श्मशान तोंवरी । संबंध गोवरी अंगीं सवें ॥ ३ ॥

॥ १०० ॥

गौळीयाची नाकपिरें । कोणे पोरें चांगलीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ति ते ॥ छ ॥
काय उपास पडिले होते । कण्याभोंवते विदुराच्या ॥ २ ॥
तुका ह्मणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥ ३ ॥

॥ १०१ ॥

आतां तरी पुढें हा चि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥छ॥

१ पं. काय

हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥ २ ॥
तुका ह्मणे लाभें होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥ ३ ॥

॥ १०२ ॥

भक्ताविण देवा । कैंचें रूप घडे सेवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शोभविलें येर येरां । सोनें एके ठायीं हिरा ॥ ध्रु ॥
देवाविण भक्ता । कोण देता निष्कामता ॥ २ ॥
तुका ह्मणे बाळ । माता जैसें स्नेहजाळ ॥ ३ ॥

॥ १०३ ॥

विश्वाचा जनिता । ह्मणे यशोदेसि माता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा भक्तांचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥ ध्रु ॥
निष्काम निराळा । गोपी लाविंयेल्या चाळा ॥ २ ॥
तुका ह्मणे आलें । रूपा अव्यक्त चांगलें ॥ ३ ॥

॥ १०४ ॥

काय दिनकरा । केला कोंबडयानें खरा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कां हो ऐसा संत ठेवा । भार माझे माथां देवा ॥ ध्रु ॥
आडविलें दासीं । तरि कां मरती उपवासी ॥ २ ॥
तुका ह्मणे हातीं । काळा सकळ अनंतीं ॥ ३ ॥

॥ १०५ ॥

जेवितां ही धरी । नाक हागतिया परी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसियाचा करी चाळा । आपुली च अवकळा ॥ ध्रु ॥
सांडावें मांडावें । काय ऐसें नाहीं ठावें ॥ २ ॥

---

१ पं. शुद्धभावें.—२ पं. हित.—३ पं. करितां.

तुका ह्मणे करी । ताका दुधा एक सरी ॥ ३ ॥

॥ १०६ ॥

हो का पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कळों आलें खटपाळसें । शिवों नये लिंपों दोषें ॥ ध्रु ॥
फोडावें मडकें । मेलें लेखीं घायें एकें ॥ २ ॥
तुका ह्मणे त्यागें । विण चुकीजेना भोगें ॥ ३ ॥

॥ १०७ ॥

व्याख्यानिंण करी शोभनतांतडी । चार न गमडी करितसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कासया पाल्हाळ आणिकांचिं दर्वी । सांगतां नये मुखीं साखरेसि ध्रु
कुंथाच्या हुंकारें न देवेल पुष्टी । रूप दावी कोष्टी माजिग वरी ॥ २ ॥
तुका ह्मणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेंविण नका वाव घेऊं ॥ ३ ॥

॥ १०८ ॥

जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येर प्रिया पुत्र धना कोण लेखा । कांचनी तीं दुःखा पात्र शत्रु ध्रु
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्व धर्म हरिचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ३ ॥

॥ १०९ ॥

मान अपमान गोवे । अवघे गुंडूनी ठेवावे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें चि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ ध्रु ॥
शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥ २ ॥
आली ऊर्मी साहे । तुका ह्मणे थोडें आहे ॥ ३ ॥

१ पं. कुष्टी.

॥ ११० ॥

थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे जालिया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरलें तें ॥ छ ॥
अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥ २ ॥
तुका ह्मणे लटिकें पाहें । सांडीं देह अभिमान ॥ ३ ॥

॥ १११ ॥

आतां उघडीं डोळे । जरी अद्यापि न कळे ॥
तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मनुष्यदेहा ऐसा निध । साधिली ते साधे सिद्ध ॥
करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ छ ॥
नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलीकाचे द्वारीं ॥
कट धरूनियां करीं । उभाउभी पालवी ॥ २ ॥
तुका ह्मणे फुकासाठीं । पायीं घातली या मिठी ॥
होतो उठाउठी । लवकरी च उतार ॥ ३ ॥

॥ ११२ ॥

न करीं[१] संग राहें रे निश्चळ । लागों नेदीं मळ ममतेचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ या नांवें अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥ छ ॥
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पों[२] ही न ये वरी मन ॥ २ ॥
तुका ह्मणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या धारा आनंदाचा ॥ ३ ॥

॥ ११३ ॥

पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ १ ॥

---

१ पं. न करीं रे संग.—२ पं. संकल्पा ही वरी न ये मन.

॥ ध्रु. ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे ॥ ध्रु ॥
आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥ २ ॥
तुका ह्मणे पेठ । भूमिवरी हे वैकुंठ ॥ ३ ॥

॥ ११४ ॥

तिर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मिळालिया संतसंग । समर्पितां भलें अंग ॥ ध्रु ॥
तीर्थी भाव फळे । येथें आनाड तें वळे ॥ २ ॥
तुका ह्मणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥ ३ ॥

॥ ११५ ॥

घेऊनियां चक्र गदा । हा चि धंदा करी तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भक्ता राखे पायापासीं । दुर्जनासी संहारी ॥ ध्रु ॥
अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥ २ ॥
तुका ह्मणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥ ३ ॥

॥ ११६ ॥

देखोनि पुराणिकांची दाढी । रडे फुंदे नाक ओढी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ ध्रु ॥
आवरितां नावरे । खुर आठवी नेवरे ॥ २ ॥
बोलों नये मुखावाटां । ह्मणे होता त्यांचा तोटा ॥ ३ ॥
दोन्ही सिंगें चारी पाय । खुणा दावी ह्मणे हाय ॥ ४ ॥
मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥ ५ ॥
होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥ ६ ॥
तुका ह्मणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥ ७ ॥

॥ ११७ ॥

दुर्जनाची गंधी विष्टेचिया परी । देखोनियां दुरी व्हावें तया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अइका हो तुह्मी मात हे सज्जन । करूं संघष्टन नये बोलों ॥ छ ॥
दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ २ ॥
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळल्यापरी धांवे श्वान ॥ ३ ॥
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ४ ॥
तुका ह्मणे किती सांगावें पृथक । अंग कुंभीपाक दुर्जनाचें ॥ ५ ॥

॥ ११८ ॥

अतिवादी नव्हे शुद्धया बीजाचा । ओळखा जातीचा अंत्यज तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मानी जो ॥ छ ॥
तुका ह्मणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ २ ॥

॥ ११९ ॥

शब्दा नाहीं धीर । ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचें न व्हावें दर्शन । खळा पंगती भोजन ॥ छ ॥
संतास जो निंदी । अधम लोभासाठीं वंदी ॥ २ ॥
तुका ह्मणे पोटीं । भाव अणीक जया होटीं ॥ ३ ॥

॥ १२० ॥

चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शिंदळीच्या मागें विचितां पाडलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ॥ छ ॥
तुका ह्मणे भितों पुढिलिया दत्ता । ह्मणऊनि चिंता उपजली ॥ २ ॥

---

१. पं. अधम २. पं. अंगणीं.

॥ १२१ ॥

मांडवाच्या दारा । पुढें आणिला ह्मातारा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणे नवरी आणा रांड । जाळा नवऱ्याचें तोंड ॥ ध्रु ॥
समय न कळे । काय उपयोगीं ये वेळे ॥ २ ॥
तुका ह्मणे खरा । येथूनिया दूर करा ॥ ३ ॥

॥ १२२ ॥

कांहीं नित्यनेमाविण । अन्न खाय तो[1] चि श्वान ॥
वांयां मनुष्यपण । भार वाहे तो वृषभ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचा होय भूमी भार । नेणे यातीचा आचार ॥
जाला दावेदार । भोगवी अघोर पितरांसि ॥ ध्रु ॥
अखंड अशुभ वाणी । खरें न बोले चि स्वप्नीं[2] ॥
पापी तयाहुनी । आणिक नाहीं दुसरा ॥ २ ॥
पोट पोसी एकला । भूतीं दया नाहीं ज्याला ॥
पाठीं लागे आल्या । अतिताचे दाराशीं ॥ ३ ॥
कांहीं संतांचें पूजन । न घडे तीर्थांचें भ्रमण ॥
यमाचा आंदण । सीण थोर पावेल ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी ॥
देवा विसरूनी । गेलीं ह्मणतां मी माझें ॥ ५ ॥

॥ १२३ ॥

कन्या गो करी कथेचा विकरा ॥ चांडाळ तो खरा तया नांवें ॥ १

---

१ त. दे. तो. श्वान.—२ तं. दे. न बोले स्वप्नीं.

गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण। यातिशीं कारण नाहीं देवा ॥ २ ॥*
आशाबद्ध नये करूं तें करिती । तुका ह्मणे जाती नरकामधीं ॥ ३ ॥

॥ १२४ ॥

हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एक एकाचे ह्रुदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ॥ ध्रु ॥
भेदकासी नाड । एक वेलांटी च आड ॥ २ ॥
उजवें वामांग । तुका ह्मणे एक चि अंग ॥ ३ ॥

॥ १२५ ॥

वक्त्या आधीं मान । गंध अक्षता पूजन ।
श्रोता यति जाला जाण । तरी त्या नाहीं उचित ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शीर सर्वांगा प्रमाण । यथाविधि कर चरण ।
धर्माचें पाळण । सकळीं सत्य करावें ॥ ध्रु ॥
पट्ट पुत्र सांभाळी । पिता त्याची आज्ञा पाळी ।
प्रमाण सकळीं । ते मर्यादा करावी ॥ २ ॥
वरासनीं पाषाण । तो न मानावा सामान्य ।
येर उपकरणें । सोनियाचीं परी तीं नीच ॥ ३ ॥
सोनियाचा पैंजण । मुगुटमणि केला हीण ।
जयाचें कारण । तया ठायीं अळंकार ॥ ४ ॥
सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम त्याचें धन ।
तुका ह्मणे जाण । तुह्मी संत तदर्थीं ॥ ५ ॥

* पं. "जे जैसें करिती ते तैसें पावती । भोग ते भोगिती केलें कर्मी" ॥ हें कडवें जास्ती आहे.— १ त. अधिकार.— २ त. दे. पट्टपुत्रा सांभाळी.

॥ १२६ ॥

घरीं रांडा पोरें मरती उपवासीं । सांगे लोकांपासीं थोरपण ॥ १ ॥
नेऊनियां घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय चुकावूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जाणों त्या प्रमाण । ठकावे हे जन तैसे नहों ॥ ३ ॥

## जोहार-अभंग ३.

॥ १२७ ॥

मायबाप[1] जोहार । सारा साधावया आलों वेसकर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मागील पुढील करा झाडा । नाहीं तरी खोडा घालिती जी ॥ ध्रु
फांकूं नका रुजू जालिया वांचून । सांगा जी कोण घेरीं तीं धण्या ॥२
आजि मायबाप करा तडामोडी । उद्यां कोणी घडी राहेना हो ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं न चले ते बोली । अखरते सालीं झाडा घेती ॥ ४ ॥

॥ १२८ ॥

येऊं द्या जी कांहीं वेसकरास । आंतून बाहेर वोजेचा धास ॥ १ ॥
जों यावें तों हात चि रिता नाहीं । कधीं तरीं कांहीं द्यावें घ्यावें ॥ २ ॥
तुका ह्मणे उद्यां लावीन ह्मनेरा[3] । जे हे दारोदारांभोंवतीं फिरा ॥ ३ ॥

॥ १२९ ॥

देतीं घेती परज गेली । घर खालीं करूनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धांवणियाचे न पडे हातीं । खादली राती काळोखी ॥ ध्रु ॥
अवघियांचें अवघें नेलें । कांहीं ठेविलें नाहीं मागें ॥ २ ॥
सोंग संपादुनि दाविला भाव । गेला आधीं माव वारि होती ॥ ३ ॥
घराकडे पाहूं नये सें चि जालें । अमानत केलें दिवाणांत ॥ ४ ॥
आतां तुका कोणा न लगे चि हातीं । जाली ते निश्चितीं बोलों नये ॥५
॥ ३ ॥

---

१त. जो हार माय बाप जोहार. पं. मायबाप जोहार जी जोहार.—२ पं. घरिती धण्या.—३ पं. मनेरा

॥ १३० ॥

शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षितीला हो दिसां सातां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उठाउठी करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥ ध्रु ॥
त्वरा जाली गरुड टाकियेला मागें। द्रौपदीच्या लागें नारायणें ॥ २ ॥
तुका ह्मणे करी बहु च तांतडी । प्रेमाची आवडी लोभ फार ॥ ३ ॥

॥ १३१ ॥

बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वाट दावी तया न लगे रुसावें। अनित्याई जीवें नाश पावे ॥ ध्रु ॥
निंब दिला रोग तुटाया अंतरीं । पोभाळितां वरि आंत चरे ॥ २ ॥
तुका ह्मणे हित देखण्यासि कळे । पडती आंधळे कूपा माजी ॥ ३ ॥

॥ १३२ ॥

माकडें मुठीं धरिलें फुटाणे । गुंतलें तें नेणे हात तेथें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय तो तयाचा लेखावा अन्याय। हित नेणे काय आपुलें तें ॥ ध्रु॥
शुकें नळिकेशीं गोवियेलें पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥ २ ॥
तुका ह्मणे एक ऐसे पशुजीव । न चले उपाव कांहीं तेथें ॥ ३ ॥

॥ १३३ ॥

हरि तूं निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठिण ।
नव्हे तें करिसी आन । कवणें नाहीं केलें तें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व ।
पुत्र पत्नी जीव । डोंबाधरीं वोपविलीं ॥ ध्रु ॥
नळा दमयंतीचा योग । विघडिला त्यांचा संग ।
ऐसें जाणे जग । पुराणें ही बोलतीं ॥ २ ॥

---

१ पं. लोभापर. त. लोभपर.—२ पं. शिणावें.

राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दयाभूर्ती ।
तुळविलें अंतीं । तुळें मास तयाचें ॥ ३ ॥
कर्ण भिडतां समरंगणीं । बाणीं व्यापियेला रणीं ।
मागसी पाडोनी । तेथें दांत तयाचे ॥ ४ ॥
बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिला कर ।
करूनि काहार । तो पाताळीं घातला ॥ ५ ॥
श्रियाळाच्या घरीं । धरणें मांडिलें मुरारी ।
मारविलें करीं । त्याचें बाळ त्याहातीं ॥ ६ ॥
तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गति ।
ठांव नाहीं पुढती । तुका ह्मणे करिसी तें ॥ ७ ॥

॥ १३४ ॥

चाल केलासी मोकळा । बोल विठल वेळोवेळां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळीं वसे ॥ ध्रु ॥
पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी ॥ २ ॥
केलीं मागें नको राहों । तुज जमान आह्मी आहों ॥ ३ ॥
करीं तुज जीं करवती । आणिक नामें घेऊं किती ॥ ४ ॥
तुका ह्मणे काळा । रीग नाहीं निघती ज्वाळा ॥ ५ ॥

॥ १३५ ॥

बाळ बापा ह्मणे काका । तरी तो कां निपराध ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठल ॥ ध्रु ॥
साकरेसि ह्मणतां धोंडा । तरी कां तोंडा न रुचे ॥ २ ॥
तुका ह्मणे आरुष बोल । नव्हे वोल आहाच ॥ ३ ॥

---

१ पं. दयाळु भूर्ती.—२ पं. त्रासियेला.

॥ १४० ॥

अझुनि कां थीर पोरा न ह्मणसी किर । भकोनियां धीर लाजे चुर निघाला ॥ १ ॥
ध्रु. मोकळा होतासि कां रे पडिलासि डाई । वरिलांचा भार आतां उतरेसा नाहीं ॥
मेळवूनि मेळा एकाएकीं दिली मिठी । कवळिलें एक बहु वैसविलीं पाठीं ॥ २ ॥
तळील तें वरी वरील तें येतें तळा । न सुटे तोंवरी येथें गुंतलिया खेळा ॥ ३ ॥
सांडितां ठाव पुढें सईल धरी हात । चढेल तो पडेल ऐसी एका रे मात ॥ ४ ॥
तुका ह्मणे किती आवरावे हात पाय । न खेळावें तोंच वरें वरी न ये डाय ॥ ५ ॥

## कोडें---अभंग २.

॥ १४१ ॥

कोडें रे कोडें एका हें कोडें । उगवूनि फार राहे गुंतोनियां थोडें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पुसतसे सांगा मी हें माझें ऐसें काई ।
रुसूं नका नुगवे तो ह्मवे आपुली आई ॥ ध्रु ॥
सांगतों हें मूळ कांहीं न धरावी खंती । जालें जीवों मेलें मरो प्रारब्धा हातीं ॥ २ ॥
तुका ह्मणे अभिमान सांडावा सकळीं ॥ नये अंगावरी वांयां येऊं देऊं कळीं ॥ ३ ॥

॥ १४२ ॥

नुगवे तें उगवून सांगितलें भाई । घालुनियां ताळा आतां शुद्ध राखा घाई ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां कांहीं नाहीं राहिलें । म्यां आपणा आपण पाहिलें ॥ ध्रु ॥
कमाईस मोल येथें नका रीस मानूं । निवडूं नये मज कोणा येथें वानूं ॥ २ ॥
तुका ह्मणे पदोपदीं कान्हो वनमाळी । जयजत मग सेवटिला एक वेळीं ॥ ३ ॥

॥ १४३ ॥

हेरूप आनंदाचा । घोष करा हरिनामाचा ।
कोण हा दैवाचा । भाग पावे येथील ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पुण्य पाहिजे बहुत । जन्मांतरींचें संचित ।

---

१ दे. ज्यालें ज्यवो. त. ज्यालें जेवो.—२ दे. त. हारस.—३ दे. उरी कांहीं.

॥ २७३ ॥

रडोनियां मान । कोण मागतां भूषण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देवें दिलें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥ ध्रु ॥
लावितां लावणी । विके भीके केज्या दानी ॥ २ ॥
तुका ह्मणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥ ३ ॥

॥ २७४ ॥

पूज्या एकासनीं आसनीं आसन[1] । बैसतां गमन मातेशीं तें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांगतों ते धर्म नीतीचे संकेत । सावधान हित व्हावें तरी ॥ ध्रु ॥
संतां ठाया ठाव पूजनाची इच्छा । जीवनीं च वळसा सांपडला ॥ २ ॥
तुका ह्मणे एकाएकीं वरासनें[2] । दुजें तेथें भिन्न अशोभ्य तें ॥ ३ ॥

॥ २७५ ॥

जेणें मुखें स्तवी । तें चि निंदे पाठीं लावी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसी अधमाची याती । लोपी सोनें खाय माती ॥ ध्रु ॥
गुदद्वारा वाटे । मिष्टान्नांचा नरक लोटे ॥ २ ॥
विंचु लाभाविण । तुका ह्मणे वाहे शीण ॥ ३ ॥

॥ २७६ ॥

अधमाची यारी । रंग पतंगाचे परी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विटे न लगतां क्षण । मोल जाय वांयां विण ॥ ध्रु ॥
सर्पाचिया परी । विषें भरला कल्हारीं ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । मज ऐसी दावा ॥ ३ ॥

---

१ पं. आसनें.–२ दे. पं. वरासनें.

॥ २७७ ॥

आणिकांची स्तुति आह्मां ब्रह्महत्या । एका वांचूनि त्या पांडुरंगा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मां विष्णुदासां एकविध भाव । न ह्मणों या देव आणिकांसि ॥ ध्रु. ॥
शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेन ॥ २ ॥
तुका ह्मणे मज आणिका संकल्पें । अवघीं च पापें घडतील ॥ ३ ॥

॥ २७८ ॥

तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझे मनोरथ सिद्धी । पाववावे कृपानिधी ॥ ध्रु. ॥
तूं तों उदाराचा राणा । माझी अल्प चि वासना ॥ २ ॥
कृपादृष्टीं पाहें । तुका ह्मणे होईं साह्य ॥ ३ ॥

॥ २७९ ॥

संताचा अतिक्रम । देवपूजा ते अधर्म ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येती[१] दगड तैसे वरी । मंत्रपुष्पें देवा शिरीं ॥ ध्रु. ॥
अतीतासि गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । ताडण भेदकांची सेवा ॥ ३ ॥

॥ २८० ॥

करणें तें देवा । हे चि एक पावे सेवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघें घडे येणें सांग । भक्त देवाचें तें अंग ॥ ध्रु. ॥
हें चि एक वर्म । काय बोलिला तो धर्म ॥ २ ॥
तुका ह्मणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥ ३ ॥

॥ २८१ ॥

मागें नेणेंतणें[२] घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥ १

---

१ पं. येती दगड ते वरी.—२ पं. नेणतेपणं.

॥ ध्रु. ॥ परनारीचें जया घडलें गमन । दावीतो वदन जननीरत ॥ ध्रु ॥
उपदेशा वरी मन नाहीं हातीं । तो आह्मां पुढती पाहूं नये ॥ २ ॥
तुका ह्मणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥ ३ ॥

॥ २८२ ॥

आगिकाच्या घातें । ज्यांची निवतील चित्तें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ते चि ओळखावे पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥ ध्रु ॥
कान पसरोनी । ऐके वेद दुष्ट वाणी ॥ २ ॥
तुका ह्मणे भांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ३ ॥

## हनुमंतस्तुति–अभंग ४.

॥ २८३ ॥

शरण शरण जी हनुमंता । तुज आलों रामदूता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ ध्रु ॥
शूर आणि धीर । स्वामिकाजीं तूं सादर ॥ २ ॥
तुका ह्मणे रुद्रा । अंजनीचिया कुमरा ॥ ३ ॥

॥ २८४ ॥

केली सीताशुद्धी । मूळ रामायणा आधीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा प्रतापी गहन । सुरां सकळ[१] भक्तांचें भूषण ॥ ध्रु ॥
जाऊनि पाताळा । केली देवीची अवकळा ॥ २ ॥
राम लक्षुमण । नेले आणिले चोरून ॥ ३ ॥
जोडूनियां कर । उभा सन्मुख समोर ॥ ४ ॥
तुका ह्मणे जपें । वायुसुता जाती पापें ॥ ५ ॥

१ पं. सुरां सकळ मोहन.

॥ २८५ ॥

काम घातला बांदोडी । काळ केला देशधडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तया माझें दंडवत । कपिकुळीं हनूमंत ॥ ध्रु ॥

शरीर वज्रा ऐसें । कवळी ब्रह्मांड जो पुच्छें ॥ २ ॥

रामाच्या सेवका ॥ शरण आलों ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ २८६ ॥

हनुमंत महाबळी ॥ रावणाची दाढी जाळी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ ध्रु ॥

करोनी उड्डाण । केलें लंकेचें शोधन ॥ २ ॥

जाळीयेली लंका । धन्य धन्य ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ४ ॥

॥ २८७ ॥

कुंभ अवघा एक आवा । पाकीं एकीं गुणे डावा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसे भिन्न भिन्न साटे । केले प्रारब्धानें वांटे ॥ ध्रु ॥

हिरे दगड एक खाणी । कैचें विजातीसी पाणी ॥ २ ॥

तुका ह्मणे शिरीं । एक एकाची पायरी ॥ ३ ॥

॥ २८८ ॥

मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रिते ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥ ध्रु ॥

बोलों जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥ २ ॥

तुका ह्मणे बहुतोंडे जे वाचाळ । तेंग तें च मूळ लटिक्याचें ॥ ३ ॥

---

१ दे. ( नवीन पाठ. ) काळ घातला तोरडीं । –२ दे. त. दहन.

॥ २८९ ॥

न लगे चंदना सांगावा परिमळ । वनस्पतिमेळ हाकारूनी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी । धरितां ही परी आवरे ना ॥ ध्रु॥
सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाश किरणा कर म्हून ॥ २ ॥
तुका ह्मणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ॥ ३ ॥

॥ २९० ॥

चंदनाचे हात पाय ही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥ ध्रु॥
तुका ह्मणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळे चि ना ॥ २ ॥

॥ २९१ ॥

मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचें कारण ।
मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली ।
मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥ ध्रु ॥
मन गुरू आणि शिष्य । करी आपुलें चि दास्य ।
प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ॥ २ ॥
साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात ।
नाहीं नाहीं आनुदैवत । तुका ह्मणे दुसरें ॥ ३ ॥

॥ २९२ ॥

मायबापें जरी सर्पीण बोका । त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥ १ ॥

---

१ पं. पुसावा.—२ पं. आन.

चंदनाचा शूळ सोनियाची वेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥
तुका ह्मणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व नाठा ॥ ३ ॥

॥ २१३ ॥

शिकल्या बोलाचें सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ॥ १ ॥
पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निजसुखा ॥ २ ॥
तुका ह्मणे जैसी त्यांचासाटीं ग्वाही । देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥ ३ ॥

॥ २१४ ॥

प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघा देव चि जाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥ छ ॥
सत्वरजतमबाधा । नव्हे हरिभक्तांसि कदा ॥ २ ॥
खाय बोले करी । अवघा त्यांच्या अंगें हरी ॥ ३ ॥
देवभक्तपण । तुका ह्मणे नाहीं भिन्न ॥ ४ ॥

॥ २१५ ॥

शास्त्राचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो माझा सांगाती प्राणसखा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणउनी नाहीं आणिकांचा पांग । सर्व जालें सांग नामें एका ॥ छ ॥
सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें[1] । तो चि आह्मां संगें क्रीडा करी ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी विधीचे जनिते । स्वयंभू आइते केले नव्हों ॥ ३ ॥

॥ २१६ ॥

ऐका महिमा आवडीची । बोरें खाय भिलटीचीं[2] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ थोर प्रेमाचा भुकेला । हा चि दुष्काळ तयाला ।
अष्टमा सिद्धींला । न मनी क्षीरसागराला ॥ छ ॥

१ दे. जयाचीं अंगं.—२ पं. भिलणीचीं.

पव्हे सुदामदेवाचे । फके मारी कोरडे च ॥ २ ॥
न ह्मणे उच्छिष्ट अथवा थोडे । तुका ह्मणे भक्तीपुढें ॥ ३ ॥

॥ २९७ ॥

कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिंति त्वां थोर मानियेली ॥ १ ॥
॥ धृ. ॥ कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥ छ ॥
तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घासील भूमीसी वदन यम ॥ २ ॥
का रे नागवसी आयुष्य खातो काळ । दिसेंदिस बळ क्षीण होतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे यासि सांगा कोणी तरी । विसरला हरी मायबाप ॥ ४ ॥

॥ २९८ ॥

साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळां न पाहवे ॥ १ ॥
साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिक कांपती देखोनियां ॥ २ ॥
असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २९९ ॥

आमचे[१] गोसावी अयाचितवृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश ॥ १ ॥
दगडाची नाव आधीं च तें जड । न काय दगड तारूं जाणे ॥ २
तुका ह्मणे वेष विटंबिला त्यांनीं । सोंगसंपादणी करिती परी ॥ ३ ॥

॥ ३०० ॥

मृगजळा काय करावा उतार । पावावया पार[२] पैल थडी ॥ १ ॥
॥ धृ. ॥ खापराचे होन खेळती लेंकुरें । कोण त्या वेव्हारें[३] लाभ हाणि ॥ छ ॥
मंगळदायक करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥ २ ॥

१ पं. आमची.—२ पं. तीर.—३ पं. व्यापारें.

स्वप्नींचें जें सुखदुःख जालें काहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव ॥ ३ ॥
सारीं जालीं मेलीं लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३०१ ॥

माझें ह्मणतां याला कां रे नाहीं लाज । कन्या पुत्र भाज धन वित्त ॥ १ ॥
कोणी सोडवी ना काळाचे हातींचें । एकाविणें साचें नारायणा ॥ २ ॥
तुका ह्मणे किती सांगावें चांडाळा । नेणे जीवेंकळा कोण्या जीतो ॥ ३ ॥

॥ ३०२ ॥

आंधळ्यासि जन अवघे चि आंधळे । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥ १ ॥
रोग्या विषतुल्य लागे तें मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

॥ ३०३ ॥

छळी विष्णुदासा कोणी । त्याची अमंगळ वाणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येऊं न द्यावा समोर । अभागी तो दुराचार ॥ ध्रु ॥
नावडे हरिकथा । त्याची व्यभिचारीण माता ॥
तुका ह्मणे याति । भ्रष्ट तयाची ते मति ॥ ३ ॥

॥ ३०४ ॥

बोलविसी तैसें आणीं अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मिठेंविण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥ ध्रु ॥
संपादणीविण विटंबिलें सोंग । गुणेंविण चांग रूप हीन ॥ २ ॥
कन्यापुत्रेंविण मंगळदायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैसी होते मज परी । न देखे अंतरीं प्रेमभाव ॥ ४ ॥

१ पं. कांहीं.—२ पं. जीवनकळा.—३ पं. सर्व.—४ पं. हो का तयाची मळती.—५ पं. पक्वान्न.

॥ ३०५ ॥

अंगीं ज्वर तया नावडे साकर । जन तो इतर गोडी जाणे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ एकाचिये तोंडीं पडिली ते माती । अवघे ते खाती पोटभरी ॥ध्रु॥

चारितां बळें येत असे दांतीं । मागोनियां घेती भाग्यवंत ॥ २ ॥

तुका ह्मणे नसे संचित हें बरें । तयासि दुसरें काय करी ॥ ३ ॥

॥ ३०६ ॥

धिग जीणें तो बाईले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धिग जीणें ज्याचें लोभावरी मन । अतीतपूजन घडे चि ना ॥ध्रु॥

धिग जीणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥ २ ॥

धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य । झुरे मानालागीं साधुपणा ॥ ३ ॥

तुका ह्मणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ४ ॥

॥ ३०७ ॥

अरे हें देह व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें ।
द्यूतकर्म मनोभावें । सारीपाट खेळावा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मग कैचें हरिचें नाम । निजेलिया जागा राम ।
जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ॥ ध्रु ॥

विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अतिधीट ।
तया तेचि वाट । अधोगती जावया ॥ २ ॥

अणीक एक कोड । नरका जावयाची चाड ।
तरी संतनिंदा गोड । करीं कवतुकें सदा ॥ ३ ॥

तुका ह्मणे ऐसें । मना लावी राम पिसें ।
नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जासी ठकोनी ॥ ४ ॥

॥ ३०८ ॥

अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मती पाषांडिया ॥ ध्रु ॥

जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शास्त्रकांसि ॥ २ ॥

तुका ह्मणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दूषिला देव ॥ ३ ॥

॥ ३०९ ॥

एक तटस्थ मानसीं । एक सहज चि आळसी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ दोन्ही दिसती सारिखीं । वर्म जाणे तो पारखी ॥ ध्रु ॥

एक ध्यानीं करिती जप । एक बैसुनि घेती झोप ॥ २ ॥

एकां सर्वस्वाचा त्याग । एकां पोटासाठीं जोग ॥ ३ ॥

एकां भक्ति पोटासाठीं । एकां देवासवें गांठी ॥ ४ ॥

वर्म पोटीं एका । फळें दोन ह्मणे तुका ॥ ५ ॥

॥ ३१० ॥

काय कळे बाळा । बाप सदैव दुबळा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आहे नाहीं हें न कळे । हातीं काय कोण्या वेळे ॥ ध्रु ॥

देखिलें तें दृष्टी । मागे घालुनियां मिठी ॥ २ ॥

तुका ह्मणे भावें । माझ्या मज समजावें ॥ ३ ॥

॥ ३११ ॥

भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळूनी वर्ते मन ॥ ध्रु ॥

नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवें आस ॥ २ ॥

---

१ पं. दूषिलें देवा.—२ पं. अतर्क्य तें.—३ पं. त. जीवे आस.

हें ना तें सें जालें । तुका ह्मणे वांयां गेलें ॥ ३ ॥

॥ ३१२ ॥

एकादशीस अन्न पान । जे नर करिती भोजन ।
श्वानविष्ठे समान । अधम जन तो एक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन ।
गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥ ध्रु ॥
अशुद्ध विटाळसीचें खळ । विडा भक्षितां[1] तांबूल ।
सांपडे सबळ । काळाहातीं न सुटे ॥ २ ॥
सेज बाज विलास भोग । करी कामिनीशीं संग ।
तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ॥ ३ ॥
आपण न वजे हरिकीर्तना । अणिकां वारी जातां कोणा ।
त्याच्या पापें जाणा । ठेंगणा महा मेरु ॥ ४ ॥
तया दंडी यमदूत । जाले तयाचे अंकित ।
तुका ह्मणे व्रत । एकादशी चुकलीया ॥ ५ ॥

॥ ३१३ ॥

करवितां व्रत अर्धें पुण्य लाभे । मोडवितां दोघे नरका जाती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शुद्धबुद्धि होयें दोघां[2] एक मान । चोरासवें कोण जिवें राखे ॥ ध्रु ॥
आपुलें देऊनी आपुला चि घात । न करावा थीत जाणोनियां ॥ २ ॥
देऊनियां वेच धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मारग मोडूं नये ॥ ४ ॥

॥ ३१४ ॥

इनामाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥ १ ॥

---

१ पं. भक्षितो.–२ पं. दोघां होय.

॥ ध्रु. ॥ अवघेची येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥ ध्रु ॥
अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ २ ॥
तुका ह्मणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ३ ॥

॥ ३१५ ॥

वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एक सरे भवसिंधु ॥ ध्रु ॥
जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ २ ॥
तुका ह्मणे विधि निषेध लोपला । उच्छेद या जाला मारगाचा ॥ ३ ॥

॥ ३१६ ॥

विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ ध्रु ॥
बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥ २ ॥
तुका ह्मणे भावें । कृपा करीजेते देवें ॥ ३ ॥

॥ ३१७ ॥

येथीचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व साटा ते ठायीं ॥ ध्रु ॥
येथीचिया नाशवंतें । काय रितें चाळवूं ॥ २ ॥
तुका ह्मणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ३ ॥

॥ ३१८ ॥

उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बोलविले बोल बोलें । धनीविठ्ठला सन्निध ॥ ध्रु ॥
तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥ २ ॥

तुका ह्मणे नये आह्मां । पुढें कामा गबाळ ॥ ३ ॥

॥ ३१९ ॥

बोलावें तें धर्मा मिळे । बरे डोळे उघडूनि ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काशासाठीं खावें शेण । जेणें जन थुंकी तें ॥ ध्रु ॥

दुजें ऐसें काय बळी । जें या जाळी अग्नीसि ॥ २ ॥

तुका ह्मणे शूर रणीं । गांढे मनीं बुरबुरी ॥ ३ ॥

॥ ३२० ॥

बरा कुणबी केलों । नाहीं तरि दंभेंचि असतों मेलों ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥ ध्रु ॥

विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥ २ ॥

सेवा चुकतों संताची । नागवण हे फुकाची ॥ ३ ॥

गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥ ४ ॥

तुका ह्मणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥ ५ ॥

॥ ३२१ ॥

दाता नारायण । स्वयें भोगिता आपण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥ ध्रु ॥

देखती जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥ २ ॥

तुका ह्मणे नाद । जाला अवघा गोविंद ॥ ३ ॥

॥ ३२२ ॥

कृपा करुनी देवा । मज साच तें दाखवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुह्मी दयावंत कैसे । कीर्ति जगामाजी वसे[1] ॥ ध्रु ॥

पाहोनियां डोळां । हातीं ओढवाल काळा ॥ २ ॥

१ पं. असे.

तुका ह्मणे देवा । माझा करावा कुठावा[1] ॥ ३ ॥

॥ ३२३ ॥

ठायींची ओळखी । येइल टाकूं टाका सुखीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुमचा जाईल ईमान । माझें कपाळीं पतन ॥ ध्रु ॥
ठेविला तो ठेवा । अभिळाषें बुडवावा ॥ २ ॥
मनीं न विचारा । तुका ह्मणे हे दातारा ॥ ३ ॥

॥ ३२४ ॥

तझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रूप कासवाचे परी । धरूनि रोहेन[2] अंतरीं ॥ ध्रु ॥
नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । चिंतन ते तुझी सेवा ॥ ३ ॥

॥ ३२५ ॥

गहूं एकजाती । परी त्या पाधाणी नासिती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वर्म जाणावें तें सार । कोठें काय थोडें फार ॥ ध्रु ॥
कमाईच्या सारें । जाति दाविती प्रकार ॥ २ ॥
तुका ह्मणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥ ३ ॥

॥ ३२६ ॥

पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नेघे माझे[3] वाचे तुटी । महा लाभ फुकासाठी ॥ ध्रु ॥
विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥ २ ॥
तुका[4] ह्मणे पापें । जाती संतांचिया जपें ॥ ३ ॥

---

१ पं. कुडावा.—२ पं. राहिलों.—३ पं. माझी वाचा.—४ दे. त. तुका ह्मणे जपें संताचिया

॥ ३२७ ॥

देव होईजेतें देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥ १ ॥
॥ धु. ॥ दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांटा आपुलाला ॥ छ ॥
दाखविले परी नाहीं वर्जिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥ २ ॥
तुका ह्मणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळबीजमात्र ॥ ३ ॥

॥ ३२८ ॥

शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटोळें ॥ १ ॥
॥ धु. ॥ ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु जाले तट ॥ छ ॥
लौकिका बाहेरी । घाली रोंसी जया भेरी ॥ २ ॥
तुका ह्मणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥ ३ ॥

॥ ३२९ ॥

वैद्यें वाचविती जीवा । तरी कोण भ्याले देवा ॥ १ ॥
॥ धु. ॥ काय जाणों कैसी परी । प्रारब्ध तें केवी उरी ॥ छ ॥ *
नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥ २ ॥
जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥ ३ ॥

॥ ३३० ॥

मारगीं बहुत । या चि गेले साधुसंत ॥ १ ॥
॥ धु. ॥ नका जाऊं आडराणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ छ ॥
चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥ २ ॥
झळकती पताका । गरुड टके ह्मणे तुका ॥ ३ ॥

---

१ पं. होईजेत.—२ पं. देवाचिया.—३ पं. घरी.—४ दे. त. वैद्द. * पं. "अंगीं दैवत संचरे। मग तेथें काय उरे"। हें कडवें जास्त आहे.—५ पं. ऐसी गर्जती पुराणें । नका जाऊं आड राणें.

॥ ३३१ ॥

कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां ।
आलें वैकुंठ जवळां । सन्निध पंढरीये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं ।
अवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥ ध्रु ॥
चालती स्थिर स्थिर । गरुड टकयांचे भार ।
गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥ २ ॥
मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुलती ।
शूर उठावती । एका एक आगळे ॥ ३ ॥
नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ ।
आलें वैष्णवदळ । कळिकाळ कांपती ॥ ४ ॥
आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटीचें सुख ।
धन्य धन्य मृत्युलोक । ह्मणती भाग्याचे कैसे ॥ ५ ॥
मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी ।
उधार नाहीं पंढरीसि । पायापाशीं विठोबाच्या ॥ ६ ॥
तुका ह्मणे आतां । काय करणें आह्मां चिंता ।
सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥ ७ ॥

॥ ३३२ ॥

जया दोषां परीहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र ।
ते हरती अपार । पंढरपुर देखिलिया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर ।

१ पं. पंढरीये सन्निध.—२ पं. डुल्लती —३ पं. भाग्याचा कैसा.

पद्मातीर्थी विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥ ध्रु ॥
सकळतीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार ।
होतो नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥ २ ॥
नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठाया ।
धन्य भाग्य जयां । जे पंढरपूर[3] देखती ॥ ३ ॥
उपजोनि संसारीं । एक वेळ पाहें[4] पा पंढरी ।
महा दोषां कैची उरी । देवभक्त देखिलिया ॥ ४ ॥
ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी ।
सुदर्शन घरटी करी । रीग न पुरे कळिकाळा ॥ ५ ॥
तें सुख वर्णावया गति । एवढी कैची मज मति ।
जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥ ६ ॥
तुका ह्मणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा ।
अधम जन्मांतरिचा । तया पंढरी नावडे ॥ ७ ॥

॥ ३३३ ॥

एक नेणतां नाडलीं । एकां जाणिवेची भुली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बोलों नेणें मुकें । वेडें वाचाळ काय निकें ॥ ध्रु ॥
दोहीं सवा नाड । विहीर एकीकडे आड ॥ २ ॥
तुका ह्मणे कर्म । तुझें कळों नेदी वर्म ॥ ३ ॥

॥ ३३४ ॥

ह्मणवितों दास । मज[5] एवढी च आस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ परी तें अंगीं नाहीं वर्म । करीं आपुला तूं धर्म ॥ ध्रु ॥

---

१पं. पद्माळेसी.—२ पं. वेणुनाद.—३ पं. पंढरी.—४पं. पाहे पंढरी.—५ पं. एवढी च मज आस.

बडबडितों तोंडें । रितें भावेंविण घेंडें ॥ २ ॥
तुका ह्मणे बरा । दावूं जाणतों पसारा ॥ ३ ॥

॥ ३३५ ॥

पूजा समाधानें[1] । अतिशयें वोढे[2] सीण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें तों जाणां तुह्मी संत । आहे बोलिली ते नीत ॥ ध्रु ॥
पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ॥ २ ॥
तुका ह्मणे माथा । पायीं ठेवीं तुह्मां संतां ॥ ३ ॥

॥ ३३६ ॥

स्वर्मींचिया गोष्टी । मज धरिलें होतें वेठी ।
जालिया सेवेंटीं[3] । जालें लटिकें सकळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वायां भाकिली करुणा । मूळ पावावया सिणा ।
राव रंक राणा । कैंचे स्थानावरि आहे ॥ ध्रु ॥
सोसिलें तें अंगें । खरें होतें नव्हतां जागें ।
अनुभव ही सांगे । दुःखें डोळे उघडीले ॥ २ ॥
तुका ह्मणे संतीं । सावचित केलें अंतीं ।
नाहीं तरि होती । टाळी बैसोनि राहिली ॥ ३ ॥

॥ ३३७ ॥

आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ याति कुळ येथें असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं ॥ध्रु॥
काळकुट पितळ सोनें शुद्ध रंग । अंगाचेंच अंग साक्षी देतें ॥ २ ॥
तुका ह्मणे बरी जातीसवें भेटी । नवनीत पोटीं सांटविलें ॥ ३ ॥

---

१ पं. समाधान.—२ पं. वाटे.—३ पं. सेवटी.

॥ ३३८ ॥

बाळपणीं हरि । खेळे मथुरमाझारी ।
पायीं घागरिया सरी । कडदोरा वांकी ।
मुख पाहे माता । सुख न माय चित्ता ।
धन्य मानव संचिता । वोडवलें आजि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बाळ चांगलें वो । बाळ चांगलें वो ।
ह्मणतां चांगलें । वेळ लागे तया बोलें ।
जीवापरीस तें वाल्हें । मज आवडतें ॥ ध्रु ॥
मिळोनियां यातीं । येती नारी कुमारी बहुती ।
नाहीं आठव त्या चित्तीं । देहभाव कांहीं ।
विसरल्या घरें । तान्हीं पारठीं लेंकुरें ।
धाक सांडोनियां येरें । तान भूक नाहीं ॥ २ ॥
एकी असतील घरीं । चित्त तयापासीं परी ।
वेगीं करोनि वोसरी । तेथें जाऊं पाहे ।
लाज सांडियेली वोज । नाहीं फाजिलांचें काज ।
सुख सांडोनियां सेज । तेथें धाव घाली ॥ ३ ॥
वेधियेल्या बाळा । नर नारी या सकळा ।
बाळा खेळवी अवला । त्याही विसरल्या ।
कुमर कुमारी । नाभाव हा शरीरीं ।
दृष्टी न फिरे माघारी । तया देखतां हे ॥ ४ ॥
वैरभाव नाहीं । आप पर कोणीं कांहीं ।

शोक मोह दुःख ठायीं । तया निरसलीं ।
तुका ह्मणे सुखी । केलीं आपणासारिखीं ।
स्वामी माझा कवतुकें । बाळवेषें खेळे ॥ ५ ॥

॥ ३३९ ॥

अशोकाच्या[1] वनीं सीता शोक करी ।
कांहो अंतरले रघुनाथ दुरी ।
येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी ।
कांहों मज आणिलें अवघड लंकापुरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांगा वो त्रीजटे सखिये ऐसी मात ।
देईल कां नेदी भेटी रघुनाथ ।
मन उताविळ जाला दुरी पंथ ।
राहों न सके प्राण माझा कुडी आंत ॥ ध्रु ॥
काय दुष्ट आचरण होतें म्यां केलें ।
तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगीलें ।
गाईवत्सा पत्नीपुरुषा विघाडिलें ।
न कळे वो संचित चरण अंतरले ॥ २ ॥
नाडियेलें आशा मृगकांतिसोनें ।
धाडिलें रघुनाथा पाठिलागे तेणें ।
उलंघिली आज्ञा माव काय मी जाणें ।
देखुनी सूनाट घेउनि आलें सुनें ॥ ३ ॥

१ पं. त. वासुगीच्या.

नाहीं मूळ मारग लाग अणीक सोये ।
एकाविण नामें रघुनाथाच्या माये ।
उपटी पक्षिया एक देउनि पाये । उदकवेढ्यामध्यें तेथें चाले काये ॥ ४ ॥
जनकाची नंदिनी दुःखें ग्लानी थोरी। चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी॥
संमोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी । घेइल तुकयास्वामी राम लंकापुरी ॥ ५ ॥

॥ ३४० ॥

वीट नेघे ऐसें रांधा । जेणें बाधा उपजे ना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरी च तें गोड राहे । निरें पाहे स्वयंभ ॥ ध्रु ॥
आणिकां गुणां पोटीं वाव । दावी भाव आपुला ॥ २ ॥
तुका ह्मणे शुद्ध जाती । ते मागुती परतेना ॥ ३ ॥

॥ ३४१ ॥

नव्हतों सावचित । तेणें अंतरलें हित ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पडिला नामाचा विसर । वाढविला संवसार ॥ ध्रु ॥
लटिक्याचे पुरीं । वाहोनियां गेलों दुरी ॥ २ ॥
तुका ह्मणे नाव । आह्मां सांपडला भाव ॥ ३ ॥

॥ ३४२ ॥

अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आपुलालें तुह्मी करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य राम राम॥ध्रु॥
देखोनि जीवन जरि जाय तान । तरि कां सांटवण घरोघरीं ॥ २ ॥
देखोनियां छाया सुख न पवीजे । जंव न बैसीजे तया तळीं ॥ ३ ॥

हितें तरी होय गातां अईकतां । जरि राहे चित्ता दृढ भाव ॥ ४ ॥
तुका ह्मणे होसी भावें चि तूं मुक्त । काय करिसी युक्त जाणिवेची ॥ ५ ॥

॥ ३४३ ॥

काय उणें आह्मां विठोबाचे पाईं । नाहीं ऐसें कोई[1] येथें एक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तें[2] हें भोंवतालें ठायीं वांटूं मन । बराडी करून दारोदारीं ॥ ध्रु ॥
कोण बळी माझ्या विठोबा वेगळा । आणीक आगळा दुजा सांगा ॥ २ ॥
तुका ह्मणे मोक्ष विठोबाचे गांवीं । फुकाचीं लुटावीं भांडारें तीं ॥ ३ ॥

॥ ३४४ ॥

सेवितों[4] रस तो वांटितों आणिकां । घ्या रे होऊं नका राणभरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तो चि एक दानशूर दाता ॥ ध्रु ॥
मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धी याचे पायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ३ ॥

॥ ३४५ ॥

ऐसे ऐसियानें भेटती ते साधु । ज्याच्या दरशनें तुटे भवबंदु[5] ।
जे कां सच्चिदानंदीं नित्यानंदु । जे कां मोक्षसिद्धी तीर्थ वंदू रे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भाव सर्वकारण मूळ बंदु । सदा समबुद्धि नास्तिक्यभेदु[6] ।
भूतकृपा मोडीं द्वेषकंदु । शत्रु मित्र पुत्र सम करीं बंधु रे ॥ ध्रु ॥
मन बुद्धि काया वाचा शुद्ध करीं । रूप सर्वत्र देखोनि नमस्कारीं ।
लघुत्व सर्वभावें अंगीकारीं । सांडीमांडी मीतूंपण ऐसी थोरी रे ॥ २ ॥
अर्थकामचाड नाहीं चिंत्ता[7] । मानामान मोह माया मिथ्या ।
वर्ते समाधानीं जाणोनि नेणता । साधु भेट देती तया अवचिता रे ॥ ३ ॥

---

१ पं. सुख.—२ पं. कांहीं.—३ पं. तों.—४ पं. सेवितों हा रस.—५ पं. बंधु.—६ दे. नास्ति भेदु.—७ दे. चिंता.

मनीं दृढ धरीं विश्वास । नाहीं सांडीमांडीचा सायास ।
साधुदर्शन नित्यकाळ त्यास । तुका ह्मणे जो विटला जाणीवेस रे ॥४॥

॥ ३४६ ॥

भवसागर तरतां । कां रे करितसां चिंता ।
पैल उभा दाता । कटीं कर ठेवुनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचे पायीं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी ।
भावा एका साठीं । खांदां वाहे आपुल्या ॥ ध्रु ॥
सुखें करावा संसार । परि न संडावे दोन्ही वार ।
दया क्षमा घर । चोजवीत येतील ॥ २ ॥
भुक्तिमुक्तीची चिंता । नाहीं दैन्य दरिद्रता ।
तुका ह्मणे दाता । पांडुरंग वोळगिल्या ॥ ३ ॥

॥ ३४७ ॥

जें[1] कां रंजलें गांजलें । त्यासि ह्मणे जो आपुलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तो चि साधु ओळखावा । देव तेथें चि जाणावा ॥ध्रु॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ २ ॥
ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो ह्रदयीं ॥ ३ ॥
दया करणें जे पुत्रासी । ते चि दासा आणि दासी ॥ ४ ॥
तुका ह्मणे सांगू किती । तो चि भगवंताची मूर्ती ॥ ५ ॥

॥ ३४८ ॥

याजसाठीं भक्ति । जगीं रूढवावया[2] ख्याति ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं तरी कोठें दुजें । आहे बोलाया सहजें ॥ ध्रु ॥

---

१ पं. जे का रंजले गांजले । त्यांसिह्मणे जो आपुले ॥; —२ पं. वाढवाया.

गौरव यासाटीं । स्वामिसेवेची कसोटी ॥ २ ॥

तुका ह्मणे अळंकारा । देवभक्त लोकीं खरा ॥ ३ ॥

॥ ३४९ ॥

अमंगळ वाणी । नये ऐको ते कानीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जो हे दूषी हरिची कथा । त्यासि क्षयरोगव्यथा ॥ ध्रु ॥

याति वर्ण श्रेष्ठ । परितो चांडाळ पापिष्ठ ॥ २ ॥

तुका ह्मणे पाप । माय नावडे ज्या बाप ॥ ३ ॥

॥ ३५० ॥

कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वाचे नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥ ध्रु ॥

कैसा निरयगांवा । जाऊं न पवे विसावा ॥ २ ॥

तुका ह्मणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥ ३ ॥

॥ ३५१ ॥

आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वता भाव ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ करवी आणिकांचे घात । खोडी काढूनि पंडित ॥ ध्रु ॥

श्वानाचियापरी । मिष्टान्नासि विटाळ करी ॥ २ ॥

तुका ह्मणे ऐसा । सटवे चि ना पांचा दिसां ॥ ३ ॥

॥ ३५२ ॥

गर्भाचें धारण । तिनें वागविला सिण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घली च तोंडा ॥ ध्रु ॥

उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥ २ ॥

तुका ह्मणे जाय । नरका अभक्ताची माय ॥ ३ ॥

---

पं. गौरवावया.—

॥ ३५३ ॥

पतनासि जे नेती । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विघीपुरतें कारण । बहु वारावें वचन ॥ ध्रु ॥

सर्वस्वासि नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥ २ ॥

तुका ह्मणे दुरी । राखतां हे तों ची बरी ॥ ३ ॥

॥ ३५४ ॥

देव आड जाला । तो भोगिता मी उगला ।

अवघा निवारला । शीण शुभाअशुभाचा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जीवशिवाचें भातुकें । केलें क्रीडाया कौतुकें ।

कैचीं येथें लोकें । हा आभास अनित्य ॥ ध्रु ॥

विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग ।

वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ तयांचा ॥ २ ॥

अवघी एकाची च वीणें । तेथें कैचें भिन्नाभिन्न ।

वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥ ३ ॥

प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस ।

पायापाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥ ४ ॥

॥ ३५५ ॥

## मंबाजी गोसावी यांनीं स्वामीस पीडा केली—अभंग

न सोडीं न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भलतें जड पडो भारी । जीवावरी आगोज ॥ ध्रु ॥

---

१ पं. होतें कवतुकें.—२ पं. विईण.—३ पं. निरोपी.—४ पं. नसोडी न सोडी ।.—*पं. हाशब्द नाहीं.

शतखंड देह शस्त्रधारी । करितां परी न भीयें ॥ २ ॥

तुका ह्मणे केली आधीं । दृढ बुद्धी सावध ॥ ३ ॥

॥ ३५६ ॥

बरवें बरवें केलें विठोबा बरवें । पाहोनि[1] आंत क्षमा अंगी कांटीवरी मारविलें ॥ १ ॥ ॥ ध्रु. ॥

शिव्या गाळी नीत नाहीं । बहु फार विटंबिलें ॥ २ ॥

तुका ह्मणे क्रोधा हातीं । सोडवूनि घेतलें रे ॥ ३ ॥

॥ ३५७ ॥

पावलों[2] पावलों । देवा पावलों रे ॥ १ ॥ ध्रु. ॥

बरवें संचित होतें तैसें जालें रे । आतां काय बोलों रे ॥ २ ॥

सोज्ज्वळ कंटकवाटा भावें करूं गेलों रे । तुका ह्मणे करूनि वेगळा केलों रे ॥ ३ ॥

॥ ३५८ ॥

कां होती कां होती । देवा एवढी फजीती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मुळीं वर्म नसतों[3] चुकलों । तो मी ऐसें चित्तीं ॥ छ ॥

होणार होऊनि गेलें । मिथ्या आतां खंती[4] रे ॥ २ ॥

तुका ह्मणे पुरे आतां । दुर्जनाची संगती रे* ॥ ३ ॥

॥ ३५९ ॥

सोडवा[5] सोडवा । सोडवा हो अनंता ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुजविण ऐसा । कोण दुजा प्राणदाता ॥ छ ॥

---

१ पं. पाहोनियां.—२ त. पावलों पावलों पावलों.—३ पं नसतें.—४ पं. खंती..—५ पं. सोडवा सोडवा हो अनंता. । त. सोडवा सोडवा सोडवा । सोडवा हो अनंता. —*पं. हाशब्द नाहीं.

कोणा लाज नेणां ऐसें[1] । आणिकां शरण आह्मी जातां ॥ २ ॥
तुका ह्मणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥ ३ ॥

॥ ३६० ॥

पुत्राची वारता[2] । शुभ एके जेवीं माता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥ ध्रु ॥
नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥ २ ॥
तुका ह्मणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥ ३ ॥

॥ ३६१ ॥

ध्यानी योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोवाठीं[4] तयांचिया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तान भुक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभाव ॥ ध्रु ॥
कोण सर्व तयां आणिक सोयरें[5] । असे त्यां दुसरें हरीविण ॥ २ ॥
कोण सुख त्यांच्या जीवासि आनंद । नाहीं राज्यमद घडी तयां ॥ ३ ॥
तुका ह्मणे विष अमृता समान । कृपा नारायण करितां होय ॥ ४ ॥

॥ ३६२ ॥

न व्हावें तें जालें देखियेलें[6] पाय । आतां फिरूं काय मागें देवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बहु दिस होतों करीत हे आस । तें आलें सायासें फळ आजि ॥ ध्रु ॥
कोठवरि जिर्ण संसाराच्या[7] आशा । उगवो हा फांसा येथूनियां ॥ २ ॥
बुडालीं तयांचा मूळ ना मारग । लागे[8] तो लाग सांडूनियां ॥ ३ ॥
पुढें उलंघितां दुःखाचे डोंगर । नाहीं अंतपार गर्भवासा ॥ ४ ॥
तुका ह्मणे कास धरीन पीतांबरीं । तूं भवसागरीं तारूं देवा ॥ ५ ॥

---

१ पं. ऐसी.—२ प. तर्ता.—३ दं. त. नार्ता.—४ प. पाठोवाटी.—५ प. सोइरें.—६ पं. देखिलें हे.—७ पं. संसाराची.—८ पं लागला तो लाग सांडूनियां.

॥ ३६३ ॥

वैकुंठा जावया तपाचे सायास । करणें जीवा नास न लगे कांहीं ॥ १ ॥
तया पुंडलिकें केला उपकार । फेडावया[1] भार पृथ्वीचा ॥ २ ॥
तुका ह्मणे सोपी केली पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥ ३ ॥

॥ ३६४ ॥

शोकें शोक वाढे । हिमतीचे धीर गाढे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येथें केले नव्हे काई । लंडीपण खोटें भाई ॥ ध्रु ॥
करिती होया होय । परी नव्हे कोणी साह्य ॥ २ ॥
तुका ह्मणे घडी । साधिलिया एक थोडी ॥ ३ ॥

॥ ३६५ ॥

ह्मणउनी खेळ मांडियेला ऐसा । नाहीं कोणी दिशा वर्जीयेली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मोंझिया[2] गोतें हें वसलें सकळ । न देखिजे मूळ विटाळाचें ॥ ध्रु ॥
करूनि ओळखी दिली एकसरें । न देखों दुसरें विषमासी ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं काळापाशीं गोवा । स्थिति मति देवा वांचूनियां ॥ ३ ॥

॥ ३६६ ॥

वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥ ध्रु ॥
पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं[3] ॥ २ ॥
तुका ह्मणे याती । हो का तयाची भलती ॥ ३ ॥

३६७ ॥

करोत तपादि साधनें । कोणी साधो[4] गोरांजनें ॥ १ ॥

---

१ पं. हरावया.—२ पं. माझिया गोतें बसलें सकळ.—३ पं. निर्धारी.—४ पं. साधोत.

॥ ध्रु. ॥ आह्मी न वर्जों नया वाटा । नाचूं पंढरीचोहटां ॥ ध्रु ॥
पावोत आत्मस्थिति । कोणी ह्मणोत उत्तम मुक्ति[1] ॥ २ ॥
तुका ह्मणे छंद । आह्मां हरिच्या दासां नित्य ॥ ३ ॥

## ॥ स्वामीस सद्गुरूची कृपा जाली--अभंग ४.

॥ ३६८ ॥

सद्गुरुरायें कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ ध्रु ॥
भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ २ ॥
कांहीं कळे उपजला अंतराय । ह्मणोनियां काय त्वरा जाली ॥ ३ ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खुण माळिकेची ॥ ४ ॥
बाबाजी आपलें[2] सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्ण हरि ॥ ५ ॥
माघशुद्ध दशमी पाहुनि गुरुवार । केला अंगीकार तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ३६९ ॥

माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा[3] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंपा[4] कांहीं कोठें ॥ ध्रु ॥
जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ २ ॥
जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ३७० ॥

घालुनियां भार राहिलों निश्चिंती । निरविलें संतीं विठोबासि ॥ १ ॥

१ पं. कोणी उत्तम ह्मणोत मुक्ति.—२ पं. आपण.—३ पं. गुरुरावो.—४ पं. गुंफा.

॥ ध्रु. ॥ लावूनियां हातें कुरवाळिला माथा। सांगितलें चिंता न करावी ॥ध्रु॥
कटीं कर सम चरण साजिरे। राहिला भीवरे तीरीं उभा ॥ २ ॥
खुंटले सायास अंणिकि या जीवा। धरिले केशवा पाय तुझे ॥ ३ ॥
तुज वांटे आतां तें करीं अनंता। तुका ह्मणे संता लाज माझी ॥ ४ ॥

॥ ३७१ ॥

माझिये मनींचा जाणा हा निर्धार। जिवासि उदार जालों आतां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुजविण दुजें न धरीं आणिका। भय लज्जा शंका टाकियेली ॥ध्रु
ठायींचा संबंध तुज मज होता। विशेष अनंता केला संतीं ॥ २ ॥
जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं। हें[2] चि आतां नाहीं लाज तुह्मां ॥ ३ ॥
तुका ह्मणे संतीं घातला हावाला। न सोडीं विठ्ठला पाय आंतां ॥ ४ ॥

॥ ३७२ ॥ ॥ ४ ॥

देव सखा जरी। जग अवघें कृपा करी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा असोनि अनुभव। कासाविस होती जीव ॥ ध्रु ॥
देवाची जतन। तया बाधूं न शके अग्न ॥ २ ॥
तुका ह्मणे हरी। प्रऱ्हादासि यत्न करी ॥ ३ ॥

॥ ३७३ ॥

भले ह्मणवितां[4] संतांचे सेवक। आइत्याची भीक सुखरूप ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ठसावितां बहु लागती सायास। चुकल्या घडे नास अल्प वर्म ॥ ध्रु ॥
पाकसिद्धी लागे संचित आइतें। घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ २ ॥
तुका ह्मणे बरे सांगतां चि गोष्टी। रणभूमि दृष्टी न पडे तों ॥ ३ ॥

---

१ पं. आणीक.--२ पं. त. हे.--३ पं. तुझे.--४ दे. क. भणावितां.

॥ ३७४ ॥

संतसमागम एखादिया परी । राहावें त्याचे द्वारीं श्वानयाती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥ ध्रु ॥

कामारी वटीक सेवेचे सेवक । दीनेपण रंक तेथें भले ॥ २ ॥

तुका ह्मणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥ ३ ॥

॥ ३७५ ॥

एकली राणागोविंदा सवें । गेलें ठावें तें जालें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मज न ह्मणा न ह्मणा शिंदळी । नाहीं विषम जवळीं आतळलें ॥ ध्रु ॥

नव्हती देखिली म्यां वाट । ह्मणोनि हा भेट संग केला ॥ २ ॥

भेणें मिठी दिधली गळां । मेजे जवळ दडालें ॥ ३ ॥

सलगी भरी पयोधर । साहातां करमुर सर्वे ॥ ४ ॥

आहेव मी गर्भीणपणें । हें सांगणें कां लागे ॥ ५ ॥

तुका ह्मणे सेवटा नेलें । संपादिलें उभयतां ॥ ६ ॥

होतें बहुत हे दिवस मानसीं । आजि नवस हे फळले नवसीं ।

॥ ३७६ ॥

व्हावी भेटी ते जाली गोविंदासीं । आतां सेवा करीन निश्चयेसीं वो ॥ १

॥ ध्रु. ॥ स्थिर स्थिर मज चि साहे करा । बहु कष्ट सोसिल्या येरझारा ।

येथें आड मज न साहावे वारा । देऊनि कपाट आलें तें दुसरें वारा वो ॥ ध्रु ॥

मूळ सत्ता हे सायासाची जोडी । नेदी वेगळें होऊं एकी घडी ।

नाहीं लौकिक स्मरला आवडी । आतां येणें काळें या बोलेंसि वेडी वो ॥ २ ॥

उदयीं उदय साधिला अवकाश । निश्चितीनें निश्चिंती सावकाश ।

---

१ पं. परी.–२ पं. दीन तेथें रंकपण भले.–३ पं. मजसीं

धरिये गोडी बहुत आला रस । तुका ह्मणे हा मागुता न ये दिवस वो ॥ ३ ॥

॥ ३७७ ॥

स्वयें सुखाचे जाले अनुभव । एक एकीपाशीं सांगतील भाव ।
अवघ्यां अवघा हा कैसा नवलाव । सर्वसाक्ष तेथें चि त्याचा जीव वो ॥१॥
॥ ध्रु. ॥ आपआपणाशीं करिती नवल । परि वादावाद न संडिती बोल ।
एका मेघःशामें जलधर वोल । रसीं उताविळ ह्रदय सखोल वो ॥ ध्रु ॥
एक विषय तो सकळांचा हरि । त्याच्या आवडीनें आवडी इतरीं[1] ।
अंध बहिर हे प्रेतलोकाचारी[2] । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥ २
स्तुति पराविया मुखें रुचिकर । प्रीतिपात्राच्या गौरवीं आदर ।
परस्परें हें सादरा सादर । योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ॥ ३ ॥
भक्तिवल्लभ न तुटे चराचरीं । आप्त अनाप्त हे ऐशी ठेवी उरी ।
दुरी जवळी संचिता ऐसें धरी । रंगा रंगा एसें होणें लागे हरि वो ॥ ४ ॥
तुका लाधला हें उच्छिष्ट भोजन । आला बाहेरी प्रेमें वोसंडून ।
पडिलें कानीं त्या जीवाचें जतन । धरियेले एकाभावें ह्रदयीं चरण वो ॥५॥

॥ ३७८ ॥

आजि का वो तूं दिससी दुश्चिती ।
ह्मणी[3] एका मन लगे तुझ्या चित्तीं ।
दिलें ठेवूं तें विसरसी हातीं ।
नेणों काय बैसला हरि चित्तीं वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सर सर परती जालीस आतां भांड ।
कैसें दाखविसी जगासी या तोंड ।

---

१ प. इतरी.—२ दे. प्रेत लोकां चारी.—३ पं. ह्मणे.

व्याली माय ते लाजविली रांड ।
नाहीं थार दो ठायीं जाला खंड वो ॥ ४ ॥
होतें तैसें तें उमटलें वरी ।
बाह्य संपादणी अंतरींची चोरी ।
नाहीं मर्यादा निःसंग बावरी ।
मन हें गोविंदीं देह काम करी वो ॥ २ ॥
नाहीं करीत उत्तर कोणासवें ।
पराधीन भोजन दिलें खावें ।
नाहीं अचळ सावरावा ठावें ।
देखों उदासीन तुज गे देहभावें वो ॥ ३ ॥
कोठें नेणों हा फावला एकांत ।
सदा किलकिल भोंवतीं बहुत ।
दोघे एकवाटा बोलावया मात ।
नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥ ५ ॥
करी कवतुक खेळ खेळे कान्हा ।
दावी लाघव भांडवी सासुसुना ।
परा भक्ति हे शुद्ध तुम्ही जाणा ।
तुका ह्मणे ऐसें कळों यावें जना वो ॥ ६ ॥

॥ ३७९ ॥

भरिला उलंडूनि रिता करी घट । मीस पाणियाचें गोविंदाची चट ।

---

१ पं. होतें तैसें उमटलें वरी.—२ त. निःशंक.—३ पं. मन हें गोविंदीं काम करी वो. —४ दे. त. ठाव.—५ पं. देखोंनुदासीन.—६ दे. देहभावें.—७ दे. सासा.—८ पं. हे.

चाले झडझडां उसंतूनि वाट । पाहे पाळतूनि उभा तो चि नीट वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चाळा लावियेले[1] गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें ।
दावी बहुतांच्या बहुवेषपंथें । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥ ध्रु ॥
मनीं आवडे तें करावें उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनि आधार ।
उगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढविसी उत्तरा उत्तर वो ॥ २ ॥
धरिली खोडी दे टाकोनियां मागें । न ये विनोद हा कामा मशीं संगें ।
मिठी घालीन या जीवाचिया त्यागें । नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगें रे[2] ॥ ३
सुख अंतरींचें बाह्य ठसठसी । ह्मणे विनोद हा काय सोंग यासी ।
तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदानंदन या थोरपणें जासी रे ॥ ४ ॥
करी कारण तें कळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जाणा[3] ।
मन मिनलें रे तुका ह्मणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥ ६ ॥

॥ ३८० ॥

आजि नवल मी आलें येणें राणें । भेटी अवचिती नंदाचिया कान्हें ।
गोवी सांगती वो सकळ ही जन । होतें संचित आणियेलें तेणें वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गेलें होउनि न चले आतां कांहीं । साद घालितां जवळी दुजें नाहीं ।
अंगीं जडला मॅग[4] उरलें तें कांई[5] । आतां राखतां गुमान भलें बाई वो ॥ ध्रु ॥
बहुत कामें मज नाहीं आराणूक । एक सारितां तों पुढें उभें एक ।
आजि मी टाकोनि आलें सकळिक । तंव रचिलें आणिक कवँतुक[6] वो ॥ २ ॥
चिंता करितां हरिली नारायणें । अंगसंगें मिनँतां[7] दोघेजणें ।
सुखें निर्भर जालियें त्याच्या गुणें । तुका ह्मणे खुंटलें येणें जाणें वो ॥ ४ ॥

---

१ पं. लावियेला.—२ पं. वो.—३ पं. जाणा.—४ पं. मेग.—५ पं. कांहीं.—६ पं. कवतुक.—७ पं. आतां.

॥ ३८१ ॥

मै भुली घरजानी बाट । गोरस बेचन आयें हाट ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कान्हा रे मनमोहन लाल । सब ही बिसरूं देखें गोपाल ॥ छ ॥

काहां पग डारूं देख आनेरा । देखें तों सब वोहिन घेरा ॥ २ ॥

हुं तों थकित भैर तुका । भागा रे सब मनका धोका ॥ ३ ॥

॥ ३८२ ॥

हरिबिन रहियां न जाये जिहिरा । कबकी थाडी देखें राहा ॥ १ ॥

॥ध्रु.॥क्या मेरे लाल कवन चुकी भई । क्या मोहिपासिती बेर लगाई ॥ छ ॥

कोई सखी हरी जावे बुलावन । बार हि डारूं उसपर तन ॥ २ ॥

तुका प्रभु कब देखें पाऊं । पासीं आऊं फेर न जाऊं ॥ ३ ॥

॥ ३८३ ॥

भलो नंदाजीको डिकरो । लाज राखीलीन हमारो ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आगळ आँवो देवजी कान्हा । मैं घरछोडी आहे लाना ॥ छ ॥

उनसुं कळना नेव्हे तो भला । खसम अहंकार दादुला ॥ २ ॥

तुकाप्रभु परबॅल हरी । छरी आहे हुं जगाथी न्यारी ॥ ३ ॥

॥ ३८४ ॥

नका कांहीं उपचार माझ्या शरीरा । करूं न साहती बहु होतो उबारा ।

मनोजन्य व्यथा वेध जाला अंतरा । लवकरी आणा नंदाचिया कुमरां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सखिया वोसिया तुह्मी प्राणवल्लभा । निवेदिला भाव आर्तभूत या लोभा ।

---

१ प. मोहन.—२ पं. जाल.—३ पं. राखलीन.—४ पं. आंव. द. आवि.—५ पं. मे घर छाडी आहे लाणा.—६ त. दे. उन्हसुं कळना बेतो भला.—७ दे. पं. परबली.—८ पं. नसा हावे मज बहु होतो उबारा .—९ पं. कुमारा बो.

उमटली अंगीं वो सांवळी प्रभा। साच हे अवस्था कळे मज माझ्या क्षोभा ॥ध्रु॥
नेये कळों[1] नेदावी हे दुजियासि मात। घडावा तयासी उत्कंठा एकांत।
एकाएकीं साक्षी येथें आपुलें चित्त। कोण्या काळें होईल[*] नेणों भाग्य उदितें[2] वो[*]
॥ २ ॥
स्वाद सीण देहभान निद्रा खंडन। पाहिले तटस्छ उन्मळित लोचन
अवघें वोसाऊन उरलें ते चरण। तुका ह्मणे दर्शनापें आलें जीवन[3] ॥ ३ ॥

॥ ३८५ ॥

पडिली भुली धांवतें सैराट। छंद गोविंदाचा चोजवितें वाट।
मागें सांडोनि सकळ बोभाट। वंदीं पदांबुजें ठेवुनि ललाट वो ॥ १ ॥
॥ध्रु.॥ कोणी सांगा या गोविंदाची शुद्धी। होतें[4] वहिलें लपाला आतां खांदीं॥
कोठें आड आली हे देहबुद्धी। धांवा आळवीं करुणा कृपानिधी वो ॥ध्रु॥
मागें बहुतांचा अंतरला संग। मुळें जयाचिया तेणें केला त्याग।
पैहिलें[5] पाहातां तें हरपलें अंग। खुंटली वाट नाहींसें जालें जग वो ॥ २ ॥
शोकें वियोग घडला सकळांचा। गेल्या शरण हा अन्याय आमुचा।
केला उच्चारें[6] रे घडल्या दोषांचा। जाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ॥ ३ ॥

॥ ३८६ ॥

काय उणें कां करितोसि[7] चोरी। किती सांगों तुज नाइकसी हरी।
परपरता[8] तूं पळोनि जासी दुरी। अनावरया लौकिका बाहेरी वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माया करुणा हे करिते[9] बहुत। किती सोसूं या जनांचे[10] आघात।
न पुरे अवसरु हें चि नित्यानित्य। तूं चि सोडवीं करूनि स्थिर चित्त वो ॥ध्रु॥

---

१ पं. कळों नेदावी.–२ त. उदीत.–३ पं. भावन वो.–४ पं. होते वाईले लपाले. –५ पं. पैल.–६ पं. उच्चार.–७ त. दे. करिशील.–८ पं. परे परता.–९ पं. करिती.– १० पं. पं. जगाचे. * पं. हे शब्द नाहींत.

बहुत कामें मी गुंतलियें घरीं । जासी डोळा *तूं चुकावूनि हरी ।
करितां लाग न येसी च पळभरी । नाहीं सायासाची उरों दिली उरी वो ॥२॥
तुज ह्मणीयें मी न संगें अनंता । नको जाऊं या डोळियां परता ।
न लगे जोडी हे तुजविण आतां । तुकयास्वामी कान्होबा गुणभरिता वो* ॥३॥

॥ ३८७ ॥

घाली कवाड टळली वाड राती । कामें व्यापिली कां पडिली दुश्चित्ती ।
कोणे लागला गे सवतीचे हातीं । आजि शून्य [१]शेजे नाहीं दिसे पती वो ॥ १
॥ ध्रु. ॥ बोले दूतिकेशीं राधा हें वचन । मशीं लाघव दाखवी नारायण ।
ह्मणे कोमळ परी बहु गे निर्गुण । याशीं न बोलें कळला मज पूर्ण वो ॥[२]
धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता । तैं पाचारिलें होउनि ये वो सीता ।
[३]लाजिनली रूप न ये पालटितां । जाला भीमकी आपण राम सीता वो ॥ २ ॥
सत्यभामा दान करी नारदासी । तैं कळला वो मज ऱ्हषीकेशी ।
तुळे घालितां न ये कनक वो* राशी । सम तुके एक पान तुळसी वो ॥३॥
मज भुली पडली कैशापरी । आह्मां भोगूनि [४]ह्मणे मीं* ब्रह्मचारी ।
दिली वाट यमुने मायें खरी । तुह्मां आह्मां न कळे अद्यापवरी वो ॥ ४ ॥
जाणे जीवींचें सकळ नारायण । असे व्यापूनि तो न दिसे लपून ।
राधा संबोखिली प्रीती आलिंगून । तुका ह्मणे येथें भाव चि कारण वो ॥ ५ ॥

॥ ३८८ ॥

मिळोनि गौळणी देती यशोदे गाऱ्हाणीं ।
दहिं दुध तुप लोणी शिंकां नुरे कांहीं ।

१ पं. सजेसी नाहीं.—२ पं. पेई.—३ पं.त लाजीनली.—४ पं. ह्मणवी.* पं. हे शब्द नाहींत.

मेळवुनी पोरें तेथें रिघे एकसरें ।
वेगीं आणोनी सामोरें तेथें लोणी खाय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हरि सोंकला वो हरि सोंकला वो ।
सोंकला तो वोरीं तुज लाज नाहीं तरी ।
आह्मां सांपडतां उरी तुज मज नाहीं ॥ ध्रु ॥
तुज वाटतसे कोडें यासि लागतसे गोड ।
काय हासतेसी वेड तुज लागलें वो ।
आह्मी जाऊं तुजवरी पोरें चाळविल्या पोरी ।
काय सांगों भांडखोरी लाज वाटे आह्मां ॥ २ ॥
मुख मळिण वदन उभा हाडतिये घोणे ।
तंव दसवंती ह्मणे आणा शीक लावूं ।
थोर आणिला कांटाळा घरीं दारीं लोकपाळां ।
डेरा रिघोनि गुसळा तेथें लोणी खाय ॥ ३ ॥
मिळोनि सकळा दावें लावूनियां गळां ।
कैशा बांधिती उखळा येथें राहे उगा ।
बरा सांपडलासी हरी आजिच्यानें करिसिल चोरी ।
डोळे घालुनियां येरी येरीकडे हांसे ॥ ४ ॥
फांकल्या सकळा उपडूनियां उखळा ।
मोडी वृक्ष विमळार्जुन दोन्ही ।
उठिला गजर दसवंती नव्हे धीर ।
धांवे तुकयाचा दातार आळंगिला वेगीं ॥ ५ ॥

१ पं. वरी.–२ पं. कोडे.

॥ ३८९ ॥

गोरस घेउनी सातें निघाल्या गौळणी । तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें ।
जाला पानसरा मिठी घातली पदरा । आधीं दान माझें सारा मग चाला पंथें ॥ १ ॥
॥ धु. ॥ सरें जाऊं दे परता । मुळीं भेटलासी आतां ।
नाट लागलें संचिता । खेपा खुंटलिया ॥ ध्रु ॥
आसुडी पदरा धरी आणीक दुसरा । येरी झोंबतील धारा काय वेडा होसी ।
आलों गेलों बहु वेळां नेणों गोरा कीं सांवळा ।
सर परता गोवळा काय बोलतोसी ॥ २ ॥
आह्मी येथें अधिकारी मागें केली तुह्मी चोरी ।
आतां कळलियावरी मागें केलें त्यांचें ।
बोलिल्या हांसुनी आह्मी सासुरवासिनी ।
कां रे झोंबसी दुरूनी करी मात कांहीं ॥ ३ ॥
वांयां परनारी कैशा धरिसी पदरीं । तयां कळलिया उरी तुज मज नाहीं ।
जडला जिव्हारीं फांकों नेदी तया नारी । जेथें वर्म तें धरी जाऊं पाहे तियेचें ॥ ४ ॥
तया हातीं सांपडल्या हाटीं पाटीं चुकाविल्या ।
कृष्णमिळणी मिळाल्या त्याही न फिरती ।
तुका ह्मणे खंती वांयां न धरावी चित्तीं ।
होतें तुमच्या संचितीं वोडवलें आजि ॥ ५ ॥

॥ ३९० ॥

हरी तुझी कांति रे सांवळी । मी रे गोरी चांपेकळी ।
तुझ्या दर्शनें होइन काळी । मग हे वाळी जन मज ॥ १ ॥

१ पं. सर जाऊं दे रे सर जाऊं दे परता.—२ प. आणी.—३ पं. वेडा होसी.—४ पं. तयाचें

॥ ध्रु. ॥ उगला राहें न करीं चाळा । तुज किती सांगों रे गोवळा ।
तुझा खडबड कांबळा । अरे नंदबाळा आलगटा ॥ ध्रु ॥
तुझिये अंगीं घुरट घाणी । बहु खासी दुध तुप लोणी ।
घरिचें बाहेरिल आणोनी । मी रे चांदणी सकुमार ॥ २ ॥
मज ते हांसतील[1] जन । धिःकारिती मज देखोन ।
अंगीं[2] तुझें देखोनि लक्षण । मग विटंबणा होइल रे ॥ ३ ॥
तुजँ[3] लाज भय शंका नाहीं । मज तंव सज्जन पिशुन व्याही ।
आणीक मात बोलूं काहीं । कसी भीड नाहीं तुज माझी ॥ ४ ॥
वचन मोडी नेदी हात । कळलें न साहे ची मात ।
तुकयास्वामी गोपीनाथ । जीवन्मुक्त करूनि भोगी ॥ ५ ॥

॥ ३९१ ॥

सात पांच गौळणी आलिया मिळोनी यशोदे गाऱ्हाणें देती कैसें ।
काय व्यालीस पोर चोरटें सिरजोर जनावेगळें ची कैसें ।
दहिं दुध लोणी शिंकां नुरे चि कांहीं कवाड जैशाचें तैसें ।
चाळवूनि नाशिलीं कन्याकुमरें आमुच्या सुनांसि लाविलें पिसें गे बाइये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आझुनि तरी यासि सांगें बरव्या परी नाहीं तरी नाहीं उरी जीवेसाटी ।
मिळोनि सकळै जणी करूं वाखा सखीं तुजमज होईल तुटी गे बाइये ॥ ध्रु ॥
नेणे आपपर लौकिक वेव्हार भलते ठायीं भलतें करी ।
पाळतुनि घरीं आह्मी नसतां तेथें आपण संचार करी ।
सोगया चुंबन देतो आलिंगन लोळे सेजाबाजावरी ।
शिंकीं कडा फोडी गोसाचे डेरे धरितां न सांपडे करीं गे बाईये ॥ २ ॥

---

१ त. दे. हांसइल.—२ पं. अंगीचें.—३ पं. तुज तंव.

आतां याची चाड नाहीं आह्मां भीड सांपतां कोड पुरवूं मनिचें ।
सोसिलें बहु दिस नव्हता केला निस ह्मणुनि एकुलतें तुमचें ।
चरण खांबीं जीवें बांधेनें सरिसा जवें न चले कांहीं याचें ।
अर्थ प्राण देतां न सोडीं सर्वथा भलतें हो या जिवाचें गे बाइये ॥ ३ ॥
घेउनी जननी हातीं चक्रपाणि देतिसे गौळणी वेळोवेळां ।
निष्ठुर वाद ह्मणीं बोलाल सकळा क्षोभ जाइल माझ्या बाळा ।
जेथें लागे हात वाढतें नवनीत अमृताच्या कल्लोळा ।
देखोनि तुकयास्वामी देश देहभाव विसरल्या सकळा गे बाइये[१] ॥ ४ ॥

॥ ३१२ ॥

विरहतापें फुंदे छंद करिते जाती । हा गे तो गे सावधान सर्वे चि दुश्चिती ।
न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवतीं । वेगळी च पडों पाहे कुळाहुनिया ती[२]
॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ खुंटलीसी जाली येथें अवघियांची गती ।
आपुलीं परावीं कोण नेणें भोंवतीं । [३]त्यांचीं नांवें बोभे अहो अहो श्रीपती ।
नवलाव हा येरां वाटोनियां हांसती ॥ ध्रु ॥
बाहेरी च धांवे रानां न धरी च घर ।
न कळे बंधना जाला तेणें संचार ।
विसरूनि गेली सासुरें कीं माहेर ।
एका अवलोकीं एका पडिला विसर ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी अवघ्या राहा निश्चळा ।

१ दे. क. त. बांधेन.—२ क. बाइगे.—३ पं. ती बो.—४ पं. त्यांच्या नांवें बो बोभे बोभे आबो श्रीपती.

न ये आतां येऊं येथें सर्वथा बळा ।
त्याचा त्याच्या मुखें अवघाची निर्वाळा ।
बहुतां मतें येथें तर्कवाद निराळों[2] ॥ ३ ॥

॥ ३९३ ॥

ये रे कृष्णा खुणाविती खेळों भातुकें। मिळालिया बाळा एके ठायीं कवतुकें ।
कळों नेदी माया त्यांचें[3] त्यास ठाउकें। खेळतोसें दावी लक्षलक्षापें मुकें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अखंडित चटे त्यांनीं लावियेला कान्हा ।
आवडे तया त्यां[4] वाहाती संकल्प मना ।
काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना ।
एकांताचें[*] सुख जाती घेवोनियां रागों[5] ॥ ध्रु. ॥
अवघियांचा जाणें जाला मेळासा हरि । मिळोनियां जावें तेथें तया भीतरी ।
कळों नेदी घरिच्या करी गोवूनी चोरी। हातोहातीं नेती परस्परत्या दुरी ॥ २ ॥
आनंदें निर्भर आपणाशीं आपण । क्रीडतील बाळा त्यजिलें[6] पारिखें जन ।
एकाएकीं तेथें नाहीं दुसरें भिन्न । तुका ह्मणे एका नारायणा वांचून ॥ ३ ॥

॥ ३९४ ॥

खेळतां मुरारी जाय सरोवरा तिरीं। तंव नग्न[7] चिया नारी तेथें देखियेल्या ।
मांडिले विंदान ख्याल सुखाचें संधान । अंग लावूनी मान पिलंगत चाले॥ १
॥ ध्रु. ॥ ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे ।
पायां पडतां रे[*] न सोडी नेदी साउलां रे ॥ ध्रु. ॥
सांड्या साउलीं पातळें[8] गोंडे कसागिया चोळ्या ।

---

१ पं. क. अवघियांचा.—२ पं. क. निराळा वो.—३ पं. क. त्यास च तें.—४ पं. तया वे संकल्प वाहाती मना क. तया त्या संकल्प वाहाती मना.—५ क रानां.—६ पं. त्यजिले पारिखे.—७ पं. क. नग्न ची.—८ पं. पातळा. * पं. हा चरण नाहीं. * पं. हा शब्द नाहीं.

बुंथी घेउनी सकळा कळंबावरी पळे ।
खांदी भरूनियां करीं द्दष्टि घालोनि सामोरी ।
बैसे पाल्या वोढी वरी खदखदां हांसे ॥ २ ॥
आनंदें कल्लोळे वाळा खेळती सकळै देती उल्लटिया चपळै ।
एकी एकीहूनि असे बळ सुर काढी ।
एकी उगविती कोडीं ।
नाना परीच्या निकेडी खेळ मांडियेला ॥ ३ ॥
एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तंव नारि ।
ह्मणे नाहीं नेलें चोरी काय जाणों केव्हां ।
केला सकळीं हाकारा तंव आलिया बाहेरा ।
आतां ह्मणतिल घरां जावें कैशा परी ॥ ४ ॥
तंव हांसे वनमाळी वरी पाहोनी सकळी ।
लाजे रिघालिया जळीं मागें पुढें हात ।
लाज राखावी गोपाळा आह्मांजणींची सकळां ।
काय मागसी ये वेळा देऊं गुळवाटी ॥ ५ ॥
जोडोनियां कर या गे सकळी समोर ।
वांयां न बोलावें फार वडवड कांहीं ।
भातुकें भूषण नाहीं चाड नेघे धन ।
करा एक चित्त मन या गे मजपाशीं ॥ ६ ॥
एक एकीकडे पाहे लाज सांडूनियां राहे ।

१ पं. क. खांदीं घलुनियां.–२ पं. कल्लोळा–३ पं. सकळा.–४ पं. चपळा.–५ पं. गविती.–६ त. क. विकडी.–७ क. चोरी,–८ प. क. लाजा–९ क. राखिली.

म्हणे चला आतां सये जाऊं तयापाशीं ।
जोडोनियां हात कैशा राहिल्या निवांत ।
तुका म्हणे केली मात लाज राखिली तयांची ॥ ७ ॥

॥ ३९५ ॥

धरिला पालव न सोडी माझा येणें । कांहीं करितां या नंदाचिया कान्हें ।
एकली न येतें मी ऐसें काय जाणें । कोठें भरलें अवघड या राणें रे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सोडीं पालव जाऊं दे मज हरी । वेळ लागला[1] रे कोपतील घरीं ।
सासू दारुण सासरा आहे भारी । तुज मज सांगतां नाहीं उरी रे ॥ ध्रु ॥
सख्यां[2] वशिया होत्या मजपाशीं । तुज फावलें रे फांकतां तयांसी ।
होतें अंतर तर सांपडतें कैसी । एकाएकीं अंगीं जडलासी रे ॥ २ ॥
कैसी भागली हे करितां उत्तर । शक्ति मावळल्या आसुडितां कर ।
स्वामी तुकयाचा भोगिया चतुर । भोग भोगी त्यांचा राखे[3] लोकाचार वो ॥ ३ ॥

॥ ३९६ ॥

गाई गोपाळ यमुनेचे तटीं । येती पाणिया मिळोनि जगजेटी ।
चेंडू चौगुणा खेळती वाळवंटीं । चला चला म्हणती पाहूं दृष्टी वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी । चित्त विंठ्ठल[4] देखावया हरी ।
मिस पाणियाचें करितील घरीं । बारा सोळा मिळोनि परस्परीं वो ॥ ध्रु ॥
चिरें चोळिया त्या धुतां विसरती । ऊर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्ती ।
कोणा नाठवे[5] कोण कुळ याती । जाली तटस्थ[6] सकळ नेत्रपातीं वो ॥ २ ॥

---

१ पं. लागल्या.— २ त. दे. क. सखिया वोशिया होतिया.— ३ पं. राखी.— ४ पं. विन्हळ तें.—५ पं. नाठवे हे.—६ दे. त. क. ताटस्त.

दंतधावनाचा मुखामाजी हात । वाद्यें वाजती नाइके जनमात ।
करी श्रवेण कृष्णवेणुगीत । स्वामी तुकयाचा पुरवील मनोरथ वो ॥ ३ ॥

॥ ३९७ ॥

कोठें मी तुझा धरूं गेलें संग । लाविये़लें जग माझ्या पाठीं ॥ १ ॥
॥ धु. ॥ सर सर रे परता अवगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥ ध्रु ॥
रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ती । न देखें भोंवतीं मी ते माझी ॥ २ ॥
तुकयाचा स्वामी माझे जीवीं च बैसला । बोलीं च अबोला करूनियां ॥ ३

॥ ३९८ ॥

गोड लागे परी सांगतां चि न ये । बैसे मिठी सये आवडीची ॥ १ ॥
॥ धु. ॥ वेधलें वो येणें श्रीरंगरंगें । मीमोंजी अंगें हारपलीं ॥ ध्रु ॥
परते चि ना दृष्टी बैसली ते ठायीं । विसावोनि पायीं ठेलें मन ॥ २ ॥
तुकयाच्या स्वामीसवें जाली भेटी । तेव्हां जाली तुटी मागिल्यांची ॥ ३

॥ ३९९ ॥

पाहावया माजी नभा । दिसे शोभा चांगली ॥ १ ॥
॥ धु. ॥ बैसला तो माझे मनीं । नका कोणी लाजवूं ॥ ध्रु ॥
जीवीं आवडे जीवाहूनि । नव्हे क्षण वेगळा ॥ २ ॥
जालें विश्वंभरा ऐसी । तुकया दासी स्वामीची ॥ ३ ॥

॥ ४०० ॥

कोणी एकी भुलली नारी । विकितां गोरस ह्मणे घ्या हरी ॥ १ ॥

१ त. श्रवण हा.—२ पं. पुरवी.—३ पं. क. बोली.—४ पं. मी हे माझी.—५ पं. क. मागिलांची.—६ पं. क. जीवीं.

॥ ध्रु. ॥ देखिला डोळां बैसला मनीं । तो[1] वदनीं उच्चारी ॥ ध्रु ॥
आपुलियाचा विसर भोळा । गोविंद कळा कौतुकें ॥ २ ॥
तुका ह्मणे हांसे जन । नाहीं कान ते ठायीं ॥ ३ ॥

॥ ४०१ ॥

करूनी आइत सत्यभामा मंदिरीं रे । वाट पाहे टळोनि गेली रात्री रे ।
न ये चि देव येतील[2] कामलहरी रे । पडिली दुश्चिती तंव तो कवाड टिमकारी रे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सर गा परता कळला तुझा भाव रे ।
कार्या पुरतें हें दाविसी लाघव रे ।
बोलतोसी[3] तें अवघी तुझी माव रे ।
जाणोनि आलासी उजडता समयो रे ॥ ध्रु ॥
मी च वेडी तुजलागीं[4] बोल नाहीं रे ।
दानावेळे विटंबणा जाली काय रे ।
मागुती रुद्रासि भेटी दिली तई रे ।
विश्वासें[5] तो तुझ्या बोला आझुनि तरी[6] रे ॥ २ ॥
भ्रम होता तो अवघा कळों आला रे ।
मानवत होतें मी* भला भला रे ।
नष्टा[7] क्रिया नाहीं मां तुझ्या बोला रे ।
तुकयाबंधु स्वामी कानड्या कौसाल्या रे ॥ ३ ॥

---

१ पं. तो चि. —२ पं. येती. —३ पं. बोल बोलतोसी. —४ पं. तुज लागी.—५ पं. क. विश्वासतें.—६ पं. नाहीं.—७ पं. क. नष्टक्रिया.—* पं. हा शब्द नाहीं.

॥ ४०२ ॥

तंव तो हरि ह्मणे बो* निजांगने बो ।
लाड नीच कां देसील[1] ठोहणे बो ।
मजपें दुजें आलें तें देव जाणे बो ।
शब्द कांय[2] हे बोलसी ते डंग बो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाहा मनीं विचारूनी आधि बो ।
सांडूनि देई[3] भ्रांति करीं स्थिर बुद्धि बो ।
तंटे[4] केलें हें माझें तुझें उपाधी बो ।
उघडीं डोळे आजुनि तरी धरीं शुद्धि बो ॥ ध्रु ॥
कोठें तरी दुनियांत वर्तलें बो ।
स्त्रियांनी भ्रतारीं[5] दानां दिलें बो ।
कैसा भला मी[6] नव्हे तें सोसिलें बो ।
रुसतेसी[7] तूं उफराटें नवल जालें बो ॥ २ ॥
काय सांग त्यां दैन्य केली कैसी बो ।
तुझ्या गर्वें आणविलें हनुमंतासि बो ।
कष्टी केलें मन गरुडा भीमकीसि[8] बो ।
तुकयाबंधु ह्मणे खरें खोटें नव्हे यासि[9] बो ॥ ३ ॥

॥ ४०३ ॥

तंव ते ह्मणे ऐका हृषीकेशी बो ।

१ पं. देसी.—२ पं. काय बोलसी.—३ पं. क. देहे भ्रांति— ४ पं. तंट केले हे माझे तुझे.—५ पं. भ्रतार दान.—६ पं. मी भला.—७ पं. रुसली तं. क. रुससी तं.—८ पं. भीमकी.—९ पं. का. * पं. हा शब्द नाहीं.—क खोडला आहे.

नवाजिलें तुह्मीं ह्मणां आपणांसि वो ।
तरी *कां वंचनुक सुमनासि वो ।
नट नाट्य बरें संपादूं जाणतोसि[2] वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सर हो परता पैरता[3] हो आतां हरी ।
ह्मणे सत्राजिताची कुमरी ।
जाणतें मी या शब्दाच्या कुसरी ।
ऐसें च करून ठकविलें आजिवरी ॥ ध्रु ॥
भावें गेलें ह्मण न व्हावा वियोग ।
मनिचें आर्त जन्मांतरीं व्हावा संग ।
तों तों केलें हें* पाठमोरें जग ।
ऐसें काय जाणें हे तुझे रंग ॥ २ ॥
काय करूं या नागविलें कामें ।
लागलें तयास्तव इतुकें सोसावें[4] ।
नाहीं तरी कां न्हवती ठावीं वर्मे ।
परद्वारीं ऐसा हाकालिती प्रसिद्धनांवें ॥ ३ ॥
काय किती सांगावे तुझे गुण । न फुटे वाणी निष्ठुर ऐसा निर्गुण ।
आप पर न ह्मणसी माय बहीण । सासूसुनास लावुनि पाहासी भांडण ॥ ४ ॥
इतुकियावरी ह्मणे वैकुंठिंचा राणा । होऊन गेलें तें नये आणूं मना ।
आतां न करीं तैसें करी क्रिया आणा । भक्तवत्सल ह्मणे तुकयाबंधु कान्हा
॥ ५ ॥

---

१ पं. नवाजीत होतां आपणासी.—२ पं. जाणसी परी.—३ पं. आतां.— क. हरी आतां हो —४ पं. सोसावें नेमें. * पं. हा शब्द नाहीं. —क. कांकेली.

॥ ४०४ ॥

कान्हो एकली रे एकली रे । तुजसवें चुकलें[1] रे ।

भय वाटे वनीं[2] मज अबळा धाकली रे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ निघतां घरीं आई बा वारी । तुजसवें कां आलियें हरी ॥ ध्रु ॥

लोक वाटा सांगती खोटा । परी मी चटा लागालियें ॥ २ ॥

पिकल्या बोरी जालें सामोरी । काय जाणें कोठें राहिला हरी ॥ ३ ॥

आड खुंट जालिया जाळी । काय जाणों कान्हे मांडिली रळी ॥ ४ ॥

तुका ह्मणे जाऊं आलिया वाटा । पाहों हरी पायीं न मोडे कांटा ॥ ५ ॥

॥ ४०५ ॥

क्याला मज आयो वारितेसी घरा । खेळतों सोकरा नंदाचा मी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ बहु दिसीं जाली यासीं मजँ[3] भेटी । आतां वाटे तुटी न परावी ॥ ध्रु ॥

कोवळें बोलतो मना आवरतें । डोळियाचें पातें ढापवेना ॥ २ ॥

आजि सकळांसी आलें चोलुनियां । कां गो पाठी वांयां पुलविली ॥ ३ ॥

तुमचें तें काय खोळंबलें काज । बल्या कां गो मज कोंडा घरीं ॥ ४ ॥

तुकयाचा धनी गोकुळनायक[4] । सरा कांहीं एक बोलतों मी ॥ ५ ॥

॥ ४०६ ॥

आतां न यें मागें । मी आलें याच्या रागें ।

काय माझें जगें । कोपोनियां करावें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कां गो कलित्यां कोल्हाल । तुह्मी भलत्या च सकल ।

वेचाल ते बोल । झुटे होती बोलिले ॥ ध्रु ॥

याचे भेटी माझें मन । स्वरुपीं ठाकले लोचन ।

---

१ पं. चुकली.—२ पं. जनी.—३ पं. मसी.—४ पं. वैकुंठ नायक.

वेगळें तें क्षण आतां होऊं नावरे ॥ २ ॥
काज काम नको जालें । बीजें नावरे बोलिलें ।
याचिया भेदिलें । कामबाणीं अंतर ॥ ३ ॥
या वेगळें होणें । आतां जळो तैसें जिणें ।
घेतलें तें मनें । आतां मागें न फिरे ॥ ४ ॥
आतां मोटी वार । माझी[1] नका धरूं चार ।
तुकयाचा दातार । शेजे तो मी सुतलों[2] ॥ ५ ॥

॥ ४०७ ॥

हरिरता चपळा नारी । लागवरी न रिघती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघ्या अंगें सर्वोत्तम । भोगी काम भोगिता[3] ॥ ध्रु ॥
वाचा वाच्यत्वासि न ये । कोठें काय करावें ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा ऐशा । देवपिशा उदारा ॥ ३ ॥

॥ ४०८ ॥

गौळणी आल्या वाजं[4] । ह्मणती या गे[5] राखों आज ।
सांपडवुनी माज- । घरांत[6] धरूनी कोंडूं ।
उघडें कवाड उभ्या काळोशाचे आड । साता पांचा एक भिडि मौनेंची ठेल्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नित्य सोंकवला नेदी । सांगों चित्त बोला ।
आतां सांपडतां याला कोण सोडी जिवें ॥ ध्रु ॥
जाणोनियां हरी त्या च घरा आला चोरी ।

---

१ पं. माजी.—२ त. सुतलें.—३ पं. पुरता.—४ पं. क. वाजे.—५ पं रे.—६ क. घराधरूं कोंडुनि —७ पं. उभें.

गडियां ठेवुनी बाहेरी पूर्वद्वारें शिरे ।
त्यांच्या भयाभीत चाले पिलंगत भोंवताले ।
पाहे तंव देखियेलें नवनीत पुढें ॥ २ ॥
उतरोनि सिंकें । पाहे चाखोनियां निकें ।
गोड तें चि एका एकें । हातीं लावविनो ।
जाणे राखती तयांसि । तेथें आले चि नासी ।
माग लावी हात पुसी । चोरी आगावया ॥ ३ ॥
जाणोनियां नारी । मूळ वर्मद्वार धरी ।
माजे कोंडूनी भीतरी । घरांत धरियेला ।
कां रे नागविसी । माझे मुलीं लागलासी ।
आणवीन तुजरासी । मागें खादलें तें ॥ ४ ॥
दोहीं संधी बाहे । धरूनि नेती माते पाहे ।
काय नासी केलें आहे । घरामाजी येणें ।
तुका ह्मणे सुख । त्याचें वाटे नेदी दुःख ।
दसवंती कवतुक । करूनी रंजविल्या ॥ ५ ॥

॥ ४०१. ॥

आलिये धांवति धांवति भेट होईल ह्मण ।
तंव न टळली वेळ वो माझा उरला सीण ॥ १ ॥
॥ धु. ॥ आतां काय करूं सांग वो मज भेटेल कैसा ।
हरिलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ॥ २ ॥
लाविला उशीर बहुतीं बहु ओढिती ओढा ।

---

१ दे. माजे. क. मज. पं. मग.—२ पं. धरून धरी एकल्या. क. घरा धरियेला.—३ दोहें सदे बाहे.—४ दे. संदी.

सांभाळितां सांग असांग दुःख पावल्यें पीडा ॥ २ ॥
जळो आतां संसारु वो कई शेवट पुरे ।
तुकयाच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ॥ ३ ॥

॥ ४१० ॥

आणीक काय थोडीं । परि तीं[1] फार खोटीं कुडीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सदा मोकळीं च गुरें । होती फजीत तीं पोरें ॥ ध्रु ॥
सदा घालिती हुंबरी । एक एकांचें न करी ॥ २ ॥
तुका ह्मणे घरीं । माय वेळोवेळां मारी ॥ ३ ॥

॥ ४११ ॥

बहुतांचे संगती । बहु पावलों फजिती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बरें केलें नंदबाळें । मागिलांचें तोंड काळें ॥ ध्रु ॥
माझा करितील तंटा । लपती आलिया बोभाटा ॥ २ ॥
तुका ह्मणे काई । किती ह्मणों बाप आई ॥ ३ ॥

॥ ४१२ ॥

गाईन ते लीळा चरित्र पवाडे । राखिले संवगडे सहित गाई ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चोरिलें नवनीत बांधविला गळा । जे तुह्मीं गोपाळा छंद केले ॥ ध्रु॥
मोहिल्या गोपिका पांवयाच्या छंदें । केली ते गोविंदें क्रीडा गाऊं ॥ २ ॥
मायबापा लाड दाखविलें कौतुक । तें या आणूं सुख अंतरासी ॥ ३ ॥
निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी । ऐसा ह्मणों बळी आमुचा स्वामी ॥ ४ ॥
तुका ह्मणे सरसी असों येणें बोधें । लागोनि संबंधें सर्वकाळ ॥ ५ ॥

---

१ दे. क. तें.

## ढांका अ० ८

॥ ४१३ ॥

चौक भरियेला आसनीं पाचारिली कुळस्वामिनी ।
वैकुंठवासिनि ये धांवोनी झडकरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रंगा येईं वो विठाई सांवळिये डोळसे ।
तुझें श्रीमुख साजिरें तें मी केधवां देखेन ॥ ध्रु ॥
रजतमधुपारती । पंचप्राणांची आरती ।
अवघी सारोनी आइती । ये धांवती झडकरी ॥ २ ॥
मन मारोनियां मेंढा । आशा मनसा तृष्णा [१]सुटी ।
भक्तिभाव नैवेद्य ताटीं । भरोनि केला हाकारा ॥ ३ ॥
ढांका अनुहात गजरें । येउनि अंगासी संचरें ।
आपुला घेउनी पुरस्कार । आरोग्य करीं तुकयासी ॥ ४ ॥

॥ ४१४ ॥

साच माझा देव्हारा । भाक ठेवा भाव खरा ।
त्रिगुणाचा फुलवरा । आणा विनति सांगतों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें दैवत हें रंगीं । नाचे वैष्णवांचा संगीं ।
भरलें मग अंगीं । निवाड करी दोहींचा ॥ ध्रु ॥
तुझें आहे तुजपासीं । परि तूं जागा चुकलासी ।
चिवडुनियां नासी । तुझ्या घरिच्यांनीं केली ॥ २ ॥
आतां न पडे ठावें । वांचूनियां माझ्या देवें ।
अंधकार व्हावें । नासु ठाव शोधावा ॥ ३ ॥

१ प. तुटी. क. सुटी.

आंधळ्यासी डोळे । देते पांगुळासी पाय ।
वांजा पुत्र फळे । नवस पुरविते विठाई ॥ ४ ॥
उगविलीं कोडीं । मागें कितेकांचीं बापुडीं ।
तुका ह्मणे घडी । न लगे नवस द्या आधीं ॥ ५ ॥

॥ ४१५ ॥

विनति घातली अवधारीं । मज देईं वो अभय करीं ।
पीडिलों खेचरीं । आणीक वारी नांवांची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रंगा येईं वो एकला रंग वोडवला ।
हरिनाम उठिला गजर केला हाकारा ॥ ध्रु. ॥
देवांचे दैवतें । तुज नमिलें आदिनाथें ।
ये वो कृपावंते । भोगा माझ्या धांवति ॥ २ ॥
न लवीं आतां वेळ । आइत सारिली सकळ ।
तुका ह्मणे कुळ । आमुचिये दैवतें ॥ ३ ॥

॥ ४१६ ॥

माझा दे[१]व्हारा साचा । नाहीं आणीक कोणाचा ।
त्रिभुवनीं याचा । ठसा न लगे पुसावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ या रे लोटांगणीं । कांहीं करा विनवणी ।
करील झाडणी । भूत काढी संसार ॥ ध्रु. ॥
पडिले विषयांचे गोंधळीं । ते त्रिगुण आकळी ।
हरिनाम आरोळी । कानीं पडतां ते उठी ॥ २ ॥
घेतला अहंकारें । काम क्रोध या मत्सरें ।

१ दे. क. अहंकार.

पळती प्रेमभरें । अवघे ठाव सांडुनी ॥ ३ ॥
घेतलासे पुरा । माया ममता आसरा ।
अवघ्या एक सरा । पळती रंग देखोनी ॥ ४ ॥
तुका ह्मणे यांचा भाव । फिटला मनिचा संदेह ।
आणीक न लगे ठाव । कांहीं कोठें हिंडावें ॥ ५ ॥

॥ ४१७ ॥

पुढें येते देवी । निचा जैसा चालों गावीं ।
मागील आठवी । आठा मान आसडी ॥ १ ॥
॥ धु. ॥ एकवीरा आली अंगा । आतां निवारील रोगा ।
माझ्या* भक्तापाशीं मागा । पूजा भावें करावी ॥ छ ॥
मेंढा मारावा ओवाळ । पूजा पावली सकळ ।
तुम्हीं केलें बळ । मग मी लागीं न पडें ॥ २ ॥
तुका ह्मणे मुळीं । लागली ते आली कुळीं ।
वंदुनी सकळीं । जीवें भावें ओवाळा ॥ ३ ॥

॥ ४१८ ॥

अवघ्या जेष्ठादेवी कोण पूजनाचा ठाव ।
धरितां चि भाव कोठें नाहींसें जालें ॥ १ ॥
॥ धु. ॥ दिसे सारिखें सारिखें । परि तें कारणीं पारिखें ।
नळीं गेलें देखें । वरी टोले न साहाती ॥ छ ॥
पटे एका शिरीं । यथाविधीनें त्या येरी ।
वसकोळ्या घागरी डेरे रांजण गाडगीं ॥ २ ॥

---

१ पं. जनाति.—२ त. टोल साहाती.— ३ पं. पड.— * पं. हा शब्द नाहीं.

तुका ह्मणे माना । येथें कोणीं रुसावें ना ।
आपुलाल्या स्थानां । जेथें त्या चि शोभल्या ॥ ३ ॥

॥ ४१९ ॥

खेचर खडतर । काळ कांपती असुर ।
नांदे भीमातीर । पंढरपुरपाटणीं ॥ १ ॥
॥ धु. ॥ आतां करी[1] कां रे हाकारा । सहस्र नामें एकसरा ।
दवडिते खेचरा । अंगसंगें धरूनी ॥ छ ॥
सीते जाली झडपणी । राहाणें वासुगीच्या[2] बनीं ।
पावली जननी । झोंटि मोकाळिया[3] केशी ॥ २ ॥
लाविलें कावरें । प्रल्हादा ह्मैसासुरें[4] ।
आली येकसरें । दांत खात रंगासी ॥ ३ ॥
वसुदेवाचीं बाळें । सात खादलीं ज्या काळें ।
आली भोगवेळे । तया कारणें तेथें ॥ ४ ॥
पांडवें बापुडीं । वांज[5] केलीं फिरती वेडीं ।
धांवोनियां काढी । अंगसंगें त्राहाविलीं ॥ ५ ॥
नामाचें चिंतन । तेथें धांवते आपण ।
न विचारितां हीण । भाव देखे जयाचा ॥ ६ ॥
कुळींची कुळदेवता । तुका ह्मणे आह्मां माता ।
काय भय भूतां । काळ यमदूतांचें ॥ ७ ॥

---

१ क. करी.—२ सर्व प्रतींत हाच शब्द आहे; अभंग ३३९ यांत मुळीं " वासुगीच्या" असें होतें त्याच्या जागीं " अशोकाच्या " असा शोध दे. क. या प्रतींत घातला आहे. परंतु येथें तसा शोध नाहीं. यावरून अशोकास वासुगी असें ह्मणत असतील असें वाटतें. —३ त. मोकळा.—४ हिरण्यकशिपूसच ह्मैसासुर असें ह्मटलें असावें. —५ पं. वांज.

स्थिरावल्या[1] कैसा काय जाणों विचार ॥ २ ॥
तुका ह्मणे लाभकाळ । तेथें नसावें शीतळ ।
मग तैशी वेळ । कोठें जाते सांपडों ॥ ३ ॥

॥ ४२३ ॥

पांगुळ जालों देवा नाहीं हात ना पाय ।
बैसलों जयावरी सैराट तें जाय ।
खेटितां कुंप कांटी । खुंट दरडी न पाहे ।
[2]आधार नाहीं मज कोणी । बाप ना माये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दाते हो दान करा । जातें पंढरपुरा ।
न्या मज तेथवरी । अखमाचा सोयरा ॥ ध्रु ॥
हिंडतां गव्हानें गा । शिणलों दारोदारीं[3] ।
न मिळे चि दाता कोणी । जन्मदुःखातें[4] वारी ।
कीर्ति हे संतां मुखीं । तो चि दाखवा हरी ।
पांगळां पाय देतो । नांदे पंढरपुरीं ॥ २ ॥
या पोटाकारणें गा । जालों पांगिला जना ।
न सरे चि बापमाय । भीके[5] नाहीं खंडणा ।
पुढारा ह्मणती एक । तया नाहीं करुणा ।
श्वान हें लागे पाठीं । आशा बहु दारुणा ॥ ३ ॥
काय मी चुकलों गा । मागें नेणवे[6] कांहीं ।
न कळे चि पाप पुण्य । तेथें आठव नाहीं ।

---

१ दे. त. थिरावल्या.—२ पं. आधार नाहीं कोणी । मज बाप ना माय ॥ —३ पं. द्वारीं. —४ पं. जन्मदुःख निवारी. —५ पं. नाहीं भीक. —६ पं. नेणवे चि.

मी मार्गी भुललों गा । दीप पतंगासोयी ।
द्या मज जीवदान । संत महानुभाव कांहीं ॥ ४ ॥
दुरोनि आलों मी गा । दुःख जालें दारुण ।
यावया येथवरी । होतें हें चि कारण ।
दुर्लभ भेटी तुम्हां । पायीं जालें दरुषन ।
विनवितो तुका संतां । दोन्ही कर जोडून ॥ ५ ॥

॥ ४२४ ॥

देश वेष नव्हे माझा । सहज फिरत आलों ।
करूं सत्ता कवणावरी । कोठें स्थिर राहिलों ।
पाय ठेले क्षणतां माझे । तींहीं कैसा मोकलिलों ।
परदेशी नाहीं कोणी । अंग पांगुळ जालों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां माझी करीं चिंता । दान देई भगवंता ।
पाठीं पोटीं नाहीं कोणी । निरवीं सज्जन संतां ॥ ५
चालतां वाट पुढें । भय वाटतें चित्तीं ।
बहुत जन गेलीं । नाहीं आलीं मागुतीं ।
न देखें काय जालें । कान तरी ऐकती ।
बैसलों संधिमार्गी । तुज धरूनि चित्तीं ॥ २ ॥
भाकितों करुणा गा । जैसा मांडिल्या ठाव ।
न भरे पोट कधीं । नाहीं निश्चळ पाव ।
हिंडतां भागलों गा । लक्ष चौऱ्याशीं गांव ।

१ म. दे. वांही.—२ पं. जेणे.

धरूनि राहिलों गा । हा चि वसता ठाव ॥ ३ ॥
भरवसा काय आतां । कोण आणि अवचिता ।
तैसी च जाली कीर्ति । तया मज बहुतां ।
ह्मणउनि मारीं हाका । सोयी पावें पुंण्यवंता ।
लागली भूक थोरी । तूं चि कृपाळु दाता ॥ ४ ॥
संचित सांडवलें । कांहीं होतें जवळीं ।
वित्त गोत पुत माया । तुटली हे लागावळी ।
निष्काम जालों देवा । होतें माझे कपाळीं ।
तुका ह्मणे तूं चि आतां । माझा सर्वस्वें बळी ॥ ५ ॥

॥ ४२५ ॥

देखत होतों आधीं मागें पुढें सकळ । मग हे दृष्टी गेली वरी आले पडळ
तिमिर कोंदलेंसें वाढे वाढतां प्रबळ । भीत मी जालों देवा ।
काय ज्याल्याचें फळ ॥ १ ॥
॥ धु. ॥ आतां मज दृष्टी देईं । पांडुरंगा मायबापा ।
शरण आलों आतां । निवारूनियां पापा ।
अंजन लेववुनी । करीं मारग सोपा ।
जाईन सिद्धपंथें । अवघ्या चुकती खेपा ॥ ध्रु ॥
होतसे खेद चित्ता । कांहीं नाठवे विचार ।
जात होतों जना मागें । तोही सांडिला आधार ।
हा ना तोसा ठाव जाला । अवघा पडिला अंधार ।
फिरलीं माझीं मज । कोणी न देती आधार ॥ २ ॥

जोंवरि चळण गा । तोंवरि ह्मणती माझा ।
मानिती ल्हान थोर । देहसुखाच्या काजा ।
इंद्रियें मावळलीं । आला बागुल आजा ।
कैसा विपरीत जाला । तो चि देह नव्हे दुजा ॥ ३ ॥
गुंतलों या संसारें । कैसा आलोंसें अंध ।
मी मोझें वाढवुनी । मायातृष्णेचा बांध ।
स्वहित न दिसे चि । केला आपुला वध ।
लागलें काळ पाठीं । सवें काम हे क्रोध ॥ ४ ॥
लागती चाळवीं गा । गुणदोषाच्या सेसा ।
सांडिली वाट मग । जालों निराळा कैसा ।
पाहातों वास तुझी । थोरी करूनी आशा ।
तुका ह्मणे देवराजा । पंढरीच्या निवासा ॥ ५ ॥

॥ ४४६ ॥

सहज मी आंधळा गा । निजनिराकार पंथें ।
वृत्ति हे निवृत्ति जाली मन न दिसे तेथें ।
मी माझी हारपलें ठायीं जेथींचा तेथें ।
अदृश्य तें चि जालें कांहीं दृश्य जें होतें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सुखी मी निजलों गा शून्य सारूनि तेथें ।
त्रिकुटशिखरीं गा दान मिळे आइतें ॥ छ ॥
टाकिली पात्र झोळी धर्मअधर्म आशा ।

१ पं. माजी.—२ पं. थार.—३ पं. माझें.

कोल्हाळ चुकविला त्रिगुणाचा वोळसा ।
न मागें मी भीक आतां हा चि जाला भरवसा ।
वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ॥ २ ॥
ऊर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद ।
अरूप जागविला दाता घेऊनि छंद ।
घेऊनि आला दान निजतत्व निजबोध ।
स्वरूपीं मेळविलें नांव ठेविला भेद ॥ ३ ॥
शब्द हा बहुसार उपकाराची राशी ।
ह्मणोनि चालविला मार्ग येतील त्यांसीं ।
मागोनि आली वाट सिद्धओळीचि तैसी ।
तरले तरले गा आणीक ही विश्वासी ॥ ४ ॥
वर्म तें एक आहे दृढ धरावा भाव ।
जाणिवनागवण नेदी लागो ठाव ॥
ह्मणोनि संग टाकी सेवीं अद्वैत भाव ।
तुका ह्मणे हा चि संतीं मार्ग केला उपाव ॥ ५ ॥

॥ ४२७ ॥

आंधळ्यापांगळ्यांचा एक विठोबा दाता ।
प्रसवला विश्व तो चि सर्व होय जाणता ।
घडी मोडी हेळामात्रें पापपुण्यसंचिता ।
भवदुःख कोण वारी तुजवांचुनि चिंता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धर्म गा जागो तुझा तूं चि कृपाळू राजा ।

जाणसी जीवींचें गा न सांगतां सहजा ॥ १ ॥
घातली लोळणी गा पुंडलीकें वाळवंटीं ।
पंढरी पुण्य ठाव नीरे भीवरे तटीं ।
न देखें दुसरें गा । जाली अदृश्यदृष्टी ।
बोळला प्रेमदाता केली अमृतवृष्टी ॥ २ ॥
आणीक उपमन्यु एक बाळ धाकुटें ।
न देखे न चलवे जना चालते वाटे ।
घातली लोळणी गा हरिनाम बोभाटे ।
पावला त्याकारणें धांव घातली नेटें ॥ ३ ॥
बैसोनि खोळी शुक राहे गर्भे[1] आंधळा ।
शीणला येरझारी दुःख आठवी[2] वेळा ।
मागील सोसिलें तें ना भीं ह्मणे गोपाळा ।
पावला त्याकारणें । लाज राखिली कळा ॥ ४ ॥
न देखे जो या जना तया दावी आपणा ।
वेगळा सुखदुःखा मोहो सांडवी धना ।
आपपर तें ही नाहीं बंधुवर्ग सज्जना ।
तुकया ते चि परी जाली पावें नारायणा ॥ ५ ॥

॥ ४२८ ॥

भगवंता तुजकारणें मेलों जीता चि कैसी ।
नि[3]ष्काम बुद्धी ठेली चळण नाहीं तयासी ।

---

१ पं. गर्भी.–२ पं. नाठवी.–३ पं. निःकाम.

न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी ।
जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठोबा दान दे गा तुझ्या सारिखें नांमा[1] ।
कीर्ति हे वाखाणिली थोर वाढली सीमा ॥ ध्रु ॥
भुक्ति मुक्ति तूं चि एक होसि सिद्धीचा दाता ।
ह्मणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता ।
सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां ।
कृपादान देई देवा येउनि सामोरा आतां ॥ २ ॥
संसारसागरु गा भवदुःखाचें मूळ ।
जनवाद अंथरुण माजी केले इंगळ ।
इंद्रियें[2] वज्रघातें तपे उष्ण वरी जाळ ।
सोसिलें काय करूं दुर्भर[3] हे चांडाळ ॥ ३ ॥
तिहीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा ।
वेंघलों वरि खोढा भाव धरूनि टेंका ।
जाणवी नरनारि जागो धरम लोकां ।
पावती पुण्यवंत सोई आमुचिये[4] हाका ॥ ४ ॥
नाठवे आपपर आतां काय बा करूं ।
सारिखा सोईसवा[5] हारपला विचारु ।
घातला योगक्षेम तुज आपुला भारु ।
तुकया शरणागता देई अभयकरु ॥ ५ ॥

१ पं. नांवा.—२ पं. इंद्रिय.—३ त. दुर्भर चांडाळें.—४ पं. आमुचिया.—५ पं. दोही.

## वासुदेव—अभंग ६.

॥ ४२९ ॥

मनु राजा एक देहपुरी । असे नांदतु त्यासि दोघी नारी ।
पुत्र पौत्र संपन्न भारी । तेणें कृपा केली आह्मांवरी गा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सवडीनि आलों या देशा । होतों नाहीं तरी भुललों दिशा ।
दाता तो[1] मज भेटला ऐसा । येउनि[2] मारग दाविला सरिसा गा ॥ * ॥
सवें घेउनि चौघिजण । आला कुमर सुलक्षण ।
काढे चुकवुनि कांचण । एका आणिलीं तीं कोण कोण गा ॥ २ ॥
पुढें भक्तीनें धरिलें हातीं । मागें ज्ञान वैराग्य धर्म येती ।
स्थिर केली जी आनंदें होती । सिद्ध आगुनि लाविलीं पंथीं गा ॥ ३ ॥
केले उपकार सांगों काय । बाप न करी ऐसी माय ।
धर्में त्याच्या दाखविले पाय । दिलें अक्षय भय वारूनि दान गा ॥ ४ ॥
होतों पीडत हिंडतों गांव । पोट भरता राहावया ठाव ।
तो येणें अवघा संदेह । लगें फेडियेला तुकयाचा[3] बंधव गा ॥ ५ ॥

॥ ४३० ॥

गातों वासुदेव मी एका । चित्त ठेवुनि ठायीं भावें एका ।
डोळे झाकुनि रात्र करूं नका । काळ करीन बैसला[4] लेखा गा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबंदीं ।
सांडावा आंगाया उपाधी । लक्ष लावुनि राहा गोविंदीं गा ॥ * ॥
ऐसा अल्प[5] मानवी देह । दान मागितलें[6] अर्थ रात्र स्थाय ।

१ पं. तो नि.—२ पं. देउनि.—३ प. तुकया बांधव.—४ पं. बैसला असे.—५ पं. अल्प आयुष्य.—६ पं. मागितलें तें. * पं. हा शब्द नाहीं.

पुढें बाळत्व पीडा रोग क्षय । काय भजनासि उरलें तें पाहें गा ॥ २ ॥
क्षणभंगुर नाहीं भरवसा । व्हा रे सावध सोडा माया आशा ।
न चळे बळ पडेल मग फासा । पुढें हुशार थोर आहे वोळसा गा ॥३॥
कांहीं थोडें बहुत लागपाठ । करा भक्ति भाव धरा बळकट ।
तन मन ध्यानें लावुनियां नीट । जर असेल करणें गोड शेवट गा ॥४॥
विनवितों सकळां जनां । कर जोडुनि थोरां लाहनां ।
दान इतुलें द्या मज दीना । ह्मणे तुकयाबंधु राम ह्मणा गा ॥ ५ ॥

॥ ४३१ ॥

गेले टळले पाहार तीन । काय निदसुरा अझून ।
जागे होउनि करा कांहीं दान । नका ऐकों[३]नि झाकों लोचन गा ॥१॥
॥ ध्रु. ॥ हरी राम कृष्ण वासुदेवा । जाणवितसें जना ।
चिपळ्या टाळ हातीं मुखीं घोष । ना[४]रायणा गा ॥ ध्रु ॥
जें टाकेल कोणा कांहीं । फळ पुष्प अथवा तोयें ।
द्या परी मीस घेऊं नका भाई । पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥ २ ॥
देवाकारणें भाव तस्मात । द्यावें न लगे फारसें वित्त ।
जालें एक चित्त तरी बहुत । ते[६]वढ्यासाठीं नका करूं वाताहात गा ॥ ३ ॥
आलों येथवरी बहु सायासें । करितां दान हें चि मागावयास ।
नका भार घेऊं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥ ४ ॥
आतां मागुता येईल फेरा । हें तों न घडे या नगरा ।
ह्मणे तुक[७]याबंधु धरा । ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥ ५ ॥

---

१ पं. तोडा.—२ पं. ध्यान द्या.—३ पं. एकों झाकोनि.—४ पं. नामनारायणा गा.—५ पं. तोई.—६ पं. येवढ्या.—७ पं. तुकया बंधु राम धरा.

॥ ४३२ ॥

राम राम दोनी अक्षरें । सुलभ आणि सोपारें ।
जागा मागिले पाहारें । सेवटिचें गोड तें चि खरें गा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राम कृष्ण वासुदेवा । जाणवी जनासि ।
वाजवी चिपळिया । टाळ घागऱ्याघोषें गा ॥ छ ॥
गाय वासुदेव वासुदेवा । भिन्न नाहीं आणिका नांवा ।
दान जाणोनियां करीं आवा । न ठेवीं उरीं कांहीं ठेवा गा ॥ २ ॥
एक वेळा जाणविती । भरूनियां राहा चित्तीं ।
नेघें भार सांडीं कामा हातीं । नीज घेऊनि फिरती गा ॥ ३ ॥
सुपात्रीं सर्व भाव । मी तों सर्व वासुदेव ।
जाणती कृपाळु संत महानुभाव । जया भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥ ४ ॥
शूर दान जीवें उदार । नाहीं वासुदेवीं विसर ।
कीर्ति वाढे चराचर । तुका ह्मणे तया नमस्कार गा ॥ ५ ॥

॥ ४३३ ॥

बोल बोले अबोलणें । जागें बाहेर आंत निजेलें ।
कैसें घरांत घरकुल केलें । नेणों आंधार ना उजेडलें गा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वासुदेव करितों फेरा । वाडियांत बाहेर दारा ।
कोणी कांहीं तरी दान करा । जाव नेदा तरी जातों सांमोरा गा ॥छ॥
हातीं टाळ दिंडी मुखीं गाणें । गजर होतो बहु मोट्यानें ।
नाहीं निवडिलीं थोरल्याहानें । नका निजों भिकेच्या भेणें गा ॥ २ ॥

१ पं. जाणवितसें २ त. नेचावे.—३ पं. सर्वत्र.—४ पं. वाढे कीर्ति.—५ पं. द्वारा.—६ पं. दान पुण्य करा.—७ पं. माघारा.—८ पं. मुखीं नाम गाणें.—९ पं. होतो गजर. * पं. हे शब्द नाहीं.

मी वासुदेव तत्वता । कळों येईल विचारितां ।
आहे ठाउका सभाग्या संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥ ३ ॥
काय जागाचि निजलासी । सुनें जागोन दारापासीं ।
तुझ्या हितोपाठीं करी व्यास व्यासी । भेटी न घेसी वासुदेवासी गा ॥ ४ ॥
ऐसें जागविलें अवघें जन । होतें संचित तींहीं केलें दान ।
तुका ह्मणे दुबळीं कोणकोण । गेलीं वासुदेवा विसरून गा ॥ ५ ॥

॥ ४३४ ॥

रामकृष्ण गीती गात । टाळ चिपळ्या वाजवीत ।
छंदें आपुलिया नाचत । नीज घेऊनि फिरत गा ॥ १ ॥
॥ धु. ॥ जनीं वनीं हा अवघा देव । वासनेचा हा पुसावा ठाव ।
मग वोळगती वासुदेव । ऐसा मनीं वसूं द्यावा भाव गा ॥ ध्रु ॥
निज दासाची थोर आवडी । वासुदेवासि लागली गोडी ।
मुखीं नाम उच्चारी घडोघडीं । ऐसी करा हे वासुदेवजोडी गा ॥ २ ॥
अवघा सारूनि सेवट जाला । प्रयत्न न चले कांहीं केला ।
जागा होई सांडुनि झोंपेला । दान देई वासुदेवाला गा ॥ ३ ॥
तुका ह्मणे रे धन्य त्याचें जिणें । जींहीं घातलें वासुदेवा दान ध्रु ॥
त्याला न लगे येणें जाणें । जालें वासुदेवीं राहणें गा ॥ ४ ॥

॥ ६ ॥

## गांवगुंड — अभंग २.

॥ ४३५ ॥

आह्मी जालों गांवगुंड । अवघ्या पुंड भूतांसी ॥ १ ॥

१ पं. सुनें जागऊनि दारापासीं.—२ पं. हित लागीं करसी व्यास व्यासी.—३ पं. जिहीं वासुदेवा केलें दान.

॥ ध्रु. ॥ दुसरें तें खेळों आलें । एका बोलें तो मिर्या ॥ ध्रु ॥
अवघियांचा येऊं लाग । नेदूं अंग शिवाया ॥ २ ॥
तुका ह्मणे खुंटूं नाद । जिंतूं वाद सर्वांनें ॥ ३ ॥

जोगी अ० १. ॥ १ ॥

॥ ४३६ ॥

नग जोगी जग जोगी । जोगजागे बोलती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जागता जगदेव । राखा कांहीं भाव ॥ ध्रु ॥
अवघा क्षेत्रपाळ । पूजा सकळ ॥ २ ॥
पूजापत्र कांहीं । फळ पुष्प तोयें ॥ ३ ॥
बहुतां दिसां फेरा । आला या नगरा ॥ ४ ॥
नका घेऊं भार । धर्म तो निःसार ॥ ५ ॥
तुका मागे दान । द्यां जी अनन्य ॥ ६ ॥

सरवदा--अभंग १. ॥ १ ॥

॥ ४३७ ॥

एका गा ए भाई । सरवदा सांगतो काई ।
येथें नाडेल माई । दोघां पुत्रांची ।
ते करिती निच्चीं विटंबना । अवघ्या प्रसिद्ध जना ।
एक न मारितां शाहाणा । तो जाणा सुख न पवे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आणीक ऐका गा ए । सरवदा सांगतो काय ।
खरें चिं बोले तो जाय । नरकामध्यें अधोगती ।
हें चौघांच्या मुखें । मना आणावें सुखें ।

---

१ पं. जागे जाग.–२ पं. पूजावा.–३ पं. तोई.–४ पं. द्यावें. * पं. हा शब्द नाहीं.

अवघीं चुकती दुःखें । खोटें बोला नरनारी ॥ ध्रु ॥
आणीक नाडेल एक जाण । सरवदा बोलतो वचन ।
जागें मांझें ह्मणोन । पडिलें खान तया वरीं ।
ह्मणोन न ह्मणा माझें कांहीं । निजीं निजा सुखें ठायीं ।
यत्न होईल तईं । चोराठायीं विश्वास ॥ २ ॥
आणीक एकी परी । सरवदा सांगतो थोरी ।
दुःख पावेल नारी । पतिव्रता यामधीं ।
पांचांनीं दिधली हातीं । ह्मणोनि न मनावी निश्चिती ।
परपुरुषीं होय रती । सुखगती ते पावे ॥ ३ ॥
आणीक एकी परी । सरवदा सांगतो तें करीं ।
दान देतां जो न वारी । नव्हे भला भला तो ।
तुका ह्मणे आई । येथें नांव काई ।
सांगसी तें ठायीं । मरो रांडेचें ॥ ४ ॥

॥ १ ॥

## मुंढा—अंभग ३.

॥ ४३८ ॥

संबाल यारा उपर तलें दोन्हो मारकी चोट ।
नजर करे सो ही राखे पैश्वा जावे लुट ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ प्यार खुदाई रे बाबा जिकिर खुदाई ॥ ध्रु ॥
उडे कुदे ढुंग नचावे आगल भुलन प्यार ।

१ पं. माझें चित्त.—२ पं. पश्वा.—३. पं. प्यार खुदाई प्यार खुदाई प्यार खुदाई रे बाबा जिकिर खुदाई.

लडबड खडबड कांहेकों खचलावत भार ॥ २ ॥

कहे तुका चेलो एका हम जिन्होंके सात ।

मिलावे तो उसे देना तो ही चढावे हात ॥ ३ ॥

॥ ४३९ ॥

सब संबाल भ्याने लौंढे खडा केऊं गुंग ।

मंदिरथी मेना हुवा मुलि पाडी भंग ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आपसकुं संबाल आपसकुं संबाल ।

मुंढे खुब राख ताल । मुथियोंहि बोला नहीं तो करूंगा हाल ॥ध्रु॥

आवलका तो पीछे नहीं मुदल बिसर जाय ।

फिरने नहीं लाज रंडी गधे गोते खाय ॥ २ ॥

जिन्हो खातिर इतना होता सो नहीं तुझे वेफाम ।

उचा जोरो लिया तुंवा तुंवा बुरा काम ॥ ३ ॥

निकल जावे चिकल जोरो मुंढे दिलदारी ।

जबानीकी छोड दे बात फिर एक तारी ॥ ४ ॥

कहे तुका फिसल रुका मेरेको दान देख ।

पकड धका गांडगुढघी मार चलाऊं आलेख ॥ ५ ॥

॥ ४४० ॥

आवल नाम आल्ला बडा लेते भुल न जाये ।

इलाम त्याकालजमुपरनाहीं तुंव बजाये ॥ १ ॥

आल्ला एक तुं नबी एक तुं ॥ ध्रु ॥

---

१ पं. सुनो.—२ पं महा.—३ त. अपसकु संबाल मुंढे खुब राख ताल.—४ पं. आवल तो.—५ पं.बेकाम.— ६ पं. जारा.— ७ पं. मेरेको तो. त. मेरेका.

काटतें सिर पावों हात नहीं जीव डराये ।
आगले देखे पिछले बुझे । आपें हजुर आयें ॥ २ ॥
सब सवरी नचाव म्याने । खडा आपनी सात ।
हात पावों रखते जबाब । नहीं आगली बात ॥ ३ ॥
सुनो भाई बजार नहीं । सब हि निरचे लाव ।
नन्हा बडा नहीं कोये एक ठोर मिलाव ॥ ४ ॥
एक तार नहीं प्यार । जीवतनकी आस ।
कहे तुका सो हि मुंढा । राखलिये पायेनपास ॥ ५ ॥

॥ ४४१ ॥

## डोई फोडा--अभंग १. ॥ ३ ॥

तम भज्याय ते बुरा जिकीर ते करे। सीर काटे ऊर कुटे ताहां सब डरे ॥१॥
॥ ध्रु. ॥ ताहां एक तु हीं ताहां एक तु हीं ।
ताहां एक तु हीं रे बाबा हमें तुलें नहीं ॥ ध्रु ॥
दिदार देखो भुले नहीं किशे पछाने कोये ।
सचा नहीं पकडुं सके झुटा झुटे रोये ॥ २ ॥
किसे कहे मेरा किन्हे सात लिया भास ।
नहीं मेलो मिले जीवना झुटा किया नास ॥ ३ ॥
सुनो भाई कैसा तो हीं । होय तैसा होय ।
बाट खाना आल्ला कहना एकबारां तो हीं ॥ ४ ॥
भला लिया भेक मुंढे । आपना नफा देख ।
कहे तुका सो हीं संका । हाक आल्ला एक ॥ ५ ॥

॥ १ ॥

॥ ४४२ ॥

## मलंग—अभंग १.

नजर करे सो हिं* जिंके बाबा दुरथी तमासा देख ।
लकडी फांसा लेकर बैठा आगले ठकण भेख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काहे भुला एक देखत आंखो मार तडांगो बाजार॥ध्रु.॥
दमरी चमरी जो नर भुला । सोत आघो हि लत खाये ॥ २ ॥
नहि बुलावत किसे बाबा आप हि मत जाये ।
कहे तुका उस असाके संग फिरफिर गोदे[१] खाये ॥ ३ ॥

## दरवेस—अभंग १. ॥ १ ॥

॥ ४४३ ॥

अल्ला करे सो होय बाबा करतारका सिरताज[२] ।
गाउ बछरे तिस चलावे यारी बाघो न सात ॥ १ ॥
ख्याल मेरा साहेबका । बाबा हुवा करतार ।
व्हांटें आघे चढे पीठ । आपे हुवा असवार[३] ॥ २ ॥
जिकिर करो अल्लाकी बाबा सबल्यां अंदर भेस ।
कहे तुका जो नर बुझे सो हि भया दरवेस ॥ ३ ॥

## वैद्यगोळी—अभंग १. ॥ १ ॥

॥ ४४४ ॥

अल्ला देवे अल्ला दिलावे अल्ला दारु अल्ला खिलावे[४] ।
अल्ला बगर नही कोये अल्ला करे सो हि होये ॥ १ ॥

---

१ पं. गोते.—२ पं. शिरताज.—३ दे. असुवार. त. असिवार.—४ दे. त. खलावे. * पं. हा शब्द नाहीं.

॥ ध्रु. ॥ मर्द होये वो खडा फीर नामर्दकुं नहीं धीर ।
आपने दिलकुं करना खुसी तीन ग्रामकी क्या खुमासी ॥ ध्रु ॥
सब रसोंका किया मार । भजनगोली एक हि सार ।
इमाने तो सब ही सखा । थोडी तो भी लेकर ज्या ॥ २ ॥
जिन्हों पास तीन सोये । वो हि बमकार निरोवे ।
सातो पांचो मार चलोवे । उनार सो पीछे खावे ॥ ३ ॥
सब ज्ञानी निकल जावे । पीछे गमडा मर्दी खावे ।
गांवढाळ सो क्या लेवे । हगनानि भरी नहि धोवे ॥ ४ ॥
मेरी दारू जिन्हें खाया । दिदार दरगां सो हि पाया ।
तल्हे मुंडी घाल जावे । बिगारी सोन क्या लेवे ॥ ५ ॥
बजारका तुझे भाव । वो हि पुसता आवे ठाव ।
फुकट बाटु कहे तुका । लेवे सो हि ले हि सखा ॥ ६ ॥

## गोंधळ अभंग ३. ॥ १ ॥

॥ ४४५ ॥

राजस सुंदर बाळा । पाहों आलिया सकळा वो ।
विटीं विटोनि ठेली । माझी परब्रह्म वेल्हाळा वो ।
कोटि रविशशि मांझी । परब्रह्म वेल्हाळा वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राजस विठाबाई । माझें ध्यान तुझे पायीं वो ।
त्यजुनियां चौधांसी । लावी आपुलिये सोई वो ॥ ध्रु ॥
सकुमार साजिरी । कैसीं पाउलें गोजिरीं वो ।

१ पं. क. इनाम. त. विमान.—२ पं. लगार. क. ल्हार.—३ त. तो—४ त. पं. लेवे सखा.—५ पं. कोटि रविशशिप्रभा लोपल्या सकळा वो.—६ पं. चौघांसी.

कंठीं तुळसीमाळा । उभी भीवरेच्या तिरीं वो ।
दंत हिरया ज्योति । शंखचक्र मिरवे करीं वो ॥ २ ॥
निर्गुण निराकार । वेदां न कळे चि आकार वो ।
शेषादिक श्रमले । श्रुती न कळे तुझा पार वो ।
उभारोनि बाहे । भक्तां देत अभयकर वो ॥ ३ ॥
येउनि पंढरपुरा । अवतरली सारंगधरा वो ।
देखोनि भक्ति भाव । वोरसली अमृतधारा वो ।
देउनि प्रेमपान्हा । तुकया स्वामीनें किंकरा वो ॥ ४ ॥

॥ ४४६ ॥

सुदिन सुवेळ । तुझा मांडिला गोंधळ वो ।
पंच प्राण दिवटे । दोन्ही नेत्रांचे हिलाल वो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पंढरपुरनिवासे । तुझे रंगीं[1] नाचत असें वो ।
नवस पुरवीं माझा । मनिचीं जाणोनियां इच्छा वो ॥ ध्रु ॥
मांडिला देव्हारा । तुझा त्रिभुवनामाझारीं वो ।
चौक साधियेला । नाभिकळस ठेविला वरी वो ॥ २ ॥
बैसली देवता । पुढें वैष्णवाचें गाणें वो ।
उद्गारें गर्जती । कंठीं तुळसीचीं दर्शनें[2] वो ॥ ३ ॥
स्वानंदाचे ताटीं । धूप दीप पंचारती वो ।
ओवाळिली माता । विठाबाई पंचभूतीं वो ॥ ४ ॥
तुझें तुज पावलें । माझा नवस पुरवीं आतां वो ।
तुका ह्मणे राखें । आपुलिया शरणागता वो ॥ ५ ॥

---

१ पं. रंगणीं.–२ पं. भूषणं.

॥ ४४७ ॥

सुंदर मुख साजिरें । कुंडलें मनोहर गोमटीं बो ।
नागर नाग शोभा । केशर कस्तुरी मळवटीं बो ।
विशाळ व्यंकट नेत्र । वैजयंती तळपे कंठीं बो ।
कास पीतांबराची । चंदन सुगंध साजे उटी बो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अतिवरवंटा वाळा । आली सुलक्षणी[1] गोंधळा बो ।
राजस तेजोराशी । सिरवी शिरीं मणी वेल्हाळा बो ।
कोटि रविशशिप्रभा लोपल्या सकळा बो ।
न कळे ब्रह्मादिकां । अनुपम्य इची लीळा बो ॥ ध्रु ॥
सांवळी सुकुमार । गोरी भुजा शोभती चारी बो ।
सखोल वक्षस्थळ । सुढाळ पदक अळके वरी बो ।
कटीं क्षुद्र घंटिका । शब्द करिताती माधुरी बो ।
गर्जत चरणीं वाकी । अभिनव संगीत नृत्य करी बो ॥ २ ॥
अष्टांगें[2] मंडित काय । वर्णावी रूपलावणी बो ।
*शोभिव सुंदर रसाची ओतिली । सुगंध लावण्यखाणी बो ।
सर्वकळासंपन्न । मंजुळ बोले हास्यवदनीं बो ।
बहु रूपें नटली । आदिशक्ति नारायणी बो ॥ ३ ॥
घटस्थापना केली । पंढरपुरमहानगरीं बो ।
अस्मानी मंडप दिला । तिन्ही ताळांवरी बो ।
आरंभिला गोंधळ इनें । चंद्रभागेतिरीं बो ।

---

१ पं. सुलक्षणा. त. सुलक्षणी.—२ पं. अष्टांगी. * पं. ही पंक्ती नाहीं.

आली भक्तिकाजा । कृष्णाबाई योगेश्वरी वो ॥ ४ ॥
तेहतिस कोटि देव । चामुंडा अष्ट कोटि भैरव वो ।
आरत्या कुरवंड्या । करिती पुष्पांचा वरुषाव वो ।
नारद तुंबर गायन । ब्रम्हानंद करिती गंधर्व वो ।
वंदी चरणरज तेथें । तुकयाचा वैभव वो ॥ ५ ॥

॥ ४४८ ॥

शंख करिशी ज्याच्या नांवें । त्यानें तुज नाहीं ठावें ।
एक सांगतां एका भावें । सोंड धरी तें जीवउनि खावें । रे विठ्ठल ॥ १ ॥
टिळे माळा करिसी सोंग । करुनि चाळविलें जग ।
पसरी हात नाहीं त्याग । दावी दगड पुजी भग । रे विठ्ठल ॥ २ ॥
राख लावुनि अंग मळी । वाये ठाके मी एक बळी ।
वासने हातीं बांधली नळी । त्यासि येउनि गिळी । रे विठ्ठल ॥ ३ ॥
कोण तें राहटीचें सुख । वरें पाय हारतें मुख ।
करवी पीडा भोगवी दुःख । पडे नरकीं परी न पळे चि मूर्ख । रे विठ्ठल ॥४॥
सिकला फाक मारी हाका । रांडा पोरें मेळवी लोकां ।
विटंवी शरीर मागे रुका । वेळे ते गेले अवघें चि फुका । रे विठ्ठल॥ ५ ॥
कळावें जनां मी एक बळी । उभा राहोनि मांडी फळी ।
फोडोनि गुडघे कोंपर चोळी । आपला घात करोनि आपण चि तळमळे ।
रे विठ्ठल ॥ ६ ॥
फुकट खेळे ठकली वांयां । वरुनि सोंग वोडक्या डोया ।
शिवों नये तो अंतरीं माया । संपादणीविण विटंबिली काया । रे विठ्ठल॥७॥

---

१ दे. क. त. चौदा.–२ पं. ब्रह्मानंद.–३ क. भगल.

धुळी माती कांहीं खेळों च नका । जवादी चंदन घ्यावा तुका ।
आपणा परिमळ आणिकां लोकां । मोलाची महिमा फजिती फुका । रे विठ्ठल
॥ ८ ॥
बहुत दुःखी जालियां खेळें । अंगीं बुद्धि नाहींत बळें ।
पाठीवरी तोबा तोंड काळें । रसना द्वेष उपस्थाच्या मुळें । रे विठ्ठल ॥९॥
काय सांगतो तें ऐका तुका । मोडा खेळ कांहीं अवगों च नका ।
चला जेवूं आम्ही पोटीं लागल्या भुका । भाल्यावरी वरा टाकमटिका ।
रे विठ्ठल ॥ १० ॥

॥ ४४१ ॥

एक बाई तुज वो कांहीं सांगेन शकुन ।
निजलिया भुर होसी जागी ह्मणऊन ॥ १ ॥
॥ धु. ॥ मान्य माझें केलें सांगनें एका बोलें ।
न येतां हे भलें कळों कोणा लोकांसि ॥ छ ॥
सांगनें गुण जीवीची खुण एक माझी मान ।
बैस एका भावें माझे हातीं दे वो हात ॥ २ ॥
बरवा घरचार तुज सांपडला ठाव ।
फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ॥ ३ ॥
आहे तुझे हातीं एका नवमासें फळ ।
भावा करीं साह्य चहूं अठरांच्या बळें ॥ ४ ॥
करीं लागपाठ चित्त वित्त नको पाहों ।
अखंड तो चुडा तुज भोगईल ना हो ॥ ५ ॥

१ पं. सांगतों.

कुळींची हे मुळी तुझे लागलीसे देवी ।
पडिला विसर नेदी फळ नाहीं ठावी ॥ ६ ॥
तुका ह्मणे नांद सुखें धरीं आठवण ।
माझ्या येती[1] कोणी त्यांचा राख बरा मान ॥ ७ ॥

## कावडे-अभंग ५.

॥ ४५० ॥

आहो[2] रे भाई । प्रथम नमूं तो विनायक । ठेवुनि गुरुचरणीं मस्तक ।
वदेल प्रसादिक वाणी । हरिहरांचे पवाडे ॥ १ ॥
माझी ऐसी ब्रीदावळी । दासें दासत्वें आगळी ।
पान्हेरीनें मार्ग मळी । जीवन घ्या रे कापडि हो ॥ २ ॥
जें या सीतळाहुनि[3] सीतळ । पातळाहुनि जें पातळ ।
प्रेमामृत रसाळ । तें हें सेवा अहो भाग्याचे ॥ ३ ॥
जिंकाल तरी जिंका रे अभिमान । दवडाल तरी दवडा लज्जा आणि मान ।
धराल ते धरा शंभूचे चरण । दावाल पण ऐसा दावा तो ॥ ४ ॥
काळा घेऊं नेदीं वाव । आला तो राखें घावडाव ।
शुद्ध सत्वीं राखोनि भाव । ह्मणा महादेव हरिहर वाणी गर्जों द्या ॥ ५ ॥
पराविया नारी माउली समान । परधनीं बाटों नेदीं मन ।
जीवित्व तें तृणासमान । स्वामिकार्जीं जाण शूर ह्मणों तया ॥ ६ ॥

---

१ पं. येथील.—२ पं. या सुद्धां पुढील पांच अभंगांत " आहा आहारे भाई. " असा पाठ आहे. क. पांचही ठिकाणीं मुळीं नसतां नवीन "आहा" असा शब्द घातला आहे. त. दे. "आहारे भाई " असेंच सर्वत्र आहे. परंतु दे. ५१ व्या अभंगाच्या आरंभींमात्र " आहा आहारे भाइ " असें आहे. —३ पं. जें सीतळाहुनि सीतळ । पातळाहुनि पातळ । तें सेवा अहो भाग्याचे नो ॥

शक्ति वेचावया परउपकारा । खोटें खोट्याचा पसारा ।
सत्य तें भवनदीचा तारा । आळस तो न करा येथें अहो सांगतों[1] ॥ ७ ॥
व्रत करा एकादशी सोमवार । कथा पूजन हरिजागर ।
पुण्य तें असे गातां नाचतां बहु फार । पुन्हा बोलिला संसार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥ ८ ॥
संग संतांचा करितां बरवा । उत्तमोत्तम कीर्तीचा ठेवा ।
पंथ तो सुपंथें चालावा । उगवा वासना लिगाड ॥ ९ ॥
तुका चालवितो कावडी । प्रवृत्ति निवृत्ति चोखडी ।
पुढती[2] पुढती अधिक गोडी । भजनि कळस[3] भजन आवडी केशवदास नटतसे ॥ १० ॥

॥ ४५१ ॥

आहा आहा रे भाई । हें अन्नदानाचें सत्र । पव्हे घातली सर्वत्र ।
पंथीं अवघे पंथ मात्र । इच्छाभोजनाचें आर्त पुरवावया ॥ १ ॥
यावें तेणें घ्यावें । न सरेसें केलें सदाशिवें ।
पात्र शुद्ध पाहिजे बरवें । मंगळभावें सकळ हरि[4] ह्मणा रे ॥ २ ॥
नव्हे हें कांहीं मोकळें । साक्षी[5] चौघांचिया वेगळें । नेदी नाचों मताचिया बळें ।
अणु[6] अणोरणीया आगळें । महादि महदा साक्षित्वें हरि ह्मणा रे ॥ ३ ॥
हे हरि नामाची आंबिली । जगा पोटभरी केली ।
विश्रांति कल्पतरूची साउली ।
सकळां वर्णी सेवितां भली । ह्मणा हर हर महादेव ॥ ४ ॥

---

१ दे. क. सांगतां.—२ पं. पुडती पुडती.—३ त. भजन कळस.—४ पं. हरिह्मणा रे हरिह्मणा.—५ पं. साक्ष.—६ पं. आनु आणोरणीया.

तुका हरिदास तराळ । अवघे हाकारी सकळ ।
या रे वेगें शिखरातळ । येथें भाग पर्वकाळ महादेवदर्शनें ॥ ५ ॥

॥ ४५२ ॥

आहा रे भाई । नमो उदासीन जाले देहभावा ।
आळविती देवा तया नमो ॥ १ ॥
नमो तीर्थपंथें चालती तयांसी । येती त्यांसी बोळविती त्यां नमो ॥ २ ॥
नमो तयां संतवचनीं विश्वास । नमो भावें दास्य गुरुचें त्यां ॥ ३ ॥
नमो तया मातापित्यांचें पाळण । नमो त्या वचन सत्य वदे ॥ ४ ॥
नमो तया जाणे आणिकांचें सुखदुःख । राखे तान भुक तया नमो ॥ ५ ॥
परोपकारी नमो पुण्यवंता । नमो त्या दमित्या इंद्रियांसि ॥ ६ ॥
तुका ह्मणे नमो हरिचिया दासा । तेथें सर्व इच्छा पुरलीसे ॥ ७ ॥

॥ ४५३ ॥

आहा रे भाई । तयावरी माझी ब्रीदावळी । भ्रष्ट ये कळीं क्रियाहीन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी ।
वाणिली ते थोरी देवद्वारीं वांयां वांहेगि ॥ २ ॥
बाइलेच्या दास पित्रांस उदास । भीक भिकाऱ्यास नये दारा ॥ २ ॥
विद्याबळें वाद सांगोनियां छळी । आणिकांसि फळी मांडोनियां ॥ ३ ॥
गांविंचिया देवा नाहीं दंडवत । ब्राह्मण अतीत घडे चि ना ॥ ४ ॥
सदा सर्वकाळ करितो चि निंदा । स्वप्नीं ही गोविंदा आठवीना ॥ ५ ॥
खासेमध्यें धन पोटासि बंधन । नेणे ऐसा दानधर्म कांहीं ॥ ६ ॥

१ पं. येती बोळवीत तयासि नमो.—२ पं. तहान.—३ पं. दमी.—४ पं. क. करुनियां.—५ पं. क. सर्व काळ करी संतांचिया निंदा.

तुका ह्मणे नटे दावुनियां सोंग । लवों नेदी अंग भक्तिभावें ॥ ७

॥ ४५४ ॥

आहा रे भाई । गंगा नव्हे जळ । वृक्ष नव्हे वड पिंपळ ।
तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ । श्रेष्ठ तनु देवाचिया ॥ १ ॥
समुद्र नदी नव्हे पैं गा । पाषाण ह्मणों नये लिंगा ।
संत नव्हती जगा । मानसा त्या सारिखे ॥ २ ॥
काठी ह्मणों नये वेतु । अन्न ह्मणों नये सांतु ।
राम राम हे मातु । नये ह्मणों शब्द हे ॥ ३ ॥
चंद्र सूर्य नव्हती तारांगणें । मेरू तो* नव्हे पर्वता समान ।
शेष वासुकी[1] नव्हे सर्प जाण । विखाराच्या सारिखे ॥ ४ ॥
गरुड नव्हे पाखरूं । ढोर नव्हे नंदिकेश्वरू ।
झाड नव्हे कल्पतरू । कामधेनु गाय न ह्मणावी ॥ ५ ॥
कूर्म नव्हे कासव । डुकर नव्हे वराह ।
ब्रह्म नव्हे जीव । स्त्री नव्हे लक्ष्मी ॥ ६ ॥
गवाक्ष नव्हे हाड । पाटाव नव्हे कापड ।
परीस नव्हे दगड । सगुण ते ईश्वरीचे ॥ ७ ॥
सोनें नव्हे धातु । मीठ नव्हे रेतु ।
नाहीं नाहीं चर्मांतु । कृष्णाजिन व्याघ्रांबर ॥ ८ ॥
मुक्ताफळें नव्हेति गारा । खड्याऐसा नव्हे हिरा ।
जीव नव्हे सोइरा । बोळवीजे स्वइच्छेनें ॥ ९ ॥

---

१ पं. वासुगी.—* पं. हा शब्द नाहीं.

गांव नव्हे द्वारावती । रणछोड नव्हे मूर्ति ।
तीर्थ नव्हे गोमती । मोक्ष घडे दर्शनें ॥ १० ॥
कृष्ण नव्हे भोगी । शंकर नव्हे जोगी ।
तुका पांडुरंगीं । हा प्रसाद लाधला ॥ ११ ॥

सोन्या–अ० ११. ॥ ५ ॥

॥ ४५५ ॥

वेसन गेलें निष्काम जालें नर नव्हे नारी ।
आपल्या तुटी पावल्या भेटी सोरियांचे फेरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचा वेध लागला छंद हरि गोविंद वळोवळां ।
आपुलेमागें हासत रागें माळले घालिनी गळां ॥ छ ॥
जन वेपा भीतें तोडी आमुच्या भांडणा ।
कर कटीं भीमा तटीं पंढरीचा राणा ॥ २ ॥
वेगळ्या यातिं पडिलों संगीं अवघ्या एका भावें ।
टाकियेली चाड देहभाव जीवें शिवें ॥ ३ ॥
सकळांमधीं आगळी बुद्धि निची करूं सेवा ।
थोंय तुंबामृतामधें भक्ति नाचों भावा ॥ ४ ॥
ह्मणे तुका टाकू रुका नाचों निर्लज्जा ।
बहु जालें सुख कोम चुकलों या काजा ॥ ५ ॥

॥ ४५६ ॥

आणिकां उपदेशूं नेणों नाचों आपण ।

१ पं. क. बांध.–२ पं. काम चुकलें.

मुंढा वांयां मारगेली वांयां हांसे जन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसा नव्हे चाळा आवरीं मन डोळा ।
पुढिलांच्या काळा कवतुक जाणोनी ॥ ध्रु. ॥
बाहिरल्या वेषें आंत जसें तसें ।
झाकलें तों वरें पोट भर तणें सिसें ॥ २ ॥
तुका ह्मणे केला तरी करीं शुद्ध भाव ।
नाहीं तरी जासी वांयां हा ना तोसा ठाव ॥ ३ ॥

॥ ४५७ ॥

टाका रुका चाल रांडे कां गे केली गोवी ।
पुसोनियां आलें ठाव ह्मणोनि देतें सिवी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां येणें छंदें नाचों विनोदें ।
नाहीं या गोविंदें माझें मजसी केलें ॥ ध्रु. ॥
कोरडे ते बोल कांग वेचितेसी वांयां ।
वर्ते करूनि दावीं तुझ्या मुळींचिया ठाया ॥ २ ॥
याजसाठीं म्यां दोर धरियेला हातीं ।
तुका ह्मणे तुह्मा गांठी सोडायाची खंती ॥ ३ ॥

॥ ४५८ ॥

मोकळी गुंते सितां कुंथे नाहीं भार खांवें ।
वेडवाडा बैसली खोडा घेतली आपुल्या भावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एका वाईं लाज नाहीं आणिकां त्या गरतीची ।

१ पं. मुढा क. मुढां.—२ पं. काही.

समाधानीं उंच स्थानीं जोणे सेवा पतीची ॥ ध्रु ॥
न बोलतां करी चिंता न मारितां पळे ।
दादला सेज नावडे निजे जगझोडीचे चाळे ॥ २ ॥
देखत आंध बधिर कानीं बोल बोलतां मुकें ।
तुका ह्मणे पतन सोयरीं ऐसीं जालीं एकें ॥ ३ ॥

॥ ४५९ ॥

साजें नव्हा काजळ घाल्या तेल फणी करा ।
दिवाणदारीं बैसलें पारीं नाचों फेर धरा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ या साहेबानें जालें देणें वेळोवेळां न लगे येणें ।
आतां हातीं काशामाळीं हिंडों पाटी दुकानें ॥ ध्रु ॥
अवघ्या जगीं मुंढा धर्णी नाचों एकें घाईं ।
सरसावलें सुख कैसा चाळा एके ठायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे बोळगों एका तोडू चिंता माया ।
देऊं उद्धार आतां जाऊं मुळींचिया ठाया ॥ ३ ॥

॥ ४६० ॥

सौरी सुर जालें दुर डौर घेतला हातीं ।
माया मोह सांडवलें तीही लोकीं जालें सरती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चाल विठाबाई अवघी पांजे देई ।
न धरीं गुज कांहीं वाळवंटीं सांपडतां ॥ ध्रु ॥
हिंडोनि चौऱ्याशी घरें आलें तुझ्या दारा ।

---

१ पं. सेवा जाणे.—२ पं. पाच.

एक्या रुक्यासाठीं आंचवलें संसारा ॥ २ ॥
लाज मेली शंका गेली नाचों महाद्वारीं ।
भ्रांति सावलें फिटोनि गेलें आतां कैंची उरी ॥ ३ ॥
जालें भांडी जगा सांडी नाहीं भीड चाड ।
घालीन चरणीं मिठी पुरवीन जीविंचें तें कोड ॥ ४ ॥
तुका ह्मणें रुका करी संसारतुटी ।
आतां तुह्मां आह्मां कैसी जाली जीवे साटीं ॥ ५ ॥

॥ ४६१ ॥

सम सपाट वेसनकाट निःसंग जालें सौरी ।
कुडपीयेला देश आतां येऊं नेदीं दुसरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गाऊं रघुरामा हें चि उरलें आह्मां ।
नाहीं जीवतमा वित्तगोतासहीत ॥ ध्रु ॥
ठाव जाला रिता झाकुनि काय आतां ।
कोणासवें लाज कोण दुजा पाहता ॥ २ ॥
सौरीयांचा संग आह्मां दुरावलें जग ।
भिन्न जालें सुख भाव पालटला रंग ॥ ३ ॥
लाज भय झणी नाहीं तजियेलीं दोन्ही ।
फिराविला वेष नव्हों कोणाचीं च कोणी ॥ ४ ॥
तुका ह्मणे हा आह्मां वेष दिला जेणें ।
जनाप्रे[1]चित सवें असों एकपणें ॥ ५ ॥

१ पं. जनाप्रति सवें.

॥ ४६२ ॥

नव्हे नरनारी संवसारीं अंतरलों ।
निर्लज्ज निष्काम जना वेगळे चि ठेलों[1] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चाल रघुरामा ने आपुल्या गांवा ।
तुजविण आह्मां कोण सोयरा सांगाती ॥ ध्रु ॥
जनवाद लोकनिंद्य पिशुनाचे चेरे ।
सोंहूं तुजसाठीं अंतरलीं सहोदरें ॥ २ ॥
बहुता पाठीं निरोप हातीं[2] पाठविला तुज ।
तुका ह्मणे आतां सांडुनि लौकिक लाज ॥ ३ ॥

॥ ४६३ ॥

नीट पाट करूनि थाट । दावीतसे तोरा ।
आपणाकडे पाहो कोणी । निघाली बाजारा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ते सौरी नव्हे निकी । भक्तीविण फिकी ॥ ध्रु ॥
चांग भांग करूनि सोंग । दावी माळा मुद्री ।
रुक्याची आस धरूनि । हालवी ती फुदी ॥ २ ॥
थोरे घरीं करी फेरी । तेथें नाचे बरी ।
जेथें निघे रुका । तेथें हालवी टिरी ॥ ३ ॥
आंत मांग बाहेर चांग । सौरी ती नव्हे तेग ।
तुका दास नटतसे । न करी त्याचा संग ॥ ४ ॥

१ त. जालों.–२ पं साऊं.

॥ ४६४ ॥

चाल माझ्या राघो । डोंगरीं दिवा लागो ॥ ध्रु ॥
घर केलें दार केलें । घरीं नाहीं वरो ।
सेजारणी पापिणीचीं पांच पोरें मरो ॥ १ ॥
घरीं पांच पोरें । तीं मजहुनि आहेत थोरें ।
पांचांच्या बळें । खादलीं बावन केळें ॥ २ ॥
घर केलें दार केलें । दुकान केला मोटा ।
पाटाची राणी धांगडधिंगा िचा मोटा ॥ ३ ॥
दुकान केला मोटा । तर पदरीं रुका खोटा ।
हिजडा ह्मणसी जोगी । तर सोळा सहस्र भोगी ।
तुका ह्मणे वेगीं । तर हरि ह्मणा जगीं ॥ ४ ॥

॥ ४६५ ॥

जन्मा आलिया गेलिया परी । भक्ति नाहीं केली ।
माझें माझें ह्मणोनियां । गुंतगुंतों मेलीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येथें कांहीं नाहीं । लव गुरूच्या पायीं ।
चाल रांडे टाकीं रुका । नको करूं बोल ।
गुरुविण मार्ग नाहीं । करिसी तें फोल ॥ २ ॥
खाउनी जेउनि लेउनि नेसुनि । ह्मणती आह्मी बऱ्या ।
साधु संत घरा आल्या । होती पाठमोऱ्या ॥ ३ ॥
वाचोनि पढोनि जाले शाहणे । ह्मणती आह्मी संत ।
परनारी देखोनि त्यांचें । चंचळ जालें चित्त ॥ ४

टिळा टोपी घालुनि माळा । ह्मणती आह्मी साधु ।
दयाधर्म चित्तीं नाहीं । ते जाणावे भोंदु ॥ ५ ॥
कलियुगीं घरोघरीं । संत जाले फार ।
वीतिभरी पोटासाठीं । हिंडती दारोदार ॥ ६ ॥
संत ह्मणती केली निंदा । निंदा नव्हे भाई ।
तुका असे अनन्यें भावें शरण संतां पायीं ॥ ७ ॥

॥ ११ ॥

## वाघा—अ० १.

॥ ४६६ ॥

अनंत जुगाचा देव्हारा । निजबोधांचा घुमारा ।
अवचिता भरला वारा । या मल्हारी देवाचा ॥ १ ॥
शुद्धसत्त्वाचा कवडा मोठा । बोधबिरडें बांधला गांठा
गळां वैराग्याचा पट्टा । वाटा दावूं या भक्तीच्या ॥ २ ॥
ह्रदय कोटंबा सांगातें । घोळ वाजवूं अनुहातें ।
ज्ञानभंडाराचें पोतें । रितें नव्हे कल्पांतीं ॥ ३ ॥
लक्ष चौऱ्याशीं घरें चारी । या जन्माची केली वारी ।
प्रसन्न जाला देव मल्हारी । सोहंभावीं राहिलों ॥ ४ ॥
या देवाचें भरतां वारें । अंगीं प्रेमाचें फेंफरें ।
गुरुगुरु करी वेडे चारें । पाहा तुकें भुंकविलें[१] ॥ ५ ॥

॥ १ ॥

---

१ पं. तुका भुंकविला. क. तुका भुंकविलें.

## ललित----अभंग ११.

॥ ४६७ ॥

आजी दिवस जाला । धन्य सोनियाचा भला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जालें संताचे पंगती । बरवें भोजन निगुती ॥ ध्रु ॥

रामकृष्णनामें । बरवीं मोहियेलीं प्रेमें ॥ २ ॥

तुका ह्मणे आला । चवी रसाळ हा काला ॥ ३ ॥

॥ ४६८ ॥

तुह्मी तरी सांगा कांहीं । आह्मांविशीं रखुमाबाई ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ कांहीं उरलें तें ठायीं । वेगीं पाठवुनी देईं ॥ ध्रु ॥

टोकत बैसलों देखा । इच्छीतसें ग्रासा एका ॥ २ ॥

प्रेम देउनि बहुडा जाला । तुका ह्मणे विठ्ठल बोला ॥ ३ ॥

॥ ४६९ ॥

वाट पाहें बाहे निडळीं ठेवुनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टि लागलें चित्त ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कई येतां देखें माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखीं धरूनियां माप ॥ ध्रु ॥

डावा डोळा लवे उजवी स्फुरते बाहे । मन उताविळ भाव सांडुनियां देहे ॥ २ ॥

सुखसेजे गोडचित्तीं न लगे आणीक । नाठवे घर दार तान पळाली भूक ॥ ३ ॥

तुका ह्मणे धन्य दिवस ऐसा तो कोण । पंढरीचे वाटे येतां मूळ देखेन ॥ ४ ॥

---

१ पं. तरी वो.—२ पं. ताहान हारपली.

॥ ४७० ॥

तुझें दास्य करूं आणिका मागों खावया ।
धिग् जालें जिणें माझें पंढरीराया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय गा विठोबा तुज म्हणावें ।
थोरांच्या दैवें गोड शुभअशुभ ॥ ध्रु ॥
संसाराचा धाक निरंतर आह्मांसी ।
मरण भलें परि काय अवकळा नैसी ॥ २ ॥
तुझे शरणागत शरण जाऊं आणिकांसी ।
तुका ह्मणे कवणा लाज हें कां नेणसी ॥ ३ ॥

॥ ४७१ ॥

पुरविली आळी । जे जे केली ते ते काळीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माय तरी ऐसी सांगा । कृपाळुवा पांडुरंगा ॥ ध्रु ॥
घेतलें नुतरी उचलोनि कडियेवरी ॥ २ ॥
तुका ह्मणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ३ ॥

॥ ४७२ ॥

कथेची सामग्री । देह अवसानावरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥ ध्रु ॥
आयुष्य करीं उणें । परी मज आवडो कीर्तन ॥ २ ॥
तुका ह्मणे हाणी । या वेगळी मना नाणीं ॥ ३ ॥

१ पं. धन्य जिणें जालें.—२ पं. तुज आतां.—३ पं. शुभाशुभ गोड तुह्मां थोरांच्या दैवें.—४ पं. ऐसी.—५ पं. तुका ह्मणे लाज हे कां कवणा नेणसी.—६ पं. त. सामोग्री. दे. सामुग्री.—७ पं. न आणी.

॥ ४७३ ॥

गळित जाली काया । हें चि ललित पंढरिराया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आलें अवसानापासीं । रूप राहिलें मानसीं ॥ ध्रु ॥
वाइला कळस । तेथें स्थिरावला रस ॥ २ ॥
तुका ह्मणे गोड जालें । नारायणीं पोट धालें ॥ ३ ॥

॥ ४७४ ॥

रत्नजडित सिंहासन । वरी बैसले आपण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कुंचे ढळती दोहीं बाहीं । जवळी रखुमाई राही[1] ॥ ध्रु
नाना उपचारीं । सिद्धि वोळगती कामारी ॥ २ ॥
हातीं घेऊनि पादुका । उभा बंदिजन तुका ॥ ३ ॥

॥ ४७५ ॥

हिरा शोभला कोंदणीं । जडित माणिकांची खाणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥ ध्रु ॥
कोटि चंद्र[2]लीळा । पूर्णिमेच्या पूर्णकळा ॥ २ ॥
तुका ह्मणे दृष्टि धाये । परतोनि माघारी ते न ये ॥ ३ ॥

॥ ४७६ ॥

पतित पतित । परी मी त्रिवाचा पतित ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ परी तूं आपुलिया सत्ता । मज करावें सरता ॥ ध्रु ॥
नाहीं चित्तशुद्धि । स्थिर पायांपाशीं बुद्धि ॥ २ ॥
अपराधाचा केलों । तुका ह्मणे किती बोलों ॥ ३ ॥

---

१ पं. राही रखुमाई.—२ पं. चंदकळा.

॥ ४७७ ॥

उभारिला हात । जगीं जाणाविली मात ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव बैसले सिंहासनीं । आल्या याचका हो[१]य धनी ॥ ध्रु ॥
एकाच्या कैवाडें । उगवे बहुतांचें कोडें ॥ २ ॥
दोहीं ठायीं तुका । नाहीं पडों देत चुका ॥ ३ ॥

## आशीर्वाद—अभंग ५. ॥ ११ ॥

॥ ४७८ ॥

जीविंसाटीं यत्नभाव । त्याची नाव बळकट ॥ १ ॥
॥ धु. ॥ पैल तीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥ ध्रु ॥
विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥ २ ॥
तुका ह्मणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥ ३ ॥

॥ ४७९ ॥

आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कल्याण तें[२] असे क्षेम वाढे प्रेम आगळें ॥ ध्रु ॥
भक्तिभाग्यगांठी धन । त्या नमन जीवासी ॥ २ ॥
तुका ह्मणे हरिचे दास । तेथें आस सकळ ॥ ३ ॥

॥ ४८० ॥

तया साटीं वेचूं वाणी । अइकों कानीं वारता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ क्षेम माझे हरिजन । समाधान पुसतां त्यां ॥ ध्रु ॥
परत्रींचे जे[३] सांगाती । त्यांची याती न विचारीं ॥ २ ॥
तुका ह्मणे धैर्यवंतें । निर्मळचित्तें सर[४]वीं तीं ॥ ३ ॥

---

१ पं· पुरे.—२ दे. त. ती असो.—३ पं. ते .—४ पं. तीं एक

॥ ४८१ ॥

अभय उत्तर संतीं केलें दान । जालें समाधान चित्त तेणें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण । द्यावें कृपादान नारायणा ॥ ध्रु ॥
आलें जें उचित देहविभागासी । तेणें पायांपासीं उभीं असों ॥ २ ॥
तुका ह्मणे करी पूजन वैखरी । बोबडा उत्तरीं गातों गीत ॥ ३ ॥

॥ ४८२ ॥

असो मंत्रहीन क्रिया । नका[1] चर्या विचारूं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥ ध्रु ॥
विचारूनि ठाया ठाव । येथें भाव राहिला ॥ २ ॥
आतां तुकयापाशीं हेवा । नाहीं देवा तांतडी ॥ ३ ॥

॥ ५ ॥

॥ ४८३ ॥

ऐकें[2] वचन कमळापती । मज रंकाची विनंती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कर जोडितों कथाकाळीं । आपण असावें जवळी ॥ ध्रु ॥
घेईं[3] ऐसी भाक । मागेन जरि कांहीं आणिक ॥ २ ॥
तुकयाबंधु ह्मणे देवा । शब्द इतुका[4] राखावा ॥ ३ ॥

॥ ४८४ ॥

आली ललिताची वेळ । असा सावध सकळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लाहो करा वेगीं स्मरा । टाळी वाउनि[5] विश्वंभरा ॥ ध्रु ॥
जालिया अवसान । न संपडती चरण ॥ २ ॥

---

१ दे. त. नको.–२ पं. वचन ऐका.–३ घेईं घेईं माझी भाक । जरी कांहीं मागेन आणिक ॥–४ पं. इतुका चि.– ५ त. पं. वाहोनि.

तुकयाबंधु ह्मणे थोडें[1] । अवधि उरली आहे पुढें ॥ ३ ॥

॥ ४८५ ॥

नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन ।
कायावाचामनेंसहित आलों शरण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करीं अंगीकार नको मोकलूं हरी ।
पतितपावन ब्रिदें करावीं खरीं ॥ ध्रु ॥
नेणें भक्तिभाव तुझा ह्मणवितों दास ।
जरि देसी अंतर तरि लज्जा कोणास ॥ २ ॥
ह्मणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाये ।
आतां कोण दुजा ऐसा आह्मांसी आहे ॥ ३ ॥

॥ ४८६ ॥

तूं च मायबाप बंधु सखा आमचा ।
वित्त गोत जीवलग जीवाचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां ।
योगक्षेमभार तुझे घातला माथां ॥ ध्रु ॥
तूं च क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ ।
तूं च तप तीर्थ व्रत गुरु सकळ ॥ २ ॥
ह्मणे तुकयाबंधु करिता कार्यता देवा ।
तूं च भाव भक्ति पूजा पुनस्कार[2] आघवा ॥ ३ ॥

---

१ दे. त. क. थोडं.–२ पं. छा. पुरस्कार अवघा.

॥ ४८७ ॥

करूनि उचित । प्रेम घालीं ह्रदयांत ॥ १ ॥
। ध्रु. ॥ आलों दान मागायास । थोरी करूनियां आस ॥ ध्रु ॥
चिंतन समयीं । सेवा आपुली च देईं ॥ २ ॥
तुकयाबंधु ह्मणे भावा । मज निरवावें देवा ॥ ३ ॥

॥ ४८८ ॥

गाऊं वाऊं टाळी रंगीं नाचों उदास ।
सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बळियाचा बळी तो कैवारी आमुचा ।
भुक्तिमुक्तिदाता सकळां ही सिद्धींचा ॥ ध्रु ॥
मारूं शब्दशस्त्रबाण निःशंक अनिवार ।
कंटकाचा[१] चुर शिरें[२] फोडूं काळाचें ॥ २ ॥
ह्मणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड ।
आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥ ३ ॥

॥ ४८९ ॥

सांडूनि वैकुंठ । उभा विटेवरी नीट ॥ १ ॥
। ध्रु. ॥ आला आला रे जगजेठी । भक्ता पुंडलिकाचे भेटी ॥ ध्रु ॥
पैल चंद्रभागे तिरीं । कट धरूनियां करीं ॥ २ ॥
तुकयाबंधु ह्मणे अंबर । गजर होतो जयजयकार ॥ ३ ॥

॥ ४९० ॥

कृपाळु भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥ १ ॥

१ क. कंटकांचा.—२ पं. फोडूं काळाचें शिर.

॥ ध्रु. ॥ उभा न पाचारितां दारीं । न सांगतां काम करी ॥ ध्रु ॥
भाव देखोनि निर्मळ । रजा वोडवी कपाळ ॥ २ ॥
तुकयाबंधु ह्मणे न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ॥ ३ ॥

॥ ४९१ ॥

केला अंगीकार पंढरीच्या देवें ।
आतां काय करितील काळ मशक मानवें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घातलीं बाहेर तीं भय होतें ज्यांनें ।
बैसला आपण तेथें घालुनियां ठाणें ॥ ध्रु ॥
लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी ।
हा पुरता निर्धार कळों आला आह्मांसी ॥ २ ॥
ह्मणे तुकयाबंधु न लगे करावी चिंता ।
कोणाविशीं आतां बैसलों हस्तीवरी माथां ॥ ३ ॥

॥ ४९२ ॥

अगोचरी बोलिलों आज्ञेविण आगळें ।
परी तें आतां नें संडावें राउळें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाईल रोकडा बोल न पुसतां आह्मां ।
बुझा तुझें ह्मणविलें पाहा पुरुषोत्तमा ॥ ध्रु ॥
न व्हावा न वजावा न कळतां अन्याय ।
न धरावें तें मनीं भलता करा उपाय ॥ २ ॥
ह्मणे तुकयाबंधु हीन मी ह्मणोनि लाजसी ।

१ दे. क. त. सांगतां.—२ पं. करितील.—३ पं. ज्याच्यानें.—४ पं. न संडावें कपाळु राउळें.—५ पं. तुकयाबंधु ह्मणे. * पं- हा शब्द नाहीं.

वारा लागों पाहातोहे उंच्या झाडासी ॥ ३ ॥

॥ ४९३ ॥

जाली पाकसिद्धि वाट पाहे रखुमाई ।
उदक तापलें डेरां[1] चीकसा मर्दुनि पाईं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उठा पांडुरंगा उशीर जाला भोजनीं ।
उभ्या आंचवणा गोपी कळस घेउनी ॥ छ ॥
अवघ्या सावचित्त सेवेलागीं सकळा ।
उद्धव अक्रूर आले पाचारूं मुळा ॥ २ ॥
सावरिली सेज सुमनयाति सुगंधा ।
रत्नदीप ताटीं वाळा विडिया विनोदा ॥ ३ ॥
तुका विनंती करी पाहे पंढरीराणा ।
असा सावचित्त सांगे सकळा जना ॥ ४ ॥

॥ ४९४ ॥

उठा सकळ जन उठिले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥ १
॥ ध्रु. ॥ करा जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥ छ ॥
जोडोनि[2] दोन्ही कर मुख पाहा सादर । पायावरि शिर ठेवूनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे काय पढियंतें[3] तें मागा । आपुलालें सांगा सुख दुःखं[4] ॥ ३ ॥

॥ ४९५ ॥

करूनी विनवणी पायीं[5] ठेवीं माथा ।

---

१ पं. डेरा चीकसा मर्दुंद्या पायीं.—दे. मर्दुनि अई. त. मर्दुनि आई.—२ त. पं. जोडुनियां कर.—३ त. पं. क. पडियंतें.—४ पं. दुःख सकळ.—५ पं. चरणीं.

परिसावी विनवणी माझी पंढरीनाथा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अखंडित असावेंसें वाटतें पायीं ।
साहोनि संकोच ठाव थोडासा देई ॥ ध्रु ॥
असो नसो भाव आलों तुझिया ठाया ।
पाहें कृपादृष्टी मज पंढरीराया ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मीं तुझीं वेडीं वांकडीं ।
नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं ॥ ३ ॥

॥ ४९६ ॥

घडिया घालुनि तळीं चालती वनमाळी ।
उमटती कोमळीं कुंकुमाचीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वंदा चरणरज अवघे सकळ जन ।
तारियेले पाषाण उदकीं जेणें ।
पैस करूनी चला ठाकत ठायीं ठायीं ।
मौन्य करूनी कांहीं नो बोलावें ॥ २ ॥
तुका अवसरु जाणविती पुढें ।
उघडलीं महाल मंदिरें कवाडें ॥ ३ ॥

॥ ४९७ ॥

भीतरी गेले हरी राहा क्षणभरी। होईल फळ धीर करावा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न करीं त्वरा एकें मात । क्षण एक निवांत बैसावें ॥ ध्रु ॥
करूनी मर्दन सारिलें पाणी । न्हाले देव अंग पुसी भवानी ॥ २ ॥

---

१ पं. विनंती.—२ पं असावें ऐसें.—३ पं उठती—४ पं. न.—५ पं. मंदिर.—६ पं. बैसोनी.

नेसला सोनसळा विनवी रखुमाई । वाढिलें आतां ठायीं चलावें जी ॥ ३ ॥
करूनियां भोजन घेतलें आंचवण । आनंदें नारायण पहुडले ॥ ४ ॥
तुका मात जाणवी आतां । सकळां बहुतां होती[१] ची ॥ ५ ॥

॥ ४९८ ॥

द्या जी आह्मां कांहीं सांगा जी रखुमाई ।
शेष[२] उरलें ठायीं सनकादिकांचें ॥ १ ॥
टोकत बाहेरी बैसलों आशा ।
पुराया ग्रासा एकमेकां ॥ ध्रु ॥
येथवरी आलों तुझिया नांवें ।
आस करूनी आह्मी दातारा ॥ २ ॥
प्रेम देउनियां बहुडा आतां दिलों[३] ।
तुका[४] ह्मणे आतां विठ्ठल बोला ॥ ३ ॥

॥ ४९९ ॥

बहुडविलें जन मन जालें निश्चळ ।
चुकवूनी कोल्हाळ आला तुका ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पर्यंकीं निद्रा करावें शयन ।
रखुमाई आपण समवेत ॥ ध्रु ॥
घेउनियां आलों हातीं टाळ वीणा ।
सेवेसि चरणा स्वामीचिया ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां परिसावीं सादरें[५] ।
बोबडीं उत्तरें पांडुरंगा ॥ ३ ॥

---

१ पं. होती चित्तीं.—२ पं. शेष उरलें ते ठायीं सनकादिका.—३ पं. जाला.—४ पं. तुका ह्मणे विठ्ठल बोला.—५ पं. सादर.

॥ ५०० ॥

नाच गाणें माझा जवळील ठाव । निरोपीन भाव होईल तो ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुह्मां निद्रा मज आज्ञा ते स्वभावें । उतरूनि जीवें जाईन लोण ॥ध्रु॥

एकाएकीं बहु करीन मुस्वरें । मधुर उत्तरें आवडीनें ॥ २ ॥

तुका ह्मणे तूं जगदानी उदार । फेडशील भार एकों वेळा ॥ ३ ॥

॥ ५०१ ॥

सिणलेती सेवकां देउनि इच्छादान । केला अभिमान अंगीकारा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अहो दीनानाथा आनंदमुरती । तुह्मांसि शोभती ब्रीदें ऐसीं ॥ ध्रु॥

बहुतांनीं विनविलें बहुतां प्रकारीं । सकळां ठायीं हरी पुरलेती ॥ २ ॥

तुका ह्मणे अगा कुटुंबवत्सळा । कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥ ३ ॥

॥ ५०२ ॥

उठा भागलेती उजगरा । जाला स्वामी निद्रा करा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वाट पाहाते रुक्मिणी । उभी मंचक संवारुणी ॥ ध्रु ॥

केली करा क्षमा । बडबड पुरुषोत्तमा ॥ २ ॥

लागतो चरणा । तुकयाबंधु नारायणा ॥ ३ ॥

॥ ५०३ ॥

पावला प्रसाद आतां उठोनि जावें । आपला तो श्रम कळों येतसे जीवें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा ।
पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ ध्रु ॥
तुह्मांसि जागवूं आह्मी आपुलिया चाडा ।

१ त. निंबलोण.—२ पं. क. एक वेळे.—३ पं. अंगीकार.—४ पं. दे. क. मूर्ति.—५ पं. निरविलें.—६ पं. संवारुनी.—७ दे. विटेनि ८ पं. भावें.—९ त. आतां सुखें स्वामी.

शुभाशुभ कर्मे[1] दोष हारिया[2] पीडा ॥ २ ॥
तुका ह्मणे दिलें उच्छिष्टाचें भोजन ।
आह्मां[3] आपुलिया नाहीं निवाडिलें भिन्न ॥ ३ ॥

॥ ५०४ ॥

शब्दांचीं रत्नें करूनी अळंकार । तेणें विश्वंभर पूजियेला ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ भावाचे उपचार करूनि भोजन । तेणें नारायण जेवविला ॥ ध्रु ॥
संसारा हातीं दिलें आंचवण । मुखशुद्धी मन समर्पिलें ॥ २ ॥
रंगलीं[4] इंद्रियें सुरंग तांबूल । माथां तुळसीदळ समर्पिलें ॥ ३ ॥
एकभावदीप करूनि निरांजन । देऊनि आसन देहाचें या ॥ ४ ॥
न बोलोनि तुका करी चरणसेवा । निजविलें देवा माजघरीं ॥ ५ ॥

॥ ५०५ ॥

उठोनियां तुका गेला निजस्थळा । उरले राउळा माजी देव ॥ १ ॥
॥ ध्रु. निउल[5] जालें सेवका स्वामीचें । आज्ञे करूनी चित्त समाधान ॥ ध्रु ॥
पहुडलिया हरी अनंतशैनावरी[6] । तेथें नाहीं उरी कांहीं काम ॥ २ ॥
अवघी बाहेर घालूनि गेला तुका । सांगितलें लोकां निजले देव ॥ ३ ॥

॥ ५०६ ॥

## दसरा—अ० १

पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा ।
सांपडला तो साधा आजि मुहूर्त बरा ।
गर्जा जयजयकार[7] हरि ह्रुदयीं धरा ।
आळस नका करूं लाहानां सांगतों थोरां ॥ १ ॥

---

१ त. कर्म.—२ पं. हाराया.—३ पं. नाहीं निवाडिलें आह्मां आपुल्या भिन्न.—४ पं. रंगली इंद्रिय. ५ पं. नेउले.—६ पं. अनंतसेनावरी.—७ दे. त. जेजेकार.

॥ ध्रु. ॥ या हो या हो बाइयानो निघाले हरी ।
सिलंगणा [1]वेगीं घेउनि आरत्या करीं ।
ओवाळूं श्रीमुख वंदूं पाउलें शिरीं ।
आम्हां दैव आलें येथें घरिच्या घरीं ॥ ध्रु ॥
अक्षय मुहूर्त [2]औटांमध्यें साधे तें ।
मग येरी गर्जे जैसें तैसें [3]होतें जातें ।
ह्मणोनि मागें पुढें कोणी न पाहावें येथें ।
सांडा परतें काम जाऊं हरी सांगातें ॥ २ ॥
बहुतां बहुतां रीतीं चित्तीं धरा हें मनीं ।
नका [4]गै करूं आइकाल ज्या कानीं ।
मग हें सुख कधीं न देखाल स्वप्नीं ।
उरेल हायहाय मागें होईल काहाणी ॥ ३ ॥
ऐसियास वंचती त्यांच्या अभाग्या पार ।
नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार ।
मग हे वेळ घटिका न ये अजरामर ।
कळलें असों द्या मग पडतील विचार ॥ ४ ॥
जयासाटीं ब्रह्मादिक जालेति पिसे ।
उच्छिष्टा कारणें देव जळीं जाले मासे ।
अर्द्धांगीं विश्वमाता लक्षुमी वसे ।
तो हा तुकयाबंधु ह्मणे आलें अनायासें ॥ ५ ॥

॥ ५०७ ॥

ओवाळूं आरती [5]पंढरीराया । सर्वभावें शरण आलों तुझिया पायां ॥ १ ॥

---

१ पं. घेउनि वेगीं.—२ दे. क. औटामध्यें.—३ क. होतें.—४ पं. गई.—५ पं.आरती माझ्या.

॥ ध्रु. ॥ सर्व व्यापून कैसें रूप[1] आकळ । तो हा गौळ्या घरीं जाला कृष्ण बाळ ॥ ध्रु ॥

स्वरूप गुणातीत जाला अवतारधारी[2] । तो हा पांडुरंग उभा विटेवरी ॥ २ ॥

भक्तीचिया काजा कैसा रूपासि आला । ब्रिदाचा तोडर[3] चरणीं मिरविला ॥ ३

आरतें आरती[4] ओवाळिली । वाखाणितां कीर्त्ति वाचा परतली ॥ ४ ॥

भावभक्तिबळें होसी कृपाळु देवा । तुका[5] ह्मणे पांडुरगा तुझ्या न कळती मावा ॥ ५ ॥

॥ ५०८ ॥

करूनि आरती । आतां ओवाळूं श्रीपती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आजि पुरले नवस । धन्य जाला हा दिवस ॥ ध्रु ॥

पाहा वो सकळा । पुण्यवंता तुह्मी बाळा ॥ २ ॥

तुका वाहे टाळी । होता सन्निध जवळी ॥ ३ ॥

॥ ५०९ ॥

द्याल माळ जरी[6] पडेन मी पायां । दंडवत वांयां कोण वेची ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आलें तें हिशोबें अवघिया प्रमाण । द्यावें तरी दान मान होतो[7] ॥ ध्रु ॥

मोकळिया मनें घ्याल जरी सेवा । प्रसाद पाठवा लवकरी ॥ २ ॥

तुका ह्मणे तुह्मी जालिया कृपण । नामाची जतन मग कैची ॥ ३ ॥

॥ ५१० ॥

तुह्मीं जावें निजमंदिरा । आह्मी जातों आपुल्या घरा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विठोबा लोभ असों देई । आह्मी असों तुमचे पाई ॥ ध्रु ॥

चित्त करी सेवा । आह्मी जातों आपुल्या गांवा ॥ २ ॥

तुका ह्मणे दिशा भुलों । फिरोन पायापाशीं आलों ॥ ३ ॥

---

१ त. रूप कैसें.—२ पं. स्वरूप गुणातीत अवतार धरी ।—३ त. तोरडु. पं. तोडरु.—४ पं. आरती कैसी.—५ पं. तुका ह्मणे तुझ्या.—६ पं. तरी.—७ पं. क. ही शोभे.

॥ ५११ ॥

पाहें प्रसादाची वाट । द्यावें धोवोनियां ताट ॥ १ ॥
॥ध्रु. ॥ शेष घेऊनि जाईन । तुमचें जालिया भोजन ॥ ध्रु ॥
जालों एकसवा । तुह्मां आडुनियां देवा ॥ २ ॥
तुका ह्मणे चित्त । करूनि राहिलों निश्चित ॥ ३ ॥

॥ ५१२ ॥

केली कटकट गाऊं नाचों नेणतां ।
लाज नाहीं भय आह्मां पोटाची चिंता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बैसा सिणलेती पाय रगडूं दातारा ।
जाणवूं द्या वारा उब जाली शरीरा ॥ ध्रु ॥
उशिरा उशीर किती काय ह्मणावा ।
जनंनिये[1] बाळका कोप कांहीं न धरावा ॥ २ ॥
तुझिये संगतीं ओह्मीं[2] करूं कोल्हाळ ।
तुका ह्मणे बाळें अवघीं[3] मिळोन गोपाळ ॥ ३ ॥

॥ ५१३ ॥

कळस वाहियेला शिरीं । सहस्रनामें पूजा करीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पीक पिकलें पिकलें । घन दांटोनियां[4] आलें ॥ ध्रु ॥
शेवटीचें दान । भागा आला नारायण ॥ २ ॥
तुका ह्मणे पोट । भरलें वारलें[5] बोभाट ॥ ३ ॥

---

१ पं. जननी या.–२ दे. क. येऊं.–३ पं. अवघे.–४ त. मोडोनियां.–५ पं. क. वारला.

॥ ५१४ ॥

आरुष शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं ।
लडिवाळ बाळकें तूं चि आमुची आई ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देईं गे विठाबाई प्रेमभातुकें ।
अवघियां कवतुकें लहानां थोरां सकळां ॥ ध्रु ॥
असो नसो भाव आलों तुझिया ठाया ।
पाहे कृपादृष्टी आतां पंढरीराया ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी तुझीं वेडीं वांकुडीं ।
नामें भवपाश आतां आपुलिया तोडीं ॥ ३ ॥

॥ ५१५ ॥

आडकलें देवद्वार । व्यर्थ काय करकर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां चला जाऊं घरा । नका करूं उजगरा ॥ ध्रु ॥
देवा[1] लागलीसे निज । येथें उभ्या काय काज ॥ २ ॥
राग येतो[2] देवा । तुका ह्मणे नेघे सेवा ॥ ३ ॥

॥ ५१६ ॥

कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता ।
बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कृष्ण माझा गुरु कृष्ण माझें तारूं ।
उतरी पैल पारु भवें[3]नदीचि ॥ ध्रु ॥
कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन ।
सोइरा सज्जन कृष्ण माझा ॥ २ ॥

---

१ पं. ठाई.—२ पं. येईल.—३ पं. भवनदी.

तुका ह्मणे माझा श्रीकृष्ण विसावा ।
वाटे न करावा परता जीवा ॥ ३ ॥

॥ ५१७ ॥

कृपा करावी भगवंतें । ऐसा शिष्य द्यावा मातें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें व्रत जो चालवी । त्यासि द्यावें त्वां पालवी ॥ ध्रु ॥
व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । तिहीं लोकीं ज्याचा झेंडा ॥ २ ॥
तुका तुका हाका मारी । माझ्या विठोबाच्या द्वारीं ॥ ३ ॥

॥ ५१८ ॥

जातो वाराणसी । निरवी गाई घोडे ह्मैसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गेलों येतों नाहीं ऐसा । सत्य मानावा भरवसा ॥ ध्रु ॥
नका काढूं माझीं पेवें । तुह्मीं वरळा भूस खावें ॥ २ ॥
भिकारियाचे पाठीं । तुह्मी घेऊनि लागा काठी ॥ ३ ॥
सांगाल[२] जेवाया ब्राह्मण । तरी कांपाल[३] माझी मान ॥ ४ ॥
वोकलिया वोका । म्यां खर्चिला नाहीं रुका ॥ ५ ॥
तुह्मीं खावें ताकपाणी । जतन करा तूपलोणी ॥ ६ ॥
नाहीं माझे मनीं । पोरें रांडा नागवणी ॥ ७ ॥
तुका ह्मणे नीट । होतें तैसें बोले स्पष्ट ॥ ८ ॥

॥ ५१९ ॥

कास घालोनी बळकट । झालों कळिकाळासी नीट ।
केली पायवाट । भवसिंधूवरूनि ॥ १ ॥

१ त. माना हा.—२ दे. त. सांगा.—३ दे. त. का ।।.—४ पं. नष्ट—५ त. केलें.

॥ ध्रु. ॥ या रे या रे लाहान थोर । याति भलते नारीनर ।
करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥ ध्रु. ॥
का[1]मी गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे ।
लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥ २ ॥
एकंदर शिका । पाठविला इहलोका ।
आलों ह्मणे तुका । मी नामाचा धारक ॥ ३ ॥

॥ ५२० ॥

आह्मी वैकुंठवासी । आलों या चि कारणासी ।
बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ता[2]वया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ झाडूं संतांचे मारग । आडरानें भरलें जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं ॥ ध्रु. ॥
अर्थं लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ।
विषय[3]लोभी मन । सा[4]धनें बुडविलीं ॥ २ ॥
पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ।
तुका ह्मणे करा । ज[5]यजयकार आनंदें ॥ ३ ॥

॥ ५२१ ॥

बळियाचे अंकित । आह्मी जालों बळिवंत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लाता हा[6]णोनि संसा[7]रा । केला ष[8]ड्डूर्मींचा मारा ॥ ध्रु. ॥
जन धन तन । केलें तृणाही समान ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां । आह्मी मुक्तीचिया माथां ॥ ३ ॥

---

१ त. कामी गुंतलें रिकामें । जपी तपी येथें जमे । लाविलें दमामें । पं. कामीं.—२ क. वर्ताव्या पं. वर्तीया.—३ त. लोभीं.—४ पं. साधन बुडविलें.—५ दे. त. जेजेकार.—६ हला. पं. हणिला.—७ पं. त. संसार.—८ पं. षड्डूर्मीमार

॥ ५२२ ॥

मृत्युलोकीं आह्मां आवडती परी । नाहीं एका हरिनामें विण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन हें मनीं बैसलेंसे[1] ॥ ध्रु ॥
सोनें रूपें आह्मां मृत्तिके समान । माणिकें पाषाण खडे तैसे[2] ॥ २ ॥
तुका ह्मणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरी आह्मांपुढें ॥ ३ ॥

॥ ५२३ ॥

स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणमृत्तिकेच्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाठवे[3] हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरे ना ॥ ध्रु ॥
दृष्टिमुखें मरण इंद्रियाच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ २ ॥
तुका ह्मणे जरी अग्नि जाला साधु । परी[4] पावे बाधूं संघट्टणें ॥ ३ ॥

॥ ५२४ ॥

पराविया नारी रखुमाई[5]समान । हें गेलें[6] नेमून ठायींचें चि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाई वो तूं माते न करीं सायास । आह्मी विष्णुदास नव्हों तैसे[7] ॥ ध्रु॥
न साहावें मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ २ ॥
तुका ह्मणे तुज पाहिजे भ्रतार । तरी[8] काय नर थोडे जाले ॥ ३ ॥

॥ ५२५ ॥

भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सळे । विठ्ठले[9] कृपाळे होसी माये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पडिला विसर माझा काय गुणें । कपाळ हें उणें काय करूं ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें जाळूनि संचित । करीं वो उचित भेट देईं ॥ २ ॥

---

१ त. बैसलेंसे मनीं रामनाम.—२ पं. जैसे.—३ पं. अंतरे.—४ पं. तरी.—५ पं. माउली—६ त. पं. रखुमाई जन पांडुरंगे.—७ पं. तैसे नव्हों.—८ पं. तरी का इतर लोक थोडे.—९ त. पं. विठ्ठल.

॥ ५२६ ॥

तुजविण मज कोण वो[1] सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगे ॥ १ ॥
लागलीसे आस पाहा तुझें वास । रात्री वो दिवस लेखीं बोटीं ॥ २ ॥
काम गोड मज न लगे हा धंदा । तुका ह्मणे सदा हें चि ध्यान ॥ ३ ॥

॥ ५२७ ॥

पैढियंतें[2] आह्मी तुज[3]पाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाळसील लळे दनि वो वत्सले । विठ्ठले कृपाळे जन[4]निये ॥ ध्रु॥
जीव भाव तुझ्या ठेवियेला पायीं । तूं चि सर्वा ठायीं एक आह्मां ॥२॥
दुजियाचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ॥३॥
सर्वसत्ता एकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ॥ ४ ॥
ह्मणउनि पुढें मांडियेली आळी । थिंकोनियां[5] चोळी डोळे तुका ॥ ५ ॥

॥ ५२८ ॥

कोण पर्वकाळ पहासील तीथें । होतें माझें चित्त कासावीस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाठवीं भातुकें प्रेरीं[6] झडकरी । न[7]को राखों उरी पांडुरंगा ॥ ध्रु॥
न धरावा कोप मजवरी कांहीं । अवगुणी अन्यायी ह्मणोनियां ॥ २ ॥
काय रडविसी नेणतियां पोरां । जाणतियां थोरां याचिपरी ॥ ३ ॥
काय उभी कर ठेवुनियां कटीं । बुझावीं धाकुटीं लडिवाळें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां पदरासी पिळा । घालीन निराळा नव्हे मग ॥ ५ ॥

॥ ५२९ ॥

कां हो देवा कांहीं न बोला चि गोष्टी । कां मज हिंपुटीं करीतसा ॥ १ ॥

---

१ त. हो.—२ पं. त. पढीयंतें.—३ त. जयांपे.—४ त. होसी माये.—५ त. थीत.—६ पं. प्रेमें.—७ पं. नका.

॥ध्रु.॥ कंठीं प्राण पाहे वचनाची आस। तों दिसे उदास धरिलें ऐसें ॥ध्रु॥
येणें काळें बुंथी घेतलीसे खोलें। कां नये विटाळ होऊं माझा ॥ २ ॥
लाज वाटे मज ह्मणवितां देवाचा। न पुससी फुकाचा तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ५३० ॥

उचित तें काय जाणावें दुर्बळें। थोरिवेचें काळें तोंड देवा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ देतों हाका कोणी नाइकती क्षरीं। आम्ही कोणी वरी नाहीं ऐसें॥ध्रु॥
आलिया अतीता शब्द समाधान। करितां वचन काय वेंचे ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मां साजे हे श्रीहरी। आह्मी निर्लाजिरीं नव्हों ऐसीं ॥ ३ ॥

॥ ५३१ ॥

आह्मी मागों ऐसें नाहीं तुजपाशीं। जरी तूं भीतोसि पांडुरंगा ॥ १ ॥
॥ध्रु.॥पाहें विचारूनि आहे तुज ठावें। आह्मी भालों नावें तुझ्या एका॥ध्रु॥
ऋद्धिसिद्धि तुझें मुख्य भांडवल। हें तों आह्मां फोल भक्तीपुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे जाऊं वैकुंठा चालत। बैसोनि निश्चिंत सुख भोगूं ॥ ३ ॥

॥ ५३२ ॥

न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान। गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लागला उशीर पतितपावना। विसरोनि वचना गेलासि यां ॥ ध्रु
जाळोनि संसार बैसलों अंगणीं। तुझे नाहीं मनीं मानसीं हीं ॥ २ ॥
तुका ह्मणे नको रागेजों विठ्ठला। उठीं देई मला भेटी आतां ॥ ३ ॥

॥ ५३३ ॥

कमोदिनी काय जाणे तो परिमळ। भ्रमर सकाळ भोगीतसे ॥ १ ॥

---

१ त. तुह्मी.—२ पं. क. काळ बुंथी.—३ पं. खोळ.—४ दे. पं. नाहीं.—५ पं. मोक्ष.—६ क. निश्चित.— पं. निवांत.—७ पं. हे.—८ क. हे. पं. ते.—९ पं. कुमुदिनी.

॥ ध्रु. ॥ तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आह्मी च तें प्रेमसुख जाणों ॥ ध्रु. ॥
माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥ २ ॥
तुका ह्मणे मुक्ताफळ शिंपीपोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ३ ॥

॥ ५३४ ॥

काय सांगों तुझ्या चरणांच्या सुखा ।
अनुभव ठाउका नाहीं तुज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बोलतां हें कैसें वाटे खरेपण ।
अमृताचे गुण अमृतासी ॥ ध्रु. ॥
आह्मां एकएका ग्वाही मायपुतें ।
जाणों तें निरुतें सुख दोघें ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मां मोक्षाचा कांटाळा ।
कां तुह्मी गोपाळा नेणां ऐसें ॥ ३ ॥

॥ ५३५ ॥

देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ ध्रु.
मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ २ ॥
तुका ह्मणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हे बापुडे सकळी काळ ॥ ३ ॥

॥ ५३६ ॥

आतां येणेंविण नाहीं आह्मां चाड । कोण बडबड करी वांयां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सुख तें चि दुःख पुण्यपाप खरें । हें तों आह्मां बरें कळों आलें ॥ ध्रु. ॥

---

१ पं. चरणींच्या.—२ त. तुझे हे. गुज.—३ त. पं. सकळ ही.

तुका ह्मणे वाचा वाहिली[1] अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥ २ ॥

॥ ५३७ ॥

बोलों अबोलणें मरोनियां जिणें । असोनि नसणें जेंनि[2] आह्मां ॥ १ ॥

॥ध्रु.॥ भोगीं त्याग जाला संगीं च असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥ २ ॥

तुका ह्मणे नव्हें दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा[3] ॥ ३ ॥

॥ ५३८ ॥

अधिकार तैसा दांवियेले[4] मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जाळूं नये नांव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥ २ ॥

तुका ह्मणे रोग वैद्यांचे[5] अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥ ३ ॥

॥ ५३९ ॥

संवसार तीहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्य दारा जया चित्तीं ॥ १ ॥

शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं । जनार्दन जगीं होउनि ठेला ॥ २ ॥

तुका ह्मणे देहें दिला एकसरें । जयासि दुसरें नाहीं मग ॥ ३ ॥

॥ ५४० ॥

देहबुद्धि वसे लोभ जयां चित्तीं । आपुलें जाणती परावें जे ॥ १ ॥

तयासि चालतां पाहिजे सिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ॥ २ ॥

तुका ह्मणे धर्म रक्षाया कारणें । छाया इच्छी उन्हें तापला तो ॥ ३ ॥

॥ ५४१ ॥

काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्तिसंहारघडमोडी ॥ १ ॥

बीज तो अंकुर आच्छादिला पोटीं । अनंता सेवटीं एकाचिया ॥ २ ॥

---

१ दे. क वाईली.—२ त. पं. जनी (जनीं ?).—३ पं. विठोवासी—४ त. पं. दाविये. ला.—५ दे. त. वैदाचे.

तुका ह्मणे शब्दें व्यापिलें आकाश । गुढार हें तैसें[1] कळों नये ॥ ३ ॥

॥ ५४२ ॥

आणीक काळें न चले उपाय । धरावे यां[2] पाय विठोबाचे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अवघें चि पुण्य असे तया पोटीं । अवघिया तुटी होय पापा ॥ छ ॥

अवघें मोकळें अवघिया काळें । उद्धरती कुळें नरनारी ॥ २ ॥

काळ वेळ नाहीं गर्भवासदुःखें । उच्चारितां मुखें नाम एक ॥ ३ ॥

तुका ह्मणे कांहीं न लगे सांडावें । सांगतसें भावें घेती तयां ॥ ४ ॥

॥ ५४३ ॥

कां रे* माझा तुज न ये कळवळा । असोनि जवळा ह्रदयस्था ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥ छ ॥

कां हें चित्त नाहीं पावलें विश्रांती । इंद्रियांची गति कुंटे[3] चि ना ॥ २ ॥

तुका ह्मणे कां रे धरियेला कोप । पाप सरलें नेणों पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ५४४ ॥

दीनानाथा तुझीं ब्रिदें चराचर । घेसील कैवार शरणागता ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आह्मां रोकडे कळों आले ॥ छ ॥

आपुल्या दासांचें न साहासी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ॥ २ ॥

चक्र गदा हातीं आयुधें अपारें । न्यून तेथें[4] पुरें करूं धावें ॥ ३ ॥

तुका ह्मणे तुज भक्तीचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥ ४ ॥

---

१ पं. कैसें.–२ पं ते–३ क. खुंट.–४ पं. तें चि. * पं. हा शब्द नाहीं.

॥ ५४५ ॥

वर्णू महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ठायींची हे काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळुनि काय सांडूं ॥ ध्रु ॥

नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तो ही तुझा ॥ २ ॥

मज माझें कांहीं न दिसे पाहातां । जें तुज अनंता समर्पावें ॥ ३ ॥

तुका ह्मणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥ ४ ॥

॥ ५४६ ॥

नाहीं सुख मज न लगे हा मान । न राहे हें जन काय करूं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देहउपचारें पोळतसे अंग । विषतुल्य चांग मिष्टान्न तें ॥ ध्रु ॥

नाइकवे स्तुति वाणितां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥ २ ॥

तुज पावे ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज ॥ ३ ॥

तुका ह्मणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतूनि ॥ ४ ॥

॥ ५४७ ॥

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हें चि सांगे ॥ ध्रु ॥

विटंबो शरीर होत कां विपत्ति । परि राहो चित्तीं नारायण ॥ २ ॥

तुका ह्मणे नासिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तें चि हित ॥ ३ ॥

॥ ५४८ ॥

पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥ १ ॥

---

१ पं. मज नाहीं वाचा.—२ पं. नव्हे.—३ पं. विषातुल्य.—४ पं. क. वानितां.

॥ ध्रु. ॥ शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयाचिया ॥ ध्रु ॥
क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥ २ ॥
कर्वतिलीं[1] देहें कापियेलें मांस । गेले वनवासा[2] शुकादिक ॥ ३ ॥
तुका ह्मणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाय जळे ॥ ४ ॥

॥ ५४९ ॥

जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदों जिव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥ ध्रु ॥
आगिकांची मात नाइकावी कानीं । आणीक नयनीं न पाहावें ॥ २ ॥
चित्ता तुवां पायीं रहावें अखंडित । हाउनी निश्चित एकविध ॥ ३ ॥
चला पायें हात हें चि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबाच्या ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुह्मां भय काय करी । आमुचा कैवारी नारायण ॥ ५ ॥

॥ ५५० ॥

करिसी तें देवा करीं माझें सुखें । परी मी त्यासी मुखें न ह्मणें संत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ॥ ध्रु ॥
जगदेव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥ २ ॥
तुका ह्मणे भय न धरीं मानसीं । ऐसियाचे विशीं करितां दंड ॥ ३ ॥

॥ ५५१ ॥

ह्मणविती ऐसे आइकतों संत । न देखीजे होत डोळां कोणीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसियांचा कोण मानितें विश्वास । निवडे तो रस घाईडाई ॥ ध्रु ॥
पर्जन्याचे काळीं वाहाळाचे नद । ओसरतां बुंद न थारे चि ॥ २ ॥

१ पं. कर्वतिले देह.—२ त. वनवासास.—३ पं. हात पाय.

हिऱ्या ऐशा गारा दिसती दूरोन । तुका ह्मणे घन[1] न भेटे तों ॥ ३ ॥

॥ ५५२ ॥

अतिवाद[2] लावी । एक वोट सोंग दावी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ त्याचा बहुरूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥ ध्रु ॥

प्रतिपादी वाळी । एक पुजी एका छळी ॥ २ ॥

तुका ह्मणे नाहीं । भूतदया ज्याचे ठायीं ॥ ३ ॥

॥ ५५३ ॥

पोटाचे ते नट पाहीं नये छंद । विषयांचे भेद विषयरूप ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अर्थी परमार्थ कैसा घडों सके । चित्त लोभी भीके[3] सोंग वांयां ॥ ध्रु ॥

देवाचीं चरित्रें दाखविती लीळा । लाघवाच्या कळा मोहावया ॥ २ ॥

तुका ह्मणे चित्तीं राहे अभिळास । दोघां नरकवास सारिखा चि ॥ ३ ॥

॥ ५५४ ॥

भुंकती तीं द्यावीं भुंकों । आपण त्यांचें नये शिकों ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भाविकांनीं दुर्जनाचें । मानूं[4] नये कांहीं साचें ॥ ध्रु ॥

होइल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥ २ ॥

तुका ह्मणे त्यांचें[5] । पाप नाहीं ताडणाचें ॥ ३ ॥

॥ ५५५ ॥

जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नको भोंवतालें जगीं । पाहों जवळी राख अंगीं ॥ ध्रु ॥

कुडयाची संगती । सदा भोजन पंगती ॥ २ ॥

तुका ह्मणे ब्रह्म । साधीं विरहित कर्म ॥ ३ ॥

---

१ क. पं. त. घण.—२ क. अतिवादें.—३ त. भीकें.—४ पं. कांहीं मानूं नये साचें.—५ क. त. पं. त्याचे.

॥ ५५६ ॥

कांहीं च मी नव्हें कोणिये गांवींचा । एकट ठायींचा ठायीं एक ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघें[1] चि वांयांविण बोलें ॥ध्रु॥

नाहीं मज कोणी आपुलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥ २ ॥

नाहीं आह्मां ज्यावें मरावें लागत । आह्मीं अखंडित जैसे तैसे ॥ ३ ॥

तुका ह्मणे नांवरूप[2] नाहीं आह्मां । वेगळा ह्या कर्मा अकर्मासी ॥ ४ ॥

॥ ५५७ ॥

## लोहगांवास परचक्रवेढा पडला--अभंग ३.

न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय तुह्मी येथें नसालसें जालें । आह्मीं न देखिलें पाहिजे हें ॥ ध्रु ॥

परचक्र कोठें हरिदासांच्या वासें । नें* देखिजेत[3] देशें राहातिया ॥ २ ॥

तुका ह्मणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥ ३ ॥

॥ ५५८ ॥

काय म्यां मानावें हरिकथेचें[4] फळ । तरिजे सकळ जनीं[5] ऐसें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र[6] ॥ ध्रु ॥

पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी[7] रोकडें साक्ष आलें ॥ २ ॥

तुका ह्मणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥ ३ ॥

॥ ५५९ ॥

भीत नाहीं आतां आपुल्या मरणा ।

दुःखी होतां जना न देखवे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आमची तो जातो ऐसी परंपरा ।

---

१ पं. अवघेचि वांयां विण वोल.—२ त. नाम.—३ पं. देखिजे ते.—४ पं. कथेचें हें फळ.—५ पं. जन.—६ क. परचक्रे. (क्रें ?).—७ दे. क. साक्षसी. * दे. त. हा शब्द नाहीं.

कां तुह्मी दातारा नेणां ऐसें ॥ ध्रु ॥
भजनीं विक्षेप तें चि पैं मरण ।
न वजावा क्षण एक वांयां ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं आघाताचा वारा ।
ते स्थळीं दातारा ठाव मागें ॥ ३ ॥

॥ ३ ॥

॥ ५६० ॥

फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणमोल ॥ १ ॥
पायरी प्रतिमा एक चि पाषाण । परि तें महिमान वेगळालें ॥ २ ॥
तुका ह्मणे तैशा नव्हतील परी । संतजना सरी सारिखिया ॥ ३ ॥

॥ ५६१ ॥

कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रेति पावे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां माझा श्रोता वक्ता तूं चि देवा । करावी ते सेवा तुझी च म्यां ॥ ध्रु ॥
कुशळ चतुर येथें न सरते । करितील रिते तर्क मतें ॥ २ ॥
तुका ह्मणे जालें पणें एके घरीं । मज आणि हरी तुह्मां गांठी ॥ ३ ॥

॥ ५६२ ॥

आमचा विनोद तें जगा मरण । करिती भावहीण दखोवेखीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न कळे सँतंत हिताचा विचार । तों हे दारोदार खाती फेरे ॥ध्रु॥
वंदिलें वंदावें निंदिलें निंदावें । एक गेलें जावें त्याचि वाटा ॥ २ ॥
तुका ह्मणे कोणी नाइके सांगतां । होती यमदूतां वरपडे ॥ ३ ॥

---

१ त. ठेवीं मज.—२ क. प्रीति.—३ दे क. त. मां—४ पं. पवती. क. सर्ते.—५ पं. करितील रीति तर्क मत. ब. करितील रितें तर्क मतें.—६ पं. केणें जालें. त. जालें केणें.—७ (स्वतंत्र ?) संतत हा शब्द कांहींसा बरा लागेल.

॥ ५६३ ॥

दीप घेउनियां धुंडिती अंधार । भेटे हा[१] विचार अघटित ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विष्णुदास आह्मी न भ्यों[२] कळिकाळा । भुकों मृगजळा न घडे तें ॥ ध्रु ॥

उधळितां माती रविकळा मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ॥ २ ॥

तुका ह्मणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन वाउगें चि ॥ ३ ॥

॥ ५६४ ॥

नटनाटयें[३] अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं[४] रंग न पालटे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मांडियेला खेळ कौतुक[५] बहुरूप । आपुलें स्वरूप जाणतसों ॥ ध्रु ॥

स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे । भाव दावी पिवळे लाल संगे ॥ २ ॥

तुका ह्मणे आह्मी या जनाविरहित ॥ होउनि निश्चिंत[६] क्रीडा करूं ॥ ३ ॥

॥ ५६५ ॥

तुजविण वाणीं[७] आणिकांची[८] थोरी ।
तरी माझी हरी जिव्हा झडो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुजविण चित्ता आवडे आणीक ।
तरी हा मस्तक भंगो माझा ॥ ध्रु ॥
नेत्रीं आणिकांसि पाहीन आवडी ।
जातु ते चि घडी चांडाळ हे[९] ॥ २ ॥
कथामृतपान न करिती श्रवण ।

---

१ पं. तो.–२ त. भीं.–३ पं. क. नटनाट्य.–४ पं. दावी.–५. क. कौतुकें. पं. कव-तुकें.–६ पं. निश्चित.–७ त. पं. क. याणी.–८ पं. आणिकाची.–९ त. हें.

काय प्रयोजन मग यांचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय वांचून कारण ।
तुज एक क्षण विसंबतां ॥ ४ ॥

॥ ५६६ ॥

**स्वामींचे स्त्रीनें स्वामींस कठिण उत्तरें केलीं–अभंग ७.**

मज चि भोंवता केला येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चालोनियां घरा सर्व सुखें येती । माझी तों फजीती चुके चि ना ॥ ध्रु ॥
कोणाची बाईल होऊनियां वोढूं । संवसारीं काढूं आपदा किती ॥ २ ॥
काय तरी देऊं तोडितील पोरें । मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर । सारवावया ढोर शेण नाहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे रांड न करितां विचार । वाहुनियां भार कुंथे माथां ॥ ५ ॥

॥ ५६७ ॥

काय नेणों होता दावेदार मेला । वैर तो साधिला होऊनि गोहो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ किती सर्वकाळ सोसावें हें दुःख । किती लोकां मुख वासूं तरीं ॥ ध्रु ॥
ह्मवे आपुली आई काय माझें केलें । घड या विठ्ठलें संसाराचें ॥ २
तुका ह्मणे येती बाइले असेडे । फुंदोनियां रडे हांसे कांहीं ॥ ३ ॥

॥ ५६८ ॥

गोणी आली घरा । दाणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥

---

१ त. घेतलासे जोग–२ पं. आसडे.

॥ ध्रु. ॥ भरी लोकांची पांटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ ध्रु ॥
खवळली पिसी । हाता झोंबे जैसी[1] लांसी ॥ २ ॥
तुका ह्मणे खोटा । रांडे संचिताचा सांटा ॥ ३ ॥

॥ ५६९ ॥

आतां पोरा काय खासी । गोहो जाला देवलसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ डोचकें तिंबी घातल्या माळा । उदमाचा सांडी चाळा ॥ ध्रु
आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसपार ॥ २ ॥
हातीं टाळ तोंड वासी । गाय देउळीं देवापासीं ॥ ३ ॥
आतां आह्मी करूं काय । न बसे घरीं राणा जाय ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां धीरी । आझुनि नाहीं[2] जालें तरी ॥ ५ ॥

॥ ५७० ॥

बरें जालें गेलें । आजी अवघें मिळालें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां खाईन पोटभरी । ओल्या कोरडया भाकरी ॥ ध्रु ॥
किती तरी तोंड । याशीं वाजवूं मी रांड ॥ २ ॥
तुका बाइले मानवला । चीथू करूनियां बोला ॥ ३ ॥

॥ ५७१ ॥

न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उठितें तें कुटि[3]तें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥ ध्रु ॥
जीवंत चि मेले । लाजा वाटुनियां प्याले ॥ २ ॥
संसाराकडे । न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥

---

१ पं लांसी जैसी.—२ पं. जालें नाहीं.—३ पं. कुटी.

तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नांवें धोंडा ॥ ४ ॥

तुका ह्मणे बरें जालें । घे गे बाइले लीहिलें ॥ ५ ॥

॥ ५७२ ॥

कोण घरा येतें आमुच्या काशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देवासाटीं जालें ब्रह्मांड सोइरें । कोमळया उत्तरें काय वेचे ॥ ध्रु ॥

मानें पाचारितां नव्हे आराणुक । ऐसे येती लोक प्रीतीसाटीं ॥ २ ॥

तुका ह्मणे रांडे नावडे भूषण । कांतिलेंसें श्वान लागे पाठीं ॥ ३ ॥

॥ ५७३ ॥ ॥ ७ ॥

भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खाररा परीस काय करी ॥ ध्रु ॥

काय करिल तया साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ २ ॥

तुका ह्मणे वज्र भंगे[4] एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ३ ॥

॥ ५७४ ॥

इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥ ध्रु ॥

मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं खादली ॥ २ ॥

तुका ह्मणे काय बोलें । आतां भलें मौन्य ची ॥ ३ ॥

॥ ५७५ ॥

साधनें तरी हीं च दोन्ही । जरी कोणी साधील ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ परद्रव्य परनारी । याचा धरीं विटाळ ॥ ध्रु ॥

---

१ पं. नाहीं.—२ दे. पाठीं लागे.—३ दे. पुंस. पं. पुस.—४ पं. भेदे.—५ त. खादल्या.

देवभाग्यें घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥ २ ॥
तुका ह्मणे तें शरीर । गृह भांडार देवाचें ॥ ३ ॥

॥ ५७६ ॥

आह्मासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥ १ ॥
॥ धृ. ॥ मोहें धांवे घाली पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥ ध्रु ॥
कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ २ ॥
सुख ठेवी आह्मासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥ ३ ॥
आह्मां घाली पाठीकडे । पुढें कळिकाळाशीं भिडे ॥ ४ ॥
तुका ह्मणे कृपानीधी । आह्मां उतरीं नांवेमधीं ॥ ५ ॥

॥ ५७७ ॥

रवि रश्मिकळा । नये काढितां निराळा ॥ १ ॥
॥ धृ. ॥ तैसा आह्मां जाला भाव । अंगीं जडोनि ठेला देव ॥ ध्रु
गोडी साकरेपासुनी । कैसी निवडती दोन्ही ॥ २ ॥
तुका ह्मणे नाद उठी । विरोनि जाय नभा पोटीं ॥ ३ ॥

॥ ५७८ ॥

थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥ १ ॥
॥ धृ. ॥ घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥ ध्रु ॥
चित्त ठेवीं ग्वाही । आणिकांशीं चाड नाहीं ॥ २ ॥
आपलें तें हित फार । तुका ह्मणे खरें सार ॥ ३ ॥

---

पं. १ आपण.

॥ ५७९ ॥

अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥ ध्रु ॥
ऊंस कांदा एक आळां । स्वाद गोडीचा निराळा ॥ २ ॥
तुका ह्मणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥ ३ ॥

॥ ५८० ॥

शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघें ची दुःख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥ ध्रु ॥
खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥ २ ॥
तुका ह्मणे त्रिविध ताप । जाती मग आपेंआप ॥ ३ ॥

॥ ५८१ ॥

गोडीपणें जैसा गुळ । तैसा देव जाला सकळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां भजों कवणे परी । देव सबाह्य अंतरीं ॥ ध्रु ॥
उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥ २ ॥
हेम अळंकारा नामीं । तुका ह्मणे तैसे आह्मी ॥ ३ ॥

॥ ५८२ ॥

परमेष्ठिपदा । तुच्छ करिती सर्वदा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें चि ज्यांचें धन । सदा हरीचें स्मरण ॥ ध्रु ॥
इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ २ ॥
सार्वभौमराज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ३ ॥

---

१ त. पं. पाहतां.—२ पं. कोणे.—३ त. तुच्छ.

पाताळींचें आधिपत्य । ते तों मानिती विपत्य ॥ ४ ॥
योगसिद्धिसार । ज्यासि वाटे तें असार ॥ ५ ॥
मोक्षायेवढें सुख । सुख नव्हे चि तें दुःख ॥ ६ ॥
तुका ह्मणे हरीविण । त्यासि अवघा वाटे सिण ॥ ७ ॥

॥ ५८३ ॥

मोहोऱ्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं तरी त्याचें भक्ष । काय सांगणें ते[1] साक्ष ॥ ध्रु ॥
स्वामी[2]चिया अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥ २ ॥
तुका ह्मणे खोडी । देव[3]मनी न देती दडी ॥ ३ ॥

॥ ५८४ ॥

मजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोष्टा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बैस सांडोनि दिमाख । जाय काळें करीं मुख ॥ ध्रु ॥
येथें न सरे चार । हीण आणीक वेव्हार ॥ २ ॥
तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥ ३ ॥

॥ ५८५ ॥

भाव देवा[4]चें उचित । भाव तोचि भगवंत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्यधन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥ ध्रु ॥
बहुत बराडी । देव[5]जवळी आवडी ॥ २ ॥
तुका ह्मणे हें रोकडें । लाभ अधिक रिचो खडें ॥ ३ ॥

---

१ क. तें.–२ पं. स्वमींचिया.–३ दे. क. देवमणी.–४ त. पं. देवाचे.–५ पं. देवावरी.

॥ ५८६ ॥

गौरव गौरवापुरतें । फळ सत्यांचे[1] संकल्प ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कठिण योगाहुनि क्षेमें[2] । ओंकलिया होतो श्रम ॥ ध्रु ॥

पावलें मरे सिवेपाशीं । क्लेश उेरन[3] ते क्लेशीं ॥ २ ॥

तुका ह्मणे बहु आणी । कठिण निघालिया रणीं ॥ ३ ॥

॥ ५८७ ॥

न संडी अवगुण । वेर्मे[4] मानीतसे सिण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भोग देतां करिती काई । फुटतां यमदंडे[5] डोई ॥ ध्रु ॥

पापपुण्यझाडा । देतां तेथें मोटी पीडा ॥ २ ॥

तुका ह्मणे बोला । माझ्या सिणती विठ्ठला ॥ ३ ॥

॥ ५८८ ॥

पावे ऐसा नाश । अवघियां दिला त्रास ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ॥ ध्रु ॥

आइता च पाक । संयोगाचा सकळिक ॥ २ ॥

तुका ह्मणे धणी । सीमा राहिली होउनी ॥ ३ ॥

॥ ५८९ ॥

दुर्बळ हें अवघें जन । नारायणीं विमुख[6] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ झाडोनियां हात जाती । पात्र होतीं दंडासी ॥ ध्रु ॥

सिदोरी तें पापपुण्य । सर्वेसिण भिकेचा ॥ २ ॥

तुका ह्मणे पडिला वाहो । कैसा पांहा[7] हो* लटिकयाचा ॥ ३ ॥

---

१ पं. सत्यच संकल्प.—२ दे. क्षम.—३ पं. उतर ते.—४ क. वर्म.—५ पं. यमदंड.—६ पं. विन्मुख.—७ पं. पाहो.—* पं. हा शब्द नाहीं.

॥ ५९० ॥

वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जिंकोनियां अहंकार । पावटणी केलें शिर ॥ छ ॥

काळा नाहीं वाव । परा श्रमा कोठें ठाव ॥ २ ॥

तुका ह्मणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥ ३ ॥

॥ ५९१ ॥

झाड कल्पतरु । न करी याचकीं आव्हेरु ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुह्मी सर्वां सर्वोत्तम । ऐसे विसरतां धर्म[1] ॥ छ ॥

परिसा तुमचें देणें । तो त्या जागे अभिमानें ॥ २ ॥

गाऱ्हाण्यानें तुका । गर्जे मारुनियां हाका ॥ ३ ॥

॥ ५९२ ॥

वसवावें घर । देवें बरें निरंतर ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥ छ ॥

संकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥ २ ॥

तुका ह्मणे काळ । अवघा गोविंदें सुकाळ ॥ ३ ॥

॥ ५९३ ॥

येथील हा ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ घरीं देवाचे अबोला । त्यासि[2] ते चि सवे त्याला ॥ छ ॥

नाहीं पाहावें लागत । एकाएकीं च तें रितें[3] ॥ २ ॥

तुका ह्मणे जन । तयामध्यें येवढें भिन्न ॥ ३ ॥

---

१ त. पं. नाम.—२ दे. त्याची.—३ दे. ते रित.

॥ ५९४ ॥

करितां देवार्चन । घरा आले संतजन ॥ १
॥ ध्रु. ॥ देव सारावे परते । संत पूजावे आरते ॥ ध्रु ॥
शाळिग्राम विष्णुमूर्ती । संत हो का भलते याती ॥ २ ॥
तुका ह्मणे संधी । अधिक वैष्णवांची मांदी ॥ ३ ॥

॥ ५९५ ॥

ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करितां स्वामीसवें वाद । अधिक अधिक आनंद ॥ ध्रु ॥
असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥ २ ॥
वदे वाग्देवी । तुका विठ्ठली गौरवी ॥ ३ ॥

॥ ५९६ ॥

देवें जीव धाला । संसार तो कडू झाला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ते चि येतील ढेकर । आनंदाचे हरिहर ॥ ध्रु ॥
वेधी आणिकांस । ऐसा जया अंगीं कस ॥ २ ॥
तुका ह्मणे भुक । येणें न लगे आणीक ॥ ३ ॥

॥ ५९७ ॥

नाम साराचें ही सार । शरणागत यमकिंकर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उतमा[3]उतम । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ ध्रु ॥
नाम जपतां चंद्रमौळी ॥ नामें तरला वाल्हाकोळी ॥ २ ॥
तुका ह्मणे वर्णूं काय ॥ तारक विठोबाचे पाय ॥ ३ ॥

---

१ त. पं. तरी ते.—२ पं. पाद.—३ पं. नाम उत्तम उत्तम. क. उत्तम उत्तम.

॥ ५९८ ॥

गातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ परि तूं पतितपावन । करीं साच हें वचन ॥ ध्रु ॥

मुखें ह्मणवितों दास । चित्तीं माया लोभ आस ॥ २ ॥

तुका ह्मणे दावीं वेश । तैसा अंतरीं नाहीं लेश ॥ ३ ॥

॥ ५९९ ॥

द्रव्य असतां धर्म न करी । नागविला राजद्वारीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माय त्यासि व्याली जेव्हां । रांड[1] सटवी नव्हती तेव्हां ॥ ध्रु ॥

कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥ २ ॥

भोग स्त्रियेसि[2] देतां लाजे । वस्त्र दासीचें घेउनि निजे ॥ ३ ॥

तुका ह्मणे जाण । नर गाढवाहुनी हीन ॥ ४ ॥

॥ ६०० ॥

मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धनअभिमान[3] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐशियाची करी[4] सेवा । काय सुख होय जीवा ॥ ध्रु ॥

पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत ॥ २ ॥

विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणी ॥ ३ ॥

॥ ६०१ ॥

एक वेळ प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अहंकारा नांवें दोष । त्याचें ओस पाडिलें ॥ ध्रु ॥

अनुतापें स्नानविधि । यज्ञसिद्धि देहहोम ॥ २ ॥

---

१ त. राणसटवी. दे. "रांड" असें असतां वर. "रान" हा शोध घातला आहे.—२ पं. देतां स्त्रियेसि.— ३ त. आणि मान.—४ पं. करितां.

जीवशिवा होतां चुका । तेथें तुका विनटला ॥ ३ ॥

॥ ६०२ ॥

त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें तया काई असे ओझें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥ ध्रु॥

पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥ २ ॥

तुका ह्मणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ३ ॥

॥ ६०३ ॥

बोली मैंदाची बरवी असे । वाटे अंतरीं घालावे फांसे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कैसा वरिवरि दिसताहे चांग । नव्हे भाविक केवळ मांग ॥ ध्रु॥

टिळा टोपी माळा कंठीं । अंधारीं नेउनि चेंपी घांटी ॥ २ ॥

तुका ह्मणे तो* केवळ पुंड । त्यावरि[1] वाजती यमदंड ॥ ३ ॥

॥ ६०४ ॥

दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें[2] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥ ध्रु ॥

तुह्मी पापा भीतां । आह्मां उपजावया चिंता ॥ २ ॥

तुका ह्मणे सेवा । कळिकाळा जिंकी देवा ॥ ३ ॥

॥ ६०५ ॥

करा नारायणा । माझ्या दुःखाची खंडणा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वृत्ति राखा पायांपाशीं । वस्ती धरूनि मानसीं ॥ ध्रु ॥

पाळोनियां लळा । आतां पाववावें फळा ॥ २ ॥

---

१ दे. त्याजवरी यमदंड.—२ दे. नामं संकीर्तनं.— * पं. "तो" हा शब्द नाहीं.

तुका ह्मणे दीनें । त्यांचा हरतिया सीण ॥ ३ ॥

॥ ६०६ ॥

मी तों दीनाहूनि दीन । माझा तूज अभिमान ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मी तों आलों शरणागत । माझें करावें स्वहित ॥ ध्रु ॥

दिनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ॥ २ ॥

तुका ह्मणे आतां । भलें नव्हे मोकलितां ॥ ३ ॥

॥ ६०७ ॥

सुख वाटे तुझे वर्णितां पवाडे । प्रेम मिठी पडे वदनासी ॥ १ ॥

॥धु.॥ व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी। आला दुराचारी पारधी तो॥ ध्रु॥

वृक्षाचिया माथां सोडिला ससांना[1] । धनुष्यासि बाणा लावियेलें ॥ २ ॥

तये काळीं तुज पक्षी आठविती । धांवें गा श्रीपती मायबापा ॥ ३ ॥

उडोनियां जातां ससांना[2] मारील । बैसतां विंधील पारधी तो ॥ ४ ॥

ऐकोनियां धांवा तया पक्षियांचा । धरिला सर्पाचा वेश वेगीं ॥ ५ ॥

डंखोनि पारधी भुमीसि पाडिला । बाण तो[3] लागला ससान्यासी ॥ ६

ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा । होसील कोंवसा संकटींचा ॥ ७ ॥

तुका ह्मणे तुझी कीर्ति त्रिभुवना । वेदांचिये[4] वाणी वर्णवेना ॥ ८ ॥

॥ ६०८ ॥

नाहीं दुकळलों अन्ना । परि या मान जनार्दना ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देव केला सकळसाक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ॥ ध्रु ॥

भोगी भोगविता । बाळासवें तो चि पिता ॥ २ ॥

---

१ पं. ससाणा—२ पं. ससाणा.—३ क. तों.—४ क. वेदासि जे वाणी. त. वेदाची ही वाणी.

कर्म अकर्म जळालें । प्रौढें तुका तें उरलें ॥ ३ ॥

## नाटाचे-अ० ६३.

॥ ६०९ ॥

प्रथम नमन तुज एकदंता । रंगीं रसाळ वोडवीं कथा ।
मति सौरस करीं प्रबळता । जेणें फिटे आतां अंधकार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुझिये कृपेचें भरितें । आणीक काय राहिलें तेथें ।
मारग सिद्धाच्यानि पंथें । पावविसी तेथें तूं चि एक ॥ ध्रु ॥
आरंभा आदि तुझें वंदन । सकळ करितां कारण ।
देव ऋषि मुनि आदिकरून । ग्रंथ पुराण निर्माणी ॥ २ ॥
काय वर्णूं तुझी गती । एवढी कैंची मज मती ।
दिनानाथ तुज ह्मणती । करीं सत्य वचन हें चि आपुलें ॥ ३ ॥
मज वाहावतां मायेच्या पुरीं । बुडतां डोहीं भवसागरीं ।
तुज वांचुनि कोण तारी । पाव झडकरी तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६१० ॥

प्रथमारंभीं लंबोदर । सकळ सिद्धींचा दातार ।
चतुर्भुज फरशधर । न कळे पार वर्णितां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तो देव नटला गौरीबाळ । पांयीं बांधोनि घागऱ्या घोळ ।
नारदतुंबरसहित मेळ । सुटला पळ विघ्नांसी ॥ २ ॥
नटारंभीं थाटियला रंग । भुजा नाचवी हालवी अंग ।
सेंदुरविलेपनें चांग । मुगुटीं नाग मिरविला ॥ ३ ॥

---

१ पं. त. प्रौद.—२ पं. तेणें फिटे आतां अंधकारु.—३ पं. सेंदुर विलेपन.

जया मानवती देव ऋषि मुनी । पाहातां न पुरे डोळियां धनी ।
असुर जयाच्या चरणीं । आदी अवसानीं तो चि एक ॥ ४ ॥
सकळां सिद्धींचा दातार । जयाच्या रूपा नाहीं पार ।
तुका ह्मणे आमुचा दातार । भवसागर तारील हा ॥ ५ ॥

॥ ६११ ॥

विठ्ठल आमचें जीवन । आगमनिगमाचें स्थान ।
विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यानविसावा ॥ १ ॥
॥ धु. ॥ विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त ।
विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥ २ ॥
विठ्ठल विस्तारला जनीं । सप्त हीं पाताळें भरूनी ।
विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ ३ ॥
विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा ।
विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेलें चाळा विश्व विठ्ठलें ॥ ४ ॥
विठ्ठल बांप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता ।
विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता । तुका ह्मणे आंतां नाहीं दुसरें ॥ ५ ॥

॥ ६१२ ॥

बरवा झाला वेवसाव । पावलों चिंतिला चि ठाव ।
दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांती ॥ १ ॥
॥ धु. ॥ बरवा फळला शकुन । अवघा निवारिला सिण ।
तुमचें जालिया दरुषण । जन्ममरण नाहीं आतां ॥ ध्रु ॥

---

१ पं. माय बाप.—* पं. हा शब्द नाहीं.

बरवें जालें आलों या ठाया । होतें संचित ठायींचों पाया ।
देहभाव पालटली काया । पडली छाया ब्रह्मींची ॥ २ ॥
जोडिलें नै सरे हें धन । अविनाश आनंदघन ।
अमूर्तमूर्ति मधुसूदन । समें चरण देखियेले ॥ ३ ॥
जुनाट जुगादिचें नाणें । बहुना काळाचें ठेवणें ।
लोपलें होतें पारिखेपणें । ठावचळण चुकविला ॥ ४ ॥
आतां या जीवाचियासाठीं । न सुटे पडलिया मिठी ।
तुका ह्मणे सिणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥ ५ ॥

॥ ६१३ ॥

मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंदबुद्धी ।
तुज म्यां पाठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानीधी मायबापा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं ऐकिलें गाइलें गीत । धरिली लाज सांडिलें हित ।
नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥ ५ ॥
केला करविला नाहीं उपकार । नाहीं दया आली पीडितां पर ।
करूं नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥ २ ॥
नाहीं केलें तीर्थाचें भ्रमण । पाळिला पिंड करचरण ।
नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मुर्तीचें ॥ ३ ॥
असंगसंग घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय ।
न कळे हित करावें तें । काय नये बोलूं आठवूं तें ॥ ४ ॥
आप आपण्या घातकर । शत्रु जालों मी दावेदार ।

---

१ दे. ठायींच.—२ पं. हें न सरे.—३ प. समचरणीं.—४ पं. पुराणा.—५ पं. आप आपणियां.

तूं तंव कृपेचा सागर । उतरीं पार तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६१४ ॥

आतां पावेन[1] सकळ सुखें । खादलें कदा तें नेखें[2] ।
अवघें सरलें पारिखें । सकळ देखें माहियेरें[3] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जवळी विठल रखुमाई । बहिणी बंधु बाप आई ।
सकळ गोताची च साई । पारिखें काई ऐसें नेणिजे ॥ ध्रु. ॥
जगदाकारीं जाली सत्ता । वारोनि गेली पराधीनता ।
अवघें आपुलें चि आतां । लाज आणि चिंता दुऱ्हावली ॥ २ ॥
वावरे इच्छा वसे घरीं । आपुले सत्तेचे माहेरीं ।
करवी तैसें आपण करीं । भीड न धरी चुकल्याची ॥ ३ ॥
सोसिला होता सासुरवास । बहुतांचा बहुत दिवस ।
बहु कामें पुरविला सोस । आतां उदास आपुल्यातें ॥ ४ ॥
करिती कवतुक लाडें । मज बोलविती कोडें ।
मायबाप उत्तरें गोडें । बोले बोबडें पुढें तुका ॥ ५ ॥

॥ ६१५ ॥

सर्वसुखाचिंया[4] आशा जन्म गेला । क्षण मुक्ती यत्न नाहीं केला ।
हिंडतां दिशा सीण पावला । मायाविष्टिला जीव माझा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें स्वहित नेणती कोणी । कांहीं न करितां मजवांचुनी ।
सज्जन तंव सुखमांडणी । नेणती कोणी आदि अंत ॥ ध्रु. ॥
काय सांगों गर्भींची यातना । मज भोगितां नारायणा ।

१ दे. क. पावन.—२ पं. न देखें.—३ पं. माहियेरे.—४ पं. सर्व सुखाची.

मांस मळ मूत्र जागा । तुज क्षणक्षणा ध्यांत असें ॥ २ ॥
मज चालतां प्रयाणकाळीं । असतां न दिसती जवळी ।
मृत्तिके मृत्तिका कवळी । एकले मेळीं संचिताचे ॥ ३ ॥
आतां मज ऐसें करीं गा देवा । कांहीं घडे तुझी चरणसेवा ।
तुका विनवीतसे केशवा । चालवीं दावा संसारें ॥ ४ ॥

॥ ६१६ ॥

अगा ए सावळ्या सगुणा । गुणनिधिनाम नारायणा ।
आमची परिसा विज्ञापना । सांभाळीं दीना आपुलिया ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ बहु या उदराचें कष्ट । आह्मांसि केलें कर्मभ्रष्ट ।
तुमची चुकविली वाट । करीं वटवट या निमित्यें ॥ ध्रु ॥
जालों पांगिला जनासी । संसाराची आंदणी दासी ।
न कळे कधीं सोडविसी । दृढपाशीं बहु बांधलों ॥ २ ॥
येथें तों नये आठव कांहीं । विसावा तो क्षण एक* नाहीं ।
पडिलों आणिके प्रवाहीं । हित तों कांहीं दिसे चिं ना ॥ ३ ॥
जीवित्व वेचिलें वियोगें । हिंडतां प्रवास वाउगें ।
कांहीं व्याधि पीडा रोगें । केलिया भोगें तंडातोंडी ॥ ४ ॥
माझा मीं च जालों शत्रु । कैचा पुत्र दारा कैचा मित्रु ।
कासया घातला पसरु । अहो जगद्गुरु तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६१७ ॥

आतां मज धरवावी शुद्धि । येथुनी परतवावी बुद्धि ।
घ्यावें सोडवुनि कृपानिधि। सांपडलों संधीं काळचक्रीं ॥ १ ॥

१ पं. ध्यातसें.—२ दे. क. त. वेचलों.—३ पं. तडातडा तोंडीं.—* पं. हा शब्द नाहीं.

॥ ध्रु. ॥ करिसील तरि नव्हे काई । राईचा डोंगर पर्वत राई ।
आपुले करुणेची खाई । करीं वो आई मजवरी ॥ ध्रु ॥
मागील काळ अज्ञानपणें । सरला स्वभावें त्या गुणें ।
नेणें आयुष्य जालें उणें । पुढील पेणें अंतरलें ॥ २ ॥
आतां मज वाटतसे भय । दिवसेंदिवस चालत जाय ।
येथें म्या येउनि केलें काय । नाहीं तुझे पाय आठविले ॥ ३ ॥
करूनि अपराध क्षमा । होतील केले[1] पुरुषोत्तमा ।
आपुले नामीं घ्यावा प्रेमा । सोडवीं भ्रमोपासुनिया[2] ॥ ४ ॥
हृदय वसो तुमच्या गुणीं । ठाव ह्या पायांपें चरणीं ।
करूं[3] हा रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६१८ ॥

जेणें हा जीव दिला दान । तयाचें करीन चिंतन ।
जगजीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जो या उभा* भीवरेच्या[4] तिरीं । कट धरूनियां करीं ।
पाउलें सम चि साजिरीं । अंतरीं धरोनि राहेन ॥ ध्रु ॥
जो या असुरांचा काळ । भक्तजनप्रतिपाळ ।
खेळे हीं लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायांवरी ॥ २ ॥
जो या गोपाळांच्या मेळीं । खेळु खेळे वनमाळी ।
रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा ॥ ३ ॥
जो हा लावण्यपुतळा । जयाचे अंगीं सकळ कळा ।

---

१ पं. होतें.—२ पं. भवभ्रमापासुनि.—३ दे. त. कद्दा रस सेवन.—४ क. भीमरेच्या * हा शब्द नाहीं.

जयाचे गळां वैजयंतीमाळा । तया वेळोवेळां दंडवत ॥ ४ ॥
जयाचें नाम पाप नासी । लक्ष्मी ऐसी जयाची दासी ।
तो[1] हा तेजःपुंज रासी । सर्वभावें त्यासि तुका शरण ॥ ५ ॥

॥ ६१९ ॥

काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण ।
ऐसें तुह्मी[2] सांगा संतजन । करा समाधान चित्त माझें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय हें खंडईल कर्म । पारुषतील धर्माधर्म ।
कासयानें तें कळे वर्म । ह्मणउनी श्रम वाटतसे ॥ ध्रु ॥
काय हो स्थिर राहेल बुद्धी । कांहीं अरिष्ट न[3] येल मधीं ।
धरिली[4] जाईल ते शुद्धी । शेवट कधीं तो मज न कळे ॥ २ ॥
काय ऐसें पुण्य होईल गांठीं । घालीन पायीं देवाचे मिठी ।
मज तो कुरवाळील[5] जगजेठी । दाटइन कंठीं सद्गदित ॥ ३ ॥
काय हे[6] निवतील डोळे । सुख तें देखोनि सोहळे ।
संचित कैसें तें न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥ ४ ॥
ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ । रात्रिदिवस हे चि* तळमळ ।
तुका ह्मणे नाहीं आपुलें बळ । जेणें फळ पावें निश्चयेंसी ॥ ५ ॥

॥ ६२० ॥

तूंचि अनाथाचा दाता । दुःख मोह नासावया चिंता ।
शरण आलों तुज आतां । तारीं कृपावंता मायबापा ॥ १ ॥

---

१ दे. जो हा तेजोपुंज्यरासी. क. तो हा तेजो पुंज्यरासी.—२ पं. सांगाल तुह्मी संतजन.—३ त. पं. न येलकीं मधीं.—४ त. पं. धरिलें जाईल तें सिद्धी.—५ दे. त. कृवाळील.—६ त. ते. * दे. क. “हे चि” हे शब्द नाहींत.

संतसंगति देई चरणसेवा । जेणें[1] तुझा विसर न पडावा ।
हा च भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ॥ २ ॥
मज[2] भाव प्रेम देईं कीर्ती । गुण नाम वर्णावया स्तुती ।
विघ्नां सोडवूनि हातीं । विनंती माझी परिसावी हे ॥ ३ ॥
आणीक कांहीं नाहीं मागणें । सुखसंपत्तिराज्यचाड धनें[3] ।
सांकडें न पडे तुज जेणें । दुजें भक्तीविण मायबापा ॥ ४ ॥
जोडोनियां कर पायीं ठेवीं[4] माथा । तुका विनवी पंढरिनाथा ।
रंगीं वोडवावी रंगकथा । पुरवीं व्यथा[5] मायबापा ॥ ५ ॥

॥ ६२१ ॥

सेंदरीं[6] हें देवी दैवतें । कोण *तीं पुजी भुतेंकेतें ।
आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवदान ॥ १ ॥
॥ध्रु.॥ आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल बराडी ।
कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि अधरा[7] ॥ ५ ॥
दासीचा पाहुनरउखतें[8] । धणी देईल आपुल्या हातें ।
करुणाभाषणउचितें । हें तों रितें सतंत शक्तिहीन ॥ २ ॥
काय तें थिल्लरीचें पाणी । ओंठ न भिजे न फिटे धणी ।
सीण तरीं आदीं आवसानीं । क्षोभे पुरश्चरणीं दिलें फळ ॥ ३ ॥
विलेपनें बुजाविती तोंड । भार[9] खोल वाहाती उदंड ।

---

१ त. जेणें तुझा विसर न व्हावा. पं. क. जेणें हा तुझा विसर न पडावा.—२ पं. मज भाव देईं परमप्रीति.—३ त. धनें.—४ पं. ठेवितों.—५ पं. देवा मनारेथ.—६ त. सेंदरीं हेंदरीं देवी दैवतें. पं. सेंदरीं हेंदरीं दैवतें.—७ पं. अधीरा.—८ त. पं. पाहुणेर उखीतें.—९ क. भारखोळ.—* पं. हा शब्द नाहीं.

करविती आपणयां दंड । ऐसियास भांड ह्मणे देव तो ॥ ४ ॥
तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन ।
तुका ह्मणे त्याचें करा चिंतन । वंदूं चरण येती सकळें ॥ ५ ॥

॥ ६२२ ॥

विषयओढीं भुलले जीव । आतां यांची कोण करील कींव ।
नुपजे नारायणीं भाव । पावोनि ठाव नरदेह ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोण सुख भरोनि संसारीं । पडोनि काळाचे आहारीं ।
माप या लागलें शरीरीं । जालियावरी सळें ओढिती ॥ ध्रु ॥
बापुडीं होतील सेवटीं । आयुष्यासवें जालिया तुटी ।
भोगिले मागें पुढें ही कोटी । होईल भेटी जन्मासी ॥ २ ॥
जंतिली घाणां बांधोनि डोळे । मागें जोडी आर तेंही पोळे ।
चालिलों किती तें न कळे । दुःखें होरंबळे भूकतान ॥ ३ ॥
एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित ।
तें हें देह मानुनि अनित्य । न करिती नित्य नामस्मरण ॥ ४ ॥
तुका ह्मणे न वेचतां मोल । तो हा यासि महाग विठ्ठल ।
वेंचितां फुकाचे चि बोल । केवढें खोल अभागिया ॥ ५ ॥

॥ ६२३ ॥

आले हो संसारा तुह्मी एक करा । मुक्तिमारग हळू चि धरा ।
काळदंड कुंभयातना थोरा । कां रे अघोरा देखसी ना ॥ १ ॥
नाहीं त्या यमासि करुणा । बाहेर काढितां कुडी प्राणा ।

१ पं. जुंतिले.—२ क. हारंबळे. पं. आरंबळे.—३ दे. क. देखसी ना.—

ओढाळ सांपडे जैं[1] धान्या । चोर यातना धरिजेतां ॥ २ ॥
नाहीं दिलें पोवेल[2] कैसा । चालतां पंथें[3] तेणें वळसा ।
नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेती बंद जैसा धरोनियां ॥ ३ ॥
क्षण एक नागीवा पायीं । न चलवे तया करितां कांहीं ।
ओढिती[4] कांटवणा सोई । अग्निस्तंभीं बाही कवटाळविती ॥ ४ ॥
देखोनि अंगें कांपती । तये नदीमाजी चालविती ।
लागे ठाव न लगे बुडविती । वरि मारिती यमदंड ॥ ५ ॥
तानभूक न साहावे वेळ । तो राखिती कितीएक काळ ।
पिंड पाळूनि कैसा सीतळ । तो तप्तभूमीं ज्वाळ लोळविती ॥ ६ ॥
ह्मणउनी करा कांहीं सायास । व्हावेल तर व्हा रे उदास ।
करवेल तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका ह्मणे ॥ ७ ॥

॥ ६२४ ॥

न बोलसी तें ही कळलें देवा । लाजसी आपुलिया नांवा ।
तुज मी नाहीं घालीत गोवा । भीड केशवा कासयाची ॥ १ ॥
उतरीं आपुला हा पार । मजशीं बोलोनि उत्तर ।
माझा तुज नव्हे अंगीकार । मग विचार करीन मी ॥ २ ॥
दात्या[5] आणि मागत्यासी । धर्मनीति तरी बोलिली ऐसी ।
यथानशक्ति टाकेल तैसी । बाधी दोघांसी विन्मुखता ॥ ३ ॥
ह्मणोनि करितों मी आस । तुझिया वचनाची वास ।
धीर हा करूनि सायास । न टळें नेमास आपुलिया ॥ ४ ॥

---

१ पं. जैसें.—२ दे. क. पं. पावइल.—३ त. पंथें.—४ दे. क. वोढितां.—५ दे. त. दाय । आणि मागतयासी.

तुझें म्यां घेतल्या वांचून । न वेंजें एथूनि[1] वचन ।
हा चि माझा नेम सत्य जाण। आहे नाहीं ह्मण तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६२५ ॥

आतां मी न पडें सायासीं । संसारदुःखाचिये पाशीं ।
शरण रिघेन संतांसी । ठाव पायांपाशीं मागेन त्यां ॥ १ ॥
न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधले[2] पाय ।
आतां मज न विसंबें माय । मोकलूनि धाय विनवीतसें ॥ २ ॥
बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें ।
त्रिगुण येतील लहरें । तेणें दुःखें घोरें[3] आक्रंदलों ॥ ३ ॥
आणीक दुःखें सांगों मी किती । सकळ संसारस्थिती ।
न साहे पाषाण फुटती । भयें[4] चित्तीं कांप भरलासे ॥ ४ ॥
आतां मज न साहवे सर्वथा । संसारगंधीची हे* वार्ता ।
जालों वेडा असोनि जाणता । पावें अनंता तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६२६ ॥

आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरि तारीं मारीं ।
जवळी अथवा दुरी धरीं । घालीं संसारीं अथवा नको ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहीं च नेणें ।
मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणें रंकाहुनी ॥ ध्रु. ॥
मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवतां नावरती ।
सकळ खुंटलिया युक्ती । शांति निवृत्ति जवळी नाहीं ॥ २ ॥

---

१ पं. येथून न वजें वचन—२ दे.क त. लाधती.—३ पं. घोर.—४ पं. भय कांप चित्तीं भरलासे.—* त. हा शब्द नाहीं.

सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव ।
आतां करीं कळे तो उपाव । तूं चि सर्व ठाव माझा देवा ॥ ३ ॥
राहिलों धरूनि विश्वास । आधार नेटीं तुझी कास ।
आणीक नेणें मी सायास । तुका ह्मणे यास तुझें उचित ॥ ४ ॥

॥ ६२७ ॥

देवा तूं कृपाकरुणासिंधु । होसी मायबाप आमचा बंधु ।
जीवनसिद्धि साधनसिंधु । तोडिसी भवबंधु काळपाश ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शरणागता वज्रपंजर । अभयदाना तूं उदार ।
सकळां देवां[1] तूं अगोचर । होसी अविकार अविनाश ॥ ध्रु. ॥
भागली स्तुति करितां फार । तेथें मी काय तें गव्हार ।
जाणावया तुझा हा विचार । नको अंतर देऊं आतां ॥ २ ॥
नेणें भाव परि ह्मणवीं तुझा । नेणें भक्ति परि करितों पूजा ।
आपुल्या नामाचिया काजा । तुज केशीराजा लागे धांवणें ॥ ३ ॥
तुझिया बळें पंढरीनाथा । जालों निर्भर तुटली व्यथा ।
घातला भार तुझिया माथां । नें[2] भीं सर्वथा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६२८ ॥

कोण सुख धरोनि संसारीं । राहों सांग मज बां[3] हरी ।
अवघ्या नाशिवंता परी । थितां[4] दुरी अंतरसी ॥ १ ॥
प्रथम केला गर्भीं वास । काय ते सांगावे सायास ।
दुःख भोगिलें नव ही मास । आलों जन्मास येथवरी ॥ २ ॥

---

१ दे. देवां.—२ पं. भिये.—३ पं. बाहेरी.—४ पं. थिता दुरी तूंही अंतरसी.

बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषयव्यथा ।
वृद्धपणीं प्रवर्तली चिंता । मरें मागुता जन्म धरीं ॥ ३ ॥
क्षण एक तो ही नाहीं विसावा । लक्ष चौऱ्याशीं घेतल्या धांवा ।
भोवंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥४॥
आतां पुरे ऐसी भरोवरी । रंक होऊनि राहेन द्वारीं ।
तुझा दास मी दीन कामारी । तुका ह्मणे करीं कृपा आतां ॥ ५ ॥

॥ ६२९ ॥

सुख या संतसमागमें । नित्य दुणावे[1] तुझिया नामें ।
दहन होती सकळ कर्में । सर्वकाळ प्रेमें डुलतेसों[2] ॥ १ ॥
ह्मणोनि नाहीं कांहीं चिंता । तूं चि आमुचा मातापिता ।
बहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥ २ ॥
ऐसा हा कळला निर्धार । मांझा तुज न पडे विसर[3] ।
असरसी देऊनियां धीर । बाह्य अभ्यंतर मजजवळा ॥ ३ ॥
दुःख तें कैसें नेणें स्वप्नासी । भुक्तिमुक्ति जाल्या कामारी दासी ।
त्यांचें वर्म तूं आह्मांपाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥ ४ ॥
जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष ।
काय तें उणें आह्मां आनंदास । सेवूं ब्रह्मरस तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६३० ॥

देवा तूं आमचा कृपाळ । भक्तिप्रतिपाळ[4] दीनवत्सळ ।
माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥ १ ॥

१ पं. दुणावे.–२ क. पं. डुलतसों.–३ दे. त. मा माझा तुज न पडे विसर.–४ पं. भक्तिपाळ.

तुज लागली सकळ चिंता । राखणें लागे वांकडें जातां ।
पुढती[1] निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज ॥ २ ॥
आह्मां भय चिंता नाहीं धाक । जन्म मरण कांहीं एक ।
जाला इहलोकीं परलोक । आलें सकळैकवैकुंठ ॥ ३ ॥
न कळे दिवस कीं राती[2] । अखंड लागलीसे ज्योती ।
आनंदलहरीची गती । वर्णूं कीर्ती[3] तया सुखा ॥ ४ ॥
तुझिया नामाचीं भूषणें । तीं यें[4] मज लेवविलीं लेणें ।
तुका ह्मणे तुझियान गुणें[5] । काय तें उणें एक आह्मां ॥ ५ ॥

॥ ६३१ ॥

न पवे सन्निध वाटते चिंता । वारियां[6] बहुतांची सत्ता ।
नुगवे पडत जातो गुंता । कर्मा[7] बळिवंता सांपडलों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बहु भार पडियेला शिरीं । मी हें माझें मजवरी ।
उघड्या नागविलों चोरीं । घरिच्याघरीं जागजाणतां ॥ ध्रु ॥
तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां ।
जाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥ २ ॥
अति हा निकट समय । मग म्यां करावें तें काय ।
दिवस गेलिया ठाकईल छाय । उरईल हाय रातिकाळीं ॥ ३ ॥
होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता ।
ठाव तो न दिसे लपतां । बहुत[8] चिंता प्रवर्तली ॥ ४ ॥
ऐसी या संकटाची संधी । धांव घालावी कृपानिधी ।

१ दे. त. पुडती.–२ दे. त. रात्री.–३ पं. किती.–४ त. पं. तोये मज लेवविलें लेणें.–
५ पं. तुझिया गुणें.–६ क. वारियां; त. वरया; पं. वरीया.–७ पं. कर्म.८– पं. बहु.

तुका ह्मणे माझी बळबुद्धी । सकळ सिद्धी पाय तुझे ॥ ५ ॥

॥ ६३२ ॥

आतां धर्माधर्मीं कांहीं उचित । माझें विचारावें हित ।
तुज मी ठाउका पतित । शरणागत परि जालों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येथें राया रंका एकी सरी । नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या वरीं ।
पावलों पाय भलत्या परी । मग बाहेरी न घालावें ॥ ध्रु ॥
ऐसें हें चालत आलें मागें । नाहीं मी बोलत वाउगें ।
आपुलिया पडिल्या प्रसंगें । कीर्ति हे जगें वाणिजेते[1] ॥ २ ॥
घालोनियां माथां बैसलों भार । सांडिला लौकिक वेव्हार ।
आह्मीं हे विचारिली थार । अविनाश पर पद ऐसें ॥ ३ ॥
येथें एक वर्म पाहिजे धीर । परि म्यां लेखिलें असार ।
देह हें नाशिवंत जाणार । धरिलें सार नाम तुझें ॥ ४ ॥
केली आरागुक सकळां हातीं । धरावें धरिलें तें चित्तीं ।
तुका ह्मणे सांगितलें संतीं । देई अंतीं ठाव मज देवा ॥ ५ ॥

॥ ६३३ ॥

बरवें झालें आलों जन्मासी । जोड जोडिली मनुष्य देहा ऐसी ।
महा लाभाची उत्तम रासी । जेणें[2] सुखासी पात्र होइजे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दिलीं इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन ।
जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ॥ ध्रु ॥
तिळेंतीळ पुण्य सांचा पडे । तरि हें बहुतां जन्मीं जोडे ।

---

१ क. वाखाणिजेते. पं. वाखाणिजे—२ त. पं. जेणें सर्व सुखासी.

नाम तुझें वाचेसी आतुडे । समागम घडे संतांचा ॥ २ ॥
ऐसिये पावविलों ठायीं । आतां मी काई होऊं उतराई ।
येवढा जीव ठेवीन पायीं । तूं माझे आई पांडुरंगे ॥ ३ ॥
फेडियेला डोळियांचा कवळ । धुतला गुणदोषांचा मळ ।
लावूनि स्तनीं केलों सीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥ ४ ॥
नाहीं याँ* आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा ।
आला आकारा आमुच्या चाडा । तुका ह्मणे भिडा भक्तीचिया[1] ॥ ५ ॥

॥ ६३४ ॥

अल्प भाव अल्प मती । अल्प आयुष्य नाहीं हातीं ।
अपराधाची वोळिलों मूर्ती । अहो वेदमूर्ती परियेसा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ किती दोषा देऊं परिहार । गुणदोषें मळिलें अंतर ।
आदि वर्तमान भविष्याकार । गेला अंतपार ऐसें[2] नाहीं ॥ ध्रु ॥
विविध कर्म चौऱ्याशी फेरा । त्रिविध भोग या शरीरा ।
कर्मकोठार पांजरा । जन्मजरामरणसांटवण ॥ २ ॥
जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये[3] भिन्न[4] पंच भूतें ।
रचतें खचतें संचितें[5] । असार रितें फलकट ॥ ३ ॥
पुत्र पत्नी सहोदर । मायबाप गोताचा पसर ।
मिळतां काष्ठें लोटतां पूर । आदळीं दूर होती खळाळीं[6] ।
ह्मणोनि नासावें[7] अज्ञान । इतुलें करीं कृपादान ।
कृपाळु तूं जनार्दन । धरूनि चरण तुका विनवी ॥ ५ ॥

---

१ पं. भक्ताचिया.–२ पं. नाहीं ऐसें.–३ दे. क. यें.–४ पं. भिन्नभिन्न.–५ पं.त. संचतें.–६ दे. खलाळीं. त. पं. खह्लाळी.–७ क. नसावें * पं. हा शब्द नाहीं.

॥ ६३५ ॥

ऐसी हे गर्जवू वैखरी । केशव मुकुंद मुरारी ।
राम कृष्ण नामें बरीं । हरी हरी दोष सकळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जनार्दना जगजीवना । विराटस्वरूपा वामना ।
महदादि मधुसूदना । भवबंधना तोडितिया ॥ ध्रु ॥
चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा ।
सकळमुगुटमणि शूरा । अहो दातारा जगदानिया ॥ २ ॥
मदनमूर्ती मनमोहना । गोपाळगोपिकारमणा ।
नटनाटयकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥ ३ ॥
गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी आणि सर्वजाणा ।
करोनि अकर्ता आपणा । नेदी अभिमाना आतळों ।
कासयानें घडे याची सेवा । काय एक समर्पावें या देवा ।
वश्य तो नव्हे वांचुनि भावा । पाय जीवावेगळे न करी तुका ॥ ५ ॥

॥ ६३६ ॥

होतों तें चिंतीत मानसीं । नवस फळले नवसीं ।
जोडिते नारायणा ऐसी । अविट ज्यासी नाश नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धरिले जीवीं न सोडीं पाय । आलें या जीवित्वाचें काय ।
कैं हे पाविजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥ ध्रु ॥
मज तों पडियेली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली ।
होती मृगजळें गोवी केली । दृष्टि उघडली बरें जालें ॥ २ ॥

---

१. त पं. मुकुंदा.—२ पं. बरवें.

आतां हा सिद्धि पावो भाव । मध्यें चांचल्यें[1] न व्हावा जीव ।
ऐसी तुह्मां भाकीतसें कींव । कृपाळुवा जगदानिया ॥ ३ ॥
कळों येते[2] आपुले बुद्धी । ऐसें तों न घडतें कधीं ।
केवढे[3] आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके ॥ ४ ॥
कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी ।
प्रीति हे[4] लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥ ५ ॥

॥ ६३७ ॥

तुझिया पार नाहीं गुणां । माझी अल्प मति नारायणा ।
भवतारका जी सुजाणा । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय जाणावें म्यां दीनें । तुझिये भक्तींचीं लक्षणें ।
धड तें तोंड धोऊं[5] नेणें । परि चिंतनें काळ सारीं ॥ ध्रु ॥
न लवीं आणीक कांहीं पिसें । माझिया मना वांयां जाय ऐसें ।
चालवीं आपुल्या प्रकाशें । हातीं सरिसें धरोनियां ॥ २ ॥
तुज[6] समर्पिली काया । जीवें भावें पंढरीराया ।
सांभाळीं समविषम[7] डाया । करीं छाया कृपेची ॥ ३ ॥
चतुर तरीं चतुरां राव । जाणता तरीं जीवांचा जीव ।
न्यून तो कोण एक ठाव । आरुष भाव परि माझा ॥ ४ ॥
होतें तें माझें भांडवल । पायांपें निवेदिले बोल ।
आदरा ऐसें पाविजे मोल । तुका ह्मणे साच फोल तूं जाणसी ॥ ५ ॥

---

१ पं. चांचल्य.—२ दे. त. क. येतें.—३ पं. येवढे.—४ त. ही.—५ पं. धुऊं.—६ पं. तुज हे समर्पिली काया.—७ दे. क. पं. रावो.

॥ ६३८ ॥

कां हो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे[1] फार ।
अनंत पावविलीं उद्धार । नव्हे चि थार मज शेवटीं ॥ १ ॥
पाप बळिवंत गाढें । तुज ही राहों सकतें पुढें ।
मागिल कांहीं राहिलें ओढें । नवल कोडें[2] देखियेलें ॥ २ ॥
काय मानिती संतजन । तुमचें हीनत्ववचन ।
कीं वृद्ध जाला नारायण । न चले पण आधील तो ॥ ३ ॥
आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी ।
पडदा काय घरच्यावरीं । धरिलें दुरी तेव्हां धरिलें ॥ ४ ॥
नको चाळवूं अनंता । कासया होतोसि नेणता ।
काय तूं नाहीं धरित सत्ता । तुका ह्मणे आतां होईं प्रगट ॥ ५ ॥

॥ ६३९ ॥

मज ते हांसतील संत । जीहीं देखिलेती मूर्तिमंत ।
ह्मणोनि उद्वेगलें चित्त । आंहा[3] च भक्त ऐसा दिसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ध्यानीं म्या वर्णाविति कैसे । पुढें एकीं स्तुति केली असे ।
तेथूनि जीव निघत नसे । ऐसिये आंसे[4] लागलोंसें ॥ ध्रु ॥
कासया पाडिला जी धडा । उगा चि वेडा आणि वांकडा ।
आह्मां लेंकरांसि पीडा । एक मागें जोडा दुसऱ्याचा ॥ २ ॥
सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरीतसें पाय ।
तूं तंव सम चि सकळां माय । काय अन्याय एक माझा ॥ ३ ॥

---

१ दे. त. दिसे.—२ त. पं. केवढें.— ३ त. आह्मां. क. अहा.—४ दे. क. आशा.

॥ ७७३ ॥

हो कां दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥ ध्रु ॥

नसो भाव चित्तीं । हरिचे गुण गातां गीतीं ॥ २ ॥

करी[१] अनाचार । वाचे हरिनामउच्चार ॥ ३ ॥

हो कां भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥ ४ ॥

ह्मणवी हरिचा दास । तुका ह्मणे धन्य त्यास ॥ ५ ॥

॥ ७७४ ॥

हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ ध्रु ॥

करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥ २ ॥

तुका ह्मणे गीतीं* गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ३ ॥

॥ ७७५ ॥

लोह चुंबकाच्या बळें । उभें राहिलें निराळें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तैसा तूं चि आह्मांठायीं । खेळतोसी अंतर्बाहीं ॥ ध्रु ॥

भक्ष अग्नीचा तो दोरा । त्यासि वांचवी मोहरा ॥ २ ॥

तुका ह्मणे अधीलपणें । नेलीं लांकडें चंदनें ॥ ३ ॥

॥ ७७६ ॥

डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तरी ते नव्हति संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥ ध्रु ॥

मेळवूनि नरनारी । शकुन सांगती नानापरी ॥ २ ॥

---

१ पं. करो. * त. हा शब्द नाहीं.

तुका ह्मणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥ ३ ॥

॥ ७७७ ॥

गाढवांचे[1] घोडे । आह्मी करूं दृष्टीपुढें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ चघळी वाहाणा । माघारिया बांडा सुना ॥ ध्रु ॥

सोंगेसंपादणी[2] । तरि करूं शुद्ध वाणी ॥ २ ॥

तुका ह्मणे खळ । करूं समयीं निर्मळ ॥ ३ ॥

॥ ७७८ ॥

बाईल मेली मुक्त जाली । देवें माया सोडविली ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ ध्रु ॥

पोर मेलें बरें जालें । देवें मायाविरहित केलें ॥ २ ॥

माता मेली मज देखतां । तुका ह्मणे हरली चिंता ॥ ३ ॥

॥ ७७९ ॥

योग तप या चि नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ करणें तें हें चि करा । सत्यें बरा व्यापार ॥ ध्रु ॥

तरि खंडे येरझार । निघे भार देहाचा ॥ २ ॥

तुका ह्मणे मानामान । हें बंधन नसावें ॥ ३ ॥

॥ ७८० ॥

करी संध्यास्नान । वारी खाउनियां अन्न ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मौनीं[3] ॥ ध्रु ॥

मजुराचें धन । विळा दोर चि जतन ॥ २ ॥

---

१ त. गाढवाचें घोडें.—२ दे. त. सोंगसंपादनी.—३ पं. मनीं.

तुका ह्मणे नाहीं । अधीरासी देव कांहीं ॥ ३ ॥

॥ ७८१ ॥

वाखर घेउनि आलें । त्यासी तरवांरेनें[1] हालें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नव्हे आपुलें उचित । करूनि टाकावें फजित ॥ ध्रु ॥
अंगुळिया मोडी । त्यासी काय सिलें घोडीं ॥ २ ॥
नपुंसकासाठीं । तुका ह्मणे न लगे जेठी ॥ ३ ॥

॥ ७८२ ॥

वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुजला[2] तें नाहीं ठावें । जेणें अंगें चि ब्रह्म व्हावें ॥ ध्रु ॥
जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दाचें पांडित्य ॥ २ ॥
गासी तान मान बंध । हाव भाव गीत छंद ॥ ३ ॥
जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ॥ ४ ॥
साधनाच्या[3] ओढी । डोळियांच्या मोडामोडी ॥ ५ ॥
तुका ह्मणे देहीं । संत[4] जाहाले विदेही ॥ ६ ॥

॥ ७८३ ॥

प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातों हरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मनेंसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरीराया ॥ ध्रु ॥
सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ॥ २ ॥
तुका ह्मणे ठेवी तैसें । आह्मी राहों त्याचे इच्छे ॥ ३ ॥

---

१ दे. त. तरवारेणें.—२ पं. त. परि तें तुज नाहीं ठावें । जेणें अंगें ब्रह्म व्हावें
३ पं. साधनाच्या ओढाओढी.—४ पं. संत जाले ते विदेही.

॥ ७८४ ॥

पाववील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ त्यासी चिंतिलिया मनीं । चिंता करी गंवसणी ॥ ध्रु ॥

पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥ २ ॥

तुका ह्मणे नई । सिद्धि वोळगती पायीं ॥ ३ ॥

॥ ७८५ ॥

धन्य भावशीळ । ज्याचें ह्रृदय निर्मळ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पूजी प्रतिमेचे देव । संत ह्मणती तेथें भाव ॥ ध्रु ॥

विधिनिषेध नेणती । एक निष्ठा धरूनी चित्तीं ॥ २ ॥

तुका ह्मणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ३ ॥

॥ ७८६ ॥

आधीं च आळशी । वरी गुरूचा उपदेशी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मग त्या कैंची आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥ ध्रु ॥

नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥ २ ॥

तुका ह्मणे ते गाढव । घेती मनासवें धांव ॥ ३ ॥

॥ ७८७ ॥

नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणी लोटी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ॥ ध्रु ॥

न धरिती लाज । नाहीं जनासवें काज ॥ २ ॥

तुका ह्मणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ॥ ३ ॥

---

१ त. मानी..—२ पं. मनामागें.

॥ ७८८ ॥

टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळें[1] पोटासाटीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची ॥ ध्रु ॥

कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे । प्रेमेंविण डोळे[2] गळताती ॥ २ ॥

तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

॥ ७८९ ॥

धन्य देहूं गांव पुण्य भूमि ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धन्य क्षेत्रवासी लोक[3] ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ ध्रु ॥

कर कटी उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते[4] माता रखुमादेवी ॥ २ ॥

गरुड पारीं उभा जोडुनियां कर । अश्वत्थ समोर उत्तरामुख ॥ ३ ॥

दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥ ४ ॥

लक्ष्मीनारायण बल्लाळाचें[5] बन । तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ५ ॥

विघ्नराज द्वारीं बहिरव बाहेरी । हनुमंत शेजारीं सहित दोघे ॥ ६ ॥

तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥ ७ ॥

## शाक्तावर—अभंग १३.

॥ ७९० ॥

टंवकारूनि दृष्टि लावुनियां रंग । दावी झगमग डोळ्यांपुढें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणती शिष्यासी लागली समाधी । लटकी चि उपाधी झकविती ॥ ध्रु ॥

---

१ दे. त. वोंगळ.—२ पं. गळे दाटताती.—३ त. लोक हे दैवाचे. दे. क. लोक दइवाचे.—४ त. हे.—५ पं. बलाळाचें.

दीपाचिया ज्योती कोंडियेलें तेज । उपदेश सांजरात्रीमाजी ॥ २ ॥
रांगोळिया चौक शृंगारूनी वोजा । आवरण पूजा यंत्र करी ॥ ३ ॥
पडदा लावोनियां दीप चहूं कोनीं । बैसोनि आसनीं मुद्रा दावी ॥ ४ ॥
नैवेद्यासी ह्मणे करावें पक्कान्न । पात्रासी दिव्यान्न परवडी ॥ ५ ॥
जाला उपदेश कवळ घ्या रे मुखीं । आपोशन शेखीं बुडविलें ॥ ६ ॥
पाषांड करोनी मांडिली जीविका । बुडवी भाविकां लोकांप्रती ॥ ७ ॥
कायावाचामनें सोडवी संकल्प । गुरु गुरु जप प्रतिपादी ॥ ८ ॥
शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्वभूषणें भोग भोगी ॥ ९ ॥
विधीचा ही लोप बुडविला वेद । शास्त्रांचा ही बोध हराविला ॥ १० ॥
योगाची धारणा नाहीं प्राणायाम । सांडी यम नेम नित्यादिक ॥ ११ ॥
वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप । वाढविलें पाप मतिलंडें ॥ १२ ॥
तुका ह्मणे गेलें गुरुत्व गुखाडी । पूर्वजांसी धाडी नर्कवासा ॥ १३ ॥

॥ ७९१ ॥

शाक्त गधडा जये देशीं । तेथें राशी पापाच्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सुकृताचा उदो केला । गोंधळ घाला इंद्रियें ॥ ध्रु ॥
क्रोधरूपें वसे काम । तीचें नाम जपतसे ॥ २ ॥
मद्यभक्षण मांगिणजाती । विटाळ चित्तीं सांटविला ॥ ३ ॥
स्तवुनियां पूजी रांड । न लजे भांड दाढीसी । ४ ॥
तुका ह्मणे भगवती । नेइल अंतीं आपणापें ॥ ५ ॥

---

१ दे. शखीं.–२ पं. लगे.

॥ ७९२ ॥

राजा प्रजा द्वाड देश । शाक्त वास करिती तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अधर्माचें उबड[1] पीक । धर्म रंक त्या गांवीं ॥ ध्रु ॥
न पिके भूमि कांपे भारें । मेघ वारें पीतील ॥ २ ॥
तुका ह्मणे अवघीं दुःखें । येती सुखें वस्तीसी ॥ ३ ॥

॥ ७९३ ॥

ऐसें[2] कलियुगाच्या मुळें । जालें धर्माचें वाटोळें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांडुनियां रामराम । ब्राह्मण ह्मणती दोमदोम ॥ ध्रु ॥
शिवों नये तीं निळीं । वस्त्रें पांघरती काळीं ॥ २ ॥
तुका ह्मणे वृत्ति । सांडुनि गदा मागत जाती ॥ ३ ॥

॥ ७९४ ॥

अवघ्या पापें घडला एक । उपासक शक्तीचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचा विटाळ नको अंगा । पांडुरंगा माझिया ॥ ध्रु ॥
काम क्रोध मद्य अंगीं । रंगला रंगीं अवगुणी ॥ २ ॥
करितां पाप न धरी शंका । ह्मणे तुका कोणी ही ॥ ३ ॥

॥ ७९५ ॥

वारितां बळें धरितां हातीं । जुलुमें जाती नरकामधीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रंडीदासाप्राति कांहीं । उपदेश तो ही चालेना ॥ ध्रु ॥
जन्म केला वाताहात । थोर घात येठांयीं[3] ॥ २ ॥
तुका ह्मणे पंढरीनाथा । तुझी कथा दूषीती ॥ ३ ॥

---

१ पं. उबेड.–२ पं. ऐका.–३ पं. ते ठायीं.

॥ ७१६ ॥

शाक्तांची शूकरी माय । विष्ठा खाय बिदीची ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तिची त्या पडली सवे । मागें धांवे ह्मणोनि ॥ ध्रु ॥

शाक्तांची गाढवी माय । भुंकत जाय वेसदारा ॥ २ ॥

तुका ह्मणे शिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥ ३ ॥

॥ ७१७ ॥

हरिहर सांडुनि देव । धरिती भाव क्षुल्लकीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐका त्यांची विटंबणा । देवपणा भक्तांची ॥ ध्रु ॥

अंगीं कवडे घाली गळां । परडी कळाहीन हातीं ॥ २ ॥

गळां गांठा हिंडे दारीं । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ ३ ॥

माथां सेंदुर दांत खाती । जेंगट हातीं सटवीचें ॥ ४ ॥

पूजिती विकट दोंद । पशु सोंड गजाची ॥ ५ ॥

ऐशा छंदें चुकलीं वाटा । भाव खोटा भजन ॥ ६ ॥

तुका ह्मणे विष्णुशिवा । वांचुनि देवा भजती ते ॥ ७ ॥

॥ ७१८ ॥

कांद्यासाठीं जालें ज्ञान । तेणें जन नाडिलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काम क्रोध बुचबुची । भुंके पुची व्यालीची ॥ ध्रु ॥

पूजेलागीं द्रव्य मागे । काय सांगे शिष्यातें ॥ २ ॥

तुका ह्मणे कैचें ब्रह्म । अवघा भ्रम विषयांचा ॥ ३ ॥

---

१ पं. लागली.—२ त. देवपणा त्या भक्तांची.—३ पं. पूजिती विकट दोंद तोंड.—४ त. भाव खोटा तें भजन.—५ त. तं. देहूच्या प्रतींत "तीं" असा पाठ होता तो चांगला होता, पण तो बदलून "ते" असा केला आहे.

॥ ७९९ ॥

सांडुनियां पंढरीराव । कवणातें ह्मणों देव ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ बहु लाज वाटे चित्ता । आणिकांतें देव ह्मणतां ॥ ध्रु ॥

सांडुनियां हिरा । कोणें वेचाव्या त्या गारा ॥ २ ॥

तुका ह्मणे हरिहर । ऐसी[1] सांडुनियां धुर ॥ ३ ॥

॥ ८०० ॥

बहुतें गेलीं वांयां । न भजतां पंढरीराया ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ करिती कामिकांची सेवा । लागोन मागोन खात्या देवा ॥ ध्रु ॥

अवघियांचा धनी । त्यासी गेलीं विसरोनि ॥ २ ॥

तुका ह्मणे अंतीं । पडती यमाचिया हातीं ॥ ३ ॥

॥ ८०१ ॥

असो आतां ऐसा धंदा । तुज गोविंदा आठवूं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ रक्षिता तूं होसी जरी । तरि काय येरीं करावें ॥ ध्रु ॥

काया वाचा मन पायीं । राहे ठायीं करूं तें ॥ २ ॥

तुका ह्मणे गाइन गीतीं । रूप चित्तीं धरूनियां ॥ ३ ॥

॥ ८०२ ॥

नाहीं आह्मी विष्णुदास । करीत आस कोणांची ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कां हे नष्ट करिती निंदा । नेणों सदा आमुची ॥ ध्रु ॥

असों भलते ठायीं मनें । समाधानें आपुलिया ॥ २ ॥

---

१ पं. ऐसे.

तुका ह्मणे करूं[1] देवा । तुझी सेवा धंदा तो ॥ ३ ॥

॥१३॥

॥ ८०३ ॥

पाखांडयांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपुलें[2] भिकारी अर्थ नेणे ॥ ध्रु ॥
न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडिती ॥ २ ॥
तुझ्या पांयांविण दुजें नेणें कांहीं । तूं चि सर्वांठायीं एक मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे खीळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडा वादकांशीं ॥ ४ ॥

॥ ८०४ ॥

कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशळ हे भांड बहु जाले ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें[3] बडबडी कोरडा चि ॥ ध्रु ॥
दंभ[4] करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥ २ ॥
वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । नव्हती अलिप्त देहाहुनी ॥ ३ ॥
तुका ह्मणे दंड सोहील[5] यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ॥ ४ ॥

॥ ८०५ ॥

विषयाचें सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ॥ ध्रु ॥
असिपत्रीं[6] तरुवरखैराचे इंगळ[7] । निघतील ज्वाळ तेलपाकीं ॥ २ ॥

---

१ पं. करूं.—२ पं. आपण.—३ पं. मुखीं वडबडी भलते चि.—४ दे. क. त. डंव.—५ दे. साहिले.—६ पं. असिपत्र तरुवर.—७ दे. पं. त. विंगळ

तप्तभूमीवरि लोळविती पाहीं[1] । अग्निस्तंभ बाहीं कवळविती ॥ ३ ॥
ह्मणऊनि तुका येतो काकुलती । पुरे आतां याती गर्भवास ॥ ४ ॥

॥ ८०६ ॥

अल्प माझी मती । ह्मणोनि येतों काकुलती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां दाखवा दाखवा । मज पाउलें केशवा ॥ ध्रु ॥
धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ २ ॥
तुका ह्मणे दया । मज करा अभागिया ॥ ३ ॥

॥ ८०७ ॥

वाटुली पाहातां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं[2] वो डोळां ॥ १ ॥
तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठले पाहिली वास तुझी ॥ २ ॥
तुका ह्मणे माझ्या आसावल्या[3] बाह्या । तुज क्षेम द्यावया[4] पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ८०८ ॥

देह हा सादर पाहावा[5] निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥ ध्रु ॥
यजन याजन तप व्रतें[6] करिती । विकल्पें नागवती शुद्ध पुण्यां[7] ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकुनियां ॥ ३ ॥

॥ ८०९ ॥

तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौन्यपणें ॥ १ ॥
मौन्यपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ ध्रु ॥
रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हें झकवे ब्रह्मादिक ॥ २ ॥

---

१ पं. चालविती पायीं.—२ दे. त. कई.—३ दे. असांवल्या.—४ क. देया. पं. द्येया.—५ पं. पाहावया.— ६ क. त. व्रत.—७ पं. पुण्यें.

ब्रह्मादिकां देवां कर्माची कचाटी । ह्मणोनि आटाटी फार त्यांसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझे गुण नाम रूप । आहेसी अमुप वाणूं काई ॥ ४ ॥

॥ ८१० ॥

मनवाचातीत तुझें हें स्वरूप । ह्मणोनियां माप भक्ति केलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भक्तीचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्वता न मोजवे ॥ ध्रु ॥
योग याग तपें देहाचिया योगें । ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी केशवा करितों ऐसी ॥ ३ ॥

॥ ८११ ॥

देवा ऐसा शिष्य देई । ब्रह्मज्ञानी निपुण पाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जो कां भावाचा आगळा । भक्तिप्रेमाचा पुतळा ॥ ध्रु ॥
ऐशा युक्ति ज्याला वाणे । तेथें वैराग्याचें ठाणें ॥ २ ॥
ऐसा जाला हा शरीरी । तुका लिंबलोण करी ॥ ३ ॥

॥ ८१२ ॥

जंववरी नाहीं देखिली पंढरी । तोंवरी वर्णिसी थोरी वैकुंठींची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनि कामारी दीनरूप ॥ ध्रु ॥
वृंदावन सडे चौक रंग माळा । अभिनव सोहोळा घरोघरीं ॥ २ ॥
नामघोष कथापुराणकीर्तनीं । ओविया कांडणीं पांडुरंग ॥ ३ ॥
सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥ ४ ॥

१ दे. क. त. ब्रह्मादिका.—२ दे. क. पं. देवा.—३ पं. काय—४ दे. क. सांपडेसी.—५ दे. शरीरीं.—६ दे. त. जंव नाहीं.—७ पं तंववरि.—८ त. वार्णसील.—९ दे. त. पं. अभिन्नव.

तुका ह्मणे जें न साधे सायासें । तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरि ॥ ५ ॥

॥ ८१३ ॥

दुःख वाटे ऐसी ऐकों[1] नये गोष्टी । जेणें घडे तुटी तुझ्या पायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजित नाइकती ॥ध्रु॥
काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडुनि पुढती वाटे लावूं ॥ २ ॥
तुका ह्मणे मज दावूं नको ऐसे । दृष्टीपुढें पिसे पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ८१४ ॥

शूकरासी विष्ठा माने सावकास । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेवीं अभक्तांसी आवडे पाखांड । न लगे त्यां गोड परमार्थ ॥ध्रु॥
श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरि ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्पा पाजिलिया क्षीर । वमितां विखार विष जालें ॥ ३ ॥

॥ ८१५ ॥

रासभ धुतला महा तीर्थांमाजी । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेवीं खळा काय केला उपदेश । नव्हे चि मानस शुद्ध त्याचें ॥ध्रु॥
सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणे ॥ २ ॥
तुका ह्मणे श्वाना क्षिरिचें भोजन । सवें चि वमन जेवी तया ३ ॥

॥ ८१६ ॥

जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषातुल्य[2] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेवीं परमार्थ जीहीं दुराविला । तयालागीं झाला सन्निपात ॥ध्रु॥
कांमिनी[3] जयाच्या जाहाली नेत्रासी । देखी तो चंद्रासी पीतवर्ण ॥ २ ॥

---

१ पं. ऐकोनियां. दे. एकोनियें. क. ऐकोनिये.—२ त. विषतुल्य.—३ दे. " कामिण. " असें नवीन केलें आहे.

तुका ह्मणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ३ ॥

॥ ८१७ ॥

आतां असो मना अभक्तांची कथा । न होई दुश्चिता हरिनामीं ॥ १ ॥

॥ध्रु.॥ नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नांवें ॥ ध्रु ॥

प्रभातें न घ्यावें नांव माकडाचें । तैसें अभक्तांचें सर्वकाळ ॥ २ ॥

तुका ह्मणे आतां आळवूं मंगळ । जेणें सर्व काळ सुखरूप ॥ ३ ॥

॥ ८१८ ॥

नाम आठवितां सद्गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांग ही गात्रीं प्रेम तुझें ॥ध्रु

सर्व ही शरीर वेचो या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥ २ ॥

तुका ह्मणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतां पाईं ॥ ३ ॥

॥ ८१९ ॥

जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अंधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तो चि जाणे ॥ ध्रु ॥

शरणागता जेणें घातलें पाठीशीं । तो जाणे तविशीं राखों तया ॥ २ ॥

कासे लाग तया न लगती सायास । पोहोणारा त्यास पार पावी ॥ ३ ॥

तुका ह्मणे जीव विठ्ठलाचे हातीं । दिला त्याची गति तो चि जाणे॥४॥

॥ ८२० ॥

नका वांटूं मन विधिनिषेधांशीं । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥ १ ॥

१ त. आनंदाश्रु.–२ पं लागती.

॥ ध्रु. ॥ खादलिया अन्ना मासी बोलों[1] नये । अवघें चि जाये एका घांसें ॥ ध्रु ॥
जोडी होते परी ते बहु कठिण । करितां जतन सांभाळावें ॥ २ ॥
तुका ह्मणे येथें न मना[2] विषाद । निंबेंविण व्याध तुटों नये ॥ ३ ॥

॥ ८२१ ॥

नको होऊं देऊं भावीं अभावना । या चि नांवें जाणा बहु दोष ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मेघवृष्टि येथें होते अनिवार । जिव्हाळया[3] उखर लाभ नाड ॥ ध्रु ॥
उत्तमा विभागें कनिष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासी ॥ २ ॥
तुका ह्मणे जिणें बहु थोडें आहे । आपुलिया पाहें पुढें बरें ॥ ३ ॥

॥ ८२२ ॥

त्याग तंव मज न वजतां केला । कांहीं च विठ्ठला मनांतूनि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भागलिया आला उबग सहज । न धरितां काज जालें मनीं ॥ ध्रु ॥
देह जड जालें ऋणाच्या आभारें । केलें संवसारें कासावीस ॥ २ ॥
तुका ह्मणे गेला आळसकिळस । अकर्तव्य दोष निवारले ॥ ३ ॥

॥ ८२३ ॥

मढें झांकुनियां करिती पेरणी । कुणबियाचे वाणी लवलाहें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तयापरी करीं स्वहित आपुलें । जयासी फावलें नरदेह ॥ ध्रु ॥
ओटीच्या परिस मुठीचें तें वाढे । यापरि कैवाडें स्वहिताचें ॥ २ ॥

---

१ दे. बोळों.–२ त. माना.–३ दे. जिव्हाळयां.

नाहीं काळसत्ता आपुलिये हातीं । जाणते हे गुंती उगवितीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे पाहें आपुली सूचना । करितो शाहाणा मृत्युलोकीं ॥ ४ ॥

॥ ८२४ ॥

राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोणी कोणा एथें न मनी जी फुका । कृपेविण एका देवाचिया ॥ छ ॥
शृंगारिलें नाहीं नगीयेत वरि । उमटे लोकारि जैसें तैसें[१] ॥ २ ॥
तुका ह्मणे घरीं वसे नारायण । कृपेची ते खुण सौम्या येते ॥ ३ ॥

॥ ८२५ ॥

वत्स पळे धेनु धांवे पाठीलागीं । प्रीतीचा तो अंगीं आविर्भाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शिकविलें काय येईल कारणा । सूत्र ओढी मना आणिकांच्या ॥ छ ॥
सांडिलें तें नाहीं घेत मेळवितां । ह्मणऊनि लाता मागें सारी ॥ २ ॥
तुका ह्मणे आग्रह करावा न लगे । सांगतसे अंगें अनुभव ॥ ३ ॥

॥ ८२६ ॥

देवाच्या संबंधें विश्व चि सोयरें । सूत्र ओढे दोरें एका एक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आहाच हें नव्हे विटायामारिखें । जीव जीवनीं देखें सामावलें ॥ छ ॥
आणिकांचें सुख दुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यायें ॥ २ ॥
तुका ह्मणे ठसावलें शुद्ध जातीं । शोभा चि पुढती विशेषता ॥ ३ ॥

---

१ त. ती.–२ दे. तैसें.३– क. दिसों.४– दे. पं. क. त. आयुर्भाव.

॥ ८२७ ॥

अवघा वेंचलों इंद्रियांचे ओढी । जालें तें तें घडी निरोपिलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ असावा जी ठावा सेवेसी विचार । आपुला म्यां भार उतरिला ॥ ध्रु ॥

कायावाचामनें तो चि निजध्यास । एथें जालों ओस भक्तिभावें ॥ २ ॥

तुका ह्मणे करूं येईल धांवणें । तरि नारायणें सांभाळावें ॥ ३ ॥

॥ ८२८ ॥

राहो आतां हें चि ध्यान । डोळां मन लंपटो ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कोंडकोंडुनि धरीन जीवें । देहभावें ओंवाळीन ॥ ध्रु ॥

होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥ २ ॥

तुका ह्मणे गोजिरिया । विठोबा पायां पडों द्या ॥ ३ ॥

॥ ८२९ ॥

आदि मध्य अंत दाखविला दीपें । हा तों आपणापें यत्न बरा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ दासत्वें[1] दाविलें धन्याचें भांडार । तोंतों नव्हे सार एथुनियां ॥ ध्रु ॥

उपायानें सोस नासला सकळ । सत्ते[2] सत्ताबळ अंगा आलें ॥ २ ॥

तुका ह्मणे दृष्टि सकळांचे शिरीं । वचन चि करी बैसोनियां ॥ ३ ॥

॥ ८३० ॥

सांटविले[3] वाण । पैस घातला दुकान ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्ध चि जवळी ॥ ध्रु ॥

निवडिलें साचें । उत्तममध्यमकनिष्ठाचें ॥ २ ॥

तुका बैसला दुकानीं । दांवी[4] मोला ऐसी वाणी ॥ ३ ॥

---

१ दे. क. त. दाशत्वें पं. दास्यत्वें. –२ त. सत्यें.–३ पं. साटविला वान.–४ पं. मोला ऐसी दावि वानि.

॥ ८३१ ॥

लागलिया मुख स्तनां । घाली पान्हा माउली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उभयतां आवडी लाडें । कोडें कोड पुरतसे ॥ ध्रु ॥
मेळवितां अंगें अंग । प्रेमें रंग वाढतो ॥ २ ॥
तुका ह्मणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे ॥ ३ ॥

॥ ८३२ ॥

अवगुण तों [1]कोणीं नाहीं प्रतिष्ठिले । मागें होत आले शिष्टाचार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दुर्बळाच्या नांवें पिटावा डांगोरा । हा [2]तों नव्हे बरा सत्यवाद ॥ ध्रु ॥
मद्य आणि मधु एकरासी नांवें । तरि [3]कां तें खावें आधारें त्या ॥ २ ॥
तुका ह्मणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद वृष्टिन्यायें ॥ ३ ॥

॥ ८३३ ॥

भूतीं भगवंत । [*]हा तों जाणतों संकेत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भारी मोकालितों बाण । ज्याचा त्यासी कळे गुण ॥ ध्रु ॥
करावा उपदेश । निवडोनि तरि दोष ॥ २ ॥
तुका ह्मणे वाटे । चुकतां आडरानें कांटे ॥ ३ ॥

॥ ८३४ ॥

आह्मां हें [4]कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ॥ ध्रु ॥

---

१ त. 'कोणी नाहीं' यांच्याबद्दल 'नाहीं कोणी.' पं. कांहीं नाहीं.–२ क. त. तो.–
३ त. पं. 'कां तें' याबद्दल 'तें कां'.–४ दे. त. क. कवतुक.– * पं. हा शब्द नाहीं.

अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे बाण ॥ २ ॥
तुका ह्मणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोटया परी ॥ ३ ॥

॥ ८३५ ॥

दर्पणासी नर्कटें[1] लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसे सुदें विपरीत ॥ ध्रु ॥
अंधळ्यास काय हिरा । गारा चि तो सारिखा ॥ २ ॥
तुका ह्मणे भुंके सुनें । ठाया नेणे ठाव तो ॥ ३ ॥

॥ ८३६ ॥

नावडे तरि कां येतील हे भांड । घेउनियां तोंड काळें येथें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नासोनियां जाय रस यासंगती । खळाचे पंगती नारायणा ॥ ध्रु ॥
तोंडावाटा नर्क काढी अमंगळ । मिष्टान्ना विटाळ करी सुनें[2] ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं संतांची मर्यादा । निंदे तो चि निंदा मायझवा ॥ ३ ॥

॥ ८३७ ॥

लेकरा आईतें पित्याची जतन । दावी निजधन सर्व जोडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्यापरि आमचा जालासे सांभाळ । देखिला चि काळ नाहीं आड ॥ ध्रु ॥
भुकेचे संनिध वसे स्तनपान । उपायाची भिन्न चिंता नाहीं ॥ २ ॥
आळवूनि तुका उभा पैलथडी । घातली या उडी पांडुरंगें ॥ ३ ॥

---

१ पं. नकटें.—२ दे. "सुणें" असें मागून केलें आहे.

॥ ८३८ ॥

शुद्ध चर्या हें चिं* संताचें पूजन । लागत चि धन नाहीं वित्त ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सगुणाचे सोई सगुण विश्रांती । आपण चि येती चोजवीत ॥ ध्रु ॥
कीर्तनीं[1] चि वोळे कृपेचा वोरस । दुरीपणें वास संनिधता ॥ २ ॥
तुका ह्मणे वर्म सांगतों सेवंगें[2] । मन लावा लागे स्वहिताच्या ॥ ३ ॥

॥ ८३९ ॥

जीवींचें जाणावें या नांवें आवडी । हेंकड तें ओढी अमंगळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चित्ताच्या संकोचें कांहीं च न घडे । अतिशयें वेडे चार ते[3] चि ॥ ध्रु ॥
काळाविण कांहीं नाहीं रुचों येत । करूनि संकेत ठेवियेला ॥ २ ॥
तुका ह्मणे कळे वचनें चांचणी । काय बोलवूनि वेळोवेळां ॥ ३ ॥

॥ ८४० ॥

कामातुर चवी सांडी । बरळ तोंडीं बरळे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रंगलें तें अंगीं दावी । विष देववी आसडे ॥ ध्रु ॥
धनसोसें लागे वेड । ते बडबड शमेना ॥ २ ॥
तुका ह्मणे वेसनें दोन्ही । नर्कखाणी भोगावया ॥ ३ ॥

॥ ८४१ ॥

[4]कृष्णांजनें जाले सोज्ज्वळ लोचन । तेणें दिले वा[5]न निवडुनी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ निरोपाच्या मापें क[6]री लडबड । त्याचें त्या[7]नें गोड नारायणें ॥ ध्रु ॥

---

१ पं. कीर्तनेची.—२ त. सवंग.—३ दे. तो.—४ पं. कृष्णांजन.—५ पं. त. वाण.—६ पं. करीलबडबड दे. करीं.—७ पं. त. तेणे. * पं 'चि' हा शब्द नाहीं.

भाग्यवंतांघरीं करितां विश्वासें । कार्य[1] त्यासरिसें होईजेतें ॥ २ ॥
तुका ह्मणे पोट भरे बरेवोजा । निज ठाव निजा निजस्छानीं ॥ ३ ॥

८४२

मैंद आला पंढरीस । हातीं घेउनि प्रेमपाश ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पुढें नाडियलें जग । नेतो लागों नेदी माग ॥ ध्रु ॥
उभारोनि बाहे । दृष्टादृष्टी वेधीताहे ॥ २ ॥
वैकुंठीहुनि पेणें । केलें पंढरीकारणें ॥ ३ ॥
पुंडलिकें थारा । देउनि आणिलें या चोरा[2] ॥ ४ ॥
तुका ह्मणे चला । तुह्मी आह्मी धरूं त्याला ॥ ५ ॥

॥ ८४३ ॥

भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणा सकळां साक्षित्वेसीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझी माझी ह्मणे एँकएकां[3] मारी । हें तों नाहीं दुरी उभयतां ॥ ध्रु ॥
तुझें थोडें भातें माझें बहु फार । छंद करकर वाद मिथ्या ॥ २ ॥
तुका ह्मणे एके ठायीं आहे वर्म । हें चि होय श्रम निवारितें ॥ ३ ॥

॥ ८४४ ॥

लटकियाँची[4] आशा । होतों पडिलों वळसा ।
होउनियां दोषा । पात्र मिथ्या अभिमानें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बरवी उघडली दृष्टी । नाहीं तरी होतों कष्टी ।
आक्रंदते सृष्टी । मात्र या चेष्टांनीं ॥ ध्रु ॥

---

१ पं. कायें.—२ दे. क. आणिलें चोरा.—३ पं. एकमेका.—४ दे. लटिकियाच्या. पं. लाटिक्याच्या.

मरणाची नाहीं शुद्धी । लोभीं प्रवर्तली बुद्धी ।
परती तों कधीं । घडे चि ना माघारीं ॥ २ ॥
सांचूनि मेरे धन । लावी पोरांसी भांडण ।
नाहीं नारायण । तुका ह्मणे स्मरीला ॥ ३ ॥

॥ ८४५ ॥

जवळी मुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं[1] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नासी काम ॥ ध्रु ॥
सुखाचें शेजार । करूं कां नावडें घर ॥ २ ॥
तुका ह्मणे ठेवा । कां हा न करी चि बरवा ॥ ३ ॥

॥ ८४६ ॥

बरवें देशावर[2] जालें । काय बोलें बोलावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लाभें लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें[3] ॥ ध्रु ॥
भाग्यें जाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥ २ ॥
तुका ह्मणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ३ ॥

॥ ८४७ ॥

सांगतां हें नये सुख । कीर्ती मुख न पुरे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आवडीनें सेवन करूं । जीवींचें धरूं जीवीं च ॥ ध्रु ॥
उपमा या देतां लाभा । काशा शोभा सारिखी ॥ २ ॥
तुका ह्मणे नुचलीं डोई । ठेविली पायीं संतांचे ॥ ३ ॥

---

१ दे. आहिर्णेसी. पं, अहिर्णिसी. त. आहीर्णीसी.—२ दे. त. पं. देशाउर.—३ दे. दरुषणें.

॥ ८४८ ॥

आपुलाला[1] लाहो करूं । केणें भरूं हा विठ्ठल ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भाग्य पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥ ध्रु ॥
पुढती[2] कोठें घडे ऐसें । बहुतां दिसें फावलें ॥ २ ॥
तुका ह्मणे जाली जोडी । चरण घडी न विसंबें[3] ॥ ३ ॥

॥ ८४९ ॥

उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ ध्रु ॥
संपुष्ट हां[4] हृदयपेटी । करूनि पोटीं सांटवूं ॥ २ ॥
तुका ह्मणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ३ ॥

॥ ८५० ॥

आह्मां[5] आपुलें नावडे संचित । चरफडे[6] चित्त कळवळ्यानें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न कळतां जाला खोळंब[7] मारगा । जगीं जालों जगा बहुरूपी ॥ध्रु॥
कळों आलें बरें उघडले डोळे । कर्णधार मिळे तरि बरें ॥ २ ॥
तुका ह्मणे व्हाल ऐकत करुणा । तरि नारायणा उडी घाला ॥ ३ ॥

॥ ८५१ ॥

बरगासाटीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ फजित तो केला लाहे । ताडण साहे गौरव ॥ ध्रु ॥
ओढाळाची ओंगळ ओढी । उगी खोडी नवजाय ॥ २ ॥
तुका फजीत करी बुच्या[8] । विसरे कुच्या खोडी तेणें ॥ ३ ॥

---

१ पं. आपुला लाहो.–२ दे. त. पुडती.–३ दे. क. विसंमें.–४ पं. हे.–५ त. आह्मांसी आपुलें नावडे स्वहित.–६ दे. त. पं. चरफडी.–७ पं. खोळंबा.–८ पं. बुका.

॥ ८५२ ॥

धांव घालीं आई । आतां पाहातेसी काई ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धीर नाहीं माझे पोटीं । जालें वियोगें हिंपुटी ॥ ध्रु ॥
करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥ २ ॥
तुका ह्मणे डोई । कधीं ठवीन हे पायीं ॥ ३ ॥

॥ ८५३ ॥

तुह्मां ठावा होता देवा । माझे अंतरींचा हेवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ होतों काशानें सुटका । तरि हे वैकुंठनायका ॥ ध्रु ॥
नसतें संभाळिलें । जरि तुह्मीं आश्वासिलें ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपाळुवा । बरवा केला सावाधावा ॥ ३ ॥

॥ ८५४ ॥

देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाहातां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ॥ ध्रु ॥
आरुष हे वाणी । गोड करूनि घेतां कानीं ॥ २ ॥
आवडीनें खेळे । तुका पुरवावे सोहाळे ॥ ३ ॥

॥ ८५५ ॥

दर्शनाची आस । आतां न साहे उदास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जीव आला पायांपाशीं । येथें असें कलिवरेंसीं ॥ ध्रु ॥
कांहीं च नाठवे । ठायीं बैसलें नुठवे ॥ २ ॥
जीव असतां पाहीं । तुका ठकावला ठायीं ॥ ३ ॥

---

१ दे. हिंपुटी.—२ पं. फुकाचे.—३ दे. पं. सोहाळे.—४ पं. नुठावे.

॥ ८५६ ॥

भोगावरि आह्मीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ १ ॥
॥ध्रु.॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाठीं बळा येऊं आतां ॥ध्रु॥
काय सारूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरी काय ठेवूं ॥ २ ॥
केला तरि उरे वाद चि कोरडा । बळें घ्यावी पीडा स्वपनींची ॥ ३ ॥
आवघे चि वाण आले तुह्मां घरा । मजुरी मजुरा रोज कीर्दी[१] ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥ ५ ॥

॥ ८५७ ॥

कां हो एथें काळ आला आह्मां आड । तुह्मांपाशीं नाड करावया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ॥ ध्रु ॥
कां हो उपजेना द्यावी ऐशी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ॥२॥
पाप फार किंवा जालासी दुर्बळ । मागिल तें बळ नाहीं आतां ॥ ३ ॥
काय जालें देणें[२] निघालें दिवाळें । कीं बांधलासि बळें ऋणेंपायीं ॥४॥
तुका ह्मणे कां रे ऐसी केली गोवी । तुझी माझी ठेवी निवडुनियां ॥५॥

॥ ८५८ ॥

काय देह घालूं करवती कर्मरी[३] । टाकूं या भितरी अग्नीमाजी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय सेवूं वन शीत उष्ण तान[४] । साहों कीं मोहन[५] धरूनी बैसों ॥ ध्रु ॥
काय लावूं अंगीं भस्म उधळण । हिंडूं देश कोण खुंट चारी ॥ २ ॥

१ त. कीर्ती.–२ पं. नेणें.–३ दे. करमरी.–४ पं. वाहान.–५ पं. मौन.

काय त्यजूं अन्न करूनि उपास । काय करूं नास जीवित्वाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय करावा उपाव । ऐसा देई भाव पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ८५९ ॥

दंभें कीर्ति पोट भरे मानी जन । स्वहित कारण नव्हे कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अंतरलों तुझे पाय मज दुरी । भरिलों हे थोरी जाणिवेची ॥ ध्रु. ॥
पिंडाच्या पाळणें भोंवतीं विकार । मज दावेदार मजमाजी ॥ २ ॥
कैसा करूं घात आपुला आपण । भरूनि गुमान लोकलाज ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज दावी तो सोहळा । देखें पाय डोळां तुझे देवा ॥ ४ ॥

॥ ८६० ॥

धिग जिणें त्याचा स्वामी हीन वर । मरण तें वर भलें मग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आइका जी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥ ध्रु. ॥
देशोदेशीं भाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें पारि भलें ॥ २ ॥
तुका म्हणे हें कां मुचलें उत्तर । जाणोनि अंतर ओळखावें ॥ ३ ॥

॥ ८६१ ॥

आतां गाऊं तुज ओविया मंगळीं । करूं गदारोळी हरिकथा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ होसि निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥ ध्रु. ॥
भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनि राहों ॥ २ ॥
तुका ह्मणे आम्ही लाडिकीं लेकुरें । न राहों अंतरें पायांविण ॥ ३ ॥

१ दे. क. त. त्यजूं.—२ पं. उपास.—३ दे. त. सोहळा.—४ पं. त. जीणें.—५ दे. वर. पं. बरें—६ दे. ऐका जी.—७ पं. तुज गाऊं.—८ दे. मंगळीं—९ दे. त. पं. अंतरे.

॥ ८६२ ॥

सर्व सुखें आजी एथें चि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥ १ ॥
सर्वकाळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥ २ ॥
तुका ह्मणे वाचा राहिली कुंटित । पुढें जालें चित्त समाधान ॥ ३ ॥

॥ ८६३ ॥

विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल या चित्तीं बैसलासे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया । विठ्ठल हे[1] छाया माझी मज ॥ ध्रु ॥
बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥ २ ॥
सकळां इंद्रियां मन एक प्रधान । तें ही करी ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे या विठ्ठलासी आतां । नये विसंबतां माझें मज ॥ ४ ॥

॥ ८६४ ॥

होय[3] वारकरी । पाहें पाहें रे पंढरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय करावीं साधनें । फळ अवघें चि तेणें ॥ ध्रु ॥
अभिमान नुरे । कोड अवघें चि पुरे ॥ २ ॥
तुका ह्मणे डोळां । विठो[4] बैसला सांवळा ॥ ३ ॥

॥ ८६५ ॥

पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ॥ ध्रु ॥
न लगे धन मान । देहभावें उदासीन ॥ २ ॥

---

१ त. हीं.–२ पं. तुका ह्मणे या हो विठलासी आता. त. तुका ह्मणे या विठोबासी आतां.–३ पं. होय होय. दे. होयें वारेकरी पांहें पांहें रे०.–४ पं. विठु. त. विठल.

तुका ह्मणे मळ । नासी तात्काळ तें स्थळ ॥ ३ ॥

॥ ८६६ ॥

वळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं जाला त्याग अंतरींचा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मनासी हा ठावा समाचार ॥ध्रु॥
जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं । जातों विसरूनि सकळ हें ॥ २ ॥
प्रपंचाबाहेरि नाहीं आलें चित्त । केलें करी नित्य वेवसाय ॥ ३ ॥
तुका ह्मणे मन भोगण्या चि परी । जालें सोंग वरी आंत तैसें ॥ ४ ॥

॥ ८६७ ॥

ह्मणवितों दास तें नाहीं करणी । आंत वरी दोन्हीं भिन्न भाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गातों नाचतों तें दाखवितों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥ ध्रु ॥
पाविजे तें वर्म न कळे चि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥ २ ॥
भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे वांयां गेलों ऐसा दिसें । होईल या हांसें लौकिकाचें ॥ ४ ॥

॥ ८६८ ॥

न कळतां काय करावा उपाय । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येऊनियां वास करिसी ह्रदयीं । ऐसें घडे कई कासयानें ॥ ध्रु ॥
साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कैं गा देवा ॥ २ ॥
लटिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येउनि राहें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा ॥ ४ ॥

---

१ क. नाहीं. २ पं. वेवसाव.

॥ ८६९ ॥

चिंतिलें तें मनिंचें जाणे । पुरवी[1] खुणे अंतरींचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रात्री न कळे दिवस न कळे । अंगीं खेळे दैवत हें ॥ ध्रु ॥
नवसियाचे नव रस । भोगी त्यास भिन्न नाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे सम चि देणें । समचरण उभा असे ॥ ३ ॥

॥ ८७० ॥

उद्धाराचा[2] संदेह नाहीं । याचा कांहीं सेवकां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पांडुरंग अभिमानी । जीवदानी कोंवसा ॥ ध्रु ॥
बुडतां जळीं जळतां अग्नीं । ते प्रसंगीं राखावें ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मांसाटीं । कृपा पोटीं वागवी ॥ ३ ॥

॥ ८७१ ॥

काय विरक्ति[3] कळे आह्मां । जाणों एका नामा विठोबाच्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाचों[4] सुखें वैष्णवमेळीं । टाळघोळीं आनंदें ॥ ध्रु ॥
शांति क्षमा दया मी काय जाणें । गोविंद कीर्तनेंवांचूनियां ॥ २ ॥
*कासया उदास असों देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥ ३ ॥
कासया एकांत सेवूं तया वना । आनंद तो जनामाजी असे ॥ ४ ॥
तुका[5] ह्मणे आह्मां ऐसा भरवसा । विठ्ठल सरसा चालतसे ॥ ५ ॥

---

१ पं. पुरवी नवस.—२ दे. त. क. उधाराचा.—३ त. काय विरक्ति ते.—४ क. नाचों सुख. पं. नाचों प्रेमसुखें वैष्णवांचे मेळीं । दिंडी टाळघोळीं आनंदें या ॥ त. नाचों पै सुख वैष्णवमळीं । सदा टाळघोळीं आनंदेंसी.—५ पं. तुका ह्मणे मज आहे हा भरवसा । * क. हें कडवें नाहीं, व पं. " कासया एकांत " याच्या मागून आहे.

॥ ८७२ ॥

जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे यमापाशीं ॥ छ ॥
गरुडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥ २ ॥
सहज तयां जनां छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ ३ ॥
तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठसोहळा ॥ ४ ॥
तुका ह्मणे भेणें । काळ नये तेणें राणें ॥ ५ ॥

॥ ८७३ ॥

*माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपण चि देव होय गुरु ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पढियें देहभावें पुरवितो वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥छ ॥
मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥ २ ॥
योगक्षेम त्यांचें जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारूनी ॥ ४ ॥

॥ ८७४ ॥

सकळ धर्म मज विठोबाचें नाम । आणीक तें वर्म नेणें कांहीं ॥ १ ॥
काय जाणों संतां निरविलें देवें । करिती या भावें कृपा मज ॥ २ ॥
तुका ह्मणे माझा कोण अधिकार । तो मज विचार कळों यावा ॥ ३ ॥

१ त. सांगती .—२ पं. गरुड टकियांच्या.—३ दे. त. जेजेकारें.—४ दे. त्यांचें पं. त्यांचा
* या व मागील अभंगांच्या मध्यें " तुका सज्जन तिनसूं कहिये । जीनथें प्रेम दुनाये । दुर्जन तेरा मुख काला । थीता प्रेम घटाये " हा दोहरा दे. क. या दोन प्रतींत आहे.

॥ ८७५ ॥

उदंड शाहाणे होत[1] तर्कवंत । पैरि[2] या नेणवे अंत विठोबाचा ॥ १ ॥

उदंडां[3] अक्षरां करीत भरोवरी । पैरि[4] ते नेणवे थोरी विठोबाची ॥ २ ॥

तुका ह्मणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते[5] सिण रितें माप ॥ ३ ॥

॥ ८७६ ॥

आधारावांचुनी । काय सांगसी[6] काहाणी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ठावा नाहीं पंढरीराव । तोंवरी अवघें चि वाव ॥ ध्रु ॥

मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥ २ ॥

तुका ह्मणे ठेवा । जाणपण एक सवा ॥ ३ ॥

॥ ८७७ ॥

अनाथांची तुह्मां दया । पंढरीराया येतसे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसी ऐकोनियां कीर्ति । बहु विश्रांति पावलों ॥ ध्रु ॥

अनाथांच्या धांवा घरा । नामें करा कुडावा ॥ २ ॥

तुका ह्मणे सवघड हित । ठेवूं चित्त पायांपें ॥ ३ ॥

॥ ८७८ ॥

येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विषयांचे झणी व्हाल लोलिंगत । चेवलिया अंत न लगे मज ॥ ध्रु ॥

वाहोनियां भार कुंथसील ओंझे तें चि माझें थीता त्याग ॥ २ ॥

तुका ह्मणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥ ३ ॥

---

१ पं. होती.—२ पं. परी नेणवे चि०.—३ पं. उदंड अक्षरे.—४ पं. परी नेणवे चि०.५ क. त. पं. तो.—६ क. सांगशील.

॥ ८७९ ॥

हीं च त्यांचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ॥ ध्रु ॥
हा च काळ वर्तमान । साधन ही संपत्ती ॥ २ ॥
तुका ह्मणे दिवसराती । हें चि खाती अन्न ते ॥ ३ ॥

॥ ८८० ॥

दीप न देखे अंधारा । आतां हें चि करा जतन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नारायण नारायण । गांठी धन बळकट ॥ ध्रु ॥
चिंतामणीपाशीं चिंता । तेल्वता[1] ही नयेल ॥ २ ॥
तुका ह्मणे उभयलोकीं । हे चि निकी सामग्री[2] ॥ ३ ॥

॥ ८८१ ॥

धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिली तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संदेहाची सुटली गांठी । जालें पोटीं शीतळ ॥ ध्रु ॥
भवनदीचा जाला तारा । या उत्तरा[3] प्रसादें ॥ २ ॥
तुका ह्मणे मंगळ आतां । कोण दाता याहूनि ॥ ३ ॥

॥ ८८२ ॥

दिनरजनीं हा चि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संकल्पिला देह देवा । सकळ हेवा तये ठायीं ॥ ध्रु ॥
नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रियां ॥ २ ॥
कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥ ३ ॥

---

१ पं. सावता.—२ दे. त. पं. सामोग्री.—३ त. उतारा.

॥ ८८३ ॥

खरें नानवट निक्षेपीचें[1] जुनें । काढिलें ठेवणें समर्थाचें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥ ध्रु ॥

कुंलाळाच्या[2] हातें घंटाच्या[3] उत्पत्ति । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥ २ ॥

तुका ह्मणे जीवन तें नारायणीं । प्रभा जातें[4] किर्णीं प्रकाशाची ॥ ३ ॥

॥ ८८४ ॥

गंगेचिया अंतांविण[5] काय चाड । आपुलें तें कोड तृषेपाशीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विठ्ठल हें मूर्ति साजिरी सुंदर । घालीं[6] निरंतर ह्रदयपुटीं ॥ ध्रु ॥

कारण तें असे नवनीतापाशीं । गबाळ तें सोसी इतर कोण ॥ २ ॥

बाळाचे सोईतें घांस घाली माता । अट्टाहास[7] चिंता नाहीं तया ॥ ३ ॥

गाऊं नाचों करूं आनंदसोहळा । भाव चि आगळा[8] नाहीं हातां[9] ॥ ४ ॥

तुका ह्मणे अवघें जालें एकमय । परलोकींची काय चाड आतां ॥ ५ ॥

॥ ८८५ ॥

स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां सोडवणें[5] धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥ ध्रु ॥

येउनियां आड ठाके लोकलाज । तें हें दिसे काज अंतरलें ॥ २ ॥

तुका ह्मणे आह्मां जेथें जेथें गोवा । तेथें तुह्मीं देवा सांभाळावें ॥ ३ ॥

---

१ दे. त. निक्षुपीचें.—२ क. पं. कुल्लाळाच्या.—३ पं. घटाची.—४ क. "प्रभा जाते" याच्यावद्दल "प्रभाते."—५ पं. अंतेबिण.—६ पं. घालूं.—७ दे. त. आटाहास.—८ पं. वेगळा नाहीं आतां. त. नाहीं हांता.—९ दे. त. हाता—५ पं. सोडवण्या.

॥ ८८६ ॥

पडिलों भोवेंनीं[1] । होतों बहु चिंतवेनी[2] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ होतों चुकलों मारग । लाहो केला लागें वेगें[3] ॥ ध्रु ॥
इंद्रियांचे संदी । होतों सांपडलों बंदीं ॥ २ ॥
तुका ह्मणे बरें जालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥ ३ ॥

॥ ८८७ ॥

बरें जालें आलीं ज्याचीं त्याच्या घरा ।
चुकला पांन्हेरा[4] ओढाळांचा ॥ १ ॥
॥ ध्रु. बहु केलें दुखी त्यांचिया सांभाळें ।
आतां तोंड काळें तेणें लोभें ॥ ध्रु ॥
त्यांचिया अन्यायें भोगों[5] माझें अंग ।
सकळ ही लाग द्यावा लागे ॥ २ ॥
नाहीं कोठें स्थिर राहों दिलें क्षण ।
आजिवरी सिण पावलों तो ॥ ३ ॥
वेगळाल्या खोडी केली तडातडी । सांगावया घडी नाहीं सुख ॥ ४ ॥
निरवूनि तुका चालिला गोवारें । देवापाशीं भार सांडवूनि ॥ ५ ॥

॥ ८८८ ॥

न करावी आतां पोटासाटीं चिंता । आहे त्या संचिता माप लावूं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दृष्टि ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लका उपायीं सिण जाला ॥ ध्रु ॥

---

१ दे. क. भोवणीं.–२ दे. क. चिंतवणी.–३ पं. वेग.–४ क. पान्हेरा.–५ क. भोग.

येथें तंव नाहीं घेइजेसें सवें । कांहीं नये जीवें वेचों मिथ्या ॥ २ ॥
खंडणें चि नव्हे उद्वेग[1] वेरझारीं । बापुडे संसारीं सदा असों ॥ ३ ॥
शेवटा पाववी नावेचें[2] बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां सकळांचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ॥ ५ ॥

॥ ८८९ ॥

आमच्या हें आलें भागा । जि[3]व्हार या जगाचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धरूनियां ठेलों जीवें । बळकट भावें एकविध ॥ ध्रु ॥
आणूनियां केला रूपा । उभा सोपा जवळी ॥ २ ॥
तुका ह्मणे अंकित केला । खालीं आला वचनें ॥ ३ ॥

॥ ८९० ॥

खरें भांडवल सांपडलें गांठी । जेणें नये तुटी उदमासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ स[4]वंगाचें केणें सांपडलें घरीं । भरूनि वैखरी सांटविलें[5] ॥ ध्रु॥
घेतां देतां लाभ होतसे सकळां । स[6]देवां दुर्बळा भाव तैसा ॥ २ ॥
फडा आलिया तो न वजे निरासे । जरि कांहीं त्यास न कळतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां जालीसे निश्चिती । आणीक तें चित्तीं न धरूं दुजें ॥ ४ ॥

॥ ८९१ ॥

पदोपदीं दिलें अंग । जालें सांग कारण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥ ध्रु ॥
पुढती चाली मनालाहो । वाढे देहो संतोष ॥ २ ॥

---

१ पं. उद्योग.—२ दे. नावेचें बैसनें. क. नावचें बैसोनें.—३ दे. क. त. जीव्हार.—४ दे. क. पं. संवगाचें.—५ त. पं. माप केलें.—६ पं. सदेव. त. सदेवां दुर्बळां लाभ तैसा.

तुका ह्मणे क्षरभागीं । जालों जगीं व्यापक ॥ ३ ॥

॥ ८९२ ॥

निवडुनि दिलें नवनीत । संचित ते भोगीत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां पुढें भावसार[1]। जीवेंना[2] थार पाहावया ॥ ध्रु ॥
पारखियाचे पडिलें[3] हातीं । चांचपती आंवळीं ॥ २ ॥
तुका ह्मणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा[4] ॥ ३ ॥

॥ ८९३ ॥

उचित न कळे इंद्रियाचे ओढी । मुखें बडबडी शिकलें तें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आपण जाऊन न्यावीं[5] नरकास । बळें बेताळीस कुळें जग ॥ ध्रु ॥
अबोलणें बोले डोळे झांकुनियां । बडबडी वांयां दंभासाटीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी तेथील पारखी । नाचे देखोवेखीं जाणों खरें ॥ ३ ॥

॥ ८९४ ॥

एक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटितां तें तुला येई[6] कैसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणउनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावीं संग प्रारब्धाचा ॥ ध्रु ॥
आणिका संकल्पा नको गोऊं मन । तरीच कारण साध्य होय ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसें जाणावें उचित । तरी सहज स्थित येईल कळों ॥ ३ ॥

॥ ८९५ ॥

गावे ह्मणउनि गीत । धरूनि राहे तैसें चित्त ॥ १ ॥

---

१ **पं.** भवसार.—२ **त.** जीव थार.—३ **त.** पडिलों.—४ **त.** हा लाभ.—५ **त.** न्यावें आणिकांस. **पं.** न्यावें नरकास.—६ **त. पं.** येईल.

॥ ध्रु. ॥ हें चि थोर अवघड आहे । अन्न देखोनि भूक राहे ॥ ध्रु
ऐकावी ह्मुण[1] कथा । राहे तैसें धरूनि चित्ता ॥ २ ॥
तुका ह्मणे धणी । नव्हे जेविल्यावांचुनि ॥ ३ ॥

॥ ८९६ ॥

कळेल[2] हे खुण । तरि दावी नारायण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सत्य संतांपाशीं राहे । येरां भय आड आहे ॥ ध्रु ॥
अणुंचिया[3] ऐसें । असे भरलें प्रकाशें ॥ २ ॥
इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजूनि ॥ ३ ॥
तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ॥ ४ ॥
तुका ह्मणे ल्यावें । डोळां अंजन बरवें ॥ ५ ॥

॥ ८९७ ॥

जातो न येतिया वाटा । काय निरवितो करंटा ॥ १ ॥ ध्रु. ॥
कैसा जालासे बेश्रम । लाज नाहीं न ह्मणे राम ॥ ध्रु ॥
पाहे वैरियाकडे । डोळे वासुनियां रडे ॥ २ ॥
बांधुनियां यमा हातीं । दिला[4] नाहीं त्याची खंती ॥ ३ ॥
नाहीं यांपें काम । ऐसें जाणे तो अधम ॥ ४ ॥
अझुन तरि मुका । कां रे जालासि ह्मणे तुका ॥ ५ ॥

॥ ८९८ ॥

वांटा घेई लवकरि । मागें अंतरसी दुरी ।
केली भरोवरी । सार नेती आणीक ॥ १ ॥

---

१ पं. ह्मणे.—२ पं. कळेल.—३ दे. त. अनुचिया.—४ पं. दिलें.

॥ ८९८॥

॥ ध्रु. ॥ ऐसीं भांबावलीं किती । काय जाणों नेणों किती ।
समय नेणती । माथां भार वाहोनि ॥ ध्रु ॥
नाहीं सारिलें तोंवरी । धांव घेई वेग करीं ।
घेतलें पदरीं । फावलें तें आपुलें ॥ २ ॥
फट लंडी ह्मणे तुका । एक न साहावे धका ।
तरि च या सुखा । मग कैसा पावसी ॥ ३ ॥

॥ ८९९ ॥

चालावा पंथ तो पाविजे त्या ठाया । ऐकिल्या वांयां वारता त्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐका जी वोजे पडतसे पायां । भावाचि तें जायावाट नव्हे ॥ध्रु॥
व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव । सांगतां तो भाव येत नाहीं ॥२॥
तुका ह्मणे येथें पाहिजे आरालें । बिंबीं निवळलें तरि भासे ॥ ३ ॥

॥९००॥

काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जया न फळे उपदेश । धस ऐसा त्या नांवें ॥ ध्रु ॥
काय नाहीं असत जड । दगड तो अबोलणा ॥ २ ॥
तुका ह्मणे कुचर दाणा । तैसा ह्मणा डेंग हा ॥ ३ ॥

॥ ९०१ ॥

देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्या ऐसी केवीं गारगोटी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मर्यादा ते जाणं अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ॥ ध्रु ॥

---

१ दे. भांमावलीं.—२ पं. मिती—३ त. पं. आइकिल्या.—४ पं. बिंब.—५ जाणा.६— पं. जाणें.

काय पडिलेंसी लटिक्याचे भरी । वोंवाळुनि थोरी परती सांडीं ॥ २ ॥
तुका ह्मणे पुढें दिसतसे घात । करितों फजित ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ १०२ ॥

संसाराचा[1] माथां भार । कांहीं पर न ठेवीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥ ध्रु ॥
भिक्षा आणि वेवसाव[2] । काला करितो गाढव ॥ २ ॥
करुनि वस्ती बाजारीं । ह्मणवी[3] कासया निस्पृही ॥ ३ ॥
प्रसादा आडुनि कवी । केलें तुप पाणी तेवीं[4] ॥ ४ ॥
तुका ह्मणे होईं शूर[5] । किंवा निसुर मजुर ॥ ५ ॥

॥ १०३ ॥

तेज्या इशारती । तटा फोकें[6] वरी घेती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय सांगावें त्याहुनी । ऐका रे धरा मनीं ॥ ध्रु ॥
नव्हे भांडखोर । ओढूनि धरूं पदर ॥ २ ॥
तुका ह्मणे तोंड । काळें करा खालीं मुंड ॥ ३ ॥

॥ १०४

मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आचारभ्रष्ट होतीं[7] लोक कळीं । पुण्य क्षीण बळी जालें पाप॥ध्रु॥
वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ २ ॥
वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥ ३ ॥
तुका ह्मणे किती करावे फजित । ते चि छंद नित्य बहु होती ॥ ४ ॥

---

१ पं. संसाराच्या.—२ दे. भिक्षाणी वेवसाव ।—३ पं. कैसा ह्मणवी निस्पृही ।—४ त. पं. जेवीं.—५ दे. सुर.—६ पं. फोकावरी.—७ त. “होती लोक” याच्याबद्दल “लोक होती.”

॥ १०५ ॥

अक्षरांचा श्रम केला । फळा आला तेणें तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघियाचा तळ धरी । जीवा उरी नुरउनी ॥ ध्रु ॥
फेळलें तें लेव भारें । पिक खेरें आलें तई ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । पुढें भाव सारावा ॥ ३ ॥

॥ १०६ ॥

उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्तशुद्ध बुद्धी ठायीं स्थीर ॥ १ ॥
न घलावी धांव मनाचिये ओढी । वचन आवडी संताचिये ॥ २ ॥
अंतरीं या रोंह वचनाचा विश्वास । न लगे उपदेश तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १०७ ॥

जीवन हें मुक्त नर जाले पावन । तजा हो दुर्जनसंगति ही ॥ १ ॥
बहुत अन्न विष मोहरीच्या मानें । अवघें चि तेणें विष होय ॥ २ ॥
तुका ह्मणे जेणें आपुलें स्वहित । तेंसी करीं नीत विचारूनि ॥ ३ ॥

॥ १०८ ॥

द्रव्याचा तो आह्मां धरितों विटाळ । नया पाठीं काळ लाग करी ॥ १ ॥
करोनियां हें चि राहिलों जीवन । एक नारायण नाम ऐसें ॥ २ ॥
तुका ह्मणे हें चि करूनि जतन । आलिया हीं दान याचकासी ॥ ३ ॥

१०९

द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग । ह्मणोनियां संग खोटा त्याचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ निरयाचें मूळ घालुनियां मागें । मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥ ध्रु ॥

१ त. कळा.—२ त. भरलें.—३ पं. वरें.—४ त. पं. तुका ह्मणे हागे देव ।—५ पं. घालावी.—
६ पं. त्यजावे. त. तजा हे.—७ त. राहिलें.

आजिच्या प्रसंगें हा चि लाभ घ्यावा । पुढील भार देवावरी घाला ॥ २ ॥
प्रालब्ध कांहीं न पालटे सोसें । तृष्णेचें हें पिसें वांयांविण ॥ ३ ॥
तुका ह्मणे घेई राहे ऐसें धन । सादर श्रवण करोनियां ॥ ४ ॥

॥ ९१० ॥

रंडे अळंकार दैन्याचिये कांती । उतमा विपत्तिसंगे घडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एकाविण एक अशोभ्य दातारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ ध्रु. ॥
रांधूं नेणे तया पुढील आइतें । केलें तें सोइतें वांयां जाय ॥ २ ॥
तुका ह्मणे चिंतामाणि शेळी गळा । पावे अवकळा ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ ९११ ॥

दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥ ध्रु. ॥
भोग कळों येतो मागिल ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥ २ ॥
तुका ह्मणे येथें झांकितील डोळे । भोग देतेवेळे येइल कळों ॥ ३ ॥

॥ ९१२ ॥

सदैव तुह्मां अवघें आहे । हातपाय चालाया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मुखीं वाणी कानीं कीर्ति । डोळे मूर्ती देखाया ॥ ध्रु. ॥
अंध बहिर ठकलीं किती । मुकीं होती पांगुळें ॥ २ ॥

---

१ दे. याच्यावर "विधवेचे संगती" असा पाठ घातला आहे.–२त. संगें.–३ दे. अशोभ.

घरास आगि लावुनि जागा । न पळे तो[१] गा वांचे ना ॥ ३ ॥
तुका ह्मणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ॥ ४ ॥

॥ ९१३ ॥

ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणउनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडी ॥ ध्रु ॥
संचित प्रारब्ध गाढें । भोंवे पुढें क्रियमाण ॥ २ ॥
तुका ह्मणे घुवडा ऐसें । जन्म सरिसें शुकराचें ॥ ३ ॥

॥ ९१४ ॥

सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडे[२] एक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संसाराची मज न साहे चि वार्ता । आणीक ह्मणतां माझें कोणी ॥ ध्रु ॥
देहसुख कांहीं बोलिले उपचार । विष तें आदर बंद[३] वाटे ॥ २ ॥
उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासावीस ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं आणीक न साहे । आवडती पाय वैष्णवांचे ॥ ४ ॥

॥ ९१५ ॥

आणीक कांहीं या उत्तराचें काज । नाहीं आतां मज बोलावया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भिन्न भेद हे भावनास्वभाव । नव्हे कांहीं देव एकविध ॥ ध्रु ॥
गुण दोष कोणें निवडावे धर्म । कोण जाणे कर्म अकर्म तें ॥ २ ॥
तरि च भलें आतां न करावा संग । दुःखांचा[४] प्रसंग तोडावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे गुण गाईं या देवाचे । घेईं माझे वाचे हे चि धणी ॥ ४ ॥

॥ ९१६ ॥

आपुल्या विचार करीन जीवाशीं । काय या जनाशीं चाड मज ॥ १ ॥

---

१ पं. ते.—२ पं. निवडूं.—३ पं. बंध.—४ पं. दुःखाचे.

॥ध्रु.॥ आपुलें स्वहित जाणती सकळें[1] । निरोधितां बळें दुःख वाटे ॥ध्रु॥
आइको नाइको कथा कोणी तरी । जाऊनियां घरीं निजो सुखें ॥ २ ॥
माझी कोण वोज जाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लावूं॥ ३ ॥
तुका ह्मणे भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे ॥ ४ ॥

॥ ९१७ ॥

धाई अंतरिंच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विधिनिषेध उर फोडी । जंव नाहीं अनुभवगोडी ॥ ध्रु ॥
वादे तळमळ उभयता । नाहीं देखिलें अनुभवितां ॥ २ ॥
अपुल्या मतें पिसें । परि तें आहे जैसेंतैसें ॥ ३ ॥
साधनाची सिद्धि । मौनें[2] करा स्थिर बुद्धि ॥ ४ ॥
तुका ह्मणे वादें । वांयां गेलीं ब्रंह्मवृंदें ॥ ५ ॥

॥ ९१८ ॥

कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कैसी ठकलीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥ ध्रु ॥
भुस उपणुनि[3] केलें काय । हारपले दोन्ही ठाय ॥ २ ॥
तुका ह्मणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां[4] ॥ ३ ॥

॥ ९१९ ॥

संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥ध्रु॥
करितों कवतुक बोबडा उत्तरीं ॥ ह्मणी मजवरि कोप धरा ॥ २ ॥

---

१ दे. सकळ.–२ त. मौन्य. दे. “ मोन ” असतां तें खोडून “ मन ” केलें आहे.–३ पं. उफणुनि –४ पं. दे. गुसाळितां.

काय माझी याति नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥३॥
तुका ह्मणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तो चि जाणे ॥ ४ ॥

॥ ९२० ॥

चंदनाच्या वासें धरितील नाकें[1] । नावडे कनक न घडे हें ॥ १ ॥
साकरेची गोडी सारखी[2] सकळां । थोरां मोट्यां बाळां धाकुटियां ॥२॥
तुका ह्मणे माझें चित्त शुद्ध होतें । तरि का निंदितें जन मज ॥ ३ ॥

॥ ९२१ ॥

तुज ऐसा[3] कोण उदाराची राशी । आपुलें चि देसी पद दासा ॥ १ ॥
शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥ २॥
भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं । अभक्तांच्या[4] परी नावडती ॥ ३ ॥
न वजासी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगियांच्या ॥४॥
तुका ह्मणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥ ५ ॥

॥ ९२२ ॥

तरि कां नेणते होते मागें ऋषी । तींहीं या जनासी दुराविलें ॥ १ ॥
वोळगती जया अष्ट[5] महासिद्धी । न या जनबुद्धी नातळती ॥ २ ॥
कंदमूळें पाला भातूच्या पोपणा । खोतील[6] वास राणां तरी केला ॥३॥
लावुनियां नेत्र उगे चि बैसले । न बोलत ठेले मौन्य[7]मुद्रे ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐसें करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ॥ ५ ॥

॥ ९२३ ॥

कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देइल धीर माझ्या जीवा ॥१॥

---

१ त. दे. नाकें.–२ त दे. सारिखी.–३ त. पं. ऐसी.–४ त. दे. अभक्तांची परी नावडेती.
५ दे. अष्टमासिद्ध.–६ पं. खाती.–७ त. मौन्यरूप.

शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥ २ ॥
कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां[1] ॥ ३ ॥
मज हा संदेह झाला दोहीं सवा । भजन करूं देवा किंवा नको ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां दुराविता जन । किंवा हें मरण भलें दोन्ही ॥ ५ ॥

॥ १२४ ॥

काय उणें जालें तुज समर्थासी । ऐसा मजपाशीं कोण दोष ॥ १ ॥
जो तूं माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमधीं ॥ २ ॥
तुजविण रत आणिकांचे ठायीं । ऐसें कोण ग्वाही[2] दावीं मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय धरूनी गुमान । सांग उगवून पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १२५ ॥

काय करूं आन दैवतें । एका विण पंढरीनाथें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सरिता मिळाली सागरीं । आणिकां[3] नांवां कैची उरी ॥
अनेक दीपीचा प्रकाश । सूर्य उगवतां नाश ॥ २ ॥
तुका ह्मणे नेणें दुजें । एका विण पंढरीराजें ॥ ३ ॥

॥ १२६ ॥

काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ होसी नामा च सारिखा[4] । समजाविली नाहीं लेखा ॥ ध्रु ॥
नाहीं वेचावेच जाला । उरला आहेसी संचला ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें । काय होईल तुह्मां ओझें ॥ ३ ॥

---

१ त. गातां तुझें.–२ दे. “ ग्वाही ” याचें “ गोही ” केलें आहे.–३ पं. आन.–४ दे. त. सारिका.

॥ १२७ ॥

एकाएकीं हातोफळी । ठाया बळी पावले तें* ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मी देवा शक्तिहीनें[1] । भाकूं तेणें करुणा ॥ ध्रु ॥
पावटणी केला काळ । जया बळ होतें तें ॥ २ ॥
तुका ह्मणे वीर्यावीर । संतधीर समुद्र ॥ ३ ॥

॥ १२८ ॥

पुढिलाचें इच्छी फळ । नाहीं बळ तें अंगीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संत गेले तया ठाया । देवराया पाववीं ॥ ध्रु ॥
ज्येष्ठांचीं कां आह्मां जोडी । परवडी न लभों ॥ २ ॥
तुका ह्मणे करीं कोड । पुरवीं लाड आमुचा ॥ ३ ॥

॥ १२९ ॥

कैवल्याच्या तुह्मां घरीं । रासी हरी उदंडें[2] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मजसाटीं कां जी वाणी । नव्हे[3] धणी विभागा ॥ ध्रु ॥
सर्वां गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनी ॥ २ ॥
तुका ह्मणे पांडुरंगा । जालों सांगा सन्मुख ॥ ३ ॥

॥ १३० ॥

आपलाल्या तुह्मी रूपासी समजा । कासया[4] वरजा आरसिया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें तों नव्हे देहबुद्धीचें कारण । होइल नारायणें दान केलें ॥ ध्रु ॥
बब्रूचिया बाणें वर्मासि स्पर्शावें । हें तों नाहीं ठावें मोकलित्या ॥ २ ॥
तुका ह्मणे बहु मुखें[5] या वचना । सत्याविण जाणा चाल नाहीं ॥ ३ ॥

---

१ त. पं शक्तिहीणें.–२ पं. उदंडा.–३ पं. नहों.–४ पं. कासीया.–५पं. मुख. *पं. हा शब्द नाहीं.

॥९३१॥

न मनावी चिंता तुह्मीं संतजनीं । हिरा स्फटिकमणी केंवि होय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पडिला प्रसंग स्थळा[1] त्या सारिखा । देखिला पारिखा भाव कांहीं ॥ ध्रु ॥
बहुतांसी भय एकाचिया दंडें । बहुते[2] या तोंडें वचनासी ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं वैखरी बा सर । करायाचे चार वेंडे वेडे ॥ ३ ॥

॥ ९३२ ॥

यथाविधि पूजा करीं । सामोग्री[3] तोंवरि हे नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां माझा सर्व भार । तूं दातार चालविसी ॥ ध्रु ॥
मंगळ तें तुह्मीं[4] जाणां । नारायणा काय तें ॥ २ ॥
तुका ह्मणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ॥ ३ ॥

॥ ९३३ ॥

भवसिंधूचें हें तारूं । मज विचारूं पाहातां ॥ १ ॥
॥ ध्रु. चित्तीं तुझे धरिन पाय । सुख काय तें तेथें ॥ ध्रु ॥
माझ्या खुणा मनापाशीं । तें या रसीं बुडोलें[5] ॥ २ ॥
तुका ह्मणे वर्म आलें । हातां भलें हें[6] माझ्या ॥ ३ ॥

॥ ९३४ ॥

पाहातां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक न वजे माझी ॥ १ ॥
॥ ध्रु. जिव्हे गोडी तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥ ध्रु ॥
श्रवणींची वाट चोखाळलीशुद्ध । गेले भेदाभेद वारोनियां[7] ॥ २ ॥

---

१ दे. स्तळा.—२ पं. बहुता.—३ पं. सामुग्री.— ४ पं. आह्मी जाणों.— ५ पं. बुडालों.—
६ पं. हें चि.—७ पं. निवारूनि.

महामळें मन होतें जें गांदलें । शुद्ध चोखाळलें स्पटिक जैसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ४ ॥

॥ ९३५ ॥

हा चि परमानंद आळंगीन बाहीं । क्षेम देतां ठायीं द्वैत तुटे ॥ १ ॥
॥धृ.॥ बोलायासि मात मन निवे हर्षे[1] चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख[2] ॥धृ॥
जनांत भूषण वैकुंठीं सरतां[3] । फावलें स्वहिता सर्वभावें ॥ २ ॥
तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥ ३ ॥
तुका ह्मणे[4] हा विठ्ठल चि व्हावा । आणिकी[5] या जीवा चाड नाहीं ॥ ४ ॥

॥ ९३६ ॥

आमुची कृपाळू तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥ १ ॥
॥ धृ. ॥ प्रेमपान्हा स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टि हे निर्मळ अमृताची ॥धृ॥
भूक तान दुःख वारीं नेदीं सीण । अंतरींचा गुण जाणोनियां ॥ २ ॥
आशा तृष्णा माया चिंता दवडीं दुरी । ठाव आह्मां करीं खेळावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे लावीं संताचा सांगात । जेथें न पवे हात कळिकाळाचा ॥ ४ ॥

॥ ९३७ ॥

जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेषें[6] संतसंगें ॥ १ ॥
॥ धृ. ॥ पूर्व पुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतरायमूळ[7] नुपजे तेथें ॥धृ॥
भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतांपायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे हे चि करावी मिरासी । बळी संतांपाशीं द्यावा जीव ॥ ३ ॥

---

१ दे. हरुषें. त. हर्षें. पं. हर्ष.—२ पं. प्रेमसुखें.—३ सरतां ?—४ पं. ह्मणे तो हा.—५ पं. आणीक.—६ त. पं. विशेष संतसंगें.—७ त. पं. अंतरायें मूळ.

॥ १३८ ॥

आतां कांहीं सोस न करीं आणीक । धरीन तें एक हें चि दृढ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जेणें भवसिंधु उतरिजे पार । तुटे[1] हा दुस्तर गर्भवास ॥ ध्रु ॥
जोडीन ते आतां देवाचे चरण । अविनाश धन परमार्थ ॥ २ ॥
तुका ह्मणे बरा जोडला हा देह । मनुष्यपणें[2] इहलोका आलों ॥ ३ ॥

॥ १३९ ॥

जतन करीन जीवें । शुद्धभावें करूनी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठ्ठल विठ्ठल हें धन । जीवन[3] अंतकाळींचें ॥ ध्रु ॥
वदळ[4] हें संचित सारूं । बरवा करूं उदिम हा ॥ २ ॥
तुका ह्मणे त्दृदयपेटी । ये संपुटीं सांटवूं ॥ ३ ॥

॥ १४० ॥

एवढा प्रभु भावें । तेणें संपुष्टीं राहावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥ ध्रु ॥
एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥ २ ॥
आला नांवा रूपा । तुका ह्मणे जाला सोपा ॥ ३ ॥

॥ १४१ ॥

भाग्यें ऐसी जाली जोडी । आतां घडी विसंभेनों[5] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विटेवरि समचरण । संतीं खुण सांगितली ॥ ध्रु ॥
अवघें आतां काम सारूं । हा चि करूं कैवाड ॥ २ ॥
तुका ह्मणे खंडूं खेपा । पुढें पापापुण्याच्या ॥ ३ ॥

---

१ पं. पुढें.– २ त. पं. मनुष्यपणा.– ३ त. अंत जीवन काळींचें.– ४ पं. वरदळ.– ५ त. विसंवेना. पं. विसंवों.

॥ १४२ ॥

पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आह्मां नारायण तैशापरी ॥ १ ॥
सर्वभावें लोभ्या आवडे हें धन । आह्मां नारायण तैशापरी ॥ २ ॥
तुका ह्मणे एकाविध जालें मन । विठ्ठला वांचून नेणे दुजें ॥ ३ ॥

॥ १४३ ॥

विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा । विठ्ठल उभा पाहावा विटेवरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अनाथाचा बंधु विठ्ठल कृपासिंधु । तोडी भवबंधु यमपाश ॥ ध्रु ॥
तो चि शरणागतां हा विठ्ठल मुक्तिदाता । विठ्ठल या संतांसमागमें ॥ २ ॥
विठ्ठल गुणनिधि विठ्ठल सर्व सिद्धि । लागली समाधि विठ्ठलनामें ॥ ३ ॥
विठ्ठलाचें नाम घेतां जालें सुख । गोडावलें मुख तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १४४ ॥

विठो सांपडावया हातीं । ठायीं जाली एकें गती ।
न धरीं भय चित्तीं । बळ कितीं तयाचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लागे आपण चि हातीं । किव भाकावी काकुलती ।
करी मग चित्तीं । असेल तें तयाचें ॥ ध्रु ॥
एकालिया भावबळें । कैं सांपडे तो काळें ।
वैष्णवांच्या मेळें । उभा ठाके हाकेसी ॥ २ ॥
बांधा माझिया जीवासी । तुका ह्मणे प्रेमपाशीं ।
न सोडीं तयासी । सर्वस्वासी उदार ॥ ३ ॥

१ पं. तयापरी.—२ पं. एकी.—३ पं. तयाचें. दे. त. तयाचें.

॥ १४५ ॥

वाट वैकुंठीं पाहाती । भक्त कैं पां येथें येती ।
तयां जन्ममरणखंती । नाहीं चित्तीं परलोक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्यधन्य हरिचे दास । तयां सुलभ गर्भवास ।
ब्रह्मादिक करिती आस । तीर्थावास[1] भेटीची ॥ ध्रु ॥
कथाश्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस ।
पाहे रात्रदिवस । वाट कर जोडोनियां ॥ २ ॥
रिद्धिसिद्धी न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्तां ॥
मोक्षसा[2]गुज्यता । वाट पाहे भक्तांची ॥ ३ ॥
असती जेथें उभे ठेले । सदा प्रेमसुखें धाले ।
आणीक ही उद्धरिले । महादोषी चांडाळ ॥ ४ ॥
सकळ करिती त्यांची आस । सर्वभावें ते उदास ।
धन्यभाग्य त्यांस । तुका ह्मणे दरुषणें ॥ ५ ॥

॥ १४६ ॥

सोनें दावी वरी तांबें तयापोटीं । खरियाचे साटीं विकूं पाहे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पारखी तो जाणे तयाचे जीवींचें । निवडी दोहींचें वेगळालें ॥ ध्रु ॥
क्षिरा नीरा कैसें होय एकपण । स्वां[3]दी तो चि भिन्न भिन्न काढी ॥ २ ॥
तुका ह्मणे थीता नां[4]गवला चि खोटा । अपमान मोटा पा[5]वईल ॥ ३ ॥

॥ १४७ ॥

फोडुनि सांगडी बांधली माजासी । पैल थडी कैसी पा[6]वे सहजीं ॥ १ ॥

---

१ त. तीर्थां आस.–२ दे. त. पं. सायोज्यता.–३ दे. स्वादीं.–४ पं. आपण.–५ पं. पाववील. ६ पं. पावेल.

॥ ध्रु. ॥ आपला घात आपण चि करी । आणिकां सांगतां नाइके तरी॥ध्रु॥
भुकेमेणें विष घेऊं पाहे आतां । आपल्या चि घाता करूं पाहे ॥ २ ॥
तुका ह्मणे एक चालतील पुढें । तयांसी वांकडें जातां ठके ॥ ३ ॥

॥ १४८ ॥

उपकारासाटीं बोलों हे उपाय । येणेंविण काय आह्मां चाड ॥ १ ॥
बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा ह्मणउनि ॥ २ ॥
तुका ह्मणे माझे देखतील डोळे । भोग देते वेळे येईल कळों ॥ ३ ॥

॥ १४९ ॥

आठवे देव तो करावा उपाव । येर तजीं वाव खटपटा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ होई वा जागा होई बा जागा । वाउगा कां गा सिणसील ॥ ध्रु ॥
जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं । बुडसी तों कांहीं निघेसि ना ॥ २ ॥
तुका ह्मणे दया पावसील भावें । जागतां तें ठावें कांहीं नव्हे ॥ ३ ॥

॥ १५० ॥

माझ्या मुखावाटा नेयो हें वचन । व्हावें हें संतान द्रव्य कोणां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ फुकाचा विभाग पतनदुःखासी । दोहींमुळें त्यासी तें चि सोसे ॥ध्रु॥
नाईकावी निंदा स्तुति माझ्या कानें । सादर या मनें होऊनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे देव असाध्य यामुळें । आशामोहजाळें गुंतलिया ॥ ३ ॥

॥ १५१ ॥

चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित तें ठायीं आपणापें ॥१॥
॥ ध्रु. ॥ मनासी विचार तो चि साच भाव । व्यापक हा देव अंतर्बाहीं॥ध्रु॥

---

१ पं. आणीक.—२ दे. त. देऊं.—३ आपला चि घाता. त. आपला चि घात.—४पं. बोलतों हे.—५ त. चाड आह्मां.—६ पं. देखवे हे डोळां.—७ पं. खटपट.—८ पं. कां सिणसील.—९ पं. कहीं.—१० पं. नये.—११ पं. मुखाचा.—१२ पं. साध्य.—१३ त. आइकावी.—१४ पं. व्यापला.

शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिके ठायीं ॥२॥
भोगित्यासी काज अंतरीचें गोड । बाहिरल्या चाड नाहीं रंगें ॥ ३ ॥
तुका ह्मणे भाव[1] शुद्ध हें कारण । भाट नारायण होईल त्यांचा ॥ ४ ॥

॥ १५२ ॥

न्व्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कांहीं न धरावी खंती । हित होइल धरा चित्तीं ॥ ध्रु ॥
खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगतां ॥ २ ॥
ज्याचें तो चि जाणे । मी मापाडें तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १५३ ॥

वासनेच्या मुखीं अदळूनि भीतें । निर्वाहापुरतें कारण तें ॥ १ ॥
॥ध्रु.॥ या नांवें अंतरा आला नारायण । चित्तसमाधान खुण त्याची ॥ध्रु॥
सर्वकाळ हा चि करणें विचार । विवेकीं सादर आत्मत्वाचे ॥ २ ॥
तुका ह्मणे जों जों भजनासी वेळे[2] । अंगें[3] तों तों कळे सन्निधता ॥३॥

॥ १५४ ॥

चिंतनें अचिंत राहिलों निश्चळ । तें चि किती काळ वाढवावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अबोल्याचा काळ आतां ऐशावरी[4] । वचनाची उरी उरली नाहीं ॥ ध्रु ॥
करूं* आला तों तों केला लवलाहो । उरों च संदेहो[5] दिला नाहीं ॥२॥
तुका ह्मणे मोह परते चि ना मागें । ह्मणउनि त्यागें त्याग जाला ॥ ३ ॥

॥ १५५ ॥

निर्गुणाचे[6] घ्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥ १ ॥

---

१ पं. शुद्ध भाव–. २ त. पं. वोळे.–३ पं. आगें.–४ पं. ऐशापरी.–५ दे. संदेहे.–
६ पं. निर्गुणासी. * पं. हें कडवें नाहीं.

॥धु.॥ तुह्मां आह्मां आतां न पडे यावरी । आहों तें चि बरी जेथें तेथें ॥धृ॥
आपणापासुनी नसावें अंतर । वेचिलें उत्तर ह्मणउनि ॥ २ ॥
तुका ह्मणे अंगा आली कठिणता[1] । आमच्या अनंता तुह्मां ऐसी ॥ ३ ॥

॥ १५६ ॥

तुज च पासाव जालोंसों[2] निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ॥ १ ॥
॥ धु. ॥ पाहावा जी ठायीं करूनि विचार । न्यून[3] कोठें फार असे चि ना ॥ धृ ॥
ठेविलिये ठायीं आज्ञेचें पाळण । करूनि जतन राहिलोंसें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां बोलतसें स्पष्ट । जालों क्रियानष्ट तुह्मांऐसा ॥ ३ ॥

॥ १५७ ॥

प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा । भक्तिरस सांगा कां जी तुह्मीं ॥ १ ॥
॥धु.॥ ह्मणऊनि कांहीं न ठेवीं चि उरी । आलों वर्मावरी एकाएकीं ॥धृ॥
न देखों चि कांहीं परती[4] माघारी । उरली ते उरी नाहीं मुळीं ॥ २॥
तुका ह्मणे आला अंतरासी[5] खंड । तरि माझें तोंड खवळिलें ॥ ३ ॥

॥ १५८ ॥

लटिका[6] ऐसा ह्मणतां देव । संदेहसा वाटतसे ॥ १ ॥
॥ धु. ॥ ऐसें आलें अनुभवा । मज ही सेवा करितां ॥ धृ ॥
शून्याकारी बहु मोळा । भेंडोळा हे पवाडे ॥ २ ॥
तुका ह्मणे ताळी नाहीं । एके ठायीं चपळत्वें ॥ ३ ॥

॥ १५९ ॥

जैशासाटीं तैसें हावें । हें बरवें कळलेंसे ॥ १ ॥

---

१ दे. त. कठिन्यता.--२ त. पं. जालोंसे.—३ दे. त. नुन्य. पं. न्युन्य.—४ पं. परतों.—५ त. अंतरा.—६ पं. लटिका देव ह्मणतां ऐसा

॥ ध्रु. ॥ उदास[1] तूं नारायणा । मी ही ह्मणा तुह्मी च ॥ ध्रु ॥
ठका मेहाठक[2] जोडा । जो धडफुडा लागासी ॥ २ ॥
एकांगी च भांडे तुका । नाहीं धोका जीवित्वें ॥ ३ ॥

॥ ९६० ॥

बहुतां रीती काकुलती । आलों चित्तीं न धरा च ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां काशासाटीं देवा । मिथ्या हेवा वाढवूं ॥ ध्रु ॥
तुह्मां आह्मां जाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥ २ ॥
तुका ह्मणे लाजिरवाणें । अधीर[3] जिणें इच्छेचें ॥ ३ ॥

॥ ९६१ ॥

आश्चर्य तें एक जालें । मना आलें माझिया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मढ्यापाशीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥ ध्रु. ॥
न यावा तो कैसा राग । खोटें मग देखोनि ॥ २ ॥
तुका ह्मणे कैंचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥ ३ ॥

॥ ९६२ ॥

मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लटाकियाची न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनि ॥ ध्रु ॥
हिशोबें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥ २ ॥
तुका ह्मणे स्वामिसेवा । येथें देवा काशाची ॥ ३ ॥

॥ ९६३ ॥

पाठवणें[4] पडणें पायां । उद्धार वांयां काशाचा ॥ १ ॥

---

१. पं. उदार.—२ पं. महाठका.—३ दे. त. आधर.—४ पं. पाटवणें.

॥ ध्रु. ॥ घडलें तें भेटीसवें । दिसेल बरवें सकळां ॥ ध्रु ॥
न घडतां दृष्टादृष्टी । काय गोष्टी कोरड्या ॥ २ ॥
अबोल्यानें असे तुका । अंतर ऐका साक्षीनें ॥ ३ ॥

॥ १६४ ॥

अभयाचें स्थळ । तें हें एक अचळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरि धरिला विश्वास । ठेलों होऊनियां दास ॥ ध्रु ॥
पुरली आवडी । पायीं लागलीसे गोडी ॥ २ ॥
तुका ह्मणे कंठीं नाम । अंगीं भरलेंसे प्रेम ॥ ३ ॥

॥ १६५ ॥

संदेह निरसे तरि रुचिकर । फिक्यासी आदर चवी नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां नको मज खोट्यानें फटवूं । कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥ ध्रु ॥
गेला तरि काय जीवाचें सांकडें । वांचऊनि पुढें काय काज ॥ २ ॥
तुका ह्मणे करीं निवडा जो बरें । केलीं तैसीं पोरें आळीपायीं ॥ ३ ॥

॥ १६६ ॥

वेदे वाणी परि दुर्लभ अनुभव । चालीचा चि वाहो बहुतेक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मी ऐसें कैसें राहावें निश्चळ । पाठिलागा काळ जिंतितसे ॥ ध्रु ॥
वाढवितां पोट दंभाचे पसार । येतील माघारे मुदला तोटे ॥ २ ॥
तुका ह्मणे बरें जागवितां मना । तुमच्या नारायणा अभयें करें ॥ ३

१ पं. एका.–२ दे. भरलें सप्रेम.–३ पं. अनुभवो.–४ दे. पाटिलाग.–५ त. अभयंकरें.

॥ १६७ ॥

उगें चि हें मन राहातें निश्चळ ॥ तरि कां तळमळ सोंट होती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय तुमचीं नेणों कवतुक विंदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥ध्रु॥
नानाछंदें आह्मां नाचवावें जीवां । वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी आपुली प्रतिष्ठा । वाढवावया चेष्टा करीतसां ॥ ३ ॥

॥ १६८ ॥

आह्मी वळकट जालों फिराउनी । तुमच्या वचनीं तुह्मां गोऊं ॥ १ ॥
॥ ध्रु॰ ॥ जालें तेव्हां जालें मागिल तें मागें । आतां वर्मलागें ठावीं जालीं ॥ ध्रु ॥
तोडावया अवघ्या चेष्टांचा संबंध । शुद्धापाशीं शुद्ध बुद्ध व्हावें ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मां आत्मत्वाची सोय । आपण चि होय तैसा चि तूं ॥३॥

॥ १६९ ॥

तुह्मी साच नुपेक्षाल हा भरवसा । मज जाणतसां अधीरसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कासया घातला लांबणी उद्धार । ठेवा करकर वारूनियां ॥ध्रु॥
सुटों नये ऐसें कळलें निरुतें । कां घ्यावें मागुतें आळवूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी सभाग्य जी देवा । माझा तुह्मां केवा काय आला ॥३॥

॥ १७० ॥

तुह्मां होईल देवा पडिला विसर । आह्मीं तें उत्तर यत्न केलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पतितपावन ब्रीदें मिरविसी । याचा काय देसी झाडा सांग ॥ ध्रु ॥

१ त. साठ.—२ पं. आत्मत्वीं.—३ पं. यत्नें.

आहाच मी नव्हें अर्थाचें भुकेलें । भलत्या एका बोलें वारेन त्या ॥२॥
तुका ह्मणे देह देईन सांडणें । सहित अभिमानें ओवाळूनि ॥ ३ ॥

॥ ९७१ ॥

जडलों अंगाअंगीं । मग ठेवीं प्रसंगीं ।
कांहीं उरीजोगी । लोकीं आहे पुरती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ठेवीं निवारूनि आधीं । अवकाश तो चि बुद्धी ।
सांपडली[1] संधी । मग बळ कोणासी ॥ ध्रु ॥
गळा बांधेन पायीं । हालों नेदीं ठायिचा ठायीं ।
निवाड तो तई । अवकळा केलिया ॥ २ ॥
तुका ह्मणे ठावे । तुह्मी[2] असा जी बरवे ।
बोभाटाची सवे । मुळींहुनी विठोबा ॥ ३ ॥

॥ ९७२ ॥

आह्मी शक्तिहीनें । कैसें कराल तें नेणें ।
लिगाडाच्या गुणें । खोळंबला राहिलों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें मज देई देवा । असे[3] ठेविला तो ठेवा ।
नाहीं करीत हेवा । कांहीं अधीक आगळा ॥ ध्रु ॥
नाहीं गळां पडलों झोंड । तुमचें तें चि माझें तोंड ।
चौघां चार खंड । लांबणी हे अनुचित ॥ २ ॥
नाहीं येत बळा । आतां तुह्मासी गोपाळा ।
तुका ह्मणे गळा । उगवा पायां[4] लागतों ॥ ३ ॥

---

१ पं. सांपडलों.—२ पं आह्मां.—३ पं. असेल तो ठेविला ठेवा.—४ त. पं पायीं.

॥ १७३ ॥

काय कृपेविण घालावें सांकडें । निश्चिती निवाडे कोण्या एका ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मीं तैसीं पुढें असों दीनपणें । वेचूनि वचनें करुणेचीं ॥ ध्रु ॥
धेरूं भय आतां काय वाहों चिंता । काय करूं आतां आप्तपणें ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी भावहीन जीव । ह्मणउनी देव दुर दुरी ॥ ३ ॥

॥ १७४ ॥

नाहीं उल्लंघिलें कोणाचें वचन । मज कां नारायण दुरी जाला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अशंकितें मनें करीं आळवण । नाहीं समाधान निश्चितीचें ॥ ध्रु ॥
दासांचा विसर हें तों अनुचित । असे सर्व नीत पायांपाशीं ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मां लाज येत नाहीं । आह्मां चिंताडोहीं बुडवितां ॥ ३ ॥

॥ १७५ ॥

जीव जायवरी सांडी करी माता । हे तों आश्चर्यता बाळकाची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून जालें ॥ध्रु॥
क्षणक्षणा माझा नें घ्यावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं वचनासी रुचि । फळ कटवें चि तें तें होय ॥ ३ ॥

॥ १७६ ॥

ह्मणउनी दास नव्हे ऐसा जालों । अनुभवें बोलों स्वामीपुढें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें । मी च माझ्या वेचें अट्टाहासें ॥ ध्रु ॥
कासयानें गोडी उपजावा विश्वास । प्रीती कांहीं रस वांचुनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे अगा चतुरा शिरोमणी । विचारावें मनीं केशीराजा ॥ ३ ॥

१ पं. धरूनि.—२ पं. आप्तपणें.—३ पं. आशंकित मनें. दे. शंकितमनें.—४ पं. असो.—
५ दे. ने घावा.—६— पं. वचनाची.—७ पं. अट्टाहसें त. आटाहासें.

॥ १७७ ॥

काय आतां आह्मीं पोट चि भरावें । जग चाळवावें भक्त ह्मूण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसा तरि एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासावीस ॥ध्रु॥

काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची ॥ २ ॥

तुका ह्मणे काय [1]गुंपोनि दुकाना । राहों नारायणा करूनी घात ॥ ३ ॥

॥ १७८ ॥

वर्म तरि आह्मां दावा । काय देवा जाणें मी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ बहुतां रंगीं हीन जालों । तरि आलों शरण ॥ ध्रु ॥

द्याल जरि तुह्मी धीर । होईल स्थिर मन ठायीं ॥ २ ॥

तुका ह्मणे सत्ताबळें । लडिवाळें राखावीं ॥ ३ ॥

॥ १७९ ॥

[2]सांगों काय नेणा देवा । बोलाची त्या आवडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वांयां मज चुकुर करा । विश्वंभरा विनोदें ॥ ध्रु ॥

आवडीच्या करा ऐसें । अंतर्वासें जाणतसां ॥ २ ॥

तुका ह्मणे समाधानें । होइन मनें मोकळा ॥ ३ ॥

॥ १८० ॥

निर्धाराचें अवघें गोड । वाटे कोड कौतुक ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ बैसलिया भाव पांयीं । बरा तईं नाचेन ॥ ध्रु ॥

स्वामी कळे सावधान । तरि मन उल्हासे ॥ २ ॥

तुका ह्मणे आश्वासावें । प्रेम द्यावें [3]विठ्ठले ॥ ३ ॥

---

१ पं. गुफोनि.—२ पं. सांगों देवा नेणा काय । बोलाचिये आवडी ॥ ३ त. विठ्ठलें.

॥ ९८१ ॥

जाली तडातोडी । अवघीं पडिलों[1] उघडीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नव्हों कोणांची च कांहीं । तुझे भरलिया वाहीं ॥ ध्रु ॥

पारुषेला[2] संवसार । मोडली बैसण्याची थार ॥ २ ॥

आतां ह्मणे तुका । देवा अंतरें राखों नका ॥ ३ ॥

॥ ९८२ ॥

आधार तो व्हावा । ऐसी आस करीं देवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुह्मांपाशीं काय उणें । काय वेचे समाधानें ॥ ध्रु ॥

सेवेच्या अभिलाषें[3] । मन बहु जालें पिसें ॥ २ ॥

अरे भक्तपराधीना । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

॥ ९८३ ॥

तुमचा तुह्मीं[4] केला गोवा । आतां चुकवितां देवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कैसें सरे चाळवणें । केलें काशाला शाहाणें ॥ ध्रु ॥

कासया[5] रूपा । नांवा आलेति गा बापा ॥ २ ॥

तुका ह्मणे आतां । न सरे हवाले घालितां ॥ ३ ॥

॥ ९८४ ॥

माझी भक्ती भोळी । एकाविध भाववळी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मी कां पडेन निराळा । ऐसा सांडूनि सोहळा ॥ ध्रु ॥

आतां अनारिसा । येथें न व्हावें सहसा ॥ २ ॥

तुका ह्मणे जोडुनि पाय । पुढें उगा उभा राहें ॥ ३ ॥

---

१ पं. पडिलीं.—२ दे. पारुशला.—३ दे. अभिळासें.—४ पं. आह्मी.—५पं. कासया हो रूपा

॥ ९८५ ॥

आहे तरि सत्ता । ऐशा करितों वारता ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अंगसंगाचीं उत्तरें । सलगीसेवेनें लेंकरें ॥ छ ॥

तरी निकटवासें । असों आशंकेच्या[1] नासें ॥ २ ॥

तुका ह्मणे रुची । येथें भिन्नता कैची ॥ ३ ॥

॥ ९८६ ॥

काळ सारावा चिंतनें । एकांतवासीं गंगास्नानें ।

देवाचें पूजन । प्रदक्षणा तुळसीच्या[2] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ युक्त आहार विहार[3] । नेम इंद्रियांचा[4] सार ।

नसावी बासर । निद्रा बहु भाषण ॥ छ ॥

परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण ।

व्हावया[5] जतन । हे उपाय लाभाचे ॥ २ ॥

देह समर्पिजे देवा । भार कांहीं च न घ्यावा ।

होईल आघवा । तुका ह्मणे आनंद ॥ ३ ॥

॥ ९८७ ॥

मऊ मेणाहून[6] आह्मी विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मेले जित असों निजोनियां[7] जागे । जो[8] जो जें जें मागे तें तें देऊं ॥ छ ॥

भले तरि देऊं गांडीची लंगोटी । नाठ्याळा[9] चि गांठी देऊं माथां ॥ २ ॥

मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनि ॥ ३ ॥

अमृत तें काय गोड आह्मांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ४ ॥

---

१ दे. पं. अशंकेच्या.—२ पं. तुळसीची.—३ दे. वेहार. त. वेंव्हार.—४ पं. इंद्रियासीसार.—५ त. क[illegible]वया.—६ दे. मेनाहूनि.७ त. निजेलिया.—८ दे. त. जो जो जो: जें मागे.—९ त. नाठ्याळाचा. पं. नाटाळाचे काटी.

तुका ह्मणे आह्मी अवघे चि गोड । ज्याचें पुरे कोड त्याचेपरि ॥ ५ ॥

॥ १८८ ॥

गाढवाचें तानें । पालटलें क्षणक्षणें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तैसे अधमाचे गुण । एकविध नाहीं मन ॥ छ ॥

उपजतां बरें दिसे । रूप वाढतां तें नासे ॥ २ ॥

तुका ह्मणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥ ३ ॥

॥ १८९ ॥

विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुंनि[1] जो दुरी तो सोंवळा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ गेदें पद्यें[2] कांहीं न धरावी उपाधी । स्वाधीन चि बुद्धि करूनी ठेवा ॥ छ ॥

विचाराचें कांहीं करावें स्वहित । पांपपुण्यांचीत[3] भांडवल ॥ २ ॥

तुका ह्मणे न लगे जावें वनांतरा । विश्व विश्वंभरा सारिखें चि ॥ ३ ॥

॥ १९० ॥

कल्पतरु स्या नव्हती बाभुळा । पुरविती फळा इंच्छितिया[4] ॥ १ ॥

उदंड त्या गाई ह्मैसी आणि शेळया । परि त्या निराळया कामधेनु ॥ २ ॥

तुका ह्मणे देव दाखवील दृष्टी । तया सर्वें भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

॥ १९१ ॥

जळो प्रेमा तैसा रंग । जाय उडोनि[5] पतंग ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सामूसाटीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ छ ॥

मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥ २ ॥

जैसी वृंदावनकांती । उत्तम धरूं[6] नये हातीं ॥ ३ ॥

१ पं. येथूनि दुरी तो सोवळा.—२ पं. गद्य पद्य.—३ त. पापपुण्याचींव पं. पापपुण्याति.—४ पं. इच्छी तया.—५ दे. भुलोनि.—६ दे. धरूं ये हातीं.

बक ध्यान धरी । सोंग करूनि मासे मारी ॥ ४ ॥
तुका ह्मणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ॥ ५ ॥

॥ ९९२ ॥

वेशा नाहीं बोल अवगुण दूषीले । ऐशा बोला भले झणें क्षोभा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोण नेणे अन्न जीवाचें जीवन । विषमेळवण विष होय ॥ ध्रु. ॥
सोनें शुद्ध नेणे कोण हा विचार । डांकें हीनवर केलें त्यासी ॥ २ ॥
याती शुद्ध परि अधम लक्षण । वांयां गेलें तेणें सोंगें ही तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे शूर तो चि पावे मान । आणीक मंडण भार वाही ॥ ४ ॥

॥ ९९३ ॥

अणुरणीयां थोकडा । तुका आकाशाएवढा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गिळुनि सांडिलें कळिवर । भव भ्रमाचा आकार ॥ ध्रु. ॥
सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां । उरलों उपकारापुरता ॥ ३ ॥

॥ ९९४ ॥

धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ॥ ध्रु. ॥
जालें समाधान । पायीं विसांवलें मन ॥ २ ॥
तुका ह्मणे आले घरा । तो चि दिवाळीदसरा ॥ ३ ॥

॥ ९९५ ॥

हें चि माझें धन । तुमचे वंदावे चरण ॥ १ ॥

---

१ पं. धरूनि.—२ पं. झणी.—३ पं. हीणवर.—४ पं. सोंगहीत.—५ पं. अणुरेणुया.—६ पं. कलीवर.

॥ ध्रु. ॥ येणें भाग्यें असों जीत । एवढें समर्पूनी चित्त ॥ ध्रु ॥
सांभाळिलें देवा । मज अनाथा जी जीवा ॥ २ ॥
जोडूनियां कर । तुका विनवितो किंकर ॥ ३ ॥

॥ ११६ ॥

फजितखोरा मना किती तुज सांगों ।
नको कोणा लागों मागें मागें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ स्नेहवादें दुःख जडलेंसे[1] अंगीं ।
निष्ठुर हें जगीं प्रेमसुख ॥ ध्रु ॥
निंदास्तुति कोणी करो दयामाया[2] ।
न[3] धरीं चाड या सुखदुःखें ॥ २ ॥
योगिराज कां रे न राहाती बैसोनी ।
एकिये आसनीं या चि गुणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मना पाहें विचारून ।
होई रे कठिण वज्राऐसें[4] ॥ ४ ॥

॥ ११७ ॥

जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं ।
आवडी हे विधि । निषेधीं चि चांगली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तूं स्वामी मी सेवक । उंचे[5] पद निंच एक ।
ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥ ध्रु ॥
जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा ।

१ पं. जडलें हें आंगीं.—२ दे. त. दयामया.—३ पं. न धरीं चाड वया सुखदुःखें.
४ त. पं. वज्राऐसा.—५ पं. उंचनिच पद एक.

भोक्ता निराळा । तेणें गोडी निवडिली ॥ २ ॥
हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवे सोनें ।
एक असतां तेणें । काय दुजें जाणावें ॥ ३ ॥
उष्णें छाय सुख वाटे । बाळें मात पान्हा फुटे ।
एका एक भेटे । कोण सुख ते काळीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे हित । हें चि मानी माझें चित्त ।
नव्हे आतां मुक्त । ऐसा जाला भरवसा ॥ ५ ॥

॥ ११८ ॥

मनीं वसे त्याचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जातीचें तें झुरे[1] येर येरासाटीं । वियोगें[2] हीं तुटी नेघे कधीं ॥ ध्रु. ॥
भेटीची अपेक्षा वारता आदर[3] । पुसे नव्हे धीर मागुताले ॥ २ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । सोइरे हरिजन प्राणसखे ॥ ३ ॥

॥ ११९ ॥

नव्हे आरागूक परि मनीं वाहे । होईल त्या साहे[4] पांडुरंग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पंढरीसि जावें उद्वेगें[5] मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ॥ ध्रु. ॥
नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाकों नको ॥ २ ॥
तुका ह्मणे देह पडो या चिंतनें । पुढें[6] लागे येणें याजसाटीं ॥ ३ ॥

---

१ पं. झुरे येरा०.–२ पं हे.–३ दे. त. वरता आदर.–४ पं. साह्य.–५ दे. उदेग. त. उद्येग.–६ पं. पुढतीलागे०.

॥ १००० ॥

कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतें[1] दीन होतों तरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ साधन ते सेवा संतांची उत्तम । आवडीनें नाम गाईन तें[2] ॥ ध्रु ॥
न पुसतें कोणी कोठें ही असतां । समाधान चित्ताचिया सुखें ॥ २ ॥
तुका ह्मणे जन अव्हेरितें मज । तरी केशीराज सांभाळिता ॥ ३ ॥

॥ १००१ ॥

चतुर मी जालों आपुल्या भोंवता । भावेंविण रिता फुंजें[3] अंगीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां पुढें वांयां जावें हें तें काई । कामक्रोधें ठायीं वास केला ॥ ध्रु ॥
गुणदोष आले जगाचे अंतरा । भूताच्या मत्सरावरी बुद्धि ॥ २ ॥
तुका ह्मणे करूं उपदेश लोकां । नाहीं जालों एकां[4] परता दोषा ॥ ३ ॥

॥ १००२ ॥

धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येथें उपकारासाठीं । आले घर ज्यां वैकुंठीं[5] ॥ ध्रु ॥
लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥ २ ॥
मधुरा वाणी ओटीं । तुका ह्मणे वाव पोटीं ॥ ३ ॥

॥ १००३ ॥

[6]कुंटल्याविण नव्हे मांडा । अळसें धोंडा पडतसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राग नको धरूं मनीं । गांडमणी[7] सांगतों ॥ ध्रु ॥
तरटापुढें बरें नाचे । सुतकाचें मुसळ ॥ २ ॥

---

१ पं. होतों.–२ पं. गाईजेतें.–३ पं. स्फुंद.–४ पं. एका दोषा परता.–५ दे. वैकठीं.–६ पं. कांडिल्या कुटिल्या होतो मांडा ।.–७ त. गांडमनी.

तुका ह्मणे कांठी सार । करी फार शाहाणें ॥ ३ ॥

॥ १००४ ॥

कळों येतें तरि कां नव्हे । पडती गोवे भ्रमाचे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाणतां चि होतो घात । परिसा मेत देवा हें ॥ ध्रु ॥
आंविसासाटीं फासा मान । पाडी धनइच्छा ते ॥ २ ॥
तुका ह्मणे होणार खोटें । कर्म मोटें बळिवंत ॥ ३ ॥

॥ १००५ ॥

मोकळें मन रसाळ वाणी । या चि गुणीं संपन्न ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लक्ष्मी ते ऐशा नावें । भाग्यें ज्यावें तरि त्यांनीं ॥ ध्रु ॥
नमन नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ॥ २ ॥
तुका ह्मणे त्याच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥ ३ ॥

॥ १००६ ॥

शेवटीची विनवणी । संतजनीं परिसावी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विसर तो न पडावा । माझा देवा तुह्मांसी ॥ ध्रु ॥
पुढें फार बोलों काई । अवघें पायीं विदित ॥ २ ॥
तुका ह्मणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ॥ ३ ॥

॥ १००७ ॥

करितों कवित्व ह्मणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥ ध्रु ॥
काय मी पामर जाणे अर्थभेद । वदवी गोविंद तें चि वदें ॥ २ ॥

१ पं. काटी सार.—२ पं. मात देवा हे.—३ "आमिषासाटीं" असें असावें.

निमित्त मासामी बैसविलों आहें । मी तों कांहीं नव्हे स्वामिसत्ता ॥ ३
तुका ह्मणे आहे पाईक चि खरा । वागविंतों मुद्रा नामाची हे ॥ ४

॥ १००८ ॥

आह्मीं गावें तुह्मीं कोणी कांहीं न ह्मणावें ।
ऐसें तंव आह्मां सांगितलें नाहीं देवें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणा रामराम टाळी वाजवा हातें ।
नाचा डोला प्रेमें आपुलिया स्वहितें ॥ ध्रु ॥
सहज घडे तया आळस करणें तें काई ।
अर्भाचें भातुकें हात पोळितां कां पायीं ॥ २ ॥
येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक ।
हांसे तया घडे ब्रह्महत्यापातक ॥ ३ ॥
जया जैसा भाव निरोपण करावा ।
येथें नाहीं चाड ताळविताळ या देवा ॥ ४ ॥
सदैव ज्यां कथा काळ घडे श्रवण ।
तुका ह्मणे येर जन्मा आले पाषाण ॥ ५ ॥

॥ १००९ ॥

देव घ्या कोणी देव घ्या कोणी । आइता आला घर पुसोनी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव न लगे देव न लगे । सांटवणेचे रुपले जागे ॥ ध्रु ॥
देव मंदला देव मंदला । भाव बुडाला काय करूं ॥ २ ॥
देव घ्या फुका देव घ्या फुका । न लगे रुका मोल कांहीं ॥ ३ ॥

१ त. पं. निमित्यें.—२ पं. ना नाचा.—३ त. पोळितां.—४ पं. सांटवणाचे.

दुबळा तुका भावेंविणें । उधारा देव घेतला रुणें ॥४ ॥

॥ १०१० ॥

विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वाहावे भार माथां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ साधनें संकटें सर्वांलागीं सीण । व्हावा लागे क्षीण अहंमान ॥ध्रु॥

भाव हा कठीण वज्र हें भेदवे । परि न छेदवे मायाजाळ ॥ २ ॥

तुका ह्मणे वर्म भजनें चि सांपडे । येरांसी तों पडे ओस दिशा ॥ ३ ॥

॥ १०११ ॥

कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कोणी व्हा रे अधिकारी । त्यासी हरि देईल ॥ ध्रु ॥

वैराग्याचे बळें । साही खळ जिणावे ॥ २ ॥

उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥ ३ ॥

॥ १०१२ ॥

कायावाचामन ठेविलें गाहाण । घेतलें तुझें रिण जोडीलागीं ॥ १ ॥

॥ध्रु.॥ अवघें आलें आंत पोटा पडिलें थीतें । सारूनि निश्चितें जालों देवा ॥ध्रु॥

द्यावयासी आतां नाहीं तोळा मासा । आधील मवेशा तुज ठावी ॥ २ ॥

तुझ्या रिणें गेले बहुत बांधोन । जाले मजहून थोरथोर ॥ ३ ॥

तुका ह्मणे तुझे खतीं जें गुंतलें । करूनि आपुलें घेई देवा ॥ ४ ॥

## धुर्वक-अभंग २८.

॥ १०१३ ॥

करिसी कीं न करिसी माझा अंगीकार । हा मज विचार पडिला देवा ॥ १ ॥

॥ ध्रु.॥ देसी कीं न देसी पायांचें दर्शन । ह्मणऊनि मन स्थिर नाहीं ॥ध्रु॥

---

१ पं. भावहीन.–२ त. अहंभाव.–३ त. मायाजाळा.–४ त. बळ.–५ पं. निश्चीत.

बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा । ह्मणोनियां जिवा भय वाटे ॥ २ ॥
होईल कीं[1] न होय तुज माझा आठव । पडिला संदेह हा चि मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी[2] तों कमाईचें हीण । ह्मणऊनि सीण करीं देवा ॥ ४ ॥

॥ १०१४ ॥

ऐसा माझा कोण आहे भीडभार । नांवाचा मी फार वांयां गेलों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय सेवा रुजु आहे सत्ताबळ । तें मज राउळ कृपा करी ॥ ध्रु ॥
काय याती शुद्ध आहे कुळ कर्म । तेणें पडे वर्म तुझे ठायीं ॥ २ ॥
कोण तपोनिध दानधर्मसीळ । अंगीं एक बळ आहे सत्ता ॥ ३ ॥
तुका ह्मणे वांयां जालों भूमी भार । होईल विचार काय नेणों ॥ ४ ॥

॥ १०१५ ॥

साच मज काय कळों नये देवा । काय[3] तुझी सेवा कोंय नव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करावें तें बरें जेणें[4] समाधान । सेवावें हें वन न बोलावें[5] ॥ ध्रु ॥
शुद्ध माझा भाव होइल तुझे पायीं । तरि च हें देईं निवडूनि ॥ २ ॥
उचित अनुचित कळों आली गोष्टी । तुझे कृपादृष्टी पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज पायांसवें चाड । सांगसी तें गोड आहे मज ॥ ४ ॥

॥ १०१६ ॥

नाहीं कांटाळलों परि वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जन वन आह्मां समान चि जालें । कामक्रोध गेले[6] पावटणी ॥ ध्रु ॥
षडऊर्मी शत्रु जिंतिले[7] अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥ २ ॥

---

१ पं. कीं नव्हे तुज०.–२ दे. मी कमाईचें. पं. कमाईचा.–३ दे. त. काहे.–४ त. जनसमाधान.–५ पं. बोलवें.–६ पं. केले.–७ पं. जिंकिले.

मुख्य धर्म आह्मां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसा पाळावें तें ॥ ३ ॥

ह्मणऊनि तुका अवलोकुनी पाय । वचनाची पाहे वास एका ॥ ४ ॥

॥ १०१७ ॥

वांयांविण वाढविला हा लौकिक । आणिला लटिक वाद दोघां ॥ १ ॥

॥ धु. ॥ नाहीं ऐसा जाला देव माझ्या मतें । भुकेलें जेवितें काय जाणे ॥ छ ॥

शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी । साच तें अंतरीं बिंबे चि ना ॥ २ ॥

जालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥ ३ ॥

तुका ह्मणे मागें कळों येतें ऐसें । न घेतों हें पिसें लावूनियां ॥ ४ ॥

॥ १०१८ ॥

न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मती । परि ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥ १ ॥

॥ धु. ॥ आगमाचे भेद मी तों[1] काय जाणें । काळ तो चिंतनें सारीतसें ॥ छ ॥

कांहीं नेणें परि ह्मणवितों दास । होइल त्याचा त्यास अभिमान ॥ २ ॥

संसाराची सोय सांडिला मारग । दुराविलें जग एका घायें ॥ ३ ॥

मागिल्या लागाचें केलेंसे खंडण । एकाएकीं मन राखियेलें ॥ ४ ॥

तुका ह्मणे अगा रखुमादेवीवरा[2] । भक्तकरुणाकरा[3] सांभाळावें ॥ ५ ॥

॥ १०१९ ॥

इतुलें करीं देवा ऐकें हें वचन । समूळ अभिमान जाळीं माझा ॥ १ ॥

१ द. मी काय०. त. मी तें काय०.—२ पं. रुक्मादेवीवरा.—३ पं. आतां करुणाकरा.

॥ ध्रु. ॥ इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी । सर्व समदृष्टी तुज देखें ॥ध्रु॥
इतुलें करीं देवा विनवितों तुज । संतांचे[1] चरणरज वंदीं माथां ॥ २ ॥
इतुलें करीं देवा ऐकें हे मात । त्हृदयीं पंढरीनाथ दिवसेरात्रीं[2] ॥ ३ ॥
भलतिया भावें तारीं पंढरीनाथा । तुका ह्मणे आतां शरण आलों ॥ ४ ॥

॥ १०२० ॥

तुझा दास ऐसा ह्मणती लोकपाळ । ह्मणऊनि सांभाळ करीं माझा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अनाथाचा नाथ पतितपावन । हें आतां जतन करीं नाम ॥ ध्रु ॥
माझे गुण दोष पाहातां न लगे[3] अंत । ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥ २ ॥
नेणें तुझी कैसी करावी हे[4] सेवा । जाणसी तूं देवा अंतरींचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तूं या[5] कृपेचा सिंधु । तोडीं भवबंधु माझा देवा ॥ ४ ॥

॥ १०२१ ॥

जाणावें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हें चि सार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हें चि सार ॥ ध्रु ॥
बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हें चि सार ॥ २ ॥
जावें तें कोठें न[6] जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होती पापें आमुच्या मतें[7] ॥ ४ ॥

॥ १०२२ ॥

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥ १ ॥
ध्रु० ॥ दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवीन[8] चरणांवरी माथा ॥ ध्रु ॥
पाहोनि श्रीमुख देइन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥ २ ॥

---

१ पं. संतचरणरज०.—२ पं. दिवसराती.—३ पं. कळे.—४ पं. ते.—५ पं तू कृपेचा०.—६ दे. न वजावें आतां.—७ पं. मतीं.—८ पं. ठेवूंदे.

पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥ ३ ॥
तुका ह्मणे यासी न लावीं उशीर ॥ माझें अभ्यंतर जाणोनियां ॥ ४ ॥

॥ १०२३ ॥

मागें शरणागत तारिले बहुत । ह्मणती दीनानाथ तुज देवा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ पाहिले अपराध नाहीं याती कुळ। तारिला अजामेळ गणिका भिल्ली ॥ ध्रु ॥
अढळपदीं बाळ बैसविला धुरु । क्षीराचा सागरु उप[1]मन्या ॥ २ ॥
गजेंद्रपशु नो[2]डियें जळचरें । भवसिंधुपार उतरिला ॥ ३ ॥
प्रल्हाद अग्नींत राखिला ज[3]ळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥ ४ ॥
पांडवां संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ ५ ॥
तुका ह्मणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनियां मात शरण आलों ॥ ६ ॥

॥ १०२४ ॥

तुझा शरणागत जालों मी अंकित । करीं माझें हित पांडुरंगा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पतितपावन तुझी ब्रीदावळी । ते आतां सांभाळीं मायबापा ॥ध्रु॥
अनाथाचा नाथ [4]बोलतील संत । ऐकोनियां मात विश्वासलों ॥ २ ॥
न करावी निरास न धरावें उदास । देईं याचकास कृपादान ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी तों पातकांची रासी । देईं पायापासीं ठाव देवा ॥ ४ ॥

॥ १०२५ ॥

सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा । न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ सत्यवादी [5]करी संसार सकळ । [6]अलिप्त कमळ जळीं [7]जैसें ॥ ध्रु ॥
घडे ज्या उपकार [8]भूतांची ते दया । आत्मस्थिति तया अंगीं वसे ॥ २ ॥

---

१ दे. त. उपमन्ये.—२ पं. नाडिला.—३ त. पं. जळत.—४ पं. बोलसी ते.—५ पं. करितां.—६ पं. अलिप्त तो जळकमळ जैसा.—७ त. तैसें—८ त. भूताची हे दया. दे. भूतांची दया.

नो [1]बोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनि तो जनीं जनार्दन ॥ ३ ॥
तुका ह्मणे वर्म जाणितल्याविण । पावे करितां सीण सांडीमांडी ॥ ४ ॥

॥ १०२६ ॥

कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्में निधान हातीं चढे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ [2]कुळधर्म भक्ति कुळधर्म गति । कुळधर्म विश्रांति पाववील ॥ ध्रु॥
[3]कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनाचें ॥ २ ॥
[4]कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरीं होय ॥ ४ ॥

॥ १०२७ ॥

पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणीक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सत्य तो चि धर्म असत्य तें कर्म । आणीक हें वर्म नाहीं दुजें ॥ ध्रु॥
गति ते चि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण [5]विन्मुखता ॥ २ ॥
संतांचा [6]संग तो चि स्वर्गवास । नर्क तो उदास [7]अनर्गळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥ ४ ॥

॥ १०२८ ॥

न वजे वांयां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वांयां न वजे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न वजे वांयां कांहीं देवळासी जातां । देवासी पूजितां वांयां न वजे ॥ ध्रु॥
न वजे वांयां कांहीं [8]केलिया तीर्थ । अथवा कां [9]व्रत वांयां न वजे ॥ २ ॥
न वजे वांयां जालें संतांचें दर्शन । शुद्ध आचरण वायां न वजे ॥ ३ ॥
तुका ह्मणे भाव असतां नसतां । सायास करितां वांयां न वजे ॥ ४ ॥

---

१ पं. न. त. ना.—२ त. पं. कुळधर्में भक्ति कुळधर्में गति.—३ त. पं. कुळधर्में दया कुळधर्में उपकार.—४ त. पं. कुळधर्में महत्व कुळधर्में मान.—५ दे. त. विन्मुखते.—६ त. सांगात.—७ पं. अनर्गळ.—८ पं. केलियाही तीर्थे. त. केलिया तीर्थें.—९ त. व्रतें.

॥ १०२९ ॥

चित्तीं धरीन मी पाउलें सकुमार । सकळ बिढार संपत्तीचें ॥ १ ॥

॥धु.॥ कंठीं धरिन *मी नाम अमृताची वल्ली। होईल राहिली शीतळ तनु ॥ध्रु॥

पाहेन श्रीमुख साजिरें सुंदर । सकळां अगर लावण्यांचें ॥ २ ॥

करिन अंगसंग बाळकाचे परी । बैसेन तों वरी नुतरीं कडिये ॥ ३ ॥

तुका ह्मणे हा केला तैसा होय । धरिली मनें सोय विठोबाची ॥ ४ ॥

॥ १०३० ॥

बाळ मातेपाशीं सांगे तानभूक । उपायाचें दुःख काय जाणे ॥ १ ॥ धु०॥

तयापरी करीं पाळण हें माझें । घेउनियां ओझें सकळ भार ॥ ध्रु ॥

कासया गुणदोष आणिसील मना । सर्व नारायणा अपराधी ॥ २ ॥

सेवाहीन दीन पातकांची रासी । आतां विचारिसी काय ऐसें ॥ ३ ॥

जेणें काळें पायीं अनुसरलें चित्त । निर्धार हें हित जालें ऐसें ॥ ४ ॥

तुका ह्मणे तुह्मी तारिलें बहुतां । माझी कांहीं चिंता असों दे वो ॥ ५ ॥

॥ १०३१ ॥

जीवनावांचूनि तळमळी मासा । प्रकार हा तैसा होतो जीवा ॥ १ ॥

॥ धु० ॥ न संपडे जालें भूमिगत धन । चरफडी मन तयापरी ॥ ध्रु ॥

मातेचा वियोग जालिया हो बाळा । तो कळवळा जाणा देवा ॥ २ ॥

सांगावे ते किती तुह्मांसी प्रकार । सकळांचें सार पाय दावीं ॥ ३ ॥

ये चि चिंते माझा करपला भीतर । कां नेणों विसर पडिला माझा ॥ ४ ॥

तुका ह्मणे तूं हें जाणसी सकळ । यावरि कृपाळ होईं देवा ॥ ५ ॥

---

१ दे. त. सकुमारें.—२ पं. नुतरे. त. नुतरें.—३ पं. अनुसलें.—४ असों द्यावी.—५ पं. जाहालिया बाळा । होतो कळवळा.—६ पं. देवा.— * पं. "मी" हा शब्द नाहीं.

॥ १०३२ ॥

शरण आलें त्यासी न दावीं हे पाठी । ऐका जगजेठी विज्ञापना ॥ १ ॥
॥ध्रु.॥ अळविती तयांसी उत्तर अढंकारी । त्याचें परिसा हरी विज्ञापना ॥छ॥
गांजिलियाचें करावें धांवणें । विनंती नारायणें परिसावी हे ॥ २ ॥
भागलियाचा होईं रे विसांवा । परिसावी केशवा विज्ञापना ॥ ३ ॥
अंकिताचा भार वागवावा माथां । परिसावी अनंता विज्ञापना ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मां निमरावें ना देवा । परिसावी हे देवा विज्ञापना ॥ ५

॥ १०३३ ॥

कोण आह्मां पुसे सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोणापाशीं आह्मीं सांगावें सुखदुःख । कोण तानभूक निवारील ॥ छ ॥
कोण या तापाचा करील परिहार । उतरील पार कोण दुजा ॥ २ ॥
कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील ॥ ३ ॥
कोणावरी आह्मीं करावी हे सत्ता । होईल साहाता कोण दुजा ॥ ४ ॥
तुका ह्मणे अगा स्वामी सर्व जाणा । दंडवत चरणां तुमच्या देवा ॥५॥

॥ १०३४ ॥

तेव्हां चाले पोट बैसलों पंगती । आतां आह्मां मुक्तिपांग काई ॥१॥
॥ ध्रु. ॥ धांवा केला आतां येईं वो भोजन । येथें काई कारणें न लगे संदेह ॥ छ ॥

१ पं. शरण आल्या त्यासी ने दावी पाठी. त. न दावी.— २ पं. देवा — ३ पं. परिसावी केशवा. — ४ पं. सांगों.— ५ पं. तान्हान.— ६ भार — ७ दे. [illegible] भावंग । तथा कांही करणें लागे सख्या ॥ त. तथा काई करणें लागे संदेह ॥.

गायनाचा आतां कोठें उरला काळ । आनंदें सकळ भरी आलें ॥२॥
देवाच्या सख्यत्वें विषमासी ठाव । मध्यें कोठें वाव राहों सके ॥ ३ ॥
तेव्हां जाली अवघी बाधा वाताहात । प्रेम हृदयांत प्रवेशलें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मीं जिंतिलें भरवसा । देव कोठें दासा मोकलितो ॥५॥

॥ १०३५ ॥

तरि कां पवाडे गर्जती पुराणें । असता नारायण शक्तिहीन ॥ १ ॥
॥ धु. ॥ कीर्तीविण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वाणीत ना ॥ ध्रु ॥
तरि च ह्मणा तो आहे चिरंजीव । केलियाचा जीव सुखीं गुण ॥ २ ॥
चांगलेंपण हें निरूपमता अंगीं । वाणलें श्रीरंगीं ह्मणऊनि ॥ ३ ॥
तरि च हा थोर सांगितलें करी । अभिमान हरीपाशीं नाहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे तरि करितों याची सेवा । देवापाशीं हेवा नाहीं कुडें ॥५॥

॥ १०३६ ॥

अविट हें क्षीर हरिकथा माउली । सेविती सेविली वैष्णवजनीं ॥ १ ॥
॥ धु. ॥ अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥धृ॥
पतित पातकी पावनपंगती । चतुर्भुज होती देवाऐसे ॥ २ ॥
सर्व सुखें तया मोहोरली ठाया । जेथें दाटणी या वैष्णवांची ॥ ३ ॥
निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत । धरूनियां प्रीत गाये नाचे ॥ ४ ॥
तुका ह्मणे केलीं साधनें गाळणी । सुलभ कीर्तनीं होउनि ठेला ॥ ५ ॥

१ पं आनंद.—२ त दे. निरुपायता.—३ पं सेविता सेविली.—४ पं. मोहरली. त. मोहोरली.—५ त. निर्गुण आकार झाला गुणवंत पं. हें कडवें नाहीं.

॥ १०३७ ॥

संसारसोहळे भोगितां सकळ । भक्तां[1] त्याचें बळ विटोबाचें ॥ १ ॥
॥ध्रु.॥ भय चिंता[2] धाक न मनिती मनीं । भक्तां चक्रपाणि सांभाळीत ॥ध्रु॥
पापपुण्य त्यांचें धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्वभावें ॥ २ ॥
नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव भक्तां[3] भार सर्व वाहे ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव भक्तां वेळाईत । भक्त ते[4] निश्चित त्याचियानें ॥ ४ ॥

॥ १०३८ ॥

देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥ ध्रु. ॥
देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥ २ ॥
एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तो चि देव देव भक्त ॥ ४ ॥

॥ १०३९ ॥

हुंबरती गाये तयांकडे कान । कैवल्यनिधान देउनि ठाके ॥ १ ॥
॥ध्रु.॥ गोपाळांची पूजा उच्छिष्ट कवळी । तेणें वनमाळी सुखावला ॥ध्रु॥
चोरोनियां खाये दुध दहीं लोंणी । भावें चक्रपाणि गोविला तो ॥ २ ॥
निष्काम तो जाला कामासी लंपट । गोपिकांची वाट पाहात बैसे ॥ ३ ॥
जगदानी इच्छी तुळसीएकदळ । भावाचा सकळ विकिला तो ॥ ४ ॥
तुका ह्मणे हें चि चैतन्य[5] सावळें । व्यापुनि निराळें राहिलेंसे ॥ ५ ॥

---

१ त. भक्तांसी तें बळ विटोबाचें.–२ त. चित्तीं.–३ त्यांचा.–४ त. हे निश्चीत.–५ दे. चैतन्यें.

॥ १०४० ॥

समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सर्व[1] सिद्ध घरीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आदराचे ठायीं बहु च आदर । मागितलें फार तेथें[2] वाढी ॥ध्रु॥

न ह्मणे सोइरा सुत्हृद[3] आवश्यक । राजा आणि रंक सांरिखा[4] चि ॥ २ ॥

भाव देखे तेथें करी लंडबड[5] । जडा राखे जड निराळें चि ॥ ३ ॥

कोणीं[6] न विसंभे याचकाचा ठाव । विनवुनी देव शंका फेडी ॥ ४ ॥

तुका ह्मणे पोट भरूनी उरवी । धालें[7] ऐसें दावी अनुभवें[8] ॥ ५ ॥

॥ १०४१ ॥

आलें भरा केणें । येरझार[9] चुके जेणें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ उभें केलें विटेवरी । पेंठ इनाम पंढरी ॥ ध्रु ॥

वाहाती मारग । अवघें मोहोरलें जग ॥ २ ॥

तुका ह्मणे माप । खरें आणा माझे बाप ॥ ३ ॥

॥ १०४२ ॥

लक्ष्मीवल्लभा । दिनानाथा पद्मनाभा ॥ १ ॥

॥ ध्रु० ॥ सुख वसे तुझे पायीं । मज ठेवीं ते[10] चि ठायीं ॥ ध्रु ॥

माझी अल्प* हे वासना । तूं तो उदाराचा राणा ॥ २ ॥

तुका ह्मणे भोगें । पीडा केली धांव वेगें ॥ ३ ॥

॥ १०४३ ॥

करीं ऐसें जागें । वेळोवेळां पायां लागें ॥ १ ॥

॥ ध्रु० ॥ प्रेम झोंबो[11] कंठीं । देह धरणिये लोटीं ॥ ध्रु ॥

---

१ पं.—सिद्ध सर्व.— २ पं. तें तें.— ३ सुत्हृद सोईरा. दे. सुहृर्द.— ४ पं. सारिखे ची.— ५ त. बडबड.—६ पं. कोणा.— ७ त. पं. आलें.— ८ त. अनुभव. पं. अनुभवा.— ९ दे. पं. वेरझार.—१० पं. "ते चि" याबद्दल "तये."—११ पं. झोंबे.—* पं. "अल्प" शब्द नाहीं.

राहे लोकाचार । पडे अवघा विसर ॥ २ ॥

तुका ह्मणे ध्यावें । तुज व्यंभिचारभावें[1] ॥ ३ ॥

॥ १०४४ ॥

टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे *ते सांगाती ॥ १ ॥

॥ ध्रु० ॥ जाल तरी कोणी जा गा । करा सिदोरी ते वेगा ॥ ध्रु ॥

जाती सादावीत । तेथें असों द्यावें चित्त ॥ २ ॥

तुका ह्मणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥ ३ ॥

॥ १०४५ ॥

वांयां जातों देवा । नेणें भक्ती करूं सेवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां जोडोनियां हात । उभा राहिलों निवांत ॥ ध्रु ॥

करावें तें काय । न कळे अवलोकितों पाय ॥ २ ॥

तुका ह्मणे दान । दिलें पदरीं घेईन ॥ ३ ॥

॥ १०४६ ॥

जीव खादला दैवतें[2] । माझा येणें महाभूतें ।
झोंबलें निरुतें । कांहीं करितां[3] न सुटे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां करूं काय । न चले करितां उपाय ।
तुह्मां आह्मां सये[4] । विघडाविघड[5] केली ॥ ध्रु ॥
बोलतां दुश्चिती । मी वो पडियेलें भ्रांती ।
[6]आठव हा चित्तीं । न ये ह्मणतां मी माझें ॥ २ ॥
भलतें चि चावळे । जना अवघिया वेगळे ।

---

१ त. दे. विभीचारभावें.— २ दे. त. देवत.— ३ पं. केल्या.— ४ दे. सय. पं. सय्य.— ५ पं. विघडाविघडी.—६ पं. "आठवहा" याबद्दल "आठवण."—* दे. "ते" शब्द नाहीं.

नाठवती बाळें । आपपर सारिखें ॥ ३ ॥
नका बोलों सेये[1] । मज वचन न साहे ।
बैसोल[2] त्या राहें । उग्या वाचा खुंटोनी ॥ ४ ॥
तुह्मां आह्मां भेटी । नाहीं जाली जीवेंसाटीं ।
तुका ह्मणे दृष्टी । पाहा जवळी आहे तों ॥ ५ ॥

॥ १०४७ ॥

जीवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मां विठ्ठल एक देव । येर अवघे चि वाव ॥ ध्रु ॥
पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटी ॥ २ ॥
तुका ह्मणे चित्तीं । वाहूं रखुमाईचा पती ॥ ३ ॥

॥ १०४८ ॥

माझें आराधन । पंढरपुरींचें[3] निधान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तया एकां*विण दुजें । कांहीं नेणें पंढरीराजें ॥ ध्रु ॥
दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां । नव्हे पालट सर्वथा ॥ ३ ॥

॥ १०४९ ॥

आतां आह्मां हें चि काम । नें[4] विसंभावें तुझें नाम ।
वाहुनियां टाळी । प्रेमसुखें[5] नाचावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघी जाली आराणूक । मागें पुढें सकळिक ।
त्रिपुटीचें दुःख । प्रारब्ध[6] सारिलें ॥ ध्रु ॥

१ पं. सय्य.–२ पं. बैसल्या.–३ दे. पंढरपुरचें.– ४ पं. वाचे गोऊं तुझें नाम.– ५ पं. "प्रेम सुखें" याबद्दल "सुखें आनंदें."–६ पं. प्रारब्धें. * पं. "एका" शब्द नाहीं.

गोदातटें निर्मळें । देव देवांचीं देवळें ।
संत महंत मेळे । दिवस जाय सुखाचा ॥ २ ॥
तुका ह्मणे पंढरीनाथा । आणिक नाहीं मज चिंता ।
योगक्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥ ३ ॥

॥ १०५० ॥

चोरटें सुनें मारिलें टाळे । कोंडं करी परि न संडी चाळे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें एक दुराचारी गा देवा । आपुलिया जीवा घात करी ॥ध्रु॥
नाक गेलें तरि लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ॥ २ ॥
तुका ह्मणे कर्म बळिवंत गाढें । नेदी तया पुढेंमागें सरों ॥ ३ ॥

॥ १०२१ ॥

मुनि मुक्त जाले भेणें गर्भवासा । आह्मां विष्णुदासां सुलभ तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघा चि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप ह्मणोनियां ॥ध्रु॥
पुराणीं उपदेश साधन उद्धट । औह्मां सोपी वाट वैकुंठींची ॥ २ ॥
तुका ह्मणे जनां सकळांसहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ॥ ३ ॥

॥ १०५२ ॥

न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥ १ ॥
भारें भवनदी नुतरवे पार । दुरावती दूर तुमचे पाय ॥ २ ॥
तुका ह्मणे गर्व पुरवील पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ॥ २ ॥

॥ १०५३ ॥

तुमचिये दासींचा दास करूनि ठेवा । आशीर्वाद द्यावा हा चि मज ॥ १ ॥

---

१ पं. आह्मी.—२ पं. बैसोनि निवांत सुख भोगूं.

नवविधा काय बोलिली जे भक्ती। घ्यावी माझ्या हातीं संतजनीं॥ २ ॥

तुका ह्मणे तुमच्या पायांच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥ ३ ॥

॥१०५४॥

चोर टेंकाचे निघाले चोरी । आपलें तैसें पारखे घरीं[2] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाहीं[3] नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥ध्रु॥

बुद्धिहीन नये[4] कांहीं चि कारणा । तयासवें जाणा तें चि सुख ॥ २ ॥

तुका ह्मणे नाहीं ठाउकें वर्म । तयांसी कर्म वोडवलें ॥ ३ ॥

॥ १०५५ ॥

समर्थाचें बाळ कीविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥ १ ॥

अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ २ ॥

तुका ह्मणे तैसा मी एक पतित । परि[6] मुद्रांकित जालों तुझा ॥ २ ॥

॥ १०५६ ॥

गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । रांखेसवें भेटी केली तेणें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सहज[8] गुण जयांचे देहीं । पालट[10] कांहीं नव्हे तया ॥ ध्रु ॥

माकडाचे[11] गळां मोलाचा मणि । घातला चावुनी टाकी थुंकोनि ॥ २ ॥

तुका ह्मणे खळा नावडे[12] हित । अविद्या वाढवी आपुलें[13] मत ॥ ३ ॥

॥ १०५७ ॥

नेणे सुनें चोर पाहुणा मागता । देखून भलता भुंकतसे ॥ १ ॥

---

१ पं. दावी.—२ पं. धरी.—३ पं. नाहीं कांहीं नफा०.— ४ पं. नव्हे.—५ त. तयासी तें कर्म०.—६ पं. दास.—७ दे. राख तया तेणें केलीसे भेटी.—८ पं. सहज तो गुण०.— ९ त. जयाचा.—१० पं. पालटतो कांहीं०.—११ माकडाचिया गळां मोलाचा तो मणि ॥ घातला चावुनि थुंकुनि टाकी ॥ १२ पं. नावडे तें हित.—१३ पं. मत आपलें तें.

॥ ध्रु. ॥ शिकविलें कांहीं [१]न चले तया । बोलियेले वांयां बोल जाती ॥ध्रु॥

क्षीर ओकुनियां खाय अमंगळ । आपुली ते ढाळ जाऊं नेदी ॥ २ ॥

[२]वंदूं निंदूं काय [३]दुराचार । खळाचा विचार तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १०५८ ॥

जन [४]मानवलें वरी बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं जालों ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणउनी पंढरीनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥ध्रु॥

संतां ब्रह्मरूप जालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ॥ २ ॥

तुका ह्मणे मी तों आपणांसी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥ ३ ॥

॥ १०५९ ॥

काम क्रोध माझे जीताती शरीरीं । कोवळें तें वरी बोलतसें ॥ १ ॥

॥ध्रु.॥ [५]कैसों सरतां जालों तुझ्या पायीं । पांडुरंगा कांहीं न कळे हें ॥ ध्रु ॥

पुराणींची ग्वाही वदतील संत । तैसें नाहीं चित्त शुद्ध जालें ॥ २ ॥

तुका ह्मणे मज आणूनि अनुभवा । दाखवीं हें देवा साच खरें ॥ ३ ॥

॥ १०६० ॥

स्तुति करीं जैसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ॥ १ ॥

॥ध्रु.॥ [६]तुमचें मी दास संतांचें दुर्बळ । करूनि सांभाळ राखा पायीं ॥ ध्रु ॥

रामकृष्णहरि मंत्र उच्चारणा । आवडी चरणां विठोबाच्या ॥ २ ॥

तुका ह्मणे तुमचें सेवितों उच्छिष्ट । क्षमा करीं धीट होऊनियां ॥ ३ ॥

॥ १०६१ ॥

बहु दूरवरी ॥ [७]वेठी ओझें होतें शिरीं ॥ १ ॥

---

१ पं. न चले तें तया.—२ पं. वंदूं निंदूं संतां काय०.—३ त. दुराचारी थोर.—४ दे. त. मानविलें.—५ त. कइसा०. पं. कैसा मी सरता०.—६ पं. तुमचा.—७ पं. वेठी.

॥ ध्रु. ॥ आतां उतरला भार । तुह्मीं केला अंगीकार ॥ ध्रु ॥
बहु काकुलती । आलों मागें किती ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । आजि सफळ जाली सेवा ॥ ३ ॥

## पाईक—अभंग ११.

॥ १०६२ ॥

पाईकपणें जोतिला सिद्धांत । शूर धरी मात वचन चित्तीं ॥ १ ॥
॥ध्रु.॥ पाइकावांचून नव्हे कधीं सुख । प्रजांमध्यें दुःख न सरे पीडा ॥ध्रु॥
तरि व्हावें पाईक जिवांचे उदार । सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ॥ २ ॥
पाइकीचें सुख जयां नाहीं ठावें । धिग त्यांनीं ज्यावें वांयांविण ॥ ३ ॥
तुका ह्मणे एका क्षणांचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥ ४ ॥

॥ १०६३ ॥

पाइकीचें सुख पाइकासी ठावें । ह्मणोनियां जीवें केली सांटी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येतां गोळ्या बाण साहिले भडमार ॥ वर्षतां अपार वृष्टि वरी ॥ध्रु॥
स्वामीपुढें व्हावें पडतां भांडण । मग त्या मंडन शोभा दावी ॥ २ ॥
पाइकांनीं सुख भोगिलें अपार । शुद्ध आणि धीर अंतर्बाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे या सिद्धांताच्या खुणा । जाणे तो शाहाणा करी तो भोगी ॥४॥

॥ १०६४ ॥

पाईक तो जाणे पाइकीचा भाव । लाग वर्म ठाव चोरवाट ॥ १ ॥
॥ध्रु.॥ आपणां राखोनि ठकावें आणीक । घ्यावें सकळीक हरूनियां ॥ध्रु॥
येऊं नेदी लाग लागों नेदी माग । पाईक त्या जग स्वामी मानी ॥२॥

१ पं. आलों असें मागें०.—२ पं. पाईक ह्मणे.—३ दे. सुर. पं. त. शुर.—४ पं. तरीच पाईक.—५ दे. जिवाचा.—६ पं. लाग वग टाव०.

ऐसें जन केलें पाइकें पाइकें । जया कोणी भीक न घलिती ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे जयाचे पाईक । बळिया तो नाईक त्रैलोकींचा[1] ॥ ४ ॥

॥ १०६५ ॥

पाइकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांटा मोडोनियां ॥ १ ॥
॥ध्रु.॥ पारखिये ठायीं घेउनियां खोंगें[2] । आपलें तें जन राखियेलें ॥ ध्रु ॥
आधारेंविण जें बोलतां चावळे । आपलें तें कळे न्हे ऐसें ॥ २ ॥
सांडितां मारग मारिती पाईक । आणिकांसी शीक लागावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे विश्वा घेऊनि विश्वास । पाईक तयास सुख देती ॥ ४ ॥

॥ १०६६ ॥

पाईक तो प्रजा राखोनियां कुळ । पारखिया मूळ छेदी दुष्टा[3] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तो एक पाईक पाइकां नाईक । भाव सकळीक स्वामिकाजीं ॥ ध्रु ॥
तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाइका त्या भिन्न नाहीं स्वामी ॥ २ ॥
विश्वासावांचूनि पाइकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोलिलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे नये स्वामी उणेपण । पाइका जतन करी त्यासी ॥ ४ ॥

॥ १०६७ ॥

धनी ज्या पाइका मानितो आपण । तया भितें जन सकळीक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जिवाचे उदार शोभती पाईक । मिरवती नाईक मुगुटमणि ॥ ध्रु ॥
आपुलिया सत्ता स्वामीचें वैभव । भोगिती गौरव सकळ सुख ॥ २ ॥
कमाइचीं हीणें पडिलीं उदंडें । नाहीं तयां खंड येती जाती ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरि पाइकी च भली । थोडीबहुत केली स्वामिसेवा ॥ ४ ॥

---

१ पं. त्रैलोकींचे.–२ त. खाण.–३ त. पं. दुष्टा.

॥ १०६८ ॥

पाइकपणें[1] खरा मुशारा । पाईक तो खरा पाइकीनें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पाईक[2] जाणे मारितें अंग । पाइकासी भंग नाहीं तया ॥ ध्रु.॥

एकें[3] दोहीं घरीं घेतलें खाणें । पाईक तो पणें निवडला ॥ २ ॥

करूनि कारण[4] स्वामी यश द्यावें । पाइका त्या नांवें[5] खरेपण ॥ ३ ॥

तुका ह्मणे ठाव पाइकां निराळा । नाहीं स्वामी स्थळा गेल्याविण ॥ ४ ॥

॥ १०६९ ॥

उंच निंच कैसी पाइकाची ओळी[6] । कोण गांढे[7] बळी निवडिले ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ स्वामिकार्जी एक सर्वस्वें तत्पर । एक ते कुचर आशाबद्ध[8] ॥ ध्रु.॥

प्रसंगावांचूनि आणिती आविर्भाव[9] । पाईक तो नांव मिरवी वांयां ॥ २ ॥

गणतीचे एक उंच निंच फार । तयांमध्यें शूर विरळा थोडे ॥ ३ ॥

तुका ह्मणे स्वामी जाणे त्यांचा मान । पाईक पाहोन मोल करी ॥ ४ ॥

॥ १०७० ॥

एका च स्वामीचे पाईक सकळ । जैसें[10] बळ तैसें मोल तया ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ स्वामिपदीं एकां ठाव उंच स्थळीं । एकें[11] तीं निराळीं जवळी दुरी ॥ ध्रु.॥

हीन कमाईचा हीन आन ठाव । उंचा सर्व भाव उंच पद ॥ २ ॥

पाइकपणें तो सर्वत्र सरता । चांग तरी परता गांढ्या ठांव[12] ॥ ३ ॥

तुका ह्मणे मरण आहे या सकळां । भेणें अवकळा अभयें मोल ॥ ४ ॥

---

१ पं. पाइकपणें तो खरा०.—२ पं. पाईक तो जाणे०.—३ पं. एक दोही.—४ त. पारण.—५ त. पं. नांव.—६ पं. बोली ( दे. त. वोळी )— ७ त. गाढे.— ८ पं. आशा बहु.—९ दे. त. पं आयुर्भाव.—१० त. पं. जैसें तैसें बळ मोल०.—११ पं. एक ते नि० त. एकें ते नि०.—१२ पं. वाव.

॥ १०७१ ॥

प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाटीं एकें जैशीं तैशीं ॥ १ ॥

॥ध्रु.॥आगळें पाऊल आणिकांसी तरी । पळती माघारीं तोडिजेती ॥ध्रु.॥

पाठीवरी घाय[1] ह्मणती फटमर । धडा अंगें[2] शूर मान पावे ॥ २ ॥

घेईल दरवडा देहा तो पाईक । मारी सकळीक सर्व हरी ॥ ३ ॥

तुका ह्मणे नव्हे बोलाचें कारण । कमाईचा पण सिद्धी पावे ॥ ४ ॥

॥ १०७२ ॥

जातीचा पाईक ओळखे पाइका । आदर तो एका त्याचे ठायीं ॥ १ ॥

॥ध्रु.॥ घरितील पोटासाटीं हतियेरें[3]। कळती तीं खरें[4] वेठीचींसीं[5] ॥ ध्रु ॥

जातीचें[6] तें असे खरें घायडाय । पारखिया काय पाशीं लोपे ॥ २ ॥

तुका ह्मणे नमूं देव म्हूण[7] जना । जालियांच्या खुणा जाणतसों ॥ ३ ॥

॥ १०७३ ॥ ॥११॥

बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता नाहीं मनुष्यदेह ॥ १ ॥

॥ध्रु.॥ आपुल्या हिताचे न[8] होती सायास । गृहदाराआसधनवित्त ॥ध्रु.॥

अवचितें[9] निधान लागलें हें हातीं । भोगावी विपत्ति गर्भवास ॥ २ ॥

यावें जावें पुढें ऐसें चि कारण । भोगावें पतन नरकवास ॥ ३ ॥

तुका ह्मणे धरीं आठव या देहीं । नाहीं तरि कांहीं बरें नव्हे ॥ ४ ॥

॥ १०७४ ॥

आह्मीं पतितांनीं घालावें सांकडें । तुह्मां लेंगे[10] कोडें उगवणें ॥ १ ॥

॥ध्रु.॥आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुह्मां हातीं ॥ध्रु.॥

---

१ त. धाव.—२ दे. पं. अंग.—३ पं. हातियेर. त. हातीयेरें.—४ त. येरें.—५ पं. वेटीसीचीं.—६ पं. जातीचे असे खरे डाये घाये । सारखिया काय पासी लोपे ॥ — ७ पं. म्हूण.—८ दे. नव्हती.—९ पं. अवचिता निधान लागलें से हातीं.—१० पं. लागीं.

न घेतां कवडी करावा कुढावा[1] । पाचारितां देवा नामासाठीं ॥ २ ॥
दयासिंधु नाम पतितपावन । हें आह्मां वचन सांपडलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तूं चि देवा ॥ ४ ॥

॥ १०७५ ॥

जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घाली कवतुकें ।
भवसिंधू सुखें । उतरी कासे लावूनि ॥ ध्रु ॥
थोर भक्तांची आस । पाहे भोंवताली वास ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ॥ ३ ॥

॥ १०७६ ॥

अखंड तुझी[2] जया प्रीति । मज दे त्यांची संगति ।
मग मी कमळापति । तुंज[3] नाणीं कांटाळा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पडोन राहेन ते ठायीं । उगा चि संतांचिये पायीं
न मगें न करीं कांहीं । तुझी आण[4] विठोबा ॥ ध्रु ॥
तुह्मी आह्मी पीडों ज्यांनें[5] । दोन्ही वारंती[6] एकानें ।
बैसलों धरणें । हाका देत दारेशीं[7] ॥ २ ॥
तुका ह्मणे या बोला । चित्त द्यावें बा विठला ।
न पाहिजे केला । अवघा[8] माझा आव्हेर ॥ ३ ॥

॥ १०७७ ॥

पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥

---

१ पं. कुडावा.— २ पं. जया तुझी — ३ पं. तुज बा नाणी कंटाळा०. दे. तुज नानीं.—
४ पं. आण गा विठोबा.—५ पं. जन.—६ पं. वारतील कान.—७ पं. द्वारासीं.—८ पं. आतां.

॥ ध्रु. ॥ कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे ।
अशुभ त्यांपुढें शुभ होउनियां ठाके ॥ ध्रु ॥
प्रेमसुखाचिया रासी । पाप नाहीं ओखदासी ॥ २ ॥
तुका ह्मणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ३ ॥

॥ १०७८ ॥

जन देव तरी पायां चि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥ १ ॥
अग्नीचें सौजन्य शीतनिवारण । पालवीं बांधोनि नेतां नये ॥ २ ॥
तुका ह्मणे विंचु सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥ ३ ॥*

---

१ दे. 'ठाके' याच्यापुढें 'गाढे' असा शोध घातला आहे.—२ पं. जग.— * याच्या पुढें 'भक्तभागवत०', 'पंडित वैदिक०', 'माझी मज०', व 'वैष्णवांची याती०', हे चार अभंग तळेगांवच्या प्रतींत रामेश्वर भटाचे आहेत. देहूच्या व पंढरपूरच्या प्रतींत 'भक्तभागवत०', हा मात्र आहे. यांपैकीं प्रत्येक अभंगांत तुकारामाची प्रशंसा इ०आहे, त्याच्या शेवटच्या कडव्यांत "ह्मणे रामेश्वर" असें आहे यांवर तळेगांवच्या प्रतींत "रामेश्वर भ० अ० ४" असें सदर आहे इत्यादि कारणांवरून ते चार अभंग रामेश्वर भट याचेच आहेत असें खचित समजतें; ह्मणून ते येथें फक्त टिपेंत दाखल केले आहेतः—

**रामेश्वरभट याचे अभंग ४.**

॥ १०७९ ॥

भक्त भागवत जीवन्मुक्त संत । महिमा अत्यद्भुत चराचरीं ।
ऐसिया अनंतामाजी तूं अनंत । लीलाविग्रह होत जगत्राता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ब्रह्मानंद तुकें तुळे आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥ ध्रु ॥
शास्त्रा श्रेष्ठाचार अविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली ।
देऊनि तिळांजुळी काम्य निषिद्धांसी । विधिविणे योगेशी ब्रह्मार्पण ॥ २ ॥
संत ग्रहमेळीं जगधंद्या गिळी । पैल उदयाचळीं भानु तुका ।
संत वृंदें तीर्थ गौतमी हरिकथा । तुकया नर सिंहस्ता भेटों आली ॥ ३ ॥
शांति पतिव्रते जाले परि नयन । काम संतर्पण निष्कामता ।

॥ १०७९ ॥

भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हें तों भाग्यहीन त्यांची जोडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धें ॥ध्रु॥
जगरूढीसाटीं घोतलें दुकान । जातो नारायण अंतरोनि ॥ २ ॥
तुका ह्मणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धी ॥ ३ ॥

१ त. परारब्धें.—२ दे. त. घातला.—३ त. परपंच०. पं. प्रपंच चि गाढा.

( ३८० पृष्ठावरील टीप. )

क्षमा क्षमापणें प्रसिद्ध प्रथा जगीं । तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमंत ॥ ४ ॥
दया दिनानाथा तुवां जीकविली । विश्वीं विस्तारली कीर्ति तुझी ।
वेदवाक्यबाहु उभारिला ध्वज पूजिले देव द्विज सर्वभूतें ॥ ॥५
अधर्म क्षयव्याधि धर्माशीं स्पर्शला । तो त्वां उपचारिला अनन्यभक्ति ।
ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली । वाक्यें सपळ केलीं वेदविहितें ॥ ६ ॥
देहबुद्धि जात्या अभिमानें वंचलों । तो मी उपेक्षिलों न पाहिजे ।
न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार । मागे रामेश्वर रामचंद्र ॥ ७ ॥

॥ १०८० ॥

पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची ।
शास्त्र ही पुराणें गीता नित्य नेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कर्म अभिमानें वर्ण अभिमानें । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥ ध्रु ॥
तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे ।
अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥ २ ॥
चहूं वेदांचे हें केलें विवरण । अर्थ ही गहन करूनियां ॥
उत्तम मध्यम कनिष्ट वेगळे । करुनी निराळे ठेविले ते ॥ ३ ॥
भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळा देखियेला ।
जप तप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तनें करूनियां ॥ ४ ॥
मागें कवीश्वर जाले थोर थोर । नेले कलिवर कोणें सांगा ।
ह्मणे रामेश्वर सकळा पुसोनि । गेला तो विमानी बैसोनियां ॥ ५ ॥

॥ १०८० ॥

॥ घोंगड्याचे अभंग— ॥ १२ ॥

ठकिलें काळा मारिली दडी । दिली कुडी टाकोनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पांघुरलों बहु काळें । घोंगडें बळें सांडवलें ॥ ध्रु ॥
नये ऐसा लाग वरी । परतें दुरी लंपालें ॥ २ ॥
तुका ह्मणे आड सेवा । लाविला हेवा धांदली ॥ ३ ॥

१ पं. पांघरलों.—२ पं.ऐशा.—३ पं. लपाले.

( ३८० पृष्ठावरील टीप. )

॥ १०८१ ॥

माझी मज आली रोकडी प्राचित । होऊनि फजित दुःख पावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत जाली ॥ ध्रु ॥
ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥ २ ॥
तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आह्मां थोर । कां जे अवतार नामयाचा ॥ ३ ॥
त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । ह्मणोनि हे बाधा घडली तुज ॥ ४ ॥
आतां एक करीं सांगेन तें तुला । शरण जाईं त्याला निश्चयेंशीं ॥ ५ ॥
दर्शनें चि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥ ६ ॥
तो चि हा विश्वास धरूनि मानसीं । जाय कीर्त्तनासी नित्य काळ ॥ ७ ॥
ह्मणे रामेश्वर त्याच्या समागमें । जालें हें आराम देह माझें ॥ ८ ॥

॥ १०८२ ॥

वैष्णवांची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ ऐसी वेद श्रुति बोलती पुराणें ॥ नाहीं तें दुषण हरिभक्ता ॥ ध्रु ॥
उंच निंच वर्ण न ह्मणावा कोणी । जें कां नारायणीं प्रिय जालें ॥ २ ॥
चहूं वर्णांसी हा असे अधिकार । करितां नमस्कार दोष नाहीं ॥ ३ ॥
जैसा शालिग्राम न ह्मणावा पाषाण । होय पूज्यमान सर्वत्रासी ॥ ४ ॥
गुरु परब्रह्म देवाचा तो देव । त्यासी तो मानव ह्मणूं नये ॥ ५ ॥
ह्मणे रामेश्वर नामीं जे रंगले । स्वयें चि ते जाले देवरूप ॥ ६ ॥

॥ १०८१ ॥

घोंगडियांचा पालट केला । मुलांमुलां आपुल्यांत ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कान्होबा तो मी च दिसें । लाविलें पिसें संवगडियां ॥ ध्रु ॥

तो बोले मी उगाच बैसें । आनारिसें न दिसे ॥ २ ॥

तुका ह्मणे दिलें सोंग । नेदी व्यं[१]ग जाऊं देऊं ॥ ३ ॥

॥ १०८२ ॥

खेळों [२]लागलों सुरकवडी । माझी घोंगडी हारपली ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कान्होबाचे पडिलों गळां । घेई गोपाळा देईं झाडा ॥ ध्रु ॥

मी तों हागे उघडा जालों । अवघ्या आलों बाहेरी ॥ २ ॥

तुका ह्मणे बुद्धि काची । नाहीं ठायींची मजपाशीं ॥ ३ ॥

॥ १०८३ ॥

घोंगडियांची एकी राशी । त्याचपाशीं तें ही होतें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझियाचा माग दावा । केला गोवा [३]उगवों द्या ॥ ध्रु ॥

व्हावें ऐसें निसंतान । घेइन आन तुजपाशीं ॥ २ ॥

तुका ह्मणे लाहाण मोठा । सांडा ताठा हा देवा ॥ ३ ॥

॥ १०८४ ॥

नाहीं तुझे उगा पडत गळां । पुढें गोपाळा जाऊं नको ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ चाहाड तुझे दाविन घरीं । बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥ ध्रु ॥

तुह्मां आह्मां पडदा होता । सरला आतां सरोबरी ॥ २ ॥

तुका ह्मणे उरती गोठी । पडिली मिठी न सुटे ॥ ३ ॥

---

१ पं. नेदी व्यंग जाउ देवा. दे. त. वेंग. —२ पं. लागली.— ३ पं. उगउ द्या.— ४ पं. घेयी.— ५ पं. मांडवा.

॥ १०८५ ॥

तुह्मां आह्मां उरी तोंवरी । जनाचारी ऐसे[1] तैसी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझें घोंगडें टाकुन देईं । एके ठायीं मग असों ॥ ध्रु ॥

विरोधानें पडे तुटी । कपट पोटीं नसावें ॥ २ ॥

तुका ह्मणे तूं जाणता हरी । मज वेव्हारीं बोलविसी ॥ ३ ॥

॥ १०८६ ॥

मुळींचा तुह्मां लागला चाळा । तो गोपाळा न संडा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ घ्यावें त्याचें देणें चि नाहीं । ये चि वाहीं[2] देखतसों ॥ ध्रु ॥

माझी तरी घोंगडी मोठी । गांडीची लंगोटी सोडिस ना ॥ २ ॥

तुका ह्मणे म्यां सांडिली आशा । हुंगिला[3] फांसा येथुनियां ॥ ३ ॥

॥ १०८७ ॥

घोंगडियास घातली मिठी । न सोडी साटी केली जीवें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हा गे चोर धरा धांवा कोणी । घरांत राहाटे चहूं कोणी[4] ॥ ध्रु ॥

नोळखवे म्यां धरिला हातीं । देहो[5] दीप माय लाविली वाती ॥ २ ॥

न[6] पावे धांवणें मारितो हाका । जनाचारीं तुका नागवला ॥ ३ ॥

॥ १०८८ ॥

आतां मी देवा पांवरों काई । भिकेचें तें ही उरे चि ना ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सदैव[7] दुबळें नेणें चोर । देखोनि सुनाट फोडितो घर ॥ ध्रु ॥

नाहीं मजपाशीं फुटकी फोडी । पांचांनीं[8] घोंगडी दिली होती ॥ २ ॥

तुका ह्मणे जना वेगळें जालें । एक चि नेलें एकल्याचें ॥ ३ ॥

---

१ दे. ऐसें. पं. आहे.—२ पं. वाहि. दे. वाहिं.—३ पं. हुंगला.—४ पं. कोनि.—५ दे. देह्यादिप०.—६ पं. न पवे मारितो०.—७ दे. सदेंव. त. सदैव.—८ पं. पांचा घोंगडी.

॥ १०८९ ॥

मी माझें करित होतों जतन । भीतरिल्या चोरें घेतलें खानें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मज आल्याविण आधीं च होता । मज न कळतां मजे माजी ॥ध्रु॥
घोंगडें नेलें घोंगडें नेलें । उघडें केलें उघडें चि ॥ २ ॥
तुका ह्मणे चोरटा चि जाला साव । सहज चि न्याय नाहीं तेथें ॥ ३ ॥

॥ १०९० ॥

घोंगडें नेलें सांगों मी कोणा । दुबळें माझें नोणीत मना ॥ १ ॥
॥ध्रु. ॥ पुढें तें मज न मिळे आतां । जवळी सत्ता दाम नाहीं ॥ ध्रु ॥
सेटे महाजन ऐका कोणी । घोंगडियाची करा शोधणी ॥ २ ॥
घोंगडियाचा करा वोभाट । तुका ह्मणे जंव भरला हाट ॥ ३ ॥

॥ १०९१ ॥

माझें घोंगडें पडिलें ठायीं । माग तया पायीं सांपडला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चोर तो भला चोर तो भला । पाठिसी घातला पुंडलिकें ॥ध्रु॥
चोर कुठोरि एके चि ठायीं । वेगळें पाहावें नें लगे कांहीं ॥ २ ॥
आणिकांचीं हीं चोरलीं आधीं । माझें तयामधीं मेळविलें ॥ ३ ॥
आपल्या आपण शोधिलें तींहीं । करीन मी ही ते चि परी ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें हित चि जालें । फाटकें जाउन धंडकें आलें ॥ ५ ॥

॥ १२ ॥

॥ १०९२ ॥

सर्प भुलोन गुंतला नादा । गारुडियें फांदां घातलासे ।

१ पं. घतली खाण. त. घेतलें खान.—२ पं. मजपाशीं.—३ पं. उघड चि.—४ पं. सहज न्याय. त. सहज चि न्याव.—५ पं. नाणिती.—६ पं. त. शोधनी.—७ दे. नलगेच कांहीं.—८ पं. तोहे.—९ दे. धडकें चि आलें.—१० पं. गारुडिये फांदा घालीतसे.

हिंडवुनि पोट भरी दारोदारीं । कोंडुनि पेटारी असेरया[1] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तैसी परी मज जाली पांडुरंगा । गुंतलों[2] तो मी गा सोडीं आतां ॥

माझें मज कांहीं न चलेसें जालें । कृपा[3] तुज न करितां ॥ ध्रु ॥

आविसें मीनं[4] लाविघला गळीं । भक्ष तो गिळी ह्मणउनियां ।

काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथे बापमाये[6] कवण रया ॥ २ ॥

पक्षी पिलैंयां[7] पातलें आशा । देखोनियां फांसा गुंते बळें ।

मरण नेणें माया[8] धांवोनि वोसरे । जीवित्वें[9] ना जालीं बाळें ॥ ३ ॥

गोडपणें मासी गुंतली लिगाडीं । सांपडे फडफडी अधिकाअधिक[10] ।

तुका ह्मणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घालीं ॥ ४ ॥

॥ १०९३ ॥ ॥ १२ ॥

यातिहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायणा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय सुख मज तयाची हे खंती । आपुलाला घेती गुणभाव ॥ ध्रु ॥

द्रव्यांमुळें[11] माथां वाहियेली चिंधी । होन जयामधीं होता गांठीं ॥ २ ॥

तुका ह्मणे जन वंदितो वेगळा । मजसी दुर्बळा काय चाड ॥ ३ ॥

॥ १०९४ ॥

शीतळ साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जाऊनि वोसंगा रिघेन वोरस । लागलें[12] तें इच्छे पीइन वरी ॥ ध्रु ॥

कृपा तनु माझी सांभाळी दुभूनि । अमृतजीवनी लोटलीसे ॥ २ ॥

आनंदाचा ठाव नाहीं माझे[13] चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥ ३ ॥

सैर जाये पडे तयेसी सांकडें । सांभाळीत पुढें मागें ओसें[14] ॥ ४ ॥

---

१ पं. पेटारी आसेरया.— २ पं. गुंतलो मी०.— ३ पं. कृपा हे तुज०.— ४ दे. मिनु. त मीनु.—५ त. पं. लावियेला.—६ दे. त. बापुमाये.—७ पं. पीलीया पातले. त. पीलिया पातले.— ८ पं. सायासे धावोनि०.—९ पं. जीवित्वा नास जाली०.—१० पं. अधिकाधिक.—११ दे. पं. द्रव्यमुळें.—१२ पं. लागेल.—१३ दे. त. माझा.—१४ पं. त. असे.

तुका ह्मणे चिंता कैसी ते मी नेणें । लडिवाळ तान्हें विठाईचें ॥ ५ ॥

## रामचरित्र—अभंग ॥ १४ ॥

॥ १०९५ ॥

रामा वनवास । तेणें [1]वसे सर्व देश ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ केलें नामाचें जतन । समर्थ तो नव्हे भिन्न ॥ ध्रु ॥
वनांतरीं रडे । ऐसे पुराणीं पवाडे ॥ २ ॥
तुका ह्मणे ऋपिनेम । ऐसा कळोनि कां भ्रम ॥ ३ ॥

॥ १०९६ ॥

राम ह्मणे ग्रासोग्रासीं । तो[2] चि जेविला उपवासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्यधन्य तें शरीर । तीर्थांव्रतांचें माहेर ॥ ध्रु ॥
राम ह्मणे [3]करितां धंदा । सुखसमाधि त्या सदा ॥ २ ॥
राम ह्मणे [4]वाट चाली । यज्ञ पाउलापाउलीं ॥ ३ ॥
राम ह्मणे भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या अंगीं ॥ ४ ॥
ऐसा राम जप नित्य । तुका ह्मणे [5]जीवन्मुक्त ॥ ५ ॥

॥ १०९७ ॥

तारी ऐसे जड । उदकावरी जो दगड ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तो हा न करी तें[6] काई । कां रे लीन न[7]व्हां पायीं ॥ ध्रु ॥
[8]सळा मनुष्य जाली । ज्याच्या चरणाचे चालीं ॥ २ ॥
वानरां हातीं लंका । घेववीली ह्मणे तुका ॥ ३ ॥

---

१ पं. वस (ओस.)—२ पं. तो जेविला०.—३ पं. करी धंदा०.—४ दे. वाटे.—५ पं. तो चि मुक्त.—६ त. तो—७ पं. व्हाना.—८ पं. सीळा होती मनुष्य०.

॥ १०९८ ॥

राम ह्मणतां राम चि होइजे । पदीं बैसोन पदवी घेइजे ॥ १ ॥

॥ ध्रु ॥. ऐसें सुख वचनीं आहे । विश्वासें अनुभव पाहें ॥ ध्रु ॥

रामरसाचिया चवी । आन रस रुचती केवीं ॥ २ ॥

तुका ह्मणे चाखोनि सांगें । मज अनुभव आहे अंगें ॥ ३ ॥

॥ १०९९ ॥

रामराम उत्तम अक्षरें । कंठीं धरिलीं आपण शंकरें ॥ १ ॥

॥ध्रु.॥ कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां[२] । हळाहळ शीतळ केलें शिवा देखा ॥ २ ॥

हा चि मंत्र उपदेश भवानी । तिच्या चुकल्या गर्भादियोनि ॥ २ ॥

जुनाट[३] नागर नीच नवें । तुका ह्मणे म्यां धरिलें जीवें भावें ॥ ३ ॥

॥ ११०० ॥

राम ह्मणतां तरे जाणतां नेणतां । हो का यातिभलता कुळहीन ॥ १ ॥

॥ध्रु.॥ राम ह्मणतां न लगे आणीक सायास । केले महा दोष तेही जळती ॥ ध्रु ॥

राम ह्मणे[४] तया जवळी नये भूत । कैचा यमदूत ह्मणतां राम ॥ २ ॥

राम ह्मणतां तरे भवसिंधुपार । चुके येरझार ह्मणतां राम ॥ ३ ॥

तुका ह्मणे हें[५] सुखाचें साधन । सेवीं अमृतपान एका भावें ॥ ४ ॥

॥ ११०१ ॥

पैल आला राम रावणासी सांगती । काय निदसुरा निजलासी भूपति ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अवघे लंकेमाजी जाले रामाचे दूत । व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत ॥ ध्रु ॥

---

१ पं. पद घेवियीजे.– २ लोकी । हाळ हाळ०.–३ दे. जुन्हाट.–४ पं. ह्मणती.– ५ त. हें तों सुखाचें०.

अवघे अंगलग तुझे वधियेले वीर। होई शरणागत किंवा युद्धासी सादर ॥२॥
तुका ह्मणे एक्या भावें रा[1]मेसी भेटी। करूनि घेई आ[2]तां संबंधेसी तुटी॥३॥

॥ ११०२ ॥

समरंगणा आला। रामें रावण देखिला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कैसे भीडतील दोन्ही। नां[3]व साहूनियां रणीं ॥ ध्रु ॥
प्रेमसुखाचें संधान। बाणें निवारिती बाण ॥ २ ॥
तु[4]कयास्वामी रघुनाथ। वर्म जाणोनि केली मात ॥ ३ ॥

॥ ११०३ ॥

केला रावणाचा वध। अवघा तोडिला संबंध ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लं[5]काराज्यें बिभीषणा। केली चिरकाळ स्थापना ॥ ध्रु ॥
औ[6]दार्याची सीमा। काय वर्णूं रघुरामा ॥ २ ॥
तुका ह्मणे माझा दाता। रामें सोडविली सीता ॥ ३ ॥

॥ ११०४ ॥

रामरूप केली। रा[7]मेंं कौसल्या माउली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राम राहिला मानसीं। ध्यानीं चिंतनीं जयासी।
रा[7]म होय त्यासी। संदेह ना[8]हीं हा भरवसा ॥ ध्रु ॥
अयोध्येचे लोक। राम जाले सकळीक ॥ २ ॥
स्मरतां जानकी। रामरूप जाले क[9]पि ॥ ३ ॥
रावणेसी लंका। राम आपण जाला देखा ॥ ४ ॥
ऐसा नित्य राम ध्याय। तुका वंदी त्याचे पाय ॥ ५ ॥

---

१ पं. रामासी.—२ पं. आतां या या संमधेसी०.—३ पं. नोव.—४ पं. तुकास्वामी.—५ लं-काराज्य.—६ दे. त. उदार्याची.—७ राम.—८ त. पं. नाहीं भरवसा.—९ त. ककी.

॥ ११०५ ॥

आनंदले लोक नरनारी परिवार । शंखभेरीतुरें[1] वाद्यांचे गजर ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आनंदे[2] जाला अयोध्येसी आले रघुनाथ ।

अवघा जयजयकार[3] आळंगिला भरत[4] ॥ छ ॥

करिती अक्षवाणें ओंवाळिती रघुवीरा ।

लक्ष्मीसहित लक्ष्मण दुसरा ॥ २ ॥

जालें रामराज्य आनंदलीं सकळें ।

तुका ह्मणे गाईवत्सें नरनारीबाळें ॥ ३ ॥

॥ ११०६ ॥

जालें रामराज्य काय उणें आह्मांसी ।

धरणी धरी पीकें[5] गाई वोळल्या ह्मैसी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ राम वेळोवेळां आह्मी गाऊं ओवियें ।

दळितां कांडितां जेवितां गे बाइये ॥ छ ॥

स्वप्नीं ही दुःख कोणी न देखे डोळां ।

नामाच्या गजरें भय सुटलें काळा ॥ २ ॥

तुका ह्मणे रामें सुख दिलें[6] आपुलें ।

तयां गर्भवासीं येणें जाणें खुंटलें ॥ ३ ॥

॥ ११०७ ॥

अहल्या जेणें तारिली रामें । गणिका परलोका नेली नामें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ रामहरे रघुराजहरे । रामहरे महाराजहरे ॥ छ ॥

---

१ पं. ०तुरें यायावाद्याचे०.— २ पं. " आनंद जाला अयोध्येसी " हें ध्रुपद पूर्वी असून " आनंदले लोक " हें पहिलें कडवें मागून आहे.—३ दे. त. जेजेकार.—४ पं. भरथ.—५ त. पिका.—६ त. पं. दिधलें.

कंठ शीतळ जपतां शूळपाणी । राम जपतां अविनाशभवानी[2] ॥ २ ॥
तारकमंत्रश्रवण काशी । नाम जपतां वाल्मीक ऋषि ॥ ३ ॥
नामजप[3] बीजमंत्र नळा । सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा ॥ ४ ॥
नामजप जीवन मुनिजना । तुकयास्वामी रघुनंदना ॥ ५ ॥

॥ ११०८ ॥

मी तों अल्प मतिहीन[4] । काय वर्णूं तुझे गुण ।
उदकीं तारिले पाषाण । हें माहिमान नामाचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाम चांगलें चांगलें । माझे कंठीं राहो भलें ।
कपिकुळ उद्धरिलें । मुक्त केलें राक्षसां ॥ ध्रु ॥
द्रोणागिरि कपिहातीं । आणविला सीतापती ।
थोर केली ख्याति । भरतभेटीसमर्यां ॥ २ ॥
शिळा होती मनुष्य जाली । थोर कीर्ति वाखाणिली ।
लंका दहन केली । हनुमंतें काशानें ॥ ३ ॥
राम जानकीजीवन । योगियांचें निजध्यान ।
राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥ ४ ॥

॥ १४ ॥

॥ ११०९ ॥

॥ श्लोक रूपी अभंग—६ ॥

तुजवांचुनी मागणें काय कोणा । महीमंडळीं विश्वव्यापकजना ।
जीवभावना पूरवूं कोण जाणे । तुजवांचुनी होत कां रावराणे ॥ १ ॥

---

१ पं जपे.—२ दे. अविनाश भवाणी—३ त. राममंत्र जप बीज मंत्र०. प. राम जपे बीज०. दे. नाम जपें बीज मंत्र०.—४ पं. मतिहीन.

नसे मोक्षदाता तिहींमाजि लोकां । भवतारकु तूजवांचुनि एका ।
मनीं मानसीं चिंतितां रूपनाम । पळे पाप ताप भयें [1]नास काम ॥ २ ॥
हरी नाम हें साचें तूझें पुराणीं । हरीहातिचें काळगर्भादियोनी ।
करूं मुखवाणी कैसी देशधडी । तुजवांचुनि वाणितां व्यर्थ गोडी ॥ ३ ॥
भवभंजना व्या[2]पका लोक तिन्ही । तुज वाणितां श्रमला शेषफणी ॥
असो भावें जीव तुझ्या सर्व पायीं । दुजें मागणें आणीक व्यर्थ काई
॥ ४ ॥
दिनानाथ हे साक्ष तूझी जनासी । दिनें तारिलीं पातकी थोर दोषी ।
तुका राहिला पायिं तो राख देवा । असें मागतसे तुझी चरणसेवा ॥ ५ ॥

॥ १११० ॥

उभा भींवेरच्या तिरीं राहिलाहे । असे सन्मुख दक्षिणे मूख वाहे ।
महापातकांसी पळ कांप थोर । कैसे गर्जती घोष हे नामवीर ॥ १ ॥
गुणगंभीर हा धीर हास्यमुख । वदे वदनीं अमृत सर्वसुख ।
लागलें मु[3]निंवरां हें गोड चित्तीं । देहभावना तुटलियासि खंती ॥ २ ॥
ठसा घातला ये भूमिमाजी थोर । इच्छादाना हा द्यावयासी उदार ।
जया वोळगती सिद्धि सर्वठायीं । तुझें नाम हें चांगलें गे विठाई ॥ ३ ॥
असे उघडा हा विटेवरि उभा । कटसूत्र हें धरूनि भक्तिलोभा ।
पुढें वाट दावी भवसागराची । विठो माउली हे सिद्धसाधकांची ॥ ४ ॥
करावे गुहा धरा पंथ आधीं । जया पार नाहीं सुखा तें च साधीं ।
ह्मणे तुका पंढरीस सर्व आलें । [4]असे विश्व हें जीवनें त्याचि ज्यालें ॥ ५ ॥

---

१ त. नासे काम.—२ दे. व्यापक.—३ दे. मुनिवरां गोड.—४ दे. आस.

॥ ११११ ॥

धना गुंतलें चित्त माझें मुरारी । मन घेउनी हिंडवी दारोदारीं ।
मरे हिंडतां न पुरे यासि कांहीं । मही ठेंगणी परी तें तृप्त नाहीं ॥ १ ॥
न दिसे शुद्ध पाहातां निजमती । पुढें पडिलों इंद्रियां थोर घातीं ।
जिवा नास त्या संगती दंड बेडी । हरी शीघ्र या दृष्टसंगासि तोडीं ॥२॥
असीं आणिकें काय सांगों अनंता । मोहो पापिणी दृ[1]ष्टमायाममता ।
क्रोध काम[2] यातना थोर करी । तुजवांचुनी सोडवी कोण हरी ॥ ३ ॥
निज देखतां निज [3]हे दूरि जाये । निद्रा आळस दंभ या भीत आ[4]हे ॥
तयां वस्ति देहीं नको देउं देवा । तुजवांचुनी आणिक नास्ति हेवा ॥ ४ ॥
करीं घात पात शंका लाज थोरी । असे सत्य भाव बहू भक्ति दूरी ।
नको मोकलूं दीनबंधु अनाथा । तुका वीनवी ठेवुनी पायिं माथा ॥ ५ ॥

॥ ११२२ ॥

पैल सांवळें तेज पुंजाळ कैसें । सिरीं तुर्बिलीं साजिरीं मोरवीसें[5] ।
हरे त्यासि रे देखतां ताप माया । भजा रे भजा याद[6]वा योगिराया ॥ १ ॥
जया कामिनी लुब्धल्या सहस्रसोळा । सुकुमार ह्या गोपिका दिव्य बाळा ।
शोभे मध्यभागीं कळा चंद्रकोटी । रूपा मीनली साजिरी माळकंठीं ॥ २ ॥
[*]असे यादवां श्रेष्ठ हा चक्रपाणी । ज[7]या वंदिती कोटि तेहतीस तीन्ही ।
महाकाळ हे कांपती दैत्य ज्यासी । पाहा सांवळें रूप हें पापनासी ॥ ३ ॥
कसीं पाउलें साजिरीं कुंकुमाचीं । कसी वीट हे लावली दैवां[8]ची ।
जया चिंतितां अग्नि हा शांति नीवे । धरा मानसीं आपला देहभाव ॥ ४॥

---

१ "दृष्ट" हा शब्द "दुष्ट" याबद्दल आढळतो. याचें कारण "दुष्ट" याचा अपभ्रंश "द्रुष्ट;" आणि त्याचा "दृष्ट" असा झाला आहे.–२ त. काम हा यातना.–३ त. हें.–४ दे. आहे.–५ मोर पीसें ?–६ दे. यादव. त. 'यादवा' असतां 'यादव' केलें आहे.–७ त. तया.–८ त. दइवाची.–* त. "असे" शब्द नवा घातला आहे तो दे. नाहीं.

मुनी[1] देखतां मूख हें चित्त ध्याय । देह मांडला भाव हा बापमाय ।
तुक्या लागलें मानसीं देवपीसें । चित्त चोरटें सांवळें रूप कैसें ॥ ५ ॥

॥ १११३ ॥

असे नांदतु हा हरी सर्वजीवीं । असे व्यापुनी अग्नि हा काष्ठ तेवीं ।
घटीं बिंबलें बिंब हें ठायिठायीं । तया संगती नासु हा त्यासि नाहीं ॥१॥
तन वाटितां क्षीर हें होत नाहीं । पशू भक्षितां पालटे तें चि देहीं ।
तया वर्म तो जाणता एक आहे । असे व्यापक व्यापुनी अंतर्बाहे ॥ २ ॥
फळ कर्दळीं सेवटीं येत आहे । असे शोधितां पोकळीमाजि काये ।
धीर नाहीं तें[2] वाउगें धीग जालें । फळ पुष्पना यत्न[3] ते व्यर्थ गेले ॥३॥
असे नाम हें दर्पणें सिद्ध केलें । असे बिंब तें या मळा आड[4] ठेलें ।
कैसें[5] शुद्ध नाहीं दिसे माजिरूप । नका वाढवूं सीण हा पुण्यपाप ॥ ४ ॥
करा वर्म ठावें नका सोंग वांयां । तुका वीनवीतो पडों काय पायां ।
तुज पुत्र दारा धन वासना हे । मग ऊरलें शेवटीं काय पाहें ॥ ५ ॥

॥ १११४ ॥

मना सांडिं हे वासना दुष्ट खोडी । मती मानसीं एक हे व्यर्थ गोडी ।
असे हीत माझें तुज कांहीं एक । धरीं विठ्ठलीं प्रेम हें पायिं सूख ॥ १ ॥
ऐसा सर्वभावें तुज शरण आलों । देहदुःख हें भोगितां फार भ्यालों ।
भवतारितें दूसरें नाहिं कोणी । गुरु होत कां देव तेहेतीस तीन्ही ॥ २ ॥
जना वासना हे धना थोरि आहे । तुज लागली संगती ते चि सोये ।
करीं सर्व संगी परि त्यागु ठायीं । तुका विनवीतो मस्तक ठेवुनि पायीं ॥३॥

॥ ६ ॥

---

१ त. मनी.—२ दे. त्यें.—३ दे. यत्न व्यर्थ.—४ दे. आहे.—५ दे. त. कैसें.

॥ ११२५ ॥

सुटायाचा कांहीं पाहातां उपाय । तों हे देखें पाय गोवियेले ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसिया दुःखाचे सांपडलों संदी । हारपली बुद्धि बळ माझें ॥ध्रु॥
प्रारब्ध क्रियमाण संचितांचें । वोढत ठायींचें आलें सांचें ॥ २ ॥
विधिनिषेधाचे सांपडलों चेपे । एकें एक लोपे निवडेना ॥ ३ ॥
सारावें तें वाढे त्याचिया चि अंगें । तृष्णेचिया संगें दुःखी जालों ॥४॥
तुका ह्मणे आतां करीं सोडवण । सर्वशक्तिहीन जालों देवा ॥ ५ ॥

॥ ११२६ ॥

भय वाटे पर । न सुटे हा संसार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा पडिलों कांचणी । करीं धांवा ह्मणउनी ॥ ध्रु ॥
विचारितों कांहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । येथें न पुरे रिघावा ॥ ३ ॥

॥ ११२७ ॥

येगा येगा पांडुरंगा । घेईं उचलुनि वोसंगा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसी असोनियां वेसी । दिसतों मी परदेसी ॥ ध्रु ॥
उगवूनि गोवा । सोडवूनि न्यावें देवा ॥ २ ॥
तुज आड कांहीं । बळ करी ऐसें नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे हृषीकेशी । काय उशीर लाविलासी ॥ ४ ॥

॥ ११२८ ॥

माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हायेली ॥ १ ॥

---

१ पं. सुटायाचे. कांहीं करितां उपाय ।.—२ पं. संधी.—३ पं. प्रारब्ध क्रियामाण संताचे.—४ पं. एका एक.—५ त. सांपडेनो.—६ पं. काकरणी.—७ पं. यैगा यैगा.—८ दे. लाविसी.—९ दे. प्रेमें पान्हा०

॥ ध्रु. ॥ कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनि ॥ ध्रु ॥
केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥ २ ॥
तुका ह्मणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ३ ॥

॥ १११९ ॥

आह्मी उतराई । भाव निरोपूनि पायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मी पुरवावी आळी । करोवी ते लडिवाळीं ॥ ध्रु ॥
आमचा हा नेम । तुह्मां उचित हा धर्म ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । जाणों सांगितली सेवा ॥ ३ ॥

॥ ११२० ॥

केलें पाप जेणें दिलें अनुमोदन । दोघांसी पतन सारिखें चि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विष नवनीता विष करी संगें । दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ॥ ध्रु॥
देखिलें ओढाळ निघालिया सेता । टाळावें निमित्ता थैक म्हूण ॥ २ ॥
तुका ह्मणे जोडे केल्याविण कर्म । देखतां तो श्रम न मनितां ॥ ३ ॥

॥ ११२१ ॥

विठल गीतीं विठल चित्तीं । विठल विश्रांति भोग जया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठल आसनीं विठल शयनीं । विठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥ध्रु॥
विठल जागृतिस्वप्नसुषुप्ती । आन दुजें नेणती विठलेंविण ॥ २ ॥
भूषण अळंकार सुखाचे प्रकार । विठ्ठल निर्धार जयां नरां ॥ ३ ॥
तुका ह्मणे ते ही विठल चि जाले । संकल्प मुराले दुजेपणें ॥ ४ ॥

---

१ दे. त. कुवाळूनि.—२ पं. करविती लडवाळीं.—३ दे. त. पं. आन्मोदन—४ दे. त. सारिके चि.—५ दे. त. निमित्या.—६ त. नेणती तो.—७ दे. जागृतिस्वप्नी सुषुप्ति. ८पं. विठ्ठलीं.

॥ ११२२ ॥

दास जालों हरिदासांचा । बुद्धिकायामनेंवाचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळमृदंगकल्लोळें[1] ।
नासे दुष्टबुद्धि सकळ । समाधि हरिकीर्त्तनीं ॥ ध्रु ॥
ऐकतां हरिकथा । भक्ति लागे त्यां अभक्तां ॥ २ ॥
देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग ॥ ३ ॥
हें सुख ब्रह्मादिकां । ह्मणे[2] नाहीं नाहीं तुका ॥ ४ ॥

॥ ११२३ ॥

गति अधोगति मनाची[3] युक्ति । मन लावीं एकांतीं साधुसंगें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जतन करा जतन करा । धांवतें सैरा ओढाळ तें ॥ ध्रु ॥
मान अपमान मनाचें लक्षण । लाविलिया ध्यान तें चि करी ॥ २ ॥
तुका ह्मणे मन उतरी भवसिंधु । मन करी बंधु[4] चौऱ्याशीचा ॥ ३ ॥

॥ ११२४ ॥

पंढरीस दुःख न मिळे ओखदा । प्रेमसुख सदा सर्वकाळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पुंडलिकें हाट भरियेली पेंठ । अवघें वैकुंठ आणियेलें ॥ ध्रु ॥
उदमासीं[5] तुटी नाहीं कोणा हानि । घेऊनियां धणी लाभ घेती[6] ॥ २ ॥
पुरलें देशासी भरलें सिगेसी । अवघी पंचक्रोशी दुमदुमीत ॥ ३ ॥
तुका ह्मणे संतां लागलीसे धणी । बैसले राहोनि पंढरीस ॥ ४ ॥

॥ ११२५ ॥

द्वारकेचें केणें आलें या चि ठाया । पुढें भक्तराया चोजवीत ॥ १ ॥

---

१ पं. कल्होळ.—२ पं. नाहीं नाहीं ह्मणे तुका.—३ पं. मनाची हे युक्ति.— ४ त. बाधु.—
५ पं. उदिमासी.—६ त. देती. पं. येनी.

॥ ध्रु. ॥ गोविलें विसारें माप केलें खरें । न पाहे माघारें अद्यापवरी ॥ ध्रु ॥
वैष्णव मापारी नाहीं जाली सळे । पुढें ही न कळे पार त्याचा ॥ २ ॥
लाभ जाला त्यांनीं धरिलो तो विचार । आहिक्य परत्र सांटाविलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज मिळाली मजुरी । विश्वास या घरीं संतांचिया ॥ ४ ॥

॥ ११२६ ॥

सुरवर येती तीर्थें नित्यकाळ । पेंठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ साक्षभूत नव्हे सांगितली मात । महिमा अत्यद्भुत वर्णवेना ॥ध्रु॥
पंचक्रोशीमाजी रीघ नाहीं दोषा । जळती आपैसा अघोर ते ॥ २ ॥
निर्विषय नर चतुर्भुज नारी । अवघा घरोघरीं ब्रह्मानंदु ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्यापें नाहीं पुण्यलेश । जा रे पंढरीस घेई कोटि ॥ ४ ॥

॥ ११२७ ॥

विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड तैसा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वादावाद करणें त्यासी तों च वरी । गुखाडीची चाड सरे तों च बाहेरी ॥ ध्रु ॥
सौभाग्यसंपन्न हो कां वृद्ध प्रतिष्ठ । चिकरूनि सांडी पायां लागली ते विष्ठ ॥२॥
नाहीं याति कुळ फांसे ओढी तयासी । तुका ह्मणे काय मुद्रासोंग जाळिसी ॥३॥

॥ ११२८ ॥

देव होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥१॥
दुष्ट होसी तरी अणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥२॥

---

१ दे. त. सळ.–२ पं. धरिला विचार । अहिक्य.–३ पं न वर्णवे.–४ दे. त. रीग.–
५ पं. जैसा.–६ पं. प्रतिष्ठा.–७ पं. विकरूनि.–८ पं. विष्टा.–९ त. आणिकासी.

तुका ह्मणे जें दर्पणीं बिंबलें । तें तया बाणलें निश्चयेसीं ॥३॥

॥ ११२९ ॥

कलिधर्म मागें सांगितले संतीं । आचार सांडिती द्विजलोक ॥ १ ॥
॥ध्रु.॥ ते चि कळों आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेंकती धर्म नव्हे ॥ध्रु॥
तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥ २ ॥
देव ह्मणऊनी न येती देऊळा । संसारा वेगळा तरी कां नव्हे ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥ ४ ॥

॥ ११३० ॥

नमो विष्णुविश्वरूपा मायबापा । अपरा अमुपा पांडुरंगा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ विनवितों रंक दास मी सेवक । वचन तें एक आइकावें ॥ध्रु॥
तुझी स्तुति वेद करितां भागला । निवांत चि ठेला नेति नेति ॥ २ ॥
[1]ऋषि मुनि बहु सिद्ध कविजन । वर्णितां ते गुण न सरती ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें काय माझी वाणी । जे तुझी वाखाणी कीर्ती देवा ॥४॥

॥ ११३१ ॥

अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ घातलें वचन न पडे चि खालीं। तूं आह्मां माउली अनाथांची ॥ध्रु॥
मज याचकाची पुरवावी आशा । पंढरीनिवासा मायबापा ॥ २ ॥
[2]नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥३॥
तुका ह्मणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ४ ॥

---

१ पं. ऋषि मुनि सिद्ध बहुत कविजन । वर्णितां तुझे गुण०—२ पं. नाशली.

॥ ११३२ ॥

उदार कृपाळ अनाथांचा नाथ । ऐकसी मात शरणागतां ॥ १ ॥
॥ध्रु.॥ सर्व भार माथां चालविसी त्यांचा । अनुसरलीं वाचा काया मनें ॥ध्रु.॥
पाचारितां उभा राहासी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ॥ २ ॥
चालतां ही पंथ सांभाळिसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ॥ ३ ॥
तुका ह्मणे चिंता नाहीं तुझ्या दासां । तूं त्यांचा कोंवसा सर्वभावें ॥ ४ ॥

॥ ११३३ ॥

काय कीर्ती करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज ॥ १ ॥
॥ध्रु.॥ मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वांयां विण ॥ध्रु.॥
होइल थोरपण जाणीवेचा भार । दुरावेन दूर तुझ्या पायीं ॥ २ ॥
अंतरींचा भाव काय कळे लोकां । एक मानी एकां देखोवेखीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझे पाय आतुडती । ते मज विपत्ति गोड देवा ॥ ४ ॥

॥ ११३४ ॥

मानावया जग व्हावी द्रव्यमाया । नाहीं हे माझिया जीवा चाड ॥ १ ॥
॥ध्रु.॥ तुझ्या पायांसाटीं केली आराणूक । आतां कांहीं एक नको दुजें ॥ध्रु.॥
करूनियां कृपा करीं अंगीकार । न लवीं उसीर आतां देवा ॥ २ ॥
नव्हे साच कांहीं कळों आलें मना । ह्मणोनि वासना आवरिली ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधी पाववावे ॥ ४ ॥

॥ ११३५ ॥

आतां माझा सर्वभावें हा निर्धार । न करीं विचार आणिकांसी ॥

१ पं. ऐकसील.–२ पं. अनुसरे.–३ पं. दुऱ्हावेन.–४ दे. त. तुझा.–५ पं. त्या.–६ पं. हे नाहीं माझिया०.–७ पं. लावीं.–८ पं. आतां सर्वभावें हा माझा निर्धार.

॥ध्रु.॥ सर्वभावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ध्रु.॥
लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहीन भरोनि डोळे मुख ॥ २ ॥
निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं । येऊं नेदी मनीं शंका कांहीं ॥ ३ ॥
अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ११३६ ॥

जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आह्मां ॥ १ ॥
॥ध्रु.॥ जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदुःखें ॥ध्रु.॥
पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणांकारणें कवणें केलीं ॥ २ ॥
आह्मां मरण नाश तूं तंव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥३॥
तुका ह्मणे तूं चि निवडीं हा गुढार । दाखवीं साचार तें चि मज ॥४॥

॥ ११३७ ॥

यथार्थ वाद सांडूनि उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥ १ ॥
चोरा धरितां सांगे कुठोऱ्याचें नांव । दोघांचे ही पाव हात जाती ॥२॥
तुका ह्मणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे कांहीं ॥ ३ ॥

॥ ११३८ ॥

धीर तो कारण सांह्य होतो नारायण ।
नेदी होऊं सीण वाहों चिंता दासांसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सुखें करावें कीर्तन हर्षें गावे हरिचे गुण ।
वारी सुदर्शन आपण चि कळिकाळ ॥ ध्रु. ॥
जीव वेची माता बाळा जडभारी होतां ।

---

१ पं. कैसा हा वृत्तांत०.—२ त. कोण.—३ पं. सुख दुःख.—४ पं. पापपुण्य.—५त आचरण । हें कोणा० —६ पं. कीं कोणा.—७ पं. हे.—८ पं. कुटाऱ्याचें.—९ दे. त. साहे.

तो तों नव्हे दाता प्राकृतां यां सारिखा ॥ २ ॥
हें तों माझ्या अनुभवें अनुभवा आलें जीवें ।
तुका ह्मणे सत्य व्हावें आहाच नये कारणा ॥ ३ ॥

॥ ११३९ ॥

पुढें आतां कैंचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सर्वथाही फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥ ध्रु ॥
पांडुरंगा ऐसी नाव । तारूं भाव असतां ॥ २ ॥
तुका ह्मणे [1]चुकती बापा । पुन्हा खेपा सकळा ॥ ३ ॥

॥ ११४० ॥

[2]दुध दहीं ताक पशूचें पाळण । त्यांमध्यें कारण घृतसार ॥ १ ॥
॥ध्रु.॥ हें चि वर्म आह्मां भाविकांचे हातीं । ह्मणऊनि चित्तीं धरिला राम ॥ध्रु॥
लोहो कफ गारा अग्नीचिया काजें । येऱ्हवी तें ओझें कोण वाहे ॥ २ ॥
तुका ह्मणे खोरीं पाहारा जतन । जोंवरि हें धन [3]हातीं लागे ॥ ३ ॥

॥ ११४१ ॥

वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करिती घोष [4]जयजयकार । जळती दोषांचे डोंगर ॥ ध्रु ॥
[5]क्षमा दया शांति । बाण [6]अभंग हे हातीं ॥ २ ॥
तुका ह्मणे बळी । ते चि एक भूमंडळीं ॥ ३ ॥

॥ ११४२ ॥

ऐकें[7] रे जना तुझ्या स्वहिताच्या खुणा ।

---

१ पं. चुकवी.–२ दे. त. दुद.–३ पं. हाता.–४ दे. त. जेजेकार. –५ पं. दया क्षमा शांति०.–६ दे. अभंग ते हातीं.– ७ पं. आयीक.

पंढरीचा राणा मनामाजी स्मरावा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मग कैचें रे बंधन वाचे गातां नारायण ।

भवसिंधु तो जाण ये चि [1]तीरीं सरेल ॥ ध्रु ॥

दास्य करील कळिकाळ बंदे तुटेल मायाजाळ ।

होतील सकळ रिद्धिसिद्धी ह्मणियारीं ॥ २ ॥

सकळशास्त्रांचें सार हें वेदांचें [2]गव्हर ।

पाहातां विचार हा चि करिती पुराणें ॥ ३ ॥

ब्राह्मण [3]क्षेत्रिय वैश्य शूद्र [4]चांडाळां आहे अधिकार ।

[5]बाळें नारीनर आदि करोनि वेश्या ही ॥ ४ ॥

तुका ह्मणे अनुभवें आह्मीं पाडियलें ठावें ।

आणीक ही दैवें सुख घेती भाविकें ॥ ५ ॥

॥ ११४३ ॥

न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे [6]हा कृपाळ स्वामी माझा ॥ १ ॥

॥ध्रु.॥ अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्याशीच्या ॥ध्रु॥

आणिकियां जीवां होईल उद्धार । ते ही उपकार घडती कोटि ॥ २ ॥

[7]आहिक्य परत्रीं होसील सरता । [8]उच्चारीं रे वाचा रामराम ॥ ३ ॥

तुका ह्मणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥ ४ ॥

॥ ११४४ ॥

कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ॥ १ ॥

॥ध्रु.॥मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणे॥ ध्रु॥

---

१ दे. तरीं.—२ पं. वंध.—३ दे. त. पं. क्षेत्री.—४ पं. चांडाळांहि अधिकार.—५ पं. स्त्रिया बाळें०.—६ पं. "हा" शब्द नाहीं.—७ ऐहिक्य असें असावें.—८ पं. वाचे उच्चारितां रामनाम.

आणीक ही भोग आणिकां इंद्रियांचे । नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं ॥२॥
रूप दृष्टि धाय पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां रे नाशिवंतासाटीं । देवांसवें तुटी करितोसी ॥ ४ ॥

॥ ११४५ ॥

बैसोनि निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल तो अन्नवस्त्रदाता ॥ १ ॥
॥ध्रु.॥ काय आह्मां करणें अधिक सांचुनी । देव जाला ऋणी पुरविता ॥ध्रु॥
दयाळ मयाळ जाणे कळवळा । शरणागतां ळळा राखों जाणे ॥ २ ॥
न लगे मागणें सांगणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥ ३ ॥
तुका ह्मणे लेई अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूं चि होसी ॥ ४ ॥

॥ ११४६ ॥

सोनियांचा कळस । माजी भरिला सुरारस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय करावें प्रमाण । तुह्मी सांगा संतजन ॥ ध्रु ॥
मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांट ॥ २ ॥
तुका ह्मणे हित । तें मज सांगावें त्वरित ॥ ३ ॥

## सेतावर---अभंग ३.

॥ ११४७ ॥

सेत करा रे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं वेठी जेवा सारा । जाहाती नाहीं ह्मणियारा ।
सरिक नाहीं रे दुसरा । धनी सारा तुझा तूं ॥ ध्रु ॥
जपतप नांगरणी । न लगे आटी दुणवणी ॥ २ ॥

१ पं. "कांहीं" याच्याबद्दल "ही" आहे.—२ आणीक.—३ पं. देवासाटीं.—४ पं. न लगे सांगणें मागणें तयासी०—५ त. 'जाहाती' यावर 'जाह्याजती' असा शोध घातला आहे.—६ पं. नाहीं दुसरा.—७ त. दुणवणी. पं. दुणवनी.

कर्म कुळवणी । न लगे धर्मपाळी दोन्ही ॥ ३ ॥

ज्ञानपाभारी ती फणी । न लगे करावी पेरणी ॥ ४ ॥

बीज न लगे संचिताचें । पीक पिकलें ठायींचें ॥ ५ ॥

नाहीं यमाचें चोरटें । विठ्ठल पागोऱ्याच्या नेटें ॥ ६ ॥

पीक न वजे हा भरवसा । करी उद्वेग तो पिसा ॥ ७ ॥

सेराई[2] सर्व काळ । वांयां न वजे घटिकापळ ॥ ८ ॥

प्रेम पिकलें अपार । नाहीं सांटवावया थार ॥ ९ ॥

ऐसीये[3] जोडी जो चुकला । तुका ह्मणे धिग त्याला ॥ १० ॥

॥ ११४८ ॥

वोणव्या[4] सोंकरीं । सेत खादलें पांखरीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तैसा खाऊं नको दगा । निदसुरा राहुनि जागा ॥ ध्रु ॥

चोरासवें वाट । चालोनि केलें तळपट ॥ २ ॥

डोळे झांकुनि राती । कूपीं पडे दिवसा जोती ॥ ३ ॥

पोसी वांजे[5] गाय । तेथें कैची दुधें[6] साय ॥ ४ ॥

फुटकी सांगडी । तुका ह्मणे न पवे थडी ॥ ५ ॥

॥ ११४९ ॥

सेत आलें सुगी सांभाळावे चारी कोण ।

पिका आलें परी केलें पाहिजे जतन ॥ १ ॥

॥ध्रु. ॥ सोंकरीं. सोंकरीं विसावा तोंवरीं[7] । नको खाऊं उभें आहे तों ॥ध्रु॥

---

१ पं. उद्योग.–२ पं. दे. सगाये.–३ पं. ऐसी.–४ दे. वोनव्या.–५ पं. वांझ.–६ पं. दुधसोप.–७ दे.० तों वरी नको उभें आहे तां ॥ पं.० तो वरी उभे आहे तो ।

गोफणेसी गुंडा घाली पागोऱ्याच्या नेटें ।
पळती हाहाकारें अवघीं पांखरांचीं थाटें ॥ २ ॥
पेटवूनि आगटी राहे जागा पालटूनि ।
पडिलिया मान बळ बुद्धि व्हावीं दोनी[1] ॥ ३ ॥
खळे दोनें[2] विश्व सुखी करीं होतां रासी ।
सारा सारूनियां ज्याचे भाग देई त्यासी ॥ ४ ॥
तुका ह्मणे मग नाहीं आपुलें कारण ।
निज आलें हातां भूस सांडिलें निकण ॥ ५ ॥ ॥ ३ ॥

॥ ११५० ॥

नका घालूं दुध जयामध्यें सार । ताकाचे उपकार तरी करा ॥ १ ॥
नेदा तरी हें हो नका देऊं अन्न । फुकाचें जीवन तरी पाजा ॥ २॥
तुका ह्मणे मज सगुणाची चाड । पुरवा कोणी कोड दुर्बळाचें ॥ ३ ॥

## उत्तराधिपदें---२२

॥ ११५१ ॥

क्या गाऊं कोई सुननवाला । देखें तों सब जग हीं भुला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ खेलों आँपने[3] राम[4]हिसात । जैसी वैसी करहों मात ॥ ध्रु ॥
काहांसे लाँऊं मधुरा बानी । रीझे ऐसी लोक बिरानी ॥ २ ॥
गिरिधर लाल तो भाँवका भुका । राग कला नाहिं जानत तुका ॥ ३ ॥

॥ ११५२ ॥

छोडे[8] धन मंदिर बन बसाया । मांगत टुका घरघर खाया ॥१॥

१ पं. मानी बळबुद्धि.—२ त. पं. दानी.—३ दे. आपणें.—४ दे. राम इसातें.—५ दे. ल्यावों माधुर बाणी. त. ल्यावो मधुरावाणी.—६ दे. त. बिराणी.—७ दे. त. भावाहि भुका.—८ त. "छोडे" हा शब्द नाहीं. दे. बाहेर नवीन घातला आहे.—९ दे. टूका.

॥ ध्रु. ॥ तीनसों हम करवों सलाम । ज्यां[1]मुख बैठा राजाराम ॥ ध्रु ॥
तुलसीमाला[2] बभूत चऱ्हावे । हरजीके गुण निर्मल गावे ॥ २ ॥
कहे तुका जो सांई हमारा । हिरनकश्यप उँन्हें[3] माराहि डारा ॥ ३ ॥

॥ ११५३ ॥

मंत्रयंत्र[4] नहिं मानत साखी । प्रेमभाव नाहिं अंतर राखी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राम कहे त्याके पगहूं लागूं । देखत कपट अभिमान दुर भागूं ॥ ध्रु॥
अधिक याती कुलहीन नहिं जॉनूं[5] । जॉने[6] नारायन सो प्रॉनी[7] मानूं ॥ २ ॥
कहे तुका जीव तर्न[8] डारू वारी । राम उपासिहुं बलियाँरी* ॥ ३ ॥

॥ ११५४ ॥

चुराचुराकर माखन खाया । गौळनीका[9] नंद कुमर कन्हया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काहे बेंराई[10] दिखावत मोहि । जॉनतहुं[11] प्रभुपना तेरा[12] खेंब+ हि ॥ ध्रु॥
और बात सुन उखलसुं[13] गला । बांधालिया आपना तूं गोपालों[14] ॥ २ ॥
फेरत बनबन गाऊ धेंरावत[15] । कहे तुकयाबंधु लकरी लेले हॉत[16] ॥ ३ ॥

॥ ११५५ ॥

हरिसुं मिल दे एक हि बेर । पाछें तूं फिर नावे घर ॥ १ ॥ ध्रु. ॥
मात सुनो दुति आँवे[17] मनावन । जाया कराति भर जोबन ॥ ध्रु ॥
हरिसुख मोहि कहिया न जाये । तव तूं बुझे आँगो[18] पाये ॥ २ ॥
देखाहि भाव कछु पकारि हात । मिलाइ[19] तुका प्रभुसात ॥ ३ ॥

---

१ दे. ज्या मुखें.—२ पं. तुलसीकी माला.—३ पं. जिन्हे.—४ पं. मंत्र तंत्र —५ दे. ज्यानु. त. जाणु.—६ दे. ज्याणे. त. ज्याने त. नारायण.—७ दे. प्राणी. त. प्राणी माणुं.—८ पं. तन धन डारूं.०—९ दे. त. गौळणीका.—१० दे. त. बडाई.—११ दे. त. पं. जाणत हुं प्रभुपणा.—१२ त. तेरा खुब्राहि.—१३ दे त. उखळसुं गळा.—१४ दे. त. गोपाळा.—१५ दे. धरावतें. पं. धरावततें.—१६ पं. हाते.—१७ त. आवो.—१८ दे. आंगोपाये. पं. आगे पाय.—१९ पं. मीलळई.

* " बळिहारी; " + " सब हीं; " असावें.

॥ ११५६ ॥

क्या कहुं नाहिं बुझत लोका । लिजावे जम मारत धका ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ क्या जीवनेकी पकडी आस । हातों लिया नाहिं तेरा घांस ॥ध्रु॥
किसे दिवाने कहता मेरा । कछु जावे तन तूं सब ल्या न्यारी[1] ॥ २ ॥
कहे तुका तूं भया दिवाना । आपना बिचार कर ले जना ॥ ३

॥ ११५७ ॥

कब मरूं पाऊं चेरन[2] तुह्मारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥ १ ॥
॥ध्रु.॥ जग रडे[3] ज्याकुं सो मोहि मीठा । मीठा[4] दर आनंदमाहि पैठा ॥ध्रु॥
भला पाऊं जनम ईन्हे[5] बेर । बँस[6] मायाके असंग फेर ॥ २ ॥
कहे तुका धन मानहि दारा । वोहि[7] लिये गुंडलीया पसारा ॥ ३ ॥

॥ ११५८ ॥

दासों पाछें दौरे राम । सोवे खडा आपें मुकाम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ प्रेम*सरडी बांधी गले[8] । खैंचे[9] चले उधर ॥ ध्रु ॥
आंपने[10] जनसुं भुल न [11]देवे । कर हि धर आघें बाट बतावे ॥ २ ॥
तुकाप्रभु दीनदयाला । वारि रे तुज पर हुं गोपाला ॥ ३ ॥

॥ ११५९ ॥

ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोर हि काम ॥ ध्रु ॥
इतने गोते काहे खाता । जब तूं आंपना[12] भूल न होता ॥ १ ॥
अंतरजामी जानत साचा । मनका[13] एक उपर बाचा ॥ २ ॥

---

१ दे. पं.० ल्या नेरा.—२ त. पं. चरण.—३ "रडे" याच्या बद्दल "रोवे" असें असावें.—४ पं. मीठा दर आनंदसाहि पैठा.—५ दे. ईण्हे. पं.० पहूंजनम ईन्हे.—६ पं. सब.—७ दे. वोहिलिये गुंडलीयें. पं. गुंडली.—८ दे. त. गळे.—९ पं. खैचलले उधर चेले.—१० दे. आपणे त. आपले—११ पं. लेवे.—१२ दे. त. आपणा.—१३ पं. मन येक उवर वाचा.

* "प्रेमसरडी" असावें.

तुकाप्रभु देसबिदेस । भरिया खाली नाहिं लेस ॥ ३ ॥

॥ ११६० ॥

मेरे रामको नाम जो लेवे बारोंबार । त्याके[1] पाउं मेरे तनकी पैजार ॥ध्रु॥
हांसत खेलत चालत बाट । खाना[2] खाते सोते खाट ॥ १ ॥
जातनसुं मुंजे[3] कछु नाहिं प्यार । असंतेके[4] नाहिं हेंदु* घेड चंभार ॥२॥
ज्याका चित लगा मेरे रामको नाम । कहे तुका मेरा चित लगा त्याके पाव[5]
॥ ३ ॥

॥ ११६१ ॥

आपे[6] तरे त्याकी कोण बरॉई[7] । औरनकुं भलो[8] नाम घराई ॥ ध्रु ॥
काहे भूमि इतना भार राखे । दुभत धेनु नाहिं दुध चाखे ॥ १ ॥
बरसतें मेघ[9] फलतेंहे[10] बिरखा । कोन काम आपनी उन्होति[11] रखा ॥२॥
काहे चंदा सुरज खावे फेरा । खिन एक बैठन पावत घेरा ॥ ३ ॥
काहे परिस कंचन करे धातु । नाहिं मोल तुटत पावत घातु ॥ ४ ॥
कहे तुका उपकार[12] हि काज । सब कररहिया[13] रघुराज ॥ ५ ॥

॥ ११६२ ॥

जग चले उस घाट कोन जाय । नाहिं समजत फिरफिर गोते[14] खाय ॥ध्रु॥
नाहिं एकदो सकल संसार । जो बुझे सो आगला स्वार ॥ १ ॥
उपर स्वार[15] बैठे कृष्णांपीठ[16] । नाहिं बाचे कोइ जावे लूठ ॥ २ ॥
देख हि डर फेर बैठा तुका । जोबत[17] मारग राम हि एका ॥ ३ ॥

॥ ११६३ ॥

भले रे भाई जिन्हें किया चीज[18] । आछा नाहिं मिलत बीज ॥ ध्रु ॥

---

१ पं. याके.—२ दे. त, पं. खाणा.—३ पं मजे.—४ दे. असते की नही०.—५ दे. त. नाव.—६ पं. आप.—७ पं. वडाई । आवरनकु.—८ त. भली.—९ त. मेघा—१० पं. तेही.—११ पं. उणोति. त. उण्हेति.—१२ प. उपकर.—१३ पं. करक रहिया.—१४ दे. त. गोदे.—१५ दे. त. श्वार—१६ पं. कृष्णापिठ.—१७ पं. जावत.—१८ पं. चित्त.

* "हिंदु" असावे.

फीरतफीरत पाया सारा । मीलत[1] लोले धन किनारा ॥ १ ॥
तीरथ बरत फिर पाया जोग । नाहिं तकमल तुटत[2] भवरोग ॥ २ ॥
कहे तुका मैं ताको[3] दास । नहिं सिरभार चलावे पास[4] ॥ ३ ॥

॥ ११६४ ॥

लाल कमलि वोढे पेनाये । मोसु हरिथें[5] कैसें बनाये ॥ ध्रु ॥
कहे सखि तुम्हें कराति सोर । हिरदा हरिका कठिन कठोर ॥ १ ॥
नाहिं क्रियाँ* सरम कछु लाज । और सुनाउं बहुत हे भाज ॥ २ ॥
और नामरूप नाहिं गोवालिया । तुकाप्रभु माखन खाया ॥ ३ ॥

॥ ११६५ ॥

राम कहो जीवना फल सो ही । हरिभजनसुं बिलंब न पाई ॥ ध्रु ॥
कवनका मंदर कवनकी झोपरी । एकरामबिन सब हि फुकरी ॥ १ ॥
कवनकी काया कवनकी माया । एकरामबिन सब हि जाया ॥ २ ॥
कहे तुका सब हि चलनार[6] । एकरामबिन नाहिं बाँसारा[7] ॥ ३ ॥

॥ ११६६ ॥

काहे भुला धनसंपत्तीघोर । रामराम[8] सुन गाउ हो बाप रे ॥ ध्रु ॥
राजे लोक सब कहे[9] तूं आपना । जब काल नहीं पाया ठाना ॥ १ ॥
माया मिथ्या मनका सब धंदा । तजो अभिमान भजो गोबिंदा ॥ २ ॥
राना रंक डोंगरकी राई । कहे तुका करे[10] इलाहि ॥ ३ ॥

---

१ त.० सार । मीटत० किनार. ॥ दे. मीटत.—२ दे. त. तुटति.—३ पं. तेकोदास. दे. त. ताको दासा.—४ दे. त. पासा—५ पं. हरिते.—६ दे. चेलण्हार. त. चेलण्हारा. पं. चलणार.—७ दे. पं. वासार.—८ पं. रामनाम.—९ पं. कह.—१० पं. कर.

* "कन्या" असावें.

॥ ११६७ ॥

काहे रोवे आगले मरना । गंव्हार तूं भुला आपना ॥ ध्रु ॥
केते मालुम नाहिं पडे । नन्हे बडे गये सो ॥ १ ॥
बाप भाई लेखा नाहिं । पोछें तूं हि चलनार ॥ २ ॥
काले बाल सिंपत[3]* भये । खबर पकडो तुका कहे ॥ ३ ॥

॥ ११६८ ॥

क्या मेरे राम कवन सुख सारा । कहकर दे पुछूं दास तुह्मारा ॥ध्रु॥
तनजोबनकी कोन बराई । ब्याधपीडादि स काटहि खाई ॥ १ ॥
कीर्ति बधाऊं तों नाम[4] न मेरा । काहे झुटा पछतऊं घेरा ॥ २ ॥
कहे तुका नाहिं समजत मात । तुह्मारे शरन हे जोडहि हात ॥ ३ ॥

॥ ११६९ ॥

देखत आखों झुटा कोरा । तो काहे छोरा घरवार ॥ ध्रु ॥
मनसुं किया चाहिये पाख । उपर खाक पसारा ॥ १ ॥
कामक्रोधसो संसार । वो सिरभार चलावे[11] ॥ २ ॥
कहे तुका वो[12] संन्यास । छोडे आस तनकी हि ॥ ३ ॥

॥ ११७० ॥

रामभजन सब सार मिठाई । हरि संताप जनमदुख राई ॥ ध्रु ॥
दुधभात घृत सकर[13]पारे । हरते भुक नाहि अंततारे[14] ॥ १ ॥
खावते जुग सब चलिजावे । खट[15]मिठा फिर पचतावे ॥ २ ॥

---

१ पं. तालुम नहि परे । नन्हे बरे गये हिसारे ॥.—२ पं. पाछे चलनार तुं हि.—३ पं. सोपत.—४ पं. तों मन मेरा.—५ पं. सुटा.—६ दे. समज्यात.—७ पं. जोडत हि.—८ पं. देखो आखो० घर बारा.—९ पं. पसारा राख.—१० सबसारा.—११ पं. चलावे खरा.—१२ पं. सो सन्यास छोडे तनकी ही आस.—१३ पं. साकरपारे.—१४ पं. अनंत तारे.—१५ पं. खाट मीठापर चलावे.

* "सेत" असावें.

कहे तुका रामरस जो पीवे[1]। बहुरि फेरा वो कबहु न खावे ॥ ३ ॥

॥ ११७१ ॥

बारबार[2] काहे मरत अभागी। बहुरि मरन संक्या[+] तोरेभांगी[3] ॥ ध्रु ॥

ये हि तन करते क्या ना होय। भजन भगति करे बैकुंठे जाय ॥१॥

रामनाम मोल नहिं बेचे कबरि। वो हि सब माया छुरावत झगरी[4] ॥२॥

कहे तुका मनसुं[5] मिल राखो। रामरस जिव्हा नित्यँ[6] चाखो ॥ ३ ॥

॥ ११७२ ॥

हम उदास तीन्हके[7] सुनाहो लोका। रावणमार बिभीषण दिई लंका ॥ध्रु॥

गोबरधन नखपर गोकुल राखा। बर्सन लागा[8] जब मेंहुं फत्तरका ॥१॥

बैकुंठनायक काल कौंसासुरका। दैत डुबाय सब मंगाय गोपिका ॥२॥

स्तंभ फोड पेट चिरीया कश्यपका[9]। प्रल्हादके लियें कहे भाई तुकैयाका[10] ॥३॥

॥ २२ ॥

॥ साख्या[*] ३० ॥

॥ ११७३ ॥

तुका बस्तर विचारा क्यौं[11] करे रे। अंतर भगवान होय।

भीतर मैला केंव मिटे[+] रे। मरे उपर धोय ॥ १ ॥

॥ ११७४ ॥

रामराम कहे[12] रे मन। औरसुं नाहिं काज।

बहुत उतारे पार। आवे राख तुकाकी लाज ॥ १ ॥

---

१ पं. पीवे.—२ दे. बारंवार.—३ पं. मरनसे क्या तोरे भोगी.—४ पं. छुरावन सगरी.—५ पं. रामनसुं.—६ पं. नित.—७ पं. तीन्हको सुनाउं. त. हामदास तीन्हके सुनाहो.—८ पं. लगा जब मङु.—९ दे. कसेपका. पं. कशपका.—१० पं. तुकाका.—११ पं. क्या करे।.—१२ पं. कहे मन. * पं. "दोहोरे" हें सदर आहे.

+ "संका;" + "भेटे;" असावें.

॥ ११७५ ॥

लोभीकें चित धन बैठे । कामीन चित काम ।
माताके चित पुत बैठें । तुकाके[1] मन राम ॥ १ ॥

॥ ११७६ ॥

तुका पंखिबहिरन मानुं । बोई जनावर बाग ।
असंतनेकुं[2] संत न मानूं । जे वर्मकुं दाग ॥ १ ॥

॥ ११७७ ॥

तुका राम बहुत मिठा रे । भर राखूं शरीर ।
तनकी करूं नांवारि[3] उतारूं पैल तीर ॥ १ ॥

॥ ११७८ ॥

संतन[4] पन्हयां लें खडा । राहूं ठाकुरद्वार ।
चलत पाछेंहुं फिरों । रज उडत लेऊं सीर ॥ १ ॥

॥ ११७९ ॥

तुंकाप्रभु[5] बडो न मनूं न मानूं बडो । जिसपास बहु दाम ॥
बलिहारि उस मुखकी । जिसैंती[6] निकसे राम ॥ १ ॥

॥ ११८० ॥

राम कहे सो मुख भलारे । खाये खीर खांड ।
हरिबिन मुखमो धूल परी रे । क्या जानि उस रांड ॥ १ ॥

॥ ११८१ ॥

राम कहे सो मुख भला रे । बिन रामसें बीख ।
आब न जानूं रमते बेरों । जब काल लगावे सीख ॥ १ ॥

॥ ११८२ ॥

कहे तुका मैं[7] सवदा बेचूं । लेवेके तन हार ।

---

१ पं. तुकाके राम.—२ पं. असंतकु.—३ पं. तावरी.—४ पं. त. संत.—५ त. तुका प्रभु वडो न मानु । पं.० नमानो.—६ दे. जीसेंती.—७ दे. पं. में.

मिठा साधुसंतजन रे । मुरुखके सिर[1] मार ॥ १ ॥

॥ ११८३ ॥

तुका दास तिनका रे । रामभजन निरास ।
क्या बिचारे पंडित करो रे । हात[2] पसारे आस ॥ १ ॥

॥ ११८४ ॥

तुका प्रीत रामसुं । तैसी मिठी राख ।
पतंग जाय दीपँ[3] परे रे । करे तनकी खाक ॥ १ ॥

॥ ११८५ ॥

कहे तुका जग भुला रे । कह्या न मानत कोय ।
हात परे[4] जब कालके । मारत फोरत डोय ॥ १ ॥

॥ ११८६ ॥

तुका सुरा नहि सबदका रे । जब कमाइ न होये ॥
चोट सोहे[5] घनकि रे । हिरा नीबरे तोये ॥ १ ॥

॥ ११८७ ॥

तुका सुराँ[6] बहुत कहावे । लडत विरला कोये ।
एक पावे उंच पदवी । एक खौंसां जोये ॥ १ ॥

॥ ११८८ ॥

तुका माऱ्या पेटका । और न जाने कोये ।
जपता कछु रामनाम । हरिभगतनकी सोये ॥ १ ॥

---

१ पं. सीस.—२ पं. जब पसारे हात । .—३ त. दीपपर—४ त. पडे.—५ जबघन.—६ पं. सुर बहुत.

॥ ११८९ ॥

काफर सोही आपण बुझे । आला दुनियां भर[1] ।
कहे तुका तुम्हें सुनो रे भाई । हिरिदा[2] जिन्होका कठोर ॥ १ ॥

॥ ११९० ॥

भीस्त* न पावे मालथी । पढीया लोक रिझाये ।
निचा जथें कमतरिण[3] । सो ही सो फल खाये ॥ १ ॥

॥ ११९१ ॥

फल पाया तो खुस[4] भया । किन्होसुं[5] न करे बाद ।
बान न देखे मिरगा[6] रे । चित मिलाया नाद ॥ १ ॥

॥ ११९२ ॥

तुका दास रामका । मनमे एक हि भाव ।
तो न पालटू आब । ये हि तन जाव ॥ १ ॥

॥ ११९३ ॥

तुका रामसुं चित बांध राखूं । तैसा आपनी[7] हात ॥
धेनु बछरा छोर जावे । प्रेम न छुटे सात ॥ १ ॥

॥ ११९४ ॥

चितसुं चित जब मिले । तब तनु थंडा होये ।
तुका मिलनां[8] जिन्होसुं । ऐसा बिरला कोये ॥ १ ॥

॥ ११९५ ॥

चित मिले तो सब मिले । नहिं तो फुकट संग ।

---

१ पं. भार.–२ पं. हिरदा जिन्हका. ० हिरदा जिण्हेका०–३ पं. कमतारीण.–४ पं. सुख.–५ पं. किन्हे सुंनकरवे.–६ पं. मिरगी ।.–७ पं. आनि.–८ पं. मिलन

* "भेस्त" असावें.

पानी पथ्थर[1] येक ही ठोर । कोरनभिगे अंग ॥ १ ॥

११९६

तुका संगत तीन्हसें कहिये । जिनथें सुख[2] दुनाये ।
दुर्जन तेरा मूं काला । थीतो प्रेम घटाये ॥ १ ॥

॥ ११९७ ॥

तुका मिलना तो भला । मनसुं मन मिल जाय ।
उपर उपर माटि घसनी । उनकि कोन बराई ॥ १ ॥

॥ ११९८ ॥

तुका कुटुंब छोरे रे । लरके जोरों[3] सिर मुंदाय ।
जबथे इच्छा नाहिं मुई । तब तूं किया काय ॥ १ ॥

॥ ११९९ ॥

तुका इच्छा मीटइ तो । काहा करे जट खाक ।
मथीया गोला डारदिया तो । नहिं मिले फेरन ताक ॥ १ ॥

॥ १२०० ॥

ब्रीद मेरे साइंयाके[4] । तुका चलावे पास ।
सुरा सो हि लरे हमसें । छोरे तनकी आस ॥

॥ १२०१ ॥

कहे तुका भला भया । हुं* हुवा संतनका दास ।
क्या जानूं केते मरता । जो* न मिटती मनकी आस ॥ १ ॥

---

१ दे. त. पाथर. पं. पानी पथर येक ठोर ।. कोरन भिजे.–२ पं. मुख.–३ पं.
४ त. साईका.– * पं. "हुं" व "जो न" हे शब्द नाहींत.

॥ १२०२ ॥

तुका और मिठाई क्या करूं रे । पाले बिकारपिंड ।
राम कहावे सो भली रूखी । मा[1]खन खांडखीर ॥ १ ॥

॥ ३० ॥

॥ १२०३ ॥

ह्मणसी नाहीं रे संचित । न करीं न करीं ऐसी मात ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लाहो घेईं हरिनामाचा । जन्म जाऊं नेदीं साचा ॥ ध्रु ॥
ग[2]ळां पडेल यमफांसीं । मग कैंचा हरि ह्मणसी ॥ २ ॥
पुरलासाटीं देहाडा । ऐसें न ह्मणें न ह्मणें मूढा ॥ ३ ॥
नरदेह दुबळा । ऐसें न ह्मणें रे चांडाळा ॥ ४ ॥
तुका ह्मणे सांगों किती । से[3]कीं तोंडीं पडेल[4] मातीं ॥ ५ ॥

॥ १२०४ ॥

संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ १ ॥
बहु धड जरी जाली हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥
तुका ह्मणे [5]अंगें व्हावें तें आपण । तरी च महिमान येईल कळों ॥ ३ ॥

॥ १२०५ ॥

नाहीं संतपण मि[6]ळतें हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥ ॥
नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥ २ ॥
तुका ह्मणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥ ३ ॥

॥ १२०६ ॥

नामाची आवडी तो चि जाणा देव । न [7]धरीं संदेह कांहीं मनीं ॥ १ ॥

---

१ पं. माखना. त. माखन खीर खांड.—२ दे. गळां पडेल यमफांसा.—३ पं. शेखी.—
४ त. पडे.—५ पं. आंग.—६ त. पं. मीळत.—७ पं. धरा.

॥ ध्रु. ॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां ।
आणोनि संमता संतांचिया ॥ ध्रु ॥
नाम ह्मणे तया आणीक साधन । ऐसें हें वचन बोलों नये ॥ २ ॥
तुका ह्मणे सुख पावे या वचनीं । ज्यांचीं शुद्ध दोन्ही मायबापें ॥ ३ ॥

॥ १२०७ ॥

सुखें होतों कोठें घेतली सुती । बांधविला गळा आपुले हातीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय करूं बहु गुंतलों आतां । नये सरतां मागें पुढें ॥ ध्रु ॥
होतें गांठी तें सरलें येतां । आणीक माथां ऋणें जालें ॥ २ ॥
सोंकरिलियाविण गमाविलें पिक । रांडापोरें भिके लावियेलीं ॥ ३ ॥
बहुतांचीं बहु घेतलीं घरें । न पडे पुरें कांहीं केल्या ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं न धरावी आस । जावें हें सर्वस्व टाकोनियां ॥ ५ ॥

॥ १२०८ ॥

न मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरे तें ॥
आड आला ह्मूनं फोडियेला डोळा । बळिनें आंधळा शुक्र केला ॥१॥
करी देव तरी काय नव्हे एक । कां तुह्मी पृथक सिणा वांयां ॥ ध्रु ॥
उल्लंघुनियां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या ॥
अवघे चि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखियेली ॥ २ ॥
पितियांसी पुत्रें केला वैराकार । प्रल्हादें असुर मारविला ॥
बहुत विघ्नें केलीं तया आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ॥ ३ ॥

१ दे. आनुनि. पं. जाणोनी संमता संतांचिया.—२ पं. उरलें.—३ पं. ज्याचे शुद्ध दोनी मायेबाप.—४ पं. आतां.— ५ पं. दे. त. रीण.— ६ पं. सोकरविल्याविणे.— ७ पं ह्मणोनी.—
८ दे. त. तें.—९ दे. त. उलंघुनि.—१० पं. पितयासी.—११ पं. आड आड.

गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती ।
तयांसी[1] दिलें तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाहीं तो[2] चि जाला ॥ ४ ॥
देव जोडे ते[3] करावे अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें ।
तुका ह्मणे हा जाणतो कळवळा । ह्मणोनि अजामेळा उद्धरिलें ॥ ५ ॥

॥ १२०९ ॥

अरे गिळिलें हो संसारें । कांहीं तरि राखा खरें ।
दिला करुणाकरें । मनुष्यदेह सत्संग[4] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येथें न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड ।
उठाउठीं गोडें[5] । बीजें बीज वाढवा ॥ ध्रु ॥
केलें तें क्रियमाण । जालें तें संचित ह्मण ।
प्रारब्ध[6] जाण । उरवरित उरलें तें ॥ २ ॥
चित्त खोटें चालीवरि । रोग भोगाचे अंतरीं ।
रसने अनावरी । तुका ह्मणे ढुंगें[7] वाहे ॥ ३ ॥

॥ १२१० ॥

अग्न तापलिया काया चि होमे । तापत्रयें संतप्त होती ।
संचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके संसारस्थिति ।
राहाटघटिका जैसी फिरतां चि राहिली । भरली जाती[8] एके रितीं ।
सार्वी[9] हा प्रपंच पंचाय अग्न । तेणें पावसील निजशांति रे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नारायणनाम नारायणनाम । नित्य करीं काम जिव्हामुखें ।
जन्मजराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळ हीं दुःखें[10] ॥ ध्रु ॥

१ दे. तयां दिलें ते कोणासी नाहीं । त. तयां दिलें तैसें कवणासी नाहीं.—२ पं. हरी जाला.—३ पं. तरी करावा अधर्म.—४ पं. संतसंग.—५ पं. कोड.—६ पं. प्रारब्ध तें जाण । उरउरीत उले ते.—७ पं. डुंडुंग.—८ पं. जाली होती रिती.—९ पं. एके रिती सार्वी०.—१० पं. दुःखें रे.

शीत उष्ण वन सेवितां कपाट । आसनसमाधी साधीं ।
तप तीर्थ दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी ।
भोगाभोग तेथें न चुकती प्रकार । जन्मजरादुःखव्याधि ।
साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश सोधीं ॥ २ ॥
घोकितां अक्षर अभिमानविधि । निषेध लागला पाठी ।
वाद करितां निंदा घडती दोष । होय वज्रलेपो भविष्यति ।
दूषणाचें मूळ भूषण तुका ह्मणे । सांडीं मिथ्या खंती ।
रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहें भलतिया स्थिती ॥ ३ ॥

॥ १२११ ॥

नव्हे गुरुदास्य संसारियां । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां ।
तैसें नाम नव्हे पंढरीराया । जया सायास न लगती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणोनि गोड सर्वभावें । आंघोळी न लगे तोंड धुवावें ।
अर्थचाड जीवें । न लगे घ्यावें संसारा ॥ ध्रु ॥
कर्मा तंव न पुरे संसारिक । धर्म तंवें फळदायक ।
नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ॥ २ ॥
न लगे सांडणें मांडणें । आगमनिगमाचें देखणें ।
अवघें तुका ह्मणे । विठ्ठलनामें आटलें ॥ ३ ॥

॥ १२१२ ॥

नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥ १
॥ध्रु. ॥ देहाचा निग्रही त्याचें तो सांभाळी । मग नये कळि अंगावरी ॥ध्रु

---

१ पं. जन्म मरण जरा०.–२ पं. साधीं रे.–३ पं. अभिमान।.–४ दे. नाम पंढरी राया।
५ पं. तरी.–५ पं. ह्मणे येणें.

आपलिया इच्छा माता सेवा करी। न बाधी ते थोरी येणें क्षोभें ॥ २ ॥
तुका ह्मणे सांडा देखीचे दिमाख । मोडसीचें दुःख गांड फाडी ॥ ३ ॥

॥ १२१३ ॥

सत्य सत्यें देतें फळ । नाहीं लागत चि बळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ध्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥ ध्रु ॥
करावी च चिंता । नाहीं लागत तत्वता ॥ २ ॥
तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ३ ॥

॥ १२१४ ॥

साधक जाले कळी । गुरुगुडीची लांब नळी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पचीं पडे मद्यपान । भांगभुर्का हें साधन ॥ ध्रु ॥
अभेदाचें पाठांतर । अति विपर्यो पडिभर ॥ २ ॥
चेल्यांचा सुकाळ । पिंड दंड भंगपाळ ॥ ३ ॥
सेवा मानधन । वर इच्छेनें संपन्न ॥ ४ ॥
सोंगाच्या नरकाडी । तुका बोडोनियां सोडी ॥ ५ ॥

॥ १२१५ ॥

मज पाहातां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं देवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोणाचा कोणासीं न धरे संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ॥ध्रु
कांढा जी आपुलें मोह बुंथी जाळें। नका लावूं बळें वेड आह्मां ॥ २ ॥
जीव शिव कांहीं ठेवियेलीं नांवें। सत्य तुह्मां ठावें असोनियां ॥ ३ ॥
सेवेच्या अभिलाषें न धरा चि विचार । आह्मां दारोदार हिंडविलें ॥ ४ ॥

---

१. त. सत्यें सत्य. पं. सत्य सत्य.—२ दे. त. लागती.—३ पं. गुडगुडीची.—४ पं. पडिलें.—५ दे. अभेदाचा.—६ पं. भगपाळ.—७ पं. बोडोनियां.—८ पं. न धरवे.—९ दे. काढा काढा जी० जाळ. पं. जाळ.—१० पं. वेड बळें.—११ दे. कां ठेवियेलीं.—१२ दे. त. अभिळासें.

आहे तैसें आतां कळलियावरी । परतें सांडा दुरी दुजेपण ॥ ५ ॥
तुका ह्मणे काय छायेचा अभिलाष । हंस पावे नाश तारागणीं[1] ॥ ६ ॥

॥ १२१६ ॥

पंचभूतांचा गोंधळ । केला[2] एकेठायीं मेळ ।
लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी हें ओझें ।
देहा केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥ ध्रु ॥
जीव न देखे मरण । धरी नवीं सांडी जीर्ण ।
संचित प्रमाण । भोगा[3] शुभा अशुभा ॥ २ ॥
इच्छा वाढवी ते वेल । खुंटावा तो खरा बोल ।
तुका ह्मणे मोल । झांकलें[4] तें पावेल ॥ ३ ॥

॥ १२१७ ॥

पुसावेंसें हें चि वाटे । जें जें भेटे तयासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव कृपा करील मज । काय लाज राखील ॥ ध्रु ॥
अवघियांचा विसर जाला । हा राहिला उद्योग[5] ॥ २ ॥
तुका ह्मणे चिंता वाटे । कोण भेटे सांगेसें[6] ॥ ३ ॥

॥ १२१८ ॥

जाला तुह्मी माझें जाणतें मीपण । येणें माझा खुण मांडियेला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ खादलें[7] पचे तरि च तें हित । ओकलिया थीत पिंड पीडी ॥ध्रु॥
तरि भलें भोगें जोडिलें तें धन । पडिलिया खानें[8] जीवनासी ॥ २ ॥
तुका ह्मणे मज तारीं गा विठ्ठला । नेणतां चि भला दास तुझा ॥ ३ ॥

---

१ त. पं. तारांगणीं.—२ पं. एके ठायीं केला मेळ ।.—३ पं. भोग शुभा अशुभाच्या ।.—४ पं. झाकेल तो पावेल ।.—५ त. उदेग. दे. उदेग.—६ पं. सांगेसा.—७ पं. खादल्या खादलें हें पचे.—८ त. खान. पं. खाण.

॥ १२१९ ॥

याती मतिहीन रूपें लीन दीन । आणीक अवगुण जाणोनियां ॥ १ ॥

॥ध्रु.॥ केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥ध्रु॥

जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचित कळों चित्ता ॥ २ ॥

जालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥ ३ ॥

तुका ह्मणे यासी[1] नांवाचा अभिमान । ह्मणोनि शरण तारी बळें ॥ ४ ॥

॥ १२२० ॥

बहु उतावीळ भक्तीचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥ १ ॥

॥ध्रु. ॥ तुझ्या पायीं मज जालासे विश्वास । ह्मणोनियां आस मोकलिली॥ध्रु॥

ऋषि मुनि सिद्ध साधक अपार । कळला[2] विचार त्यांसी तुझा ॥ २ ॥

नाहीं नाँस[3] तें सुख दिलें तयांस । जाले जे उदास सर्वभावें ॥ ३ ॥

तुका ह्मणे सुख न माये मानसीं । धरिले जीवेंसी पाय तुझे ॥ ४ ॥

॥ १२२१ ॥

मायामोह[4]जाळीं होतों सांपडला[5] । परि या विठ्ठला कृपा आली ॥ १ ॥

॥ध्रु. ॥ काढूनि बाहेरि ठेविलों निराळा । कवतुक डोळां दाखविलें ॥ध्रु ॥

नाचे उडे माया करी कवतुक । नाँशवंत[6] सुखें साच केलीं ॥ २ ॥

रडे फुंदे दुःखें कुटितील माथा । एकासी रडतां तें ही मरे ॥ ३ ॥

तुका ह्मणे मज वाटतें नवल । मी माँझें[7] हे बोल ऐकोनियां ॥ ४ ॥

॥ १२२२ ॥

देहभाव आह्मी राहिलों ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ॥ १ ॥

---

१ पं. यास नामाचा.–२ पं. कळला हा विचार०.–३ पं. नाश.–४ दे. त. माया मोहो०.–५ दे. सांपडलों.–६ दे. त. पं. नासिवंत.–७ दे. मी माझे बोल०. पं. मी हे माझे बोल०.

॥ ध्रु. ॥ आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तो चि पुढें देव करीतसे ॥ ध्रु॥
ह्मणउनी नाहीं सुख दुःख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ॥ २ ॥
जालों मी निःसंग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे जालों जयाचे अंकित । तो चि माझें हित सर्व जाणे ॥ ४ ॥

॥ १२२३ ॥

आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरि तें जतन होय देठीं[1] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नामें चि सिद्धि नामें चि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पवतां ॥ ध्रु
चालिला पंथ तो पाववील[2] ठाया । जरि आड तया नये कांहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हानि[3] लाभ ॥ ३ ॥

॥ १२२४ ॥

निरोधाचें मज न साहे वचन । वहु होतें मन कासावीस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ ध्रु
देहाची भावना वासनेचा संग । नांवडे[4] उबग आला यांचा ॥ २ ॥
तुका ह्मणे देव अंतरे ज्यांमुळें[5] । आशामोहजाळें[6] दुःख वाढे[7] ॥ ३ ॥

॥ १२२५ ॥

तुजशीं संबंध[8] चि खोटा । परता परता रे थोटा[9] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देवा तुझें काय घ्यावें । आप आपणां ठकावें[10] ॥ ध्रु ॥
जेथें मुदल न ये हातां । व्याज मरावें लेखितां ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥ ३ ॥

---

१ पं. देटीं.–२ दे. पावईल.–३ दे. त. पं. हाणी.–४ त. न साहे उबग०.–५ पं. यामुळें.–६ दे. त० मोहो जाळे०.–७ पं. वाटे.–८ पं. संवंध तो खोटा.–९ पं. रे तूं खोटा.–१० पं. टकावे.

॥ १२२६ ॥

या चि हाका तुझे द्वारीं । सदा देखों ऋणकरी[1] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सदा करिती[2] खंड दंड । देवा बहु[3] गा तूं लंड ॥ ध्रु ॥
सुखें गोविसी भोजना । लपवूनियां आपणां ॥ २ ॥
एकें[4] एक बुझाविसी । तुका ह्मणे ठक होसी ॥ ३ ॥

॥ १२२७ ॥

आह्मी जाणों तुझा भाव । दृढ धरियेले पाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ फांकूं नेदूं चुकावितां । नेघों थोडें बहु देतां ॥ ध्रु ॥
बहुता दिसाचें लिगाड । आलें होत होत जड ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां । ने[5]घों सर्वस्व ही देतां ॥ ३ ॥

॥ १२२८ ॥

ऋ[6]ण वैर हत्या । हें तों न सुटे नेंदितां[7] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें कां नेणां पांडुरंगा । तुह्मी सांगतसां जगा ॥ ध्रु ॥
माझा संबंध तो किती । चुकवा लोकाची फजिती ॥ २ ॥
तुका ह्मणे या चि साठीं । [8]मज न घेतां नये तुटी ॥ ३ ॥

॥ १२२९ ॥

नाहीं मागितला । तुह्मां मान म्यां विठ्ठला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जे हे करविली फजिती । माझी एवढी जना हातीं ॥ ध्रु ॥
नाहीं केला पोटें[9] । पुढें घालूनि बोभाट ॥ २ ॥
तुका ह्मणे धरूनि हात । नाहीं ने[10]लें दिवाणांत ॥ ३ ॥

---

१ दे. रिणकरी. त. पं. रीणकरी.—२ दे. करिसी —३ पं. बहुत.—४ पं. एक एक.—५ दे. त. नेघें.—६ दे. रिण. पं. त. रीण०.—७ "न देतां" याच्या बद्दल "नेंदितां."—८ पं. मज घेतां नये तुटी.—९ पं. पोटें.—१० पं. नाहीं केली दिवानांत. दे. नाहीं नेलें दिवानांत.

॥ १२३० ॥

तूं पांढरा स्पटिक मणी । करिसी आणिका त्याहुनि ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणोनि तुझ्या दारा । न येत ठकती दातारा ॥ ध्रु ॥

तुझी ठावी नांदणूक[1] । अवघा बुडविला लोके[2] ॥ २ ॥

तुका ह्मणे ज्याचें घेसी । त्यास हें चि दाखविसी ॥ ३ ॥

॥ १२३१ ॥

बोलतों निकुरें । नव्हेत[3] सलगीचीं उत्तरें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझें संतापलें मन । परपीडा ऐकोन ॥ ध्रु ॥

अंगावरि आलें । तोंवरि जाईल सोसिलें ॥ २ ॥

तुज भक्तांची आण देवा । जरि[4] तुका येथें ठेवा ॥ ३ ॥

॥ १२३२ ॥

बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठवितां चित्तीं काय नव्हे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आणिकां उपायां कोण वांटी मन ।
सुखाचें निधान पांडुरंग ॥ ध्रु ॥

गीतें[5] गावों नाचों छंदें वावों टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥ २ ॥

अनंत ब्रह्मांडें एके रोमावळी । आह्मी केला भोळीं भावें उभा ॥ ३ ॥

लँटिका[6] हा केला संवसार[7]सिंधु । मोक्ष खरा बंधु नाहीं पुढें ॥ ४ ॥

तुका ह्मणे ज्याच्या नामाचे अंकित । राहिलों निश्चिंत[8] त्याच्या बळें ॥ ५ ॥

॥ १२३३ ॥

न लगे मायेसी बाळें[9] निरवावें । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥ १ ॥

---

१ दे. नांदनूक.—२ पं. लौकिक.—३ पं. नव्हती.—४ पं. तरी.—५ पं. गीतीं गावों नाम । छंदें वाहों टाळी । त.० वाहों०.—६ दे. लडिका.—७ पं. संसार—८ पं. निश्चित.—९ पं. बाळ.

॥ ध्रु. ॥ मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथां ॥ ध्रु ॥
गोड धड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥ २ ॥
खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥ ३ ॥
त्याच्या दुःखेंपणें आपण खापरीं । लाही तळीं वरी होय जैसी ॥ ४ ॥
तुका ह्मणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥ ५ ॥

॥ १२३४ ॥

ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतीमधीं विचारूनि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जयासी नावडे हरिनामकीर्तन । आणीक नृत्य न वैष्णवांचें ॥ ध्रु ॥
सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अंत्यजाचा ॥ २ ॥
तुका ह्मणे येथें मानी आनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥ ३ ॥

॥ १२३५ ॥

ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्वता निश्चयेसीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥ ध्रु ॥
शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ २ ॥
तुका ह्मणे गेल्या षडऊर्मी अंगें । सांडुनियां मग ब्रह्म चि तो ॥ ३ ॥

॥ १२३६ ॥

एक करिती गुरु गुरु । भोंवता भारु शिष्यांचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ ध्रु ॥

---

१ दे. मगतां.–२ पं. दुःखें पडे. ( दुःखी पणें ? ).–३ पं. नाम संकीर्तन ।.–४ "नर्त्तन" असावें.–५ पं. व्यवहार.–६ दे. अंतेजाचा.–७ दे. त. पं. कुष्ट.–८ दे. अंतेज.–९ दे. रामकृष्णें नाम उच्चारी सरळें । त. रामकृष्ण नाम०.–१० पं. सरळ.–११ दे. त. पं. शडऊर्मी.–१२ पं. ब्राह्मण तो.

परस्त्री मसणान । वैखोन मानविलें ॥ २ ॥
तुका ह्मणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ॥ ३ ॥

॥ १२३७ ॥

एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्यांचे घरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाप न लगे धुंडावें । लागेल तेणें तेथें जावें ॥ ध्रु. ॥
कांहीं दुसरा विचार । न लगे करावा चि फार ॥ २ ॥
असत्य जे वाणी । तेचि पापाची च खाणी ॥ ३ ॥
सत्य बोले मुखें । तेचि उत्तमकळी सुखें ॥ ४ ॥
तुका ह्मणे दोन्ही । जवळीच लाभहानी ॥ ५ ॥

॥ १२३८ ॥

जेवलें संचित । ऐसी आहे धर्म नीत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय ॥ ध्रु. ॥
नेदी कर्म घडों । काळें आडवाणें पडों ॥ २ ॥
तुका ह्मणे मळ । राहों नेदी तार जाळ ॥ ३ ॥

॥ १२३९ ॥

संतापाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उर फोडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वासरें तो मुके गाढवाचेपरी । उडे पाठीवरी दंड तेणें ॥ ध्रु. ॥
समय नेणे तें वेडें चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥ २ ॥
तुका ह्मणे काय वांयां चाळवणी । पिटपिटघाणी हागवणेची ॥ ३ ॥

१ प. मसणवाण.—२ न. तया घरीं.—३ न. ध्याणें.—४ प. असत्याची वाणी.—५ दे. जळावें. पं. जळे तें.—६ पं. आडवाणी.—७ प. फलकटेचा.—८ प. यमदंड.

॥ १२४० ॥

घेसी तरी घेईं संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सर्वभावें त्यांचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥ ध्रु ॥
करिसील तो करीं संतांचा सांगत । आणीक ते मात नको मना ॥ २ ॥
बैसेसी[2] तरी बैस संतां च मधीं । आणीक ते बुद्धि नको मना ॥ ३ ॥
जासी तरि जाईं संतांचिया गांवां । होईल विसावा तेथें मना ॥ ४ ॥
तुका ह्मणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥ ५ ॥

॥ १२४१ ॥

संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखक्लेश ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेथें मी राहीन[3] होऊनि याचक । घालितील भीक ते चि मज ॥ ध्रु
संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ २ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ३ ॥
संतांचा उदीम उपदेशाची पेंठ । प्रेमसुख साटीं घेती देती ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेथें आणिक नाहीं परी । ह्मणोनि भिकारी जालों त्यांचा ॥ ५

॥ १२४२ ॥

संतांचें[4] सुख जालें या देवा । ह्मणऊनि सेवा करी त्यांची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥ ध्रु ॥
निर्गुण आकार जाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ॥ २ ॥
तीर्थें त्यांची इच्छा करिती नित्यकाळ । व्हावया निर्मळ आचरणांसी ॥ ३ ॥

१ दे. संतांची भेटी.—२ पं. बैससील तर । बैस संतांमधीं ।—३ त. पं. राहेन.—४ त. संतांचें या सुख जालें तें या देवा ।.

अष्टमा सिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोणी तया ॥ ४ ॥
तुका ह्मणे ते बळिया शिरोमणी । राहिलों चरणीं निकटवासें ॥ ५ ॥

॥ १२४३ ॥

जो मानी तो देईल काई । न मनी तो नेईल काई ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मां विठ्ठल सर्वभूतीं । राहो[1] चित्तीं भलतैसा ॥ ध्रु ॥
आधीन[2] तें जना काई । जळें वांयांविण ठायीं ॥ २ ॥
वंदी निंदी तुज तो गा । तुका ह्मणे पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १२४४ ॥

भावबळें कैसा जालासी लाहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥ ध्रु ॥
पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आळिंगूनि[3] मिठी देइन पांयीं ॥ २ ॥
चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥ ३ ॥
तुका ह्मणे उत्कंठित[4] वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥ ४ ॥

॥ १२४५ ॥

कृपाळु ह्मणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आणीक उपाय नेणें[5] चि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें[6] ॥ ध्रु ॥
नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥ २ ॥
कृपा करिसी तरि थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥ ४ ॥

---

१ पं. हो चित्तीं०.—२ दे. त. आध्येन.—३ दे. त. आळंगुनि.—४ पं. उत्कंठित हे वासना.—५ दे. नेणें मी कांहीं. त. नेणें मी हे कांहीं.—६ पं. ऐसें.

॥ १२४६ ॥

सर्वभावें आलों तुज चि शरण । कायावाचामनेंसहित देवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आणीक दुसरें नेणे माझ्या मना । राहिली वासना तुझ्या पायीं ॥ ध्रु. ॥
माझिये वारचें कांहीं जडभारी । तुजविण वारी कोण एक ॥ २ ॥
तुझे आह्मी दास आमुचा तूं ऋणी । चालत दूरूनी आलें मागें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां घेतलें धरणें । हिशोबाकारणें भेटी देईं ॥ ४ ॥

॥ १२४७ ॥

कईं मात माझे ऐकती कान । बोलतां वचन संतां मुखीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ केला पांडुरंगें तुझा अंगीकार । मग होइल धीर माझ्या जीवा ॥ ध्रु. ॥
ह्मणऊनि मुख अवलोकितों पाय । हे चि मज आहे थोरी आशा ॥ २ ॥
माझिया मनाचा हा चि विश्वास । न करीं सायास साधनांचे ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज होईल भरवसा । तरलों मी ऐसा साच भाव ॥ ४ ॥

॥ १२४८ ॥

दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं ॥
कष्टलासी साटीं । भक्तिकाजें विठ्ठला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा ।
आह्मालागीं सोपा । दैत्या काळ कृतांत ॥ ध्रु. ॥
होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं ।

१ त. कायावाचामन सहित.—२ त. आलों.—३ पं. माझा.—४ पं. हा चि पै विश्वास.—
५ त. पं. साच भावें.—६ पं. तूं जगजेठी भक्तिकाजा.

ह्मणोनियां[1] घरीं । गौळियांचे अवतार ॥ २ ॥
केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसि देवा ।
तुका ह्मणे भावा । साटीं हातीं सांपडसी ॥ ३ ॥

॥ १२४९ ॥

गोड जालें पोट धालें । अवचित[2] वाचे आलें ।
ह्मणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ ।
पांतकी[3] चांडाळ । नामासाटीं आपुलिया ॥ ध्रु ॥
चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा ।
ह्मणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥ २ ॥
हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी ।
तुका ह्मणे दावी । रूप तें चि अरूपा[4] ॥ ३ ॥

॥ १२५० ॥

आंत हरि बाहेर हरि । हरिनें वरीं कोंडिलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हरिनें कांमा[5] घातला चिरा । वित्तवरा मुकविलें ॥ ध्रु ॥
हरिनें जीवें केली साटी । पांडिली[6] तुटी सकळांसी ॥ २ ॥
तुका ह्मणे वेगळा नव्हे । हरि[7] भोवे भोंवताला ॥ ३ ॥

॥ १२५१ ॥

हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥ ध्रु ॥
पारखियांसी सांगतां गोष्टी[8] । घरची कुटी[9] खातील ॥ २ ॥

१ पं. ह्मणोनिया हरी । गौळ्या घरीं अवतार ॥ .—२ पं. अवचिता.—३ पं. महा पातकी०.—४ पं. अरूप.—५ पं. काम.—६ पं. पडिली.—७ पं. हरि हा भोवे.—८ दे. त. गोटी.—९ पं. कुट.

तुका ह्मणे निवांत राहीं । पाहिलें पाहीं धणीवरि ॥ ३ ॥

॥ भुपाळ्या ॥ अभंग ॥ ८ ॥

॥ १२५२ ॥

बोलोनि दाऊं कां तुह्मी नेणा जी देवा ।
ठेवाल तें ठेवा ठायीं तैसा राहेन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय ।
ह्मणऊनि पाय जीवीं धरूनि राहिलों ॥ ध्रु ॥
त्यागें भोगें दुःख काय सांडावें मांडावें ।
ऐसी धरियेली जीवें माझ्या थोरी आशंका ॥ २ ॥
तुका ह्मणे माते बाळा चुकलिया वनीं ।
न [१]पेवतां जननी दुःख [२]पावे विठ्ठले ॥ ३ ॥

॥ १२५३ ॥

ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ ।
[३]कां हे कळवळ तुज उमटे चि ना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ [४]आवो पांडुरंगे पंढरीचे निवासे ।
लावूनियां [५]आंस चाळवूनी ठेविलें ॥ ध्रु ॥
काय जन्मा येवूनियां [६]केली म्यां जोडी ।
ऐसें घडीघडी चित्तां येतें आठवूं ॥ २ ॥
तुका ह्मणे खरा न पवे चि विभाग ।
धिकारितें जग हें चि लाहों हिशोबें ॥ ३ ॥

१ पं. परतूनि. २ त. पावतां.—३ पं. कांहो कळवळा तुह्मां उमटे चि ना.—४ पं. आहो.—
५ पं. असे.—६ पं. म्यां केली जोडी.

॥ १२५४ ॥

कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन ।
काय तुझी हीन शक्ति जालीसी दिसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लाज येते मना तुझा ह्मणवितां दास ।
गोडी नाहीं रस बोलिली यासारिखी ॥ ध्रु ॥
लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें ।
कळों येतें खरें दुजें एकावरूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी कोणें वदविली वाणी ।
प्रसादावांचूनि तुमचिया विठ्ठला ॥ ३ ॥

॥ १२५५ ॥

जळो माझें कर्म वांयां केली कटकट ।
जालें तैसें तंट नाहीं आलें अनुभवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां पुढें धीर काय देऊं या मना ।
ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥ ध्रु ॥
गुणवंत केलों दोष जाणायासाटीं ।
माझें माझें पोटीं बळकट दूषण ॥ २ ॥
तुका ह्मणे अहो केशीराजा दयाळा ।
बरवा हा ळळा पाळियेला शेवटीं ॥ ३ ॥

॥ १२५६ ॥

कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख ।

१पं. जालीसे ।.

बहु वाटे दुःख फुटों पाहे ह्रदय ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कां जी[1] सासुरवासी मज केलें भगवंता ।

आपुलिया सत्ता स्वाधीनता ते[2] नाहीं ॥ ध्रु ॥

प्रभातेसि वाटे तुमच्या यावें दर्शना ।

येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥ २ ॥

येथें अवघे वांयां गेले दिसती सायास ।

तुका ह्मणे नास दिसे जाल्या वेचाचा ॥ ३ ॥

॥ १२५७ ॥

जळोत तीं येथें उपजविती अंतराय ।

सायासाची जोडी माझी[3] तुमचे पाय ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां मज साह्य[4] येथें करावें देवा ।

तुझी घेई सेवा सकळ गोवा उगवूनि ॥ ध्रु ॥

भोगें रोगा जोडोनियां दिलें आणीकां ।

अरुचि ते हो कां आतां सकळांपासूनि ॥ २ ॥

तुका ह्मणे असो तुझें तुझे मस्तकीं ।

नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें[5] ॥ ३ ॥

॥ १२५८ ॥

न संगतां तुह्मां कळों येतें अंतर ।

विश्वीं[6] विश्वंभर परिहार[7] चि न लगे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ परि हे अनावर आवरितां आवडी ।

१ पं. कां गा.—२ दे. तें.—३ त. पं. माझ—४ दे. त. साहें.—५ दे. पं. वर्तनें.—६ दे. विश्वें विश्वीं भर.—७ पं. परीहर.

अवसान ते घडी पुरों[1] देत नाहीं ॥ ध्रु ॥
काय उणें मज येथें ठेविलिये ठायीं ।
पोटा आलों तईंपासूनिया समर्थ ॥ २ ॥
तुका ह्मणे अवघी आवरिली वासना ।
आतां नारायणा दुसरियापासूनि ॥ ३ ॥

॥ १२५९ ॥

तुजसवें आह्मीं अनुसरलों अबळा ।
नको अंगीं कळा राहों हरी हीनें[2] देऊं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांसुरवासा[3] भीतों जीव ओढे तुजपाशीं ।
आतां दोहींविशीं लज्जा राखें आमुची ॥ ध्रु ॥
न कळतां संग जाला सहज खेळतां ।
प्रवर्तली चिंता मागिलांचियावरि ॥ २ ॥
तुका ह्मणे असतां जैसें तैसें बरवें ।
वचन या भावें वेचुनियां विनटलों ॥ ३ ॥

॥ १२६० ॥ ॥ ८ ॥

रवि दीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें[4] संतांचे[5]नी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥ ध्रु ॥
तापली[6] चंदन निवविती कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥ २ ॥
मायबापें पिंड पाळियेला[7] माया । जन्ममरण जाया संतसंग ॥ ३ ॥

---

१ पं. "पुरों देत" याबद्दल "पुरों एकी देत."—२ त. हीण.—३ पं. सासुरवासी भीतें.—४ दे. त. दर्षणें.—५ पं. संतांचिया.—६ पं. तापलिया.—७ दे. पं. पाळीला.

संतांचें वचन वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूकनिवारण ॥ ४ ॥

तुका ह्मणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥ ५ ॥

॥ १२६१ ॥

हरि हरि तुह्मीं ह्मणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥ १ ॥

॥ध्रु.॥ आणिका नका कांहीं गाबाळाचे भरी । पडों[1] येथें थोरी नागवण ॥ध्रु॥

भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । ह्मणावा पतित वेळोवेळां ॥ २ ॥

तुका ह्मणे हा[2] तंव कृपेचा सागर । नामासाटीं पार पाववील ॥ ३ ॥

॥ १२६२ ॥

ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ॥ ध्रु ॥

त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥ २ ॥

तुका ह्मणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या[3] ॥ ३ ॥

॥ १२६३ ॥

गांठोळीस धन भाकावी करुणा । दावूनि सज्जना कींव पीडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नांठेळाची[4] भक्ति कुचरांचें बळ । कोरडें वोंगळ मार खाय ॥ध्रु॥

सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विल्हाळ त्या धोंडी पूजा दावी ॥२॥

तुका ह्मणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धंदधंद[5] सिंदळीचे ॥ ३ ॥

॥ १२६४ ॥

कैसें[6] असोनि ठाउकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणां[7] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां जागें[8] रे भाई जागें रे । चोर निजल्या नाडूनि भागे रे ॥ध्रु॥

---

१ पं. पडों तेथें.—२ पं. "हा तंव" यांच्या बद्दल "आहे."—३ दे. अयुशा. त. आविष्या.— ४ पं. नाटेळाची.—५ पं. धिंदधिंद.—६ पं. 'कैसें असोनि' हें ध्रुवपद असून 'आतां जागा' हें पहिलें कडवें आहे.—७ पं. पणा.—८ पं. जागा रे भाई जागा रे । भागा रे ।—

आतां नका रे भाई नका रे । आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ॥ २ ॥
तुका ह्मणे एकांच्या घायें । कां रे जाणोनि न धरा भये ॥ ३ ॥

॥ १२६५ ॥

मुदल जतन जालें । मग लाभाचें काय आलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घरीं देउनि अंतर गांठी । राखा[2] पारिख्यां न सुटे मिठी ॥ ध्रु ॥
घाला पडे थोडें च वाटे । काम मैंदाचें च पेटे ॥ २ ॥
तुका ह्मणे वरदळ खोटें । फांसे अंतरिंच्या कपटें ॥ ३ ॥

॥ १२६६ ॥

मज अंगाच्या अनुभवें । काई वाईट बरें[3] ठावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जालों दोहींचा[4] देखणा । नये मागें पुढें हीं मना ॥ ध्रु ॥
वोस वसती[5] ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥ २ ॥
तुका ह्मणे घेऊं देवा । सर्वें करूनि बोळावा ॥ ३ ॥

॥ १२६७ ॥

पाववावें ठाया । ऐसें सर्वें बोलों तया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भावा ऐसी क्रिया राखे । खोट्या खोटेपणें[6] वाखे ॥ ध्रु ॥
न ठेवूं अंतर । कांहीं भेदाचा पदर ॥ २ ॥
तुका ह्मणे जीवें भावें । सत्या[7] मानविजे देवें ॥ ३ ॥

॥ १२६८ ॥

मोल देऊनियां सांटवावे दोष । नटाचे ते वेष[8] पाहोनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हरिदासां मुखें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यें पुण्य विशेषता ॥ ध्रु ॥

---

१ पं. गांठीस.–२ दे. राख्या.–३ त. वरवें–४ पं. देहींचा.–५ पं. वोसींत.–६ पं. खोटेपण.–७ पं. सत्य.–८ दे. पं. वेश.

हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेशें । पाप त्यासरिसें मात्रागमन ॥ २ ॥
तुका ह्मणे पाहा ऐसें जालें जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥ ३ ॥

॥१२६९ ॥

[1]बहुक्षीदक्षीण । [2]आलों सोसुनियां वन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठोबा विसांवया विसांवया । पडों देईं पायां ॥ ध्रु ॥
बहुतां काकुलती । आलों सोसिली फजिती ॥ २ ॥
केली तुजसाटीं । तुका ह्मणे येवढी आटी ॥ ३ ॥

॥ १२७० ॥

कांगा धर्म केला । असोन सत्तेचा आपुला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उभाउभीं पाय जोडीं । आतां फांकों नेदीं घडी ॥ ध्रु ॥
नको सोडूं ठाव । आतां घेऊं नेदीं वाव ॥ २ ॥
तुका ह्मणे इच्छा । तैसा करीन सरिसा ॥ ३ ॥

॥ १२७१ ॥

तुमची तों भेटी नव्हे ऐसी जाली । कोरडी च बोली ब्रह्मज्ञान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां न बोलावें ऐसें वाटे देवा । संग न करावा कोणां सवें ॥ ध्रु ॥
तुह्मां निमित्यासी सांपडलें अंग । [3]नेदांवा हा संग विचारिलें ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी राहिली वासना । आवडी दर्शनाची च होती ॥ ३ ॥

॥ १२७२ ॥

आहे तें चि आह्मी मागों तुजपाशीं । [4]नव्हों तुज ऐसीं क्रियानष्टें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ [5]न बोलावीं तों च वर्मं बरें दिसे । प्रकट ते कैसे गुण करूं ॥ ध्रु ॥

---

१ **त.** बहुक्षेद.–( क्षोद ? )–क्षीण.–२ **पं.** जालों.–३ **त.** न द्यावा.–४ **पं.** नव्हे तुज ऐसीं क्रियानष्ट.– ५ **त.** न बोलावीं वर्मं तों चि बरें दिसे.

एका ऐसें[1] एका द्यावेयाचा[2] मोळा । कां तुह्मां गोपाळा नाहीं ऐसा ॥ २॥
तुका ह्मणे लोकां नाहीं कळों आलें । करावें आपुलें जतन तों ॥ ३ ॥

॥ १२७३ ॥

आह्मीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आहे तैसा[3] असो आतां । चिंतें[4] चिंता वाढते ॥ ध्रु ॥
बोलिल्याचा मौनी सीण । भिन्न भिन्न राहावें ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मांपाशीं । धीराऐसी जतन ॥ ३ ॥

॥ १२७४ ॥

आह्मांपाशीं[5] याचें बळ । कोण काळवरी तों[6] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करूनि[7] ठेलों जीवेंसाटीं । होय भेटी तोंवरि ॥ ध्रु ॥
लागलों तों न फिरें पाठीं । पडिल्या गांठी वांचूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे अवकाशें । तुमच्या ऐसें होवया[8] ॥ ३ ॥

॥ १२७५ ॥

बोलिलें चि बोलें पडपडताळूनि[9] । उपजत मनीं नाहीं शंका ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बहुतांची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ बुझाविसी[10] ॥ध्रु॥
बहुतांच्या भावें[11] वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तों श्रम न वजे वांयां ॥ ३ ॥

॥ १२७६ ॥ ॥ १२ ॥

कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आड कांहीं नये दुजें । फळ बीजें आणिलें ॥ ध्रु ॥

---

१ पं. ऐसा.–२ पं. द्यावा त्याचा.–३ पं. तैसें.–४ पं. चित्तें.–५ पं. मनी.–६ पं. तें.–
७ पं. धरूनि.–८ त. व्हावया.–९ पं. पडत पडताळूनि.–१० पं. बुझविसी.–११ पं. नांवें.

उद्वेग ते[1] वांयांविण । कैंचा सीण चिंतनें ॥ २ ॥
तुका ह्मणे गेला भ्रम । तुमच्या धर्में पायांच्या ॥ ३ ॥

॥ १२७७ ॥

संसार तो कोण देखे । आह्मां सखे हरिजन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काळ ब्रह्मानंदें सरे । आवडी उरे संचली ॥ ध्रु ॥
स्वर्मीं ते ही नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥ २ ॥
तुका ह्मणे ब्रह्मरसें । होय सरिसें भोजन ॥ ३ ॥

॥ १२७८ ॥

पडियेलों वनीं थोर चिंतवनी । उसीर कां आझूनि लावियेला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां ॥ध्रु॥
काय तुज नाहीं लौकिकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां ॥ २ ॥
तुका ह्मणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥ ३ ॥

॥ १२७९ ॥

आपुले गांवींचें न देखेसें जालें । परदेसी एकलें किती कंठूं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि पाहें मूळ येतां वाटे । जीवलग भेटे कोणी तरी ॥ ध्रु ॥
पाहातां अवध्या दिसतील दिशा । सकळ ही वोसा दृष्टीपुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे कोणी न संगे वारता । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १२८० ॥

जन तरी देखें[2] गुंतलें प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यासी नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि मागें परतलें मन । घालणीचें रान देखोनियां ॥ ध्रु ॥

---

१ पं तो –२ पं. देखा गुंतले प्रपंच । स्मरण तों त्याचें०.

इंद्रियांचा गाजे गोंधळ ये ठायीं । फोडीतसे डोई अहंकार ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा वासनेच्या आटें । केलीं तळपटें बहुतांचीं ॥ ३ ॥

॥ १२८१ ॥

धांवे त्यासी फावे[1] । दुजे उगवूनि गोवे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घ्यावें भरूनियां घर । मग नाहीं येरझार ॥ ध्रु ॥
धणी उभें केलें । पुंडलिकें या उगलें ॥ २ ॥
तुका ह्मणे ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ ३ ॥

॥ १२८२ ॥

लाहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐरावत[2] रत्न थोर । तैया[3] अंकुशाचा मार ॥ ध्रु ॥
ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥ २ ॥
तुका ह्मणे जाण । व्हावें लाहनाहुनि लाहन ॥ ३ ॥

॥ १२८३ ॥

नीचपण[4] बरवें देवा । न चले कोणाचा[5] ही दावा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ महा पुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहाती ॥ ध्रु ॥
येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरि ॥ २ ॥
तुका ह्मणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ३ ॥

॥ १२८४ ॥

उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥ १ ॥
ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ॥ २ ॥

---

१ पं. पावे.—२ पं. एरावती.—३ पं. त्यासी.—४ दे. निंचपण.—५ पं. कोणाचा ची.

तुका ह्मणे एक[1] नारायण ध्याई । वरकडा वाहीं शोक असे ॥ ३ ॥

॥ १२८५ ॥

आवडीच्या मतें करिती भजन । भोग नारायणें ह्मणती केला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अवघा देव ह्मणे वेगळें तें काय । अर्थासाटीं डोय फोडूं पाहे ॥ ध्रु

लाजे के[2]मंडल धरितां भोपळा । आणीक थींगळा प्रावरणा ॥ २ ॥

शाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं । नैश्वै[3]र्य बोलती अवघें मुखें ॥ ३ ॥

तुका ह्मणे यांस[4] देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटि जन्म घेतां ॥ ४ ॥

॥ १२८६ ॥

ह्मणतां[5] हरिदास कां[6] रे नाहीं लाज । दीनास महाराज ह्मणसी हीना ॥ १ ॥

काय ऐसें पोट न भ[7]रे तें गेलें । हालविसी कुले सभेमाजी ॥ २ ॥

तुका ह्मणे पोटें केली विटंबना । दीन जाला जना कींव भाकी ॥ ३ ॥

॥ १२८७ ॥

रिद्धिसिद्धी दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ लोडें बा[8]लिस्तें पलंग सुपति । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥ ध्रु

पुसाल तरि आह्मां वैकुंठींचा वास । परि नाहीं राह्यास ठाव कोठें ॥ २ ॥

तुका ह्मणे आह्मी राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचें उणें पुरें ॥ ३ ॥

॥ १२८८ ॥

घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नि[9]रें कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥ ध्रु ॥

आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दूरोनि दिसतसे ॥ २ ॥

---

१ पं. एका नारायणा.—२ पं. कुमंडल.—३ पं. नैश्वर.—४ त. पं. तयां.—५ पं. ह्मणवितां.—६ पं. 'कां रे' याच्याबद्दल 'कांहीं' असें आहे.—७ पं. भरेसें जालें.—८ त. लोडें आणि बालिस्तें.—९ पं. नीरें.

काम क्रोध लोभ सिणवी बहुत । मेळवूनि आंत काळकूट ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें कांहीं हातां नये । [1]आयुष्य मोलें जाये वांयांविण ॥ ४॥

॥ १२८९ ॥

अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघी च दान दिली भूमि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघा चि [2]काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥ ध्रु ॥
अवघीं च तीर्थें व्रतें केले याग । अवघें चि सांग जालें कर्म ॥ २ ॥
अवघें चि फळ आलें आह्मां हातां । अवघें चि अनंता समर्पिलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां [3]बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥ ४ ॥

॥ १२९० ॥

महुरा ऐसीं फळें नाहीं । आलीं कांहीं गळती । १ ॥
॥ ध्रु. ॥ पक्कदशे येती थोडीं । नास आढी वेचे तों ॥ ध्रु ॥
[4]विरळा पावे विरळा पावे । अवघड गोवे सेवटाचे ॥ २ ॥
उंच निंच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी ॥ ३ ॥
झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणी बहु थोडे ॥ ४ ॥
पावेल तो पैल थडी । ह्मणों गडी आपुला ॥ ५ ॥
तुका ह्मणे उभाग्यानें । [5]कोण खरें मानितसे ॥ ६ ॥

॥ १२९१ ॥

अवघ्या उपचारा । एक [6]मन चि दातारा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घ्यावी घ्यावी हे चि सेवा । [7]माझी दुर्बळाची देवा ॥ ध्रु ॥

---

१ पं. आयुष्यमोल.—२ त. काळ वेळ दिनशुद्धी—३ पं. बोलणें.—४ दे. पं. विरुळा पावे विरुळा.—५ पं. खरें कोण.—६ दे. मनें.—७ पं. दीवदुर्वळाची०.

अवघियाचा ठाव । पायांवरि जीवभाव ॥ २ ॥
चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥ ३ ॥

॥ १२९२ ॥

आली सलगी पायांपाशीं । होइल तैसी करीन ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ आणीक आह्मीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥ ध्रु ॥
अवघ्या निरोपणा भाव । हा चि ठाव उरलासे ॥ २ ॥
तुका ह्मणे पाळीं लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥ ३ ॥

॥ १२९३ ॥

देह आणि देहसंबंधें निंदावीं । इतरें वंदावीं श्वानशूकरें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येणें नांवें जाला मी माझ्याचा झाडा । मोहा नांवें खोडा गर्भवास ॥ ध्रु ॥
गृह आणि वित्त स्वदेशा विटावें । इतरा भेटावें श्वापदझाडां[1] ॥ २ ॥
तुका ह्मणे मी हें[2] माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन ॥ ३ ॥

॥ १२९४ ॥

देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कळिवर ओंवाळूनि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें॥ ध्रु ॥
करुणावचनीं लाहो एकसरें । नेदावें[3] दुसरें आड येऊं ॥ २ ॥
तुका ह्मणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥ ३ ॥

---

१ पं. श्वापदा झाडां.–२ त. “ मी हें ” याच्याबद्दल “ मुखें. ”–३ त. न द्यावें.

॥ १२९५ ॥

देह नव्हे मी हें सरे । उरला उरे विठ्ठल ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि लाहो करा । काळ सारा चिंतनें ॥ ध्रु ॥
पाळणाची नाहीं चिंता । ठाव रिता देवाचा ॥ २ ॥
तुका ह्मणे जीवासाटीं । देव पोटीं पडेल ॥ ३ ॥

॥ १२९६ ॥

पृथक मी सांगों किती । धर्म नीती सकळां ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ अवघियांचा एक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ॥ ध्रु ॥
क्षराअक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥ २ ॥
तुका ह्मणे आगमींचें । मथिलें साचें नवनीत ॥ ३ ॥

॥ १२९७ ॥

पुण्यविकरा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आत्महत्यारा हा[1] विषयांचा लोभी । ह्मणावें तें नाभी करवी दंड ॥ ध्रु ॥
नागवला अल्प लोभाचिये साटीं । घेऊनि कांचवटि परिस दिला ॥ २ ॥
तुका ह्मणे हात झाडिले परत्रीं । श्रेम[2] तो चि श्रोत्रीं वेठी केली ॥ ३ ॥

॥ १२९८ ॥

अंतरींचें ध्यान । मुख्य या नांवें पूजन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उपाधि तें अवघें पाप । गोड[3] निरसतां संकल्प ॥ ध्रु ॥
आज्ञा पाळावी हा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ २ ॥
तुका ह्मणे वृत्ति । अविट हे सहज स्थिति ॥ ३ ॥

---

१ पं. 'हा' हा शब्द नाहीं.—२ पं. श्रम तो श्रोत्रीं ठेवी केली.—३ पं. गोडी.

॥ १२९९ ॥

मूळ करणें संतां । नाहीं मिळत उचिता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥ ध्रु ॥
सागर सागरीं । सामावेसी कैंची थोरी ॥ २ ॥
तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ३ ॥

॥ १३०० ॥

बरवी नामावळी । तुझी महादोषां होळी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जालें आह्मांसी जीवन । धणीवरि हें सेवन ॥ ध्रु ॥
सोपें आणि गोड । किती अमृता ही वाड ॥ २ ॥
तुका ह्मणे अच्युता । आमचा कल्पतरु दाता ॥ ३ ॥

॥ १३०१ ॥

तृषाकाळीं उदकें भेटी । पडे मिठी आवडीची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥ ध्रु ॥
मिष्टान्नाचा योग भुके । ह्मणतां चुके पुरेसें ॥ २ ॥
तुका ह्मणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ३ ॥

॥ १३०२ ॥

कुंचराचे श्रवण । गुणदोषांवरि मन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ असोनियां नसे कथे । मूर्ख अभाग्य तें तेथें ॥ ध्रु ॥
निरर्थक कारणीं । कान डोळे वेची वाणी ॥ २ ॥
पापाचे सांगाती । तोंडीं ओढाळांचे माती ॥ ३ ॥

---

१ पं. कारण.—२ दे. त. त्रुशाकाळें०.—३ त. कुचराचें.—४ दे. करणीं.

हिताचिया नांवें । वोस पडिले देहभावें ॥ ४ ॥
फजीत करूनि सांडी । तुका करी बोडाबोडी ॥ ५ ॥

॥ १३०३ ॥

जग तरि आह्मां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येतो हिताचा कळवळा । पडती हातीं ह्मून[2] काळा ॥ छ ॥
नाहीं कोणी सखा । आह्मां निपराध पारिखा ॥ २ ॥
उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥ ३ ॥

॥ १३०४ ॥

सोपें[3] वर्म आह्मां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ समाधीचें सुख सांडा ओंवाळून[4] । ऐसें हें कीर्तन ब्रह्मरस ॥ छ ॥
पुढती घडे[5] चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ २ ॥
उपजों चि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ४ ॥

॥ १३०५ ॥

गंगा न देखे विटाळ । तें चि रांजणीं ही जळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अल्पमहत्त्वा नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ॥ छ ॥
काय खंडिली भूमिका । वर्णा पायरिका लोकां ॥ २ ॥
तुका ह्मणे अग्नीविण । बीजें वेगळीं तों भिन्न ॥ ३ ॥

॥ १३०६ ॥

देवावरिल भार । काढूं नये कांहीं पर ॥ १ ॥

---

१ पं. सोडी.–२ पं. ह्मणोनि.–३ त. हें कडवें येथें अभंगांत नाहीं. पं. मूळचेंच आहे दे. या ठिकाणीं नवीन घातलें आहे.–४ पं. ओंवाळूनी । ऐसा हा कीर्तनीं ब्रह्मरस.–५ पं. घडतें.

॥ ध्रु. ॥ तानभुके आठवण । घडे तें बरें चिंतन ॥ ध्रु ॥
देखावी निश्चिंती । ते चि अंतर श्रीपती ॥ २ ॥
वैभव सकळ । तुका मानितो विटाळ ॥ ३ ॥

॥ १३०७ ॥

थुंकोनियां मान । दंभ करितों कीर्तन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ॥ ध्रु ॥
अर्थ अनर्थ सारिखा । करूनि ठेविला पारिखा ॥ २ ॥
उपाधिवेगळा । तुका राहिला सोंवळा ॥ ३ ॥

॥ १३०८ ॥

काय ह्याचें घ्यावें । नित्य नित्य कोणें गावें ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ केलें हरिकथेनें वाज । अंतरोनि जाते निज ॥ ध्रु ॥
काम संसार । अंतरीं हे करकर ॥ २ ॥
तुका ह्मणे हेंड । ऐसे मानिती ते लंड ॥ ३ ॥

॥ १३०९ ॥

वदे साक्षत्वेंसीं वाणी । नारायणीं मिश्रित ॥ १ ॥
॥ध्रु. ॥ न लगे कांहीं चाचपावें । जातों भावें पेरीत ॥ ध्रु ॥
भांडार त्या दातियाचें । मी कैचें ये ठायीं ॥ २ ॥
सादावीत गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥ ३ ॥

॥ १३१० ॥

ऐसी जिव्हा निकी । विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥ १ ॥

१ पं. तुकोनिया.—२ पं. अंतरे.

॥ ध्रु. ॥ जेणें पाविजे उद्धार । तेथें राखावें अंतर ॥ ध्रु ॥
गुंपोनि चावटी । तेथें कोणा लाभें भेटी ॥ २ ॥
तुका ह्मणे कळा । देवाविण अमंगळा ॥ ३ ॥

॥ १३११ ॥

साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ व्यभिचारा टाकमटिका । उपहास होती लोकां ॥ ध्रु ॥
शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥ २ ॥
तुका ह्मणे जिणें । शर्तीविण लाजिरवाणें ॥ ३ ॥

॥ १३१२ ॥

मानामान किती । तुझ्या क्षुल्लका संपत्ती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जा रे चाळवीं बापुडीं । कोणी धरिती तीं गोडी ॥ ध्रु ॥
रिद्धिसिद्धी देसी । आह्मीं चुंभळें नव्हों तैसीं ॥ २ ॥
तुका ह्मणे ठका । ऐसें नागविलें लोकां ॥ ३ ॥

॥ १३१३ ॥

पाहातोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वरि ठेवूं दे मस्तक । ठेलों जोडूनि हस्तक ॥ ध्रु ॥
बरवें करीं सम । नको भंगों देऊं प्रेम ॥ २ ॥
तुका ह्मणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ३ ॥

॥ १३१४ ॥

भक्त[३] ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥

१ पं. कोण लाभ. २ पं. धरितील ते गोडी.— ३ पं. भक्ता ऐसे.

॥ध्रु.॥ विषय तो त्यांचा जाला नारायण। नावडे धन जन माता पिता ॥छ॥
निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहीं च सांकडें पडों नेदी ॥ २ ॥
तुका ह्मणे सत्य कर्मा व्हावें सांह्मे । घातलिया भये नर्का जाणें ॥ ३ ॥

॥१३१५॥

तों च हीं क्षुल्लकें सखीं सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखी तों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नारायण विश्वंभर विश्वपिता। प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥छ॥
रवि नुगवे तों दीपिकांचें[2] काज । प्रकाशें[3] तें तेज सहज लोपे ॥ २ ॥
तुका ह्मणे देहसंबंध संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥ ३ ॥

॥ १३१६ ॥

यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कारियां[4] कारणा ।
पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एक परी पडिलें भागीं । फळ बीजाचिये अंगीं ।
धन्य तो चि जगीं । आदि अंत सांभाळी ॥ छ ॥
आवश्यक[5] तो शेवट । मागें अवघी खटपट ।
चालों जाणे वाट । ऐसा विरळा एखादा ॥ २ ॥
तुका होवोनि निराळा । क्षराअक्षरावेगळा[6] ।
पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें[7] ॥ ३ ॥

॥ १३१७ ॥

वेदपुरुष तरि नेती कां वचन । निवडूनि भिन्न दाखविलें ॥ १ ॥

---

१ दे. त. साहे.—२ दे. प. दीपिकाचें.—३ पं. प्रकाश तें.— ४ दे. त. कारिये.— ५ दे. आवश्यक. पं. आवस्यक.—६ पं. क्षराक्षरावेगळा.—७ पं. विठ्ठल प्रसाद

॥ ध्रु. ॥ तुझीं वर्मै तूं चि दावूनि अनंता । होतोसी नेणता कोण्या गुणें ॥ ध्रु ॥

यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग । उणें पडतां अंग क्षोभ घडे ॥ २ ॥

वससी तूं या भूतांचे अंतरीं । तरि कां भेद हरी दावियेला ॥ ३ ॥

तपतिर्थाटणें[1] तुझें[2] मूर्तिदान । तरि कां अभिमान आड येतो ॥ ४ ॥

आतां क्षमा कीजे विनवितो तुका । देऊनियां हाँका[3] उभा द्वारीं ॥ ५ ॥

## लोहागांवीं स्वामींच्या अंगावर ऊन पाणी घातलें-तो अभंग ॥ १ ॥

॥ १३१८ ॥

जळे[4] माझी काया लागला वोणवा । धांव रे केशवा मायबापा ॥ १ ॥

। ध्रु. ॥ पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन जालें ॥ ध्रु ॥

फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहातोसी काय ह्रदय माझें ॥ २ ॥

घेऊनि जीवन धांवें लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ३ ॥

तुका ह्मणे माझी तूं होसी जननी । आणीक निर्वाणीं कोण राखे ॥ ४ ॥

॥ १३१९ ॥ ॥ १ ॥

अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥

॥ध्रु.॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ॥ध्रु॥

ऐसा हा निवाडा जालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ २ ॥

तुका ह्मणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥ ३ ॥

---

१ पं. तपें तीर्थाटणें.—२ दे. पं. तुझे.—३ पं. तुका. ( ह्मणजे पंढरपुरच्या प्रतींत या अभंगांत दोन वेळ "तुका" हा शब्द एकाच अर्थानें घातला आहे. )—४ पं. जळो.

## नामदेव व पांडुरंग यांनीं स्वप्नांत येऊन स्वामींस आज्ञा केली कीं कवित्व करणें– ते अभंग ॥ २ ॥

॥ १३२० ॥

नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको[1] ॥ ध्रु ॥
माप टाकी सळ[2] धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥ २ ॥
प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले[3] शेवटीं लावी तुका ॥ ३ ॥

॥ १३२१ ॥

द्याल ठाव तरि राहेन संगती । संतांचे पंगती[4] पायांपाशीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥ ध्रु ॥
सेवटील स्थळ नीचं[5] माझी वृत्ति । आधारें विश्रांती पावईन ॥ २ ॥
नामदेवापायीं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥ ३ ॥ ॥ २ ॥

॥ १३२२ ॥

त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणां जोगें ।
एक जातां[6] लागे । एक पाठी लागतें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ ।
करितां कोल्हाळ । कृपे खांदां हरि वाहे ॥ ध्रु ॥
पापपुण्यात्मयाच्या[7] शक्ती । असती योजिल्या श्रीपती ।
यावें काकुलती । तेथें[8] सत्तानायेका ॥ २ ॥
तुका उभा पैल थडी । तरि हे प्रकाश निवडी ।

१ त. नये.–२ त. सळे–३ पं. उरले ते सेवटीं.–४ पं. संगती.–५ दे. निंच.–६ त. आतां.–७ पं. पापपुण्यात्मा याच्या०.–८ पं. येथें.

घातल्या सांगडी । तापे पेटीं हाकारी ॥ ३ ॥

॥ १३२३ ॥

देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंतीं ॥ १ ॥
॥ धु. ॥ जैसा भाव तैसें फळ । स्वातीतोय एक जळ ॥ ध्रु ॥
पाहे सांगे आणि जेवी । अंतर महदंतर[1] तेवी ॥ २ ॥
तुका ह्मणे हिरा । पारखियां मूढां गारा ॥ ३ ॥

॥ १३२४ ॥

अनुभवें अनुभव अवघा चि साधिला । तरि स्थिरावला मनु ठायीं ॥ १ ॥
॥धु॥. पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनियां ॥ध्रु॥
एक चि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजी त्रयीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जिंकिला संसार ॥ होऊनि किंकर विठोबाचे ॥ ३ ॥

॥ १३२५ ॥

ऐसिया संपत्ती आह्मां संवसारी[2] । भोगाचिया परि काय सांगों ॥ १ ॥
॥ धु. ॥ काम तो कामना भोगीतसे देवा । आळिंगणें हेवा चरण चुंबीं ॥ ध्रु ॥
शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें तें पाप भेदबुद्धि ॥ २ ॥
तुका ह्मणे पाहें तिकडे सारिखें । आपुलें पारिखें[3] निरसलें ॥ ३ ॥

॥ १३२६ ॥

राम राज्य राम प्रजा लोकपाळ । एक चि सकळ दुजें नाहीं ॥ १ ॥
॥ धु. ॥ मंगळावांचूनि उमटेना वाणी । अखंड चि खाणी एकी रासी ॥ध्रु॥

१ दे. त. प. महदांतर.–२ पं. संसारीं.–३ त. पारखें.

मोडलें हें स्वामी ठा[1]याठाव सेवा । वा[2]ढवावा हेवा कोणा अंगें ॥ २ ॥
तुका ह्मणे अवघें दुमदुमिलें देवें । उरलें तें गावें हें चि आतां ॥ ३ ॥

॥ १३२७ ॥

निवडोनि वाग काढिले निराळे । प्रमाण डोहळे यावरि ते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जयाचा विभाग तयासी च फ[3]ळे । देखणें निराळें कौतुकासी ॥ध्रु॥
शूर तो ओळखे घा[4]यडायहात । येरां होइल मात सांगायासी ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी के[5]ळवते वाणी । केला निजस्थानीं जाणवसा ॥ ३ ॥

॥ १३२८ ॥

याजसाटीं केला होता अ[6]टाहास । शे[7]वटाचा दिस गोड व्हावा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां निश्चिं[8]तीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥ध्रु॥
कवतुक वाटे जालिया वेचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ २ ॥
तुका ह्मणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥ ३ ॥

॥ १३२९ ॥

भक्तीचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माउलीचे मागें बा[9]ळकांची हरी । एका [10]सूत्रें दोरी ओढतसे ॥ध्रु॥
जेथील जें मा[11]गे तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥ २ ॥
सेवेचिये सत्ते धनी च सेवक । आपुलें तें एक न वंची कांहीं ॥ ३ ॥
आदिअंताठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे मग उंचा[12]सन ॥ ४ ॥
भावारूढ तुका जाला एकाएकीं । देव च लौकिकीं अवघा केला ॥ ५ ॥

---

१ पं. टाया टाव.—२ दे. वाढवा तो.—३ त. फळें—४ पं. डायघायहात.—५ त. केळवती.—६ दे. त. पं. आटाहास्ये—७ पं. सेवटीचा.—८ त. निश्चितीनें.—९ त. बाळकाच्या. पं. बाळकाचे.—१० पं. सूत्र.—११ पं. मागे रायासमोर.—१२ दे. पं. उंचासनी.

॥ १३३० ॥

सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनु[1]भव तो पोटीं कैचा घडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भजनाचे सोई जगा प[2]रिहार । नेणत्यां सादर चित्त कथे ॥ ध्रु ॥
नाइकवे कानीं साधन उपाय । ऐकतो गाय ह[3]रुषें गीत ॥ २ ॥
नव्हे आराणूक जावयासी वनां । वेध कामिमना हरिकथेचा ॥ ३ ॥
काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अ[5]ष्टप्रहर ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी खेळों भातुकुलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥ ५ ॥

॥ १३३१ ॥

जाणपण बरें दे[6]वाचिये शिरीं । आह्मी ऐसीं बरीं नेणतीं च ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देखणियांपुढें रुचे कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥ ध्रु ॥
आ[7]शंकेची बाधा नाहीं लडिवाळां । चित्त वरि खेळा समबुद्धि ॥ २ ॥
तुका ह्मणे दिशा मोकळ्या सकळा । अवकाशीं खेळा ठाव जाला ॥ ३ ॥

॥ १३३२ ॥

वचनांचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जातां घरा मागें । उरों नेणें खंती । मिळाल्या [8]बहुती फांकलि-
या ॥ ध्रु ॥
उदयीं च अस्त उद[9]यें संपादला । कल्पनेचा केलां[10] जागेपणें ॥ २ ॥
जा[11]णवूनि गेला हांडोरियां पोरां । सावध इतरां करुनी तुका ॥ ३ ॥

---

१ पं. अनुभव पोटीं०.–२ पं. परिचार.–३ पं. हर्षगीत.–४ पं. वचना.–५ पं. अष्टे प्रहर ( अष्टौ प्रहर. )–६ दे. पं. देवाचें.–७ दे. पं. आशंकेचा.–८ दे. वहुतीं –९ दे. त. पं. उदयो.–१० त. जाला.–११ पं. जाणोनियां.

## स्वामींस संतांनीं पुसलें कीं तुह्मांस वैराग्य कोण्या प्रकारें जालें तें सांगा–ते अभंग ॥ २ ॥

॥ १३३३ ॥

यौती शूद्र वंश केला वेवसाव । आदि तो हा देव कुळपूज्य ॥ १ ॥
॥ धु॰ ॥ नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुह्मीं संतीं ॥ध्रु॥
संवसारें जालों अतिदुःखें दुखी । मायबाप सेखीं क्रमिलिया ॥ २ ॥
दुष्काळें आटिलें द्रंव्यें नेला मान । स्त्री एकी अन्नअन्न करितां मेली ॥३॥
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखें तुटी येतां ॥ ४ ॥
देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ५ ॥
आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ६ ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ७ ॥
गातीं पुढें त्यांचें धरावें धृपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ८ ॥
संताचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ ९ ॥
टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ १० ॥
वचन मानिलें नाहीं सुत्दृदाचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ ११ ॥
सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १२ ॥
मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १३ ॥
यावरिया जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १४ ॥
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १५ ॥
बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥

१ दे. याति शुद्र वैश. पं. याति शुद्ध वैश्य. त. याति शुद्र वौंश.–२ दे. त. कर्मलिया.–३ पं. त. द्रव्य–४ पं. करित.–५ दे. पं. देख.–६ पं. त. होतें जें भंगलें.–७ पं. पर उपकार.–८ दे. सुहृदाचें.–९ पं. सत्यअसत्याचें.–१० पं. यावरी.

विस्तारीं सांगतां बहुत प्रकार। होईल उशीर आतां पुरे ॥ १७ ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार। पुढील प्रकार देव जाणे ॥ १८
भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा। कृपावंत ऐसा कळों आलें ॥ १९
तुका ह्मणे माझें सर्व भांडवल। बोलविले बोले पांडुरंगें ॥ २० ॥

॥ १३३४ ॥

ऐका वचन हें संत। मी तों आगळा पतित।
काय काजें प्रीत। करीतसां आदरें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें चित मज ग्वाही। सत्य तरलों मी नाहीं।
एकांचिये वांहीं। एक देखीं मानिती ॥ ध्रु ॥
बहु पीडिलों संसारें। मोडीं पुसें पिटीं ढोरें।
न पडतां पुरें। या विचारें राहिलों ॥ २ ॥
सहज सरलें होतें कांहीं। द्रव्य थोडें बहु तें ही।
त्याग केला नाहीं। दिलें द्विजां याचकां ॥ ३ ॥
प्रियापुत्रबंधु। यांचा तोडिला संबंधु।
सहज जालों मंदु। भाग्यहीन करंटा ॥ ४ ॥
तोंड न दाखवे जना। शिरें सांदी भरें राणां।
एकांत तो जाणां। तयासाटीं लागला ॥ ५ ॥
पोटें पिटिलों[३] काहारें। दया नाहीं या विचारें।
बोलाविता बरें। सहज ह्मणें यासाटीं ॥ ६ ॥
सहज वडिलां होती सेवा। ह्मणोनि पूजितों या देवा।

१ पं. आला.—२ दे. "बोल" हा शब्द नाहीं.—३ पं पीडिलों.

तुका ह्मणे भावा । साटीं ह्मणी घ्या कोणी ॥ ७ ॥

॥ १३३५ ॥

बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा[1] वमन संवसार ॥ ध्रु ॥
बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ २ ॥
बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ३ ॥
बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ४ ॥
बरें जालें तुझें केलें देवाईल । लेंकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ६ ॥

॥ १३३६ ॥

बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येणें सोसें[2] मन जालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥ ध्रु ॥
बंधनापासूनि उकलली गांठी । देतां आली मिठी सौंवकाशें[3] ॥ २ ॥
तुका ह्मणे देहं[4] भारिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥ ३ ॥

॥ १३३७ ॥

मीचि मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां पुरले नवस । निरसोनी गेली आस ॥ ध्रु ॥
जालों बरा बळी । गेलों मरोनि तेकाळीं ॥ २ ॥
दोहींकडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥ ३ ॥

---

१ पं. "हा" हा शब्द नाहीं.—२ पं. सोस० परत माघारी०.—३ पं. सावकाश.—४ पं.० देहीं भरला विठ्ठल । काम क्रोध केलें०.

॥ १३३८ ॥

जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आधीं आपणयां नासी । तरि उतरे ये कसीं ॥ ध्रु ॥

ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें[1] हें निश्चयें उत्तर ॥ २ ॥

तुका ह्मणे ते उन्मनी । नास कारया कारणीं ॥ ३ ॥

॥ १३३९ ॥

साधनांच्या कळा आकार आकृति । कारण नवनीतीं मथनाचें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पक्षियासी नाहीं मारगीं आडताळा । अंतरिक्षीं[2] फळासी चि पावे ॥ ध्रु ॥

भक्तीची जोडी[3] ते उखत्या चि साटीं । उणें पुरें तुटी तेथें[4] नाहीं ॥२॥

तुका ह्मणे ओलें[5] सांचत सांचणी । आजि जाली धणी एकसरें ॥ ३ ॥

॥ १३४० ॥

नाहीं येथें वाणी । सकळां वर्णीं घ्यावी धणी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यासी दावी रंग ॥ ध्रु ॥

एका भावाचा एकांत । पीक पिकला अनंत ॥ २ ॥

तुका खळे[6] दाणीं । करी बैसोनी वांटणी ॥ ३ ॥

॥ १३४१ ॥

ठेविलें जतन । करूनियां निज धन ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥ ध्रु ॥

निवडिलें वरळा भूस । सार आइन जिंनस[7] ॥ २ ॥

---

१ पं. तें या निश्चयें.—२ पं. अंतरिक्ष. दे. त. अंतराक्षी.—३ पं. गोडी.—४ पं. येथें.—५ पं. आहे.—६ पं. खळ.—७ त. जिन्नस

तुका ह्मणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥ ३ ॥

॥ १३४२ ॥

भ्रमणा[1] पाउलें वेचिलीं तीं वाव । प्रवेशतां ठाव एक द्वार ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सार तीं पाउलें विठोबाचीं जीवीं । कोणीं न विसंभावीं[2] क्षणभरि ॥ छ ॥

सुलभ हें केलें सकळां जीवन । फुंकावे[3] चि कान न लगेसें ॥ २ ॥

तुका ह्मणे येथें सकळ हीं कोड । पुरे मूळ[4] खोड विस्ताराचें ॥ ३ ॥

॥ १३४३ ॥

कांहीं जाणों नये पांडुरंगाविण । पाविजेल सीण संदेहानें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भलतिया नावें आळविला[5] पिता । तरि[6] तो जाणता कळवळा ॥ छ ॥

अळंकार जातो[7] गौरवितां वाणी । सर्वगात्रा धणी हरिकथा ॥ २ ॥

तुका ह्मणे उपजे विल्हाळें[8] आवडी । करावा तो घडी घडी लाहो ॥ ३ ॥

॥ १३४४ ॥

बीजापोटीं पाहे फळ । विध न करितां सकळ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तया मूर्ख ह्मणावें वेडें[9] । कैसें तुटेल सांकडें ॥ छ ॥

दांवितिया[10] वाट । वेठी धरूं[11] पाहे चाट ॥ २ ॥

पुढिल्या उपाया । तुका ह्मणे राखे काया ॥ ३ ॥

॥ १३४५ ॥

मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ १ ॥

---

१ दे. भ्रमना.—२ पं. विसंबावीं.—३ पं. फुंकावा.—४ पं. मुळे.—५ पं. आळवितां.—६ त. परि.—७ पं. होतो.—८ दे. उपज विल्हाळे. पं. उपजे विल्हाळ.—९ पं. ह्मणावें तें वेडें.—१० पं. दावाविया.—११ पं. धरूनि.

॥ ध्रु. ॥ वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया[1] खळ ॥ ध्रु ॥
अगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥ २ ॥
तुका ह्मणे वर्म । येरा नाचावितो[2] भ्रम ॥ ३ ॥

॥ १३४६ ॥

वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें सांगा मजपाशीं । संतां निरवितों येविशीं ॥ ध्रु ॥
असा जी प्रवीण । ग्रंथीं[3] कळे शुद्धहीण ॥ २ ॥
तुका ह्मणे लोपें । सत्याचिया घडती पापें ॥ ३ ॥

॥ १३४७ ॥

ज्या ज्या आह्मांपाशीं होतील[4] ज्या शक्ति । तेणें हा श्रीपती अळंकारूं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघा पायांपाशीं दिला जीवभाव । जन्ममरणाठाव पुसियेला ॥ ध्रु ॥
ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ॥ २ ॥
तुका ह्मणे येथें उरला विठ्ठल । खाये बाले बोल गांये[5] नाचे ॥ ३ ॥

॥ १३४८ ॥

आह्मी आळीकरें । प्रेमसुखाचीं लेंकुरें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पायीं गोविली वासना । तुच्छ[6] केलें ब्रह्मज्ञाना ॥ ध्रु ॥
येतां पाहें मुळा । वाट[7] पंढरीच्या डोळां ॥ २ ॥
तुका ह्मणे स्थळें । मग मी पाहेन सकळें[8] ॥ ३ ॥

॥ १३४९ ॥

आइत्याची राशी । आली पाकसिद्धीपाशीं ॥ १ ॥

---

१ दे. पं. सुतकिया.—२ पं. जाणवितो.—३ पं. ग्रंथ केले. सुद्दहीण.—४ पं. होईल.—५ गायनाचे.—६ दे. तुश. त. तुष्य.—७ पं. वास पंढरीचा.—८ पं. सकळ.

॥ ध्रु. ॥ आतां सांडोनि भोजन । भिके जावें वेडेपण[1] ॥ ध्रु ॥
उसंतिली[2] वाट । मागें परतावें फुकट ॥ २ ॥
तुका ह्मणे वाणी । वेचों बैसोन ठाकणीं[3] ॥ ३ ॥

॥ १३५० ॥

धन्य[4] शुद्ध जाती । धरीं लौकरी परती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐकिलें तें चि कानीं । होय परिपाक मनीं ॥ ध्रु ॥
कळवळा पोटीं । सावधान हितासाठीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भाव । त्यांचा[5] तो चि जाणां देव ॥ ३ ॥

॥ १३५१ ॥

जीवित्व तें किती । हें चि धरितां बरें चित्तीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संत सुमनें[6] उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ॥ ध्रु ॥
विसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥ २ ॥
तुका ह्मणे जोडी । हाय जतन रोकडी ॥ ३ ॥

॥ १३५२ ॥

अभिमानाची स्वामिनी[7] शांति । महत्व घेती सकळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कळोनि हीं[8] न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥ ध्रु ॥
सर्व सत्ता करितां[9] धीर । वीर्या वीर आगळा ॥ २ ॥
तुका ह्मणे तिखट तिखें । मृदसखें आवडी ॥ ३ ॥

॥ १३५३ ॥

भोजन तें[10] पाशांतीचें । निंचें[11] उंचें उसाळी ॥ १ ॥

---

१ दे. त वेडेपणें.—२ पं. उसंतील.—३ पं. टाकनी.—४ दे. धन्यें.—५ पं. ज्याचा.—६ पं. सुमन.—७ पं. स्वामिणी.—८ पं. हें.—९ पं. धरितां.—१० पं. "तें" शब्द नाहीं.—११ पं. उंच नीच.

॥ ध्रु. ॥ जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिता[1] ॥ ध्रु ॥
कल्पना ते देवाविण । न करी भिन्न इतरीं ॥ २ ॥
तुका ह्मणे पावे मूर्ती । ते निश्चिती आपली ॥ ३ ॥

॥ १३५४ ॥

पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कारण तें हें चि करीं । चित्तीं पांडुरंग धरीं ॥ ध्रु ॥
प्रारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा ॥ २ ॥
तुका ह्मणे बळ । बुद्धी वेचूनि सकळ ॥ ३ ॥

॥ १३५५ ॥

बहुतां जन्मां अंतीं । जोडी लागली[2] हे हातीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ ध्रु ॥
बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ २ ॥
तुका ह्मणे जाणे । ऐसे भले[3] ते शाहाणे ॥ ३ ॥

॥ १३५६ ॥

रूप[4] नांवें माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयावरि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सींव वांट परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ ध्रु ॥
पोटा आलें तिच्या लोळे[5] मांड्यांवरि । पारखी न करी खंती चित्तीं ॥२॥
तुका ह्मणे भक्तीसाटीं हरिहर । अरूपीचें क्षीर[6]विभाग हें ॥ ३ ॥

॥ १३५७ ॥

लेकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥ १ ॥

---

१ पं. स्वहिताचा.—२ पं. लाधली.—३ पं. भलते. त. भले तें शाहणें.—४ पं. रूप नाव.—५ पं. लोडे मद्यावरी । पारखीये करी खंती तिची.—६ पं. क्षीर०.

॥ ध्रु. ॥ आह्मां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिति ॥ ध्रु॥
वचनाचा घेईन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरवलें ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ॥ ३ ॥

॥ १३५८ ॥

आर्तभूतांप्रति[1] । उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥ ध्रु ॥
अल्पें तो संतोषी । स्थळीं सांपडे उदेसीं ॥ २ ॥
सहज संगम । तुका ह्मणे तो उत्तम ॥ ३ ॥

॥ १३५९ ॥

मुळाचिया मुळें । दुःखें वाढती सकळें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा योगियांचा धर्म । नव्हे वाढवावा श्रम ॥ ध्रु ॥
न कळे आवडी । कोण आहे[2] कैसी घडी ॥ २ ॥
तुका ह्मणे थींत[3] । दुःख पाववावें चित्त ॥ ३ ॥

॥ १३६० ॥

भाग्यवंतां हें चि काम । मापी नाम वैखरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आनंदाची पुष्टि अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ ध्रु ॥
पिंकविलें[4] तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥ २ ॥
तुका करी प्रणिपात । दंडवत आचारियां[5] ॥ ३ ॥

॥ १३६१ ॥

लटिकें तें रुचे । साच कोणां ही न पचे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा माजल्याचा गुण । भोगें कळों येइल सीण ॥ ध्रु ॥

१ पं. आर्तभू । प्रति.— २ त. आणे.— ३ दे त. थीतें. पं. स्थीत.— ४ पं. पिकलें.— ५ पं. आचार्यां.

वाढवी ममता । नाहीं वरपडला तो दूतां ॥ २ ॥
[1]कांहीं न मनीं हेकड । तुका उपदेश माकड ॥ ३ ॥

॥ १३६२ ॥

कौतुकाची सृष्टी । कौतुकें चि केलें कष्टी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मोडे तरी भलें खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ॥ ध्रु ॥
[2]जेणणियासाटीं । भय सामावलें पोटीं ॥ २ ॥
तुका ह्मणे चेता । होणें तें तूं च आइता ॥ ३ ॥

॥ १३६३ ॥

भोवंडींसरिसें । अवघें भोंवत चि दिसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ठायीं राहिल्या निश्चळ । आहे अचळीं अचळ ॥ ध्रु ॥
[3]एकें हाकेचा कपाटीं । तेथें आणीक नाद उठी ॥ २ ॥
[4]अभ्रें धांवे शशी । [5]तुका ह्मणे दुसरें भासी ॥ ३ ॥

॥ १३६४ ॥

[6]नव्हों आह्मी आजिकालीचीं । काचीं कुचीं [7]चाळवणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एके ठायीं मूळडाळ । ठावा सकळ आहेसी ॥ ध्रु ॥
तुमचें [8]आमचेंसें कांहीं । भिन्न नाहीं वांटलें ॥ २ ॥
तुका ह्मणे जेथें असें । तेथें दिसें तुमचासा ॥ ३ ॥

॥ १३६५ ॥

योग्याची संपदा त्याग आणि शांति । उभयलोकीं कीर्ति सोहळा मान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येरयेरांवरी जायांचें उसिणें । भाग्यस्थळीं देणें झाडावेसीं ॥ ध्रु ॥

---

१ दे. पं. न मनी माकड । काहीं उपदेश हेकड ॥.–२ त. पं. जाणनिया.–३ पं. एके.–४ पं. अभ्र.–५ दे. असे ते तें दुतरें भासी. पं. असे तेथें दुसरे भासी.–६ पं. नव्हे.–७ पं. वाळवणी.–८ पं. आमचें तें कांहां ॥.

केलिया फावला ठायींचा तो लाहो । तृष्णेचा तो काहो कान्हवितो ॥२॥
तुका ह्मणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल ॥ ३ ॥

॥ १३६६ ॥

मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नासोनियां गेली खंती । सहजस्थिति भोगाचे[1] ॥ ध्रु ॥
न देखें सें जालें श्रम । आलें वर्म हाता हें ॥ २ ॥
तुका ह्मणे कैंची कींव । कोठें जीव निराळा[7] ॥ ३ ॥

॥ १३६७ ॥

नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचावाचे[2] ॥ध्रु॥
कांपवूनि टिरी शूरत्वाची मात । केलें वाताहात उचित काळें ॥ २ ॥
तुका ह्मणे करी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मळ स्तुति होतां ॥३॥

॥ १३६८ ॥

नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चिंतीं[3] नारायण सर्व भोगीं[4] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण । भावना त्या भिन्न मुंडाविया ॥ ध्रु ॥
नको गुंपों भोगीं[5] नको पडों त्यागीं । लावुनि सर्वें[6] अंगीं देवाचिया ॥२॥
तुका ह्मणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ३ ॥

॥ १३६९ ॥

अवघी मिथ्या आटी । राम नाहीं तंव कंठीं ॥ १ ॥

---

१ पं. भोगावे.—२ पं. आचावचे.—३ पं. चित्तीं—४ त. भागीं.—५ पं. भागी.—६ पं. सर्व.—७ त. निराळा.

॥ ध्रु. ॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥ ध्रु ॥

सांडिलें तें मांडे । आग्रह[1] उरल्या काळें[2] दंडे ॥ २ ॥

तुका ह्मणे आलें[3] भागा । देउनि चिंतीं पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १३७० ॥

न संगावें[4] वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ उगींच लागतील पाठीं । होतीं रितीं च हिंपुटीं ॥ ध्रु ॥

सिकविल्या गोटी । शिकोन[5] न धरिती पोटीं ॥ २ ॥

तुका ह्मणे सीण । होइल अनुभवाविण ॥ ३ ॥

॥ १३७१ ॥

जातिविजातीची व्हावयासि भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ होणार तें घडो होणाराच्या गुणें । होइल नारायणें निर्मिलें तें ॥ ध्रु ॥

व्याघ्राचिये[6] भुके वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥ २ ॥

तुका ह्मणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ॥ ३ ॥

॥ १३७२ ॥

शाहाणियां पुरे एक चि वचन । विशारती[7] खुण ते चि त्यासी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ उपदेश असे बहुतांकारणें । घेतला तो मनें पाहिजे[8] हा ॥ ध्रु ॥

फांसावेना तरिं दुःख घेतें वाव । मग होतो जीव कासावीस ॥ २ ॥

तुका ह्मणे नको राग धरूं झोंडा । नुघडितां पीडा होइल डोळे ॥ ३ ॥

---

१ दे. आग्र. पं. अग्र.—२ पं. काळ.—३ पं. आला.—४ संगवे.—५ पं. शिकोनि धरितील पोटीं.—६ पं. व्याघ्राची ते.—७ "इशारती" असावें.—८ पं. "पाहिजे हा" याच्याबद्दल "पाहिजेल."

॥ १३७३ ॥

अभिनव[1] सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ रूपाच्या आठवें दोन्ही ही आपण । वियोग[2] तो क्षण होत नाहीं ॥ ध्रु ॥

पूजा तरि चित्तें कल्पुं[3] तें ब्रह्मांड । आहाच तो खंड एकदेसी ॥ २ ॥

तुका ह्मणे माझा अनुभव यापरि । डोई पायांवरि ठेवीतसें ॥ ३ ॥

॥ १३७४ ॥

नटनाट्य तुह्मी केलें याच साटीं । कवतुकें दृष्टि निववावी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाहीं तरि काय कळलें चि आहे । वाघ आणि गाय लांकडाची ॥ ध्रु

अभेद चि असे मांडियेलें खेळा । केल्या दीपकळा बहुएकी ॥ २ ॥

तुका ह्मणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरें तें ॥ ३ ॥

॥ १३७५ ॥

रवीचा प्रकाश । तो चि निशी घडे नाश ।

जाल्या बहुवस । तरि त्या काय दीपिका ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां हा चि वसो जीवीं । माझे अंतरीं गोसावीं ।

होऊं येती ठावीं । काय वर्में यांच्यानें[4] ॥ ध्रु ॥

सर्वें असतां धणी । आड येऊं न सके कोणी ।

न लगे विनवणी । पृथकाची[5] करावी ॥ २ ॥

जन्माचिया गति । येणें अवघ्या खुंटती ।

कारण ते प्रीति । तुका ह्मणे जवळी ॥ ३ ॥

---

१ दे. त. पं. अभिन्नव.—२ दे. वियोगें तो क्षीण—३ पं. कल्प.—४ पं. त्या यानें.
५ दे. त. पृथुकाची.

॥ १३७६ ॥

ऐसे सांडुनियां धुरे । किविलवाणी दिसां[1] कां रे ।
कामें[2] उर भरे । हातीं नुरे मृत्तिका ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी ।
तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ ध्रु ॥
न लगे पुसावी चाकरी । कोणी[3] वकील ये घरीं ।
त्यांचा[4] तो चाकरी । पारपत्य सकळ ॥ २ ॥
नाहीं आडकाटी । तुका ह्मणे जातां[5] भेटी ।
न बोलतां मिठी । उगी च पायीं घालावी ॥ ३ ॥

॥ १३७७ ॥

उपकारी[6] असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी[7]
॥ ध्रु ॥
जीवा ऐसें[8] देखे आणिकां जीवांसी । निखळ चि रासि गुणांची[9] च ॥ २ ॥
तुका ह्मणे देव तयांचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥ ३ ॥

॥ १३७८ ॥

कोणां[10] पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं द्वंद्वादिक[11] दुराविलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरीं[12] च खुणा प्रकटोनि[13] ॥ ध्रु ॥
बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ २ ॥

१ पं. दिसतां.—२ पं. कामीं—३ पं कोण वकील या घरीं.—४ पं. ज्याचा.—५ पं. जा भेटी.—६ पं. अपकारी असो उरोनि उरला.—७ पं. विचारितां.—८ पं. ऐसा.—९ पं. गुणांचा.—१० पं. कोण्या पुण्यें त्यांचा.—११ दे. त. पं. द्वंदादिक.—१२ पं. अंतरींच्या.—१३ त. पं. प्रगटोनि.

तुका ह्मणे मग नयें वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ३ ॥

॥ १३७९ ॥

क्षणक्षणां सांभाळितों । साक्षी होतों आपुला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ न घडावी पायीं तुटी । मन[2] मुठी घातलें ॥ ध्रु ॥

विचारतों वचनां आधीं । धरूनि शुद्धी ठेविली ॥ २ ॥

तुका ह्मणे मागें भ्यालों । तरीं जालों जागृत ॥ ३ ॥

॥ १३८० ॥

आणूनियां मना । आवघ्या धांडोळिल्या खुणा ।

देखिला तो राणा । पंढरपूरनिवासी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वांयां जाय ।

देखिले[3] ते पाय । सम जीवीं राहाती ॥ ध्रु ॥

तो देखावा हा विध्न । चिंतनें[4] तें कार्य सिद्ध ।

आणिकां[5] संबंध । नाहीं पर्वकाळासी ॥ २ ॥

तुका ह्मणे खळ । होती[6] क्षणें चि निर्मळ ।

जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ॥ ३ ॥

॥ १३८१ ॥

धरितां[7] ये पंढरीची वाट । नाहीं संकट मुक्तीचें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वंदूं येती देव पदें । त्या आनंदें उत्साहें ॥ ध्रु ॥

नृत्यछंदें उडती रज । जे सहज चालतां ॥ २ ॥

तुका ह्मणे गरुड टके[8] । वैष्णव निके संभ्रम ॥ ३ ॥

---

१ पं. मन —२ पं. मनें मिठी घातली.—३ पं. धरिले.—४ पं. चिंतनें चि.—५ पं. आणीक.—६ दे. हो. त. होय.—७ पं. धरितां पंढरीची०.—८ दे. डके.

॥ १३८२ ॥

नाम घेतां मन निवे । जिव्हे[1] अमृत चि स्रवे ।
होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें ।
केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥ ध्रु ॥
जालें भोजनसें दिसे । चिरा पडोनि ठेला[2] इच्छे ।
धालियाच्या ऐसें । अंगा येती उद्गार ॥ २ ॥
सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा ।
तुका ह्मणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥ ३ ॥

॥ १३८३ ॥

रुची रुची घेऊं गोडी । प्रेमसुखें जाली जोडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काळ जाऊं नेदूं वांयां । चिंतूं[3] विठोबाच्या पायां ॥ ध्रु
करूं भजन भोजन । धणी घेऊं नारायण ॥ २ ॥
तुका ह्मणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ॥ ३ ॥

॥ १३८४ ॥

वेळोवेळां हें चि सांगें । दान मागें जगासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठ्ठल हे मंगळवाणी । घेऊं धणी पंगती ॥ ध्रु ॥
वेचतसे पळें पळ । केलें बळ पाहिजे ॥ २ ॥
तुका ह्मणे दुश्चित नका । राहों[4] फुका नाड हा ॥ ३ ॥

१ पं. जीवें.—२ दे. छेला.—३ दे. चिंतितां. त. चिंती.—४ पं. राहे.

॥ १३८५ ॥

आणीक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगा सारिखें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ दैवत ये भूमंडळीं । उद्धार कळी पावविते [1] ॥ ध्रु ॥

कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध ठायीं स्थळासी ॥ २ ॥

अन्यत्रींचें [2] तीर्थीं नासे । तीर्थीं वसे वज्रलेप ॥ ३ ॥

पांडुरंगींचें पांडुरंगीं । पाप अंगीं राहेना ॥ ४ ॥

ऐसें हरें गिरिजेप्रति । गुह्य स्थिती सांगितली ॥ ५ ॥

तुका ह्मणे तीर्थ क्षेत्र । सर्वत्र हें दैवत ॥ ६ ॥

॥ १३८६ ॥

पुराणींचा [3] इतिहास । गोड रस सेविला [4] ॥ १ ॥

नव्हती हे आहाच बोल । मोकळें फोल कवित्व ॥ ध्रु ॥

भावें घ्या रे भावें घ्या रे । ऐकदा [5] जा रे पंढरिये ॥ २ ॥

भाग्यें आलेति मनुष्यदेहा । तो हा पाहा विठ्ठल ॥ ३ ॥

पापपुण्या करील झाडा । जाइल पीडा जन्माची ॥ ४ ॥

घ्यावी हातीं टाळदिंडी । गावे तोंडीं गुणवाद ॥ ५ ॥

तुका ह्मणे घटापटा । न लगे वाटा शोधाव्या ॥ ६ ॥

॥ १३८७ ॥

कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भलत्या काळें [6] नामावळी । सुलभ भोळी भाविकां ॥ ध्रु ॥

प्रायश्चित्तें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ॥ २ ॥

---

१ दे. पाविते.–२ दे. आनेत्रींचें. त. अन्नेत्रींचें.–३ त. हा अभंग चार चरणी धरून “ भावें घ्यारे भावे घ्यारे । एकदा जारे पंढरिये ” हें एवढेंच ध्रुवपद धरलें आहे; आणि शेवटच्या कडव्यांत “ तुका ह्मणे० ” हें अर्ध पूर्वीं असून “ घ्यावी हातीं० ” हें अर्ध पुढें आहे.–४ त. पं. निवडिला.–५ दे. येगदा.–६ पं. काळीं.

तुका ह्मणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥ ३ ॥

॥ १३८८ ॥

पाहा रे हें दैवत कैसें । भक्तिपिसें भाविक[1] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाचारिल्या सरिसें पावे । ऐसें[2] सेवे बराडी ॥ ध्रु ॥
शुष्ककाष्ठीं[3] गुरुगुरी । लाज हरि न धरी ॥ २ ॥
तुका ह्मणे अर्धनारी । ऐसीं धरी रूपडीं ॥ ३ ॥

॥ १३८९ ॥

बहुत सोसिले मागें न कळतां । पुढती काय आतां अंध व्हावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्नां[4] चांचपडो ॥ ध्रु ॥
कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपण चि हाँक[5] देइल हाके ॥ २ ॥
तुका ह्मणे दिलीं चेतवूनि सुंनीं[6] । कौतुकावांचूनि नाहीं छळ ॥ ३ ॥

॥ १३९० ॥

आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसें दिलें साचें करोनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दुजियासी तंव अँकळ[7] हा भाव । करावा तो जीव साक्षी[8] येथें ॥ ध्रु
एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणें चि ॥ २ ॥
तुका ह्मणे करूं उगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुह्मी देवा ॥ ३ ॥

॥ १३९१ ॥

अस्त नाहीं आतां एक चि मोहोरों[9] । पासूनि अंधारा दुरि जालों ॥ १ ॥
॥ ध्रु. साक्षत्वें[10] या जालों गुणाचा देखणा । करीं नारायणा तरी खरें ॥ ध्रु ॥

---

१ पं. भाविका.—२ पं. ऐसी सवें.—३ दे. त. शुल्क काष्टीं. पं. शुष्व काष्टीं गुरगुरी.—४ पं. भिन्न भिन्न.—५ दे. आपणें चि हाके द्रेईल हाके. । पं. आपण चि हाके देइल हाक.—६ दे. सुणीं.—७ दे. त. पं. आकळ.—८ दे. पं. साक्ष.—९ पं. मोहरा.—१० पं. साक्षेत्वें.

आठवें विसरु पडियेला मागें । आलें तें चि भागें यत्न केलें ॥ २ ॥
तुका ह्मणे माझा विनोद देवासी । आह्मी तुह्मां ऐसीं दोन्ही नव्हों ॥ ३ ॥

॥ १३९२ ॥

क्षर अक्षर हे तुमचे विभाग । कासयानें जग दुरी धरा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसें आह्मी नेणों पालटों च कांहीं । त्यागिल्याची नाहीं मागें चाड ॥ ध्रु ॥
प्रतिपादिता तूं समविषमाचा । प्रसाद तो याचा पापपुण्य ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मां नाना अवगणीं । लागे संपादणी लटिक्याची ॥ ३ ॥

॥ १३९३ ॥

सर्वरसीं मीनलें चित्त । अखंडित आनंदु ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गोत पति विश्वंभरीं । जाला हरि सोयरा ॥ ध्रु ॥
वोळखी ते एका नांवें । इतरभावें खंडणा ॥ २ ॥
तुका ह्मणे नांवें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥ ३ ॥

॥ १३९४ ॥

मीं हें ऐसें काय जाती । अवघड किती पाहातां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं होत उल्लंघन । नसतां भिन्न दुसरें ॥ ध्रु ॥
अंधारानें तेज नेलें । दृष्टिखालें अंतर ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्वें देव । घेतां ठाव दावील ॥ ३ ॥

॥ १३९५ ॥

कवीश्वरांचा तो आह्मांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥ १ ॥

---

१ पं. त. इतर वाव.—२ दे. कवेश्वरांचा. त. पं. कवेश्वराचा.—३ पं. आह्मां.

॥ ध्रु.॥ दंभांचे[1] आवडी बहिराट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥ध्रु॥
सोन्यासेजारीं[2] तों लाखेची जतन । संतंत[3] ते गुण जैसेतैसे ॥ २ ॥
सेव्यसेवकता[4] न पडतां ठावी । तुका ह्मणे गोवी पावती हीं ॥ ३ ॥

॥ १३९६ ॥

वाढलियां मान न मनावी निश्चिती । भूतांचिये प्रीती भूतपण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि[5] मना लावावी कांचणी । इंद्रियांचे झणी ओढी भरे ॥ध्रु॥
एका एकपणें एकाचिये अंगीं । लागे रंग रंगीं मिळालिया[6] ॥ २ ॥
तुका ह्मणे देव निष्काम निराळा । जीवदशे चाळा चळणांचा ॥ ३ ॥

॥ १३९७ ॥

माया साक्षी आह्मी नेणों भीड भार । आप आणि पर नाहीं दोन्ही ॥१॥
॥ ध्रु. ॥ सत्याचिये साटीं अवघा चि भरे । नावडे व्यापार तुटीचा तो ॥ध्रु॥
पोभाळितां[7] चरे अंतरींचें दुःख । लासें फांसें मुख उघडावें ॥ २ ॥
तुका ह्मणे नव्हे स्फीतिचा हा ठाव । निवाड्यासी देव साक्षी केला ॥३॥

॥ १३९८ ॥

संतां आवडे तो काळाचा ही काळ । समर्थाचें बाळ जेवीं समर्थ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ परिसतां तेथें नाहीं एंकविणें[8] । मोहें[9] न पवे सीण ऐसें राखे ॥ध्रु॥
केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखें दुसरें नांशा[10] मूळ ॥ २ ॥
तुका ह्मणे मुख्य कल्पतरुछाया । काय नाहीं दया तये ठायीं ॥ ३ ॥

॥ १३९९ ॥

संतांच्या धिक्कारें[11] अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परि ॥ १ ॥

---

१ पं. दंभाची आवडी बहिरट०.–२ पं. सोन्याचे सेजारीं०.–३ पं. सतंत.–४ दे. सेव्य सेववता. पं. सेव्य सेकता.–५ पं. ह्मणोनिया.–६ त. मिळालिया.–७ दे. पोंभाळितां.–८ पं. एकेविणे. त. एकेविण.–९ पं. मोहो.–१० दे. पं. नासा.–११ दे. त. पं. धीकारें.

॥ ध्रु. ॥ कुळ आणि रूप वांयां संवसार[1] । गेला भरतार[2] मोकलितां ॥ ध्रु ॥
मूळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें[3] राखों जाणे ॥ २ ॥
तुका ह्मणे सायास तो एके ठायीं । दीप हातीं तई अवघें बरें ॥ ३ ॥

॥ १४०० ॥

ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । आभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंच वरि ॥ ध्रु ॥
दोरें चिरा कापे पडिला[4] कांचणी । अभ्यासें[5] सेवनीं विष पडे ॥ २ ॥
तुका ह्मणे कैंचा ब्रैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव एकाएकीं ॥ ३ ॥

॥ १४०१ ॥

अमर आह्मां अमर आह्मां । खरें कीं पाहा खोटें हें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न ह्मणां देह माझा ऐसा । मग भरवसा कळेल ॥ ध्रु ॥
कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें ॥ २ ॥
देव चि बरे देव चि बरे । तुका ह्मणे खरे[6] तुह्मी ॥ ३ ॥

॥ १४०२ ॥

काम नाहीं काम नाहीं । जालों पाहीं रिकामा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ फावल्या या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा[7] बैसोनि ॥ ध्रु ॥
नसत्या छंदें नसत्या छंदें । जग विनोदें विन्हडतसे[8] ॥ २ ॥
एकाएकीं एकाएकीं । तुका लोकीं[9] निराळा ॥ ३ ॥

॥ १४०३ ॥

हातीं घेऊनियां काठी । तुका लागला कांळिवरा[10] पाठी ॥ १ ॥

---

१ पं. संसार.—२ पं. भ्रतार.—३ पं. लक्षण.—४ पं. पडिल्या.—५ पं. अभ्यास.—६ त. खरे खरे तुह्मी.—७ दे. त. पं. दृष्टा.—८ पं. विन्हळतसे.—९ त. लोकिकीं.—१० पं. कलिवरा.

॥ ध्रु. ॥ नेऊनि निजविलें स्मशानीं । माणसें जाळी[1] ते ठाकणीं ॥ छ ॥
काढिलें तें ओढें । मागील उपचाराचें पुढें ॥ २ ॥
नाहीं वाटों आला भेव । सुख दुःख भोगिता देव ॥ ३ ॥
याजेसाटीं[2] हें निर्वाण । केलें कसियेलें मन ॥ ४ ॥
तुका ह्मणे अनुभव बरा । नाहीं तरी शास्त[3] होय चोरा ॥ ५ ॥

॥ १४०४ ॥

कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ प्रेमाछंदें नाचे डोले । हारपला[4] देहभाव ॥ छ ॥
एकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयेरा[5] ॥ २ ॥
तुका ह्मणे उरला देव । गेला भेव त्या[6] काळें ॥ ३ ॥

॥ १४०५ ॥

न[7] बोलेसी करा वाचा । उपाधीचा संबंध ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एका तुमच्या नामाविण । अवघा सीण कळतसे ॥ छ ॥
संकल्पाचे ओढी मन । पापपुंण्य सम[8] चि ॥ २ ॥
तुका ह्मणे नारायणीं । पावो वाणी विसांवा ॥ ३ ॥

॥ १४०६ ॥

प्रारब्धा हातीं जन । सुख सीण पावतसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करितां घोंयाळाचा[9] संग । अगें अंग माखावें ॥ छ ॥
आविसा अंगें पीडा वसे । त्यागें असे बहु सुख ॥ २ ॥
तुका ह्मणे जीव भ्याला । अवघ्या आला बाहेरी ॥ ३ ॥

---

१ पं. " जाळी ते " याच्याबद्दल " जाळीत. ".—२ पं. याच साटीं.—३ दे. सास्त.—४ पं. हरपले.—५ पं. सोइरा —६ पं. ते काळीं.—७ पं. न बोलसी.—८ पं. सवें.—९ दे. घाईळाचा.

॥ १४०७ ॥

आशा ते करविते बुद्धीचा लोप । संदेह तें पाप कैसें नव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आपला[1] आपण करावा विचार । प्रसन्न तें सार मन गोवाही[2] ॥ध्रु॥
नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ । होतें त्या[3] निर्मळ शुद्ध बुद्ध ॥ २ ॥
अंधळ्यानें नये देखण्याची चाली । चालों ऐसी बोली तुका बोले ॥३॥

॥ १४०८ ॥

जळो आतां नांव रूप । माझें पाप गांठीचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संतांचिया चरणरजें । उतरूं ओझें मातीचें ॥ ध्रु ॥
लैंटिकियाचा[4] अभिमान । होता सीण पावविता[5] ॥ २ ॥
तुका ह्मणे अरूपींचें । सुख साचें निनांवें ॥ ३ ॥

॥ १४०९ ॥

निंदा स्तुती करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥ १ ॥
॥ जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥ ध्रु ॥
शृंगारिलें मढें । जीवेंविण जैसें कुडें ॥ २ ॥
तुका ह्मणे रागें । भलतें चावळे वाउगें ॥ ३ ॥

॥ १४१० ॥

भिक्षापात्र[6] अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ।
ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव ।
समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥ ध्रु ॥

---

१ पं. आपुल्या.—२ दे. गोही.—३ पं. ते.—४ पं. लटिका चि.—५ दे. पावित.—६ दे. भिक्ष्यापत्र. त. भिक्षापात्र.

जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें ।
हें चि अभाग्य रोकडें । मूळ[1] आणि विश्वास ॥ २ ॥
काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार ।
तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ३ ॥

॥ १४११ ॥

भावबळें विष्णुदास । नाहीं नाश[2] पावत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ योगभाग्यें घरा येती । सर्व शक्ति चालत ॥ ध्रु ॥
पित्याचें जें काय[3] धन । पुत्रा कोण वंचील ॥ २ ॥
तुका ह्मणे कडे बैसों । तेणें असों निर्भर ॥ ३ ॥

॥ १४१२ ॥

कोरड्या गोष्टी[4] चटक्या बोल । शिकल्या सांगे नाहीं ओल ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोण यांचें मना आणी । ऐकों कानीं नाइकोनि ॥ ध्रु ॥
घरोघरीं सांगती ज्ञान । भूस [5]सिणें कांडिती ॥ २ ॥
तुका ह्मणे आपुल्या मति । काय रितीं पोकळें[6] ॥ ३ ॥

॥ १४१३ ॥

नव्हतियाचा सोस होतां । झडो आतां पदर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देखणें तें देखियेलें । आतां भलें साक्षित्वें ॥ ध्रु ॥
लाभें[7] कळों आली हानि । राहों दोन्हीं निराळीं ॥ २ ॥
तुका ह्मणे एकाएकीं । हा[8] कां लोकीं पसारा ॥ ३ ॥

---

१ पं. मूळ आणि विश्वासा.– २ दे. त. नास.–३ पं. का.–४ दे. त. गोठी.–५ पं. त. सीण.–६ पं. पोकळ.–७ पं. लाभ.–८ पं. हा लोकिकीं पसारा. त. हा कां लोकिकीं पसारा.

॥ १४१४ ॥

सोसें वाढे दोष । जाला न पालटे कस ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसें बरवें वचन । करितां[1] तें नारायण ॥ ध्रु ॥

असे[2] प्रारब्ध नेमें । श्रमें[3] चि उरे श्रमें ॥ २ ॥

सुख देते शांती । तुका ह्मणे धरितां चित्तीं ॥ ३ ॥

॥ १४१५ ॥

काय शरीरापें काम । कृपा साधावया प्रेम ।

उचिताचे धर्म । भागा आले ते करूं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देईन हाक नारायणा । तें तों नाकळे बंधना ।

पंढरीचा राणा । आइकोन धांवेल ॥ ध्रु ॥

सातांपांचांचें गोठलें । प्रारब्धें आकारलें ।

आतां हें संचलें । असो भोगा सांभाळीं ॥ २ ॥

फाँवली[4] ते बरवी संधि । सावधान करूं बुद्धी ।

तुका ह्मणे मधीं । कोठें नेघें विसावा ॥ ३ ॥

॥ १४१६ ॥

न लगे देशकाळ । मंत्रविधानें सकळ ।

मनें चि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ येतो बैसलिया ठाया । आँसनें[5] व्यापी देवराया ।

निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥ ध्रु ॥

कल्पनेचा साक्षी । तरि आँदरें[6] चि लक्षी ।

---

१ त. करितो.–२ पं. असो –३ दे. श्रमुचि उरे श्रम. त. श्रमुचि उरे श्रमें.–४ पं. पावली.–५ दे. आसणें. त. असणें.–६ पं. आदरें लक्षी.

आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥ २ ॥
घेणें तरि भाव । लक्षी दासांचा उपाव ।
तुका ह्मणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥ ३ ॥

॥१४१७॥

नाहीं आलें[1] भक्तिसुख अनुभवा । तो मी ज्ञान देवा काय करूं ॥ १ ॥
॥धु.॥ नसावें जी तुह्मी कांहीं निश्चिंतीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥ध्रु॥
एकाएकीं मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥ ३ ॥

॥ १४१८ ॥

मागतां विभाग । कोठें लपाल जी मग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संत साक्षी या वचना । त्यांसी ठाउकिया खुणा ॥ ध्रु ॥
होइन धरणेकरी । मग मी रिघों नेदीं बाहेरी ॥ २ ॥
तुका ह्मणे मी अक्षर । तुज देवपणाचा भार ॥ ३ ॥

॥ १४१९ ॥

मिटवण्याचे[2] धनी । तुह्मी व्यवसाय[3] जनीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोण पडे ये लिगाडीं । केली तैसीं उगवा कोडीं ॥ ध्रु ॥
केलें सांगितलें काम । दिले पाळूनियां धर्म ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां । असो तुमचें तुमचे माथां ॥ ३ ॥

॥ १४२० ॥

समार्पिली वाणी । पांडुरंगीं घेते[4] धणी ॥ १ ॥

---

१ पं. त. " आलें " हा शब्द नाहीं.--२ मी टेवण्याचे धणी । तुह्मीं येवसाय.—३ दे. वेवसाय.—४ पं. घेती.

॥ ध्रु. ॥ पूजा होते[1] मुक्ताफळीं । रस ओविया मंगळीं ॥ ध्रु ॥
धार अखंडित । ओघ चालियेला नित्य[2] ॥ २ ॥
पूर्णाहुति जींवें[3] । तुका घेऊनि[4] ठेला भावें[5] ॥ ३ ॥

॥ १४२१ ॥

अवघा चि आकार ग्रासियेला काळें । एकॅ[6] चि निराळें हरिचें नाम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धरूनि राहिलों अविनाश कंठीं । जीवन हें पोटीं सांटविलें ॥ ध्रु ॥
शरीरसंपत्ति मृगजळभान । जाईल नासोन खरें नव्हे ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां उपाधीच्या नांवें । आणियेला देवें वीट मज ॥ ३ ॥

॥ १४२२ ॥

बोलणें चि नाहीं । आतां देवाविण कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ ध्रु ॥
पाहेन ते पाय । जोंवरि हे दृष्टि धाय ॥ २ ॥
तुका ह्मणे मनें । हे चि संकल्प वाहाणें ॥ ३ ॥

॥ १४२३ ॥

येथूनियां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उंची देवाचे चरण । तेथें जालें अधिष्ठान ॥ ध्रु ॥
आघातावेगळा । असे ठाव हा निराळा ॥ २ ॥
तुका ह्मणे स्थळ । धरूनि राहिलों अचळ ॥ ३ ॥

॥ १४२४ ॥

भरला दिसे हाट । अवघी वाढली खटपट ।

---

१ पं. होती.–२ दे. नित.–३ पं. जीव.–४ त. होउनि.–५ पं. भाव.–६ त. एका चि. पं. एकतें. निराळें०.

संचिताचे[१] वाट । वाटाऊनि फांकती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भोगा ऐसे ठायाठाव । कर्मा त्रिविधाचे भाव ।
द्रष्टा येथें देव । विरहित संकल्पा[२] ॥ ध्रु. ॥
दिला पाडूनियां धडा । पापपुण्यांचा निवाडा ।
आचरती गोडा । आचरणें आपुलाल्या ॥ २ ॥
तुका ह्मणे पराधीनें । जालीं ओढलिया ऋणें ।
तुटती बंधनें । जरि[३] देवा आळविते ॥ ३ ॥

॥ १४२५ ॥

आला भागासी तो करीं वेवसाव । परि राहो भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय चाले तुह्मीं बांधलें दातारा । वाहिलिया भारा उसंतितां ॥ ध्रु. ॥
शरीर तें करी शरीराचे[४] धर्म । नको देऊं वर्म चुको मनों[५] ॥ २ ॥
चळण फिरवी ठाव बहुवस । न घडो[६] आळस चिंतनाचा ॥ ३ ॥
इंद्रियें करोत आपुले[७] व्यापार । आवडीसी थार देईं पायीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे नको देऊं काळा हातीं । येतों काकुलती ह्मणऊनि ॥ ५ ॥

॥ १४२६ ॥

आह्मां अवघें भांडवल । येथें[८] विठ्ठल एकला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कायावाचामनोभावें । येथें जीवें वेचलों ॥ ध्रु. ॥
परतें कांहीं नेणें दुजें । तत्त्वबीजें[९] पाउलें ॥ २ ॥
तुका ह्मणे संतसंगें । येणें रंगें रंगलों ॥ ३ ॥

---

१ त. संचिताची वाट. पं. संचिताचे वाटे । वाटा होउनि फाकती ॥.–२ त. पं. संकल्प.–३ पं. जरि या देवा.–४ पं. शरीराचा.–५ पं. मज.–६ पं. पडो.–७ त. आपुला. पं. आपुलाला.–८ पं. एक.–९ पं. तत्वबीज.

॥ १४२७ ॥

साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार खऱ्या मोलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भोगाचे सांभाळीं द्यावें कळिवर । संचिताची[१] थार मोडूनियां ॥ ध्रु ॥

महत्त्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें नष्टां पंचभूतां ॥ २ ॥

तुका ह्मणे मग कैंचा संवसार । जयाचा आदर तें चि व्हावें ॥ ३ ॥

॥ १४२८ ॥

निर्वैर होणें साधनाचें[२] मूळ । येर ते विल्हाळ सांडीमांडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाहीं चालों येतें[३] सोंगसंपादणी[४] । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥ध्रु॥

त्यागा नांव तरी निर्विषयवासना । कार्यकारणां[५]पुरते विधि ॥ २ ॥

तुका ह्मणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेंशीं ॥ ३ ॥

॥ १४२९ ॥

पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं यां[६] विषयांचे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ठेवूनियां लोभीं लोभ । जाला क्षोभ आत्मत्वीं ॥ ध्रु ॥

केला आणिकां वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥ २ ॥

तुका ह्मणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ३ ॥

॥ १४३० ॥

कां जी धरिलें नाम । तुह्मी असोनि निष्काम ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कोणां सांगतसां ज्ञान । ठकाठकींचें लक्षण ॥ ध्रु ॥

आवडीनें नाचें । आहे तरी पुढें साचें ॥ २ ॥

---

१ दे. संचित चि.—२ पं. साधनाच्या मुळें.—३ दे येती.—४ त. सोंग संपादनी.—५ दे. त. कारिये.—६ पं. "या" नाहीं.

तुका ह्मणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥ ३ ॥

॥ १४३१ ॥

खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसे फुकाचे उपाय । सांडूनियां वांयां जाय ॥ ध्रु ॥
परउपकार । एका वचनाचा फार ॥ २ ॥
तुका ह्मणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥ ३ ॥

॥ १४३२ ॥

दया क्षमा शांति । तेथें[1] देवाची वसति ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पावे धांवोनियां घरा । राहे धरोनियां थारा ॥ ध्रु ॥
कीर्तनाचे वाटे । बराडिया ऐसा लोटे ॥ २ ॥
तुका ह्मणे घडे । पूजा नामें[2] देव जोडे ॥ ३ ॥

॥ १४३३ ॥

शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचा फळे[3] उपदेश । आणिकां[4] दोष उफराटे ॥ ध्रु ॥
त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं[5] ॥ २ ॥
तुका ह्मणे सत्य सांगें । येतां[6] रागें येती ते ॥ ३ ॥

॥ १४३४ ॥

माझीं मेलीं बहुवरि । तूं कां जैसा तैसा हरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठो कैसा वांचलासि । आतां सांग मजपाशीं ॥ ध्रु ॥
तुज देखतां चि माझा । बाप गेला आजा पणजा ॥ २ ॥

---

१ पं. तेथें देवाची हे वस्ती.–२ पं.० नाम देव०.–३ त. खरा.–४ पं. येरा.–५
देहभावे.–६ पं. येउत.

आह्मां लागलेंसे पाठी । बालत्व तारुण्य काठी ॥ ३ ॥
तुज फावलें तें मागें । कोणी नसतां वादिलागें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझ्या अंगीं । मज देखिल लागलीं अवघीं ॥ ५ ॥

॥ १४३५ ॥

आणीक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥१॥
॥ ध्रु. ॥ विठ्ठलावांचूनि आणीक जे वाणी । नाइकें मी कानीं आपुलिया ॥
॥ ध्रु ॥
समाधानासाटीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ॥ २ ॥
जिवाहूनि मज ते चि आवडती । आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ॥ ३ ॥
तुका[3] ह्मणे माझें तो चि जाणे हित । आणिकांच्या चित्त नेदीं[4] बोला ॥४॥

॥ १४३६ ॥

आशा हे समूळ खाणोनि काढावी । तेव्हां चि गोसावी व्हावें[5] तेणें ॥१॥
॥ ध्रु. ॥ नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ॥ध्रु॥
आशा मारूनियां जयवंत व्हावें । तेव्हां चि निघावें सर्वांतूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे जरीं योगाची तांतडी । आशेची बीबुडी करीं आधीं ॥ ३ ॥

॥ १४३७ ॥

निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुको नये ॥ १ ॥
निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकांची ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसा [6]कोणें उपेक्षिला । नाहीं ऐकिला ऐसा कोणीं ॥ ३ ॥

---

१ दे. तारुण्यें.—२ दे. औघीं—३ पं. तुका ह्मणे तो चि जाणे माझें हित ।.—४ पं. नाहीं.—५ त. त्यांनीं.—६ पं. कोण.

॥ १४३८ ॥

नामाचें चिंतन प्रगट पसारा । असाल तें करा जेथें तेथें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सोडवील माझा स्वामी निश्चयेसीं । प्रतिज्ञा हे दासीं केली आह्मीं ॥ ध्रु ॥

गुण दोष नाहीं पाहात[1] कीर्तनीं । प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥ २ ॥

तुका ह्मणे कडु वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ॥ ३ ॥

॥ १४३९ ॥

नाम ह्मणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करिति[2] कांहीं ।

बधिर व्हावें त्याचे ठायीं । दुष्ट वचन वाक्य तें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जयाचे राहिलें मानसीं । ते[3] चि पावले तयासी ।

चांचपडतां मेलीं पिसीं । भलतैसीं वाचाळें ॥ ध्रु ॥

नव[4]विधीचा निषेध । जेणें मुखें करिती वाद ।

जन्मा आले निंद्य । शूकरयाती संसारा ॥ २ ॥

काय सांगों वेळोवेळां । आठव नाहीं[5] चांडाळा ।

नामासाटीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ॥ ३ ॥

आपुलिया नामासाठीं । लागे शंखासुरापाठीं ।

फोडोनियां[6] पोटीं । वेद च्यारी काढिले ॥ ४ ॥

जगीं प्रसिद्ध[7] हे बोली । नामें गणिका तारिली ।

आणिकें ही उद्धरिलीं । पातकी महादोषी ॥ ५ ॥

जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या[8] चित्तीं ।

---

१ त. पाहातां.–२ त. करितिल.–३ त. तें चि पावलें०.–४ पं. नवविधाचा.–५ पं. नाहीं त्या चांडाळा.–६ पं. फोडिया.–७ पं प्रसिद्ध बोली.–८ दे. त. प्रल्हादाचा.

जळतां बुडतां घातीं । राखे हातीं विषाचे ॥ ६ ॥
काय सांगों ऐशीं किती । तुका ह्मणे नामख्याती ।
नरकाप्रती जाती । निषेधिती तीं एकें ॥ ७ ॥

॥ १४४० ॥

किती या काळाचा सोसावा वेळसा । लागला सरिसा पाठोवाठीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लक्ष चौऱ्याशीची करा सोडवण । रिघा या शरण पांडुरंगा ॥ ध्रु ॥
उपजल्या पिंडा मरण सांगातें । मरतें उपजतें सर्वे चि तें ॥ २ ॥
तुका ह्मणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी फुटलिया ॥ ३ ॥

॥ १४४१ ॥

गासी तरि एक विठ्ठल चि गाईं । नाहीं तरि ठायीं राहें उगा ॥ १ ॥
अद्वैतीं तों नाहीं बोलाचें कारण । जाणिवेचा श्रम करिसी वांयां ॥ २ ॥
तुका ह्मणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ॥ ३ ॥

॥ १४४२ ॥

जयाचिये वाचे नये हा विठ्ठल । त्याचे मज बोल नावडती ॥ १ ॥
शत्रु तो म्यां केला न ह्मणें आपुला । जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें ॥ २ ॥
जयासी नावडे विठोबाचें नाम । तो जाणा अधम तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १४४३ ॥

आह्मांसी तों नाहीं आणीक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घालूनियां कास करितों कैवाड । वागों नेदीं आड कळिकाळासी ॥ ध्रु ॥

---

१ त. कीर्ती.—२ पं. वेळसा.—३ पं. पींडा.—४ पं. सरे चि तो.—५ प्र. सीण.—६ दे. त. नीति.

अबद्ध वांकडें जैशीतैशा[1] परी । वाचे हरि हरि उच्चारावें ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मां सांपडलें निज । सकळां हें[2] बीज पुराणांचें ॥ ३ ॥

॥ १४४४ ॥

जीव तो चि देव भोजन ते भक्ति । मरण[3] ते चि मुक्ति पाषांड्याची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पिंडाच्या पोषकीं नागविलें जन । लटिकें पुराण केले वेद ॥ ध्रु॥
मना आला तैसा करिती विचार । ह्मणती संसार नाहीं पुन्हा ॥ २ ॥[4]
तुका ह्मणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती[5] ॥ ३ ॥

॥ १४४५ ॥

भक्तांचा[6] महिमा भक्त चि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाणोनि नेणते जाले तेणें सुखें । नं[7] बोलोनि मुखें बोलताती ॥ध्रु॥
अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥ २ ॥
टाळ [8]घोष कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे हें तों आहे तयां ठावें । जिहीं एक्या भावें जाणीतलें ॥ ४ ॥

॥ १४४६ ॥

आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासिलिया[9] पूज्य होइजेतें ॥ १ ॥
अधीरासी नाहीं चालों जातां मान । दुर्लभ दर्शन[10] धीर त्याचें ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं आणिकांसी बोल । वांयां जाय मोल बुद्धीपाशीं ॥ ३ ॥

॥ १४४७ ॥

चिंतनें[11] सरे तो धन्य[12] जाणा काळ । सकळ मंगळ मंगळांचें ॥ १ ॥

---

१ त. पं. जैसें तैशापरी.–२ पं. सकळ ही बीज०.–३ त. पं. मरण ते मुक्ति.–४ पं. आपुले मनींचें करूनि पाषांड । जनामध्यें भांड पोट भरी ॥ हें कडवें येथें जास्त आहे.–५ दे. विचारी.–६ पं. भक्तीचा.–७ दे. नो.–८ पं. त. घोळ.–९ पं नासील या.–१० दे. त. दरुषण.–११ पं. चिंतनें जो सरे तो चि धन्य काळ ।.–१२ दे. "धन्य जाणा काळ" याच्याबद्दल "धन्य काळ ।."

॥ ध्रु. ॥ संवसारसिंधु नाहीं हरिदासां[2] । गर्भवास कैसा नेणती ते ॥ ध्रु ॥
जनवन ऐसें[3] कृपेच्या सागरें । दाटला आभारें[4] पांडुरंग ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा भक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी एक ॥ ३ ॥

॥ १४४८ ॥

मोक्षाचें आह्मांसी नाहीं अवघड । तो असे उघड[5] गांठोळीस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥ध्रु॥
ज्याचें त्यासी दर्णे कोंण[6] तें उचित । मानूनियां हित घेतों सुखें[7] ॥ २ ॥
तुका ह्मणे सुखें देई[8] संवसार । आवडीसी थार करीं माझे ॥ ३ ॥

॥ १४४९ ॥ ॥ १२ ॥

चिंतनासी न लगे वेळ । सर्व काळ करावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सदा वाचे नारायण । तें वदन मंगळ ॥ ध्रु ॥
पढिये सर्वोत्तम[9] भाव । येथें[10] वाव पसारा ॥ २ ॥
ऐसें उपदेशी तुका । अवघ्या लोकां सकळां ॥ ३ ॥

॥ १४५० ॥

अंतराय पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तो चि बाधी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाये[11] तुझा देवा ॥ ध्रु॥
अखंड तें खंडे संकल्पीं विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥ २ ॥
तुका ह्मणे विश्वीं विश्वंभर वसे । राहों ऐसे दसे सुखरूप ॥ ३ ॥

---

१ दे. त. संसार.—२ पं. हरिच्या दासा.—३ पं. ऐसा.—४ पं. आभार.—५ दे. उघाड.—६ पं. कोणाचें उचित.—७ पं. सुखें.—८ पं. घेई.—९ दे. सर्वोत्तमा.—१० पं. इतर.—११ पं. ठाव.

॥ १४५१ ॥

एकाचिया घाट्या[1] टोके । एक फिके उपचार ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसी सवे गोवळिया । भाव तया पढियंता ॥ ध्रु ॥

एकाचें[2] तें उच्छिष्ट खाय । एका जाय ठकवूनि[3] ॥ २ ॥

तुका ह्मणे बहु सोपें । बहु रूपें अनंत ॥ ३ ॥

॥ १४५२ ॥

कोठें नाहीं अधिकार । गेले नर वांयां ते ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐका हें सोपें वर्म । न लगे श्रम चिंतना ॥ ध्रु ॥

मृत्याचिये अंगीं छाये । उपायें चि खुंटतां ॥ २ ॥

तुका ह्मणे अवघे जन । येथें मन असों द्या ॥ ३ ॥

॥ १४५३ ॥

ज्यानें[4] ज्यानें जैसें ध्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ ध्रु ॥

अवघें साकरेचें अंग । नये व्यंग निवडितां ॥ २ ॥

तुका ह्मणे जें जें करी । तें तें हरी भोगिता ॥ ३ ॥

॥ १४५४ ॥

आचरती कर्में । तेथें काळें कर्मधर्में[5] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ खेळे गोवळियांसवें । करिती तें त्यांचें साहावें ॥ ध्रु ॥

यज्ञमुखें घांस । मंत्रपूजेसी उदास ॥ २ ॥

तुका ह्मणे चोरी । योगियां ही सवें करी ॥ ३ ॥

---

१ पं. घाटा टोके । एका फिके०.—२ दे. एकाचेथें उच्छिष्ट०.—३ पं. ठकउनी. ठकोणि.—४ दे. त. ज्याणें ज्याणें.—५ पं. धर्माधर्में.

॥ १४५५ ॥

नामाचे पवाडे बोलती पुराणें । होऊनि कीर्तन[1] तो चि ठेला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचें स्तोत्र सदा घोकी ॥ ध्रु ॥

आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्मा नाम एक तुझें ॥ २ ॥

तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं ॥ ३ ॥

परिक्षिती मृत्यु सातां दिवसांचा । मुक्त जालों[2] वाचा उच्चारितां ॥ ४ ॥

कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामा आधीं ॥ ५ ॥

सगुण निर्गुण तुज ह्मणे वेद । तुका ह्मणे भेद नाहीं नांवां[3] ॥ ६ ॥

॥ १४५६ ॥

भूतदयापरत्वें ज़या तया परी । संत नमस्कारीं सर्वभावें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ शिकल्या बोलाचा धरिसील[4] ताठा । तरी जासी[5] वाटा यमपंथें ॥ ध्रु ॥

हिरा परिस मोहरा आणीक पाषाण । नव्हे परी जन संतां तैसी ॥ २ ॥

सरितां वोहाळां[6] गंगे सागरा समान । लेखीं तयाहून अधम नाहीं ॥ ३ ॥

आणीक अमुप होती तारांगणें । रविशशिमानें लेखूं[7] नये ॥ ४ ॥

तुका ह्मणे नाहीं नरमता[8] अंगीं । नव्हे तें फिरंगी कठिण लोह ॥ ५ ॥

॥ १४५७ ॥

आणीक कांहीं मज[9] नावडे मात । ऐका[10] पंढरिनाथावांचूनियां ॥ १ ॥

त्याची च कथा आवडे कीर्तन । तें मज श्रवण[11] गोड लागे ॥ २ ॥

---

१ पं. कीर्त्तने तूं चि ठेलें.—२ पं. जाले.—३ पं. नामीं.—४ पं. धरितील.—५ पं. जाती—६ पं. वोहळ. त. वाहळ.—७ पं. मोजूं०.—८ पं. नम्रता—९ पं. "मज" हा शब्द नाहीं.—१० दे. त. एक पंढरिनाथ वांचुनिया—११ दे. श्रवणें.

तुका ह्मणे संत ह्मणोत भलतें । विठ्ठलापरतें न मनी कांहीं ॥ ३ ॥

॥ १४५८ ॥

ठेवा जाणिव गुंडून । येथें भाव चि प्रमाण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एका अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरिराज ॥ ध्रु ॥
तर्कवितर्कासी । वाव न लगे सायासीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भावेंविण । अवघा बोलती तो सीण ॥ ३ ॥

॥ १४५९ ॥

येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तो चि ध्यावा ऐका चित्तें[1] । करूनि रितें कळिवर ॥ ध्रु ॥
षडउर्मी व्हदयांत । यांचा अंत पुरवूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे खुंटे आस । तेथें वास करी तो ॥ ३ ॥

॥ १४६० ॥

मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंतो[2] ॥ १ ॥
सुख पावे शांती धरूनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ २ ॥
तुका ह्मणे लागे थोडा च विचार । परी हे प्रकार नागविती ॥ ३ ॥

॥ १४६१ ॥

कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणीक नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पावेल गौरव वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतां ॥ ध्रु ॥
शब्दज्ञानी एक आपुलाल्या मतें । सांगती वेदांत भिन्नभावें ॥ २ ॥
तुका ह्मणे एक भाव न धरितां । पडिली हे माती त्यांचे तोंडीं ॥ ३ ॥

---

१ पं. एक चित्तें.–२ पं. चित्ता.

॥ १४६२ ॥

देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ति ।
तया इच्छा गति । हें चि सुख आगळें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी ।
रिद्धिसिद्धी द्वारीं । कर जोडूनि उभ्या[1] ॥ ध्रु ॥
नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नास ।
अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥ २ ॥
ह्या नामाचा महिमा । तुज न कळे रे मेघश्यामा[2] ।
तुका ह्मणे आह्मां । जन्म गोड यासाटीं ॥ ३ ॥

॥ १४६३ ॥

न पूजीं आणिकां देवां न करीं त्यांची सेवा । न मनीं या केशवाविण दुजें ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ काय उणें जालें मज तयापायीं । तें मी मागों काई कवणासी[3] ॥ध्रु॥
आणिकाची कीर्ती नाइकें न[4] बोलें । चाड या विठ्ठलेंविण नाहीं ॥ २ ॥
न पाहें लोचनीं श्रीमुखावांचूनि । पंढरी सांडूनि न वजें कोठें ॥ ३ ॥
न करीं कांहीं आस मुक्तीचे सायास । न भें[5] संसारास येतां जातां ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं व्हावें ऐसें जीवा । नाहीं या केशवाविण दुजें ॥ ५ ॥

॥ १४६४ ॥

नव्हे खळवादी मतां[6] च पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ साक्षत्वेंसी मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ॥ध्रु ॥

१ पं. उभया.—२ दे. त. मेघशामा.—३ पं. कवणापें.—त. आणिकांसी.—४ पं. "न बोलें" यानबदल "नाबोल."—५ पं. भीयें.—६ त. मताचा पुरता. पं. मताचि.

नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ॥ २ ॥
तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वांयां श्रमों नये ॥ ३ ॥

॥ १४६५ ॥

या चि नांवें दोष । राहे अंतरीं किल्मिष ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मना अंगीं पुण्य पाप । [1]शुभ उत्तम संकल्प ॥ ध्रु ॥
बिजाऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥ २ ॥
तुका ह्मणे चित्त । शुद्ध करावें हे नि[2]तें ॥ ३ ॥

॥ १४६६ ॥

कुशळ वक्ता नव्हे जा[3]णीव श्रोता । राहे भाव चित्ता धरूनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥ ध्रु ॥
न धोवी तोंड न करी अंघोळी । जपे सदाकाळीं [4]रामराम ॥ २ ॥
जप तप ध्यान नेणे योग[5] युक्ती । कृपाळु जो भूतीं दयावंत ॥ ३ ॥
तुका ह्मणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता जीवाहूनि ॥ ४ ॥

॥ १४६७ ॥

का[6]ळाचिया सत्ता ते नाहीं घटिका । पंढरीनायका आठवितां ॥ १ ॥
॥ ध्रु० ॥ सदाकाळ गणना करी आयुष्याची । कथेचे वेळेची आज्ञा नाहीं ॥ ध्रु ॥
याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति । आहे हे त्रिजगतीं थोर [7]वाट ॥ २ ॥
तुका ह्मणे जन्मा आलियाचें फळ । स्मरावा गोपाळ तें चि खरें ॥ ३

---

१ पं. अशुभ.—२ पं. हित.—३ पं. जाणीव तो श्रोता.—४ पं. रामनाम.—५ दे. याग.—६ पं. काळाची ते सत्ता.—७ पं. वाटे.

॥ १४६८ ॥

घरोघरीं बहु[1] जाले कवि । नेणे प्रसादाची चवी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ॥ ध्रु ॥
काढावें आइतें । तें चि जोडावें स्वहितें ॥ २ ॥
तुका ह्मणे कळे । परि[2] होताती अंधळे ॥ ३ ॥

॥ १४६९ ॥

नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि बरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥ ध्रु ॥
नये होऊं कदा निंदकाची भेटी । जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥ २ ॥
तुका ह्मणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिये दृष्टी पाप वाढे ॥ ३ ॥

॥ १४७० ॥

कथा करोनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नरकवास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रवरव कुंभपाक भोगिती[3] यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥ ध्रु ॥
असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमीं अंग लोळविती ॥ २ ॥
तुका ह्मणे तया नरक न चुकती । सांपडले हातीं यमाचिया ॥ ३ ॥

॥ १४७१ ॥

नाइकावे कानीं तयाचे ते बोल । भक्तीविण फोल ज्ञान सांगे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण । दुःख पावे सीण श्रोता वक्ता ॥ ध्रु ॥

---

१ पं. "बहु" शब्द नाहीं.–२ पं. आहाच ज्ञाकितलि डोळे ।.–३ पं. करिती.

अहं ब्रह्म ह्मणोनि पाळीतसे[1] पिंडा । नो[2] बोलावें भांडा तया सवें ॥ २ ॥
वेदबाह्य लंड बोले जो[3] पाषांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें ॥ ३ ॥
तुका ह्मणे खंडी देवभक्तपण । वरिष्ठ[4] त्याहूनि श्वपच तो ॥ ४ ॥

॥ १४७२ ॥

वेदविहित तुह्मी आइका हो कर्म । बोलतों[5] तीं वर्म संतांपुढें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चारी वर्ण जाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भोगीं[6] विभागिलें ॥ ध्रु ॥
प्रथम पाउलीं पावविला पंथ । आदि मध्य अंत भेद नाहीं ॥ २ ॥
आंबे बोरी वड[7] बाभुळा चंदन । गुणागुणें[8] भिन्न अग्नि एक ॥ ३ ॥
तुका ह्मणे मन उन्मन जों होय । तोंवरि हे सोय विधि पाळीं ॥ ४ ॥

॥ १४७३ ॥

तीर्थांचें[9] जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तें आह्मीं देखिलें आपुल्या नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥ ध्रु ॥
जीवांचें जीवन सुखाचें सेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥ २ ॥
जनांचा[10] जनिता कृपेचा सागर । दीनां लोभापर दुष्टां[11] काळ ॥ ३ ॥
सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं[12] तें चि असे ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं श्रुती आतुडलें । आह्मां सांपडलें गीतीं गातां ॥ ५ ॥

॥ १४७४ ॥

माझे मनोरथ पावविले[13] सिद्धी । तईं पायीं बुद्धि स्थिरावली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें[14] हे ॥ ध्रु ॥

---

१ दे. त. पाळित.—२ पं. बोलों नये भांडा०.—३ पं. तो.— त. वरिष्ठ तो जाण श्वपचाहूनि ।.—५ पं. बालतो तें वर्म.—६ पं. जगीं.—७ पं. वन.—८ पं. गुणागुण. त. गुणागुणीं—९ दे. तीर्थांचे मूळ व्रतांचें फळ. त. तीर्थांचें तें मूळ व्रतांचें तें फळ—१० पं. जगाचा—११ दे. त पं. दृष्टां.—१२ पं. तो.—१३ दे. पावले.—१४ दे. स्मरण हें.

त्रिविध तापाचें जालेंसे दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥ २ ॥
महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगाअंगीं[1] संग अखंडित ॥ ३ ॥
जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामावलें[2] ॥ ४ ॥
तुका ह्मणे माप भरी आलें सिंगे[3] । धारबोळ गंगे पूर वाहे ॥ ५ ॥

॥ १४७५ ॥

कृपेचें[4] उत्तर देवाचा प्रसाद । आनंदीं आनंद वाढवावा ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ बहुतांच्या भाग्यें लागलें जाहाज । येथें आतां काज लवलाहें[5] ॥ ध्रु ॥
अलभ्य तें आलें दारावरी फुका । येथें[6] आतां चुका न पाहिजे ॥ २ ॥
तुका ह्मणे जिव्हाश्रवणाच्या द्वारें । माप भरा बरें सिगेवरि ॥ ३ ॥

॥ १४७६ ॥

पापपुण्यसुखदुःखाचीं मंडळें । एक एकांबळें[7] वाव घेती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचवितो काळ जीवांसी[8] तो[9] ॥ ध्रु ॥
स्वर्गाचिया भोगें सरतां नरक । मागें पुढें एक एक दोन्ही ॥ २
तुका ह्मणे भय उपजलें मना । घेई नारायणा कडिये मज ॥ ३ ॥

॥ १४७७ ॥

वचना फिरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ केला आतां अंगीकार । न मनी भार समर्थ ॥ ध्रु ॥
संसाराचा नाहीं पांग । देवें[10] सांग सकळ ॥ २ ॥
तुका ह्मणे [11]कीर्त वाणूं । मध्यें नाणूं संकल्प ॥ ३ ॥

---

१ पं. अंगोअंगीं.—२ पं. मावळलें.—३ पं. सीग.—४ पं. कृपेची.—५ पं. लवलाहो—६ पं. आतां येथें चुका०.—७ पं. एका वेळे डाव घेती ।.—८ त. भूतांसी.—९ पं. हा.—१० पं. देवें.—११ पं. कीर्ती.

तुका ह्मणे कळे । पारि होताती अंधळे ॥ ३ ॥

॥ १५०८ ॥

अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ ध्रु ॥

माझी कोणी न धरो शंका । हो[1] कां लोकां निर्द्वंद्व[2] ॥ २ ॥

तुका ह्मणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें[3] ॥ ३ ॥

॥ १५०९ ॥

सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ ध्रु ॥

अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ २ ॥

तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्याविण ॥ ३ ॥

॥ १५१० ॥

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ थोरींव सांडिली आपुली परिसें । [4]नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥ ध्रु ॥

जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें[5] ॥ २ ॥

भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ३ ॥

तुका ह्मणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ४ ॥

॥ १५११ ॥

जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुह्मी सांभाळिलों[6] संतीं । भय निवारली[7] खंती ॥ ध्रु ॥

[8]कृतकृत्य जालों । इच्छा केली ते पावलों ॥ २ ॥

---

१ पं. ऐसें हो कां निर्द्वंद.—२ दे. निद्वंद. त. निर्द्वंद.—३ पं. ऐसा.—४ दे. नेणसि वो. पं. नेणो सिवो.—५ पं. पर उपकारें.—६ पं. सांभाळिलें.—७ पं. निरसली.—८ दे. त. कृत्याकृत्य. पं. कृत्यकृत्य.

तुका ह्मणे माती । केली कस्तुरीनें सरती ॥ ३ ॥

॥ १४८२ ॥

आशाबद्ध वक्ता । भय श्रोतियाच्या[1] चित्ता ॥ १ ॥

॥ ध्रु. गातो तें चि[2] नाहीं ठावें । तोंड वासी कांहीं[3] द्यावें ॥ ध्रु ॥

जालें लोभाचें मांजर । भीक मागे दारोदार ॥ २ ॥[4]

माप आणि गोणी । तुका[5] ह्मणे रितीं दोन्ही ॥ ३ ॥

॥ १४८३ ॥

तक्र शिष्या मान । दुग्धा ह्मणे नारायण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐशीं ज्ञानाचीं डोबडें । आशाविटंबिलीं मूढें ॥ ध्रु ॥

उपदेश तो जगा । आपण सोंवळा इतका मांगा ॥ २ ॥

रसनाशिश्नाचे अंकित । तुका ह्मणे वरदळ स्फीत[6] ॥ ३ ॥

॥ १४८४ ॥

ब्रह्मचारि धर्म घोकावें[7] अक्षर । आश्रमीं विचार षट्कर्में[8] ॥ १ ॥

॥ध्रु.॥ वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग । संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥ध्रु॥

परमहंस तरी जाणे सहज वर्म । तेथें याती धर्म कुळ नाहीं ॥ २ ॥

बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥ ३ ॥

तुका ह्मणे कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा तो सीण दुःख पावे ॥ ४ ॥

॥ १४८५ ॥

आह्मी क्षेत्रींचे संन्यासी । देहभरित ऱ्हषीकेशी ।

नाहीं केली ऐशी । आशाकामबोहरी ॥ १ ॥

---

१ दे. त. श्रोतयाच्या.–२ पं. ही.–३ पं काय.–४ पं. "उभयतां लोभी मन । वांयां गेलें तें भजन ॥ बहिर्मुख एके ठायीं । तैसें जालें तयां दोहीं ॥" हीं दोन कडवीं जास्त आहेत.–५ दे. त. तुका ह्मणे गोणी । माप आणि रितीं दोन्ही.–६ दे. स्पित. त. स्थित.–७ पं. घोकावीं अक्षरें.–८ त. पं. षट्कर्म.

॥ ध्रु. ॥ आलें अयाचित अंगा । सहज तें आह्मां भागा ।
दाता पांडुरंगा । ऐसा करितां निश्चिंती ॥ ध्रु ॥
दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडण ।
बंदीं[1] बंद कौपीन । बहिरवास औठडें ॥ २ ॥
काळें साधियेला काळ । मन करूनि निश्चळ ।
लौकिकीं विटाळ । धरूनि असों ऐकांत[2] ॥ ३ ॥
कार्यकारणाची चाली । वांचावाचत्वें[3] नेमिली ।
एका नेमें चाली । स्वरूपीं च राहाणें ॥ ४ ॥
नव्हे वेषधारी । तुका आहाच वरवरी ।
आहे तैसीं बरीं । खंडें निवांडितों[4] वेदांची ॥ ५ ॥

॥ १४८६ ॥

निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोंपी गुहा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोठें हीं चित्तासी नसावें बंधन । ल्हृदयीं नारायण सांटवावा[5] ॥ ध्रु ॥
नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धी इंद्रियें[6] दमी ॥ २ ॥
तुका ह्मणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणांची गोवी उगवूनि ॥ ३ ॥

॥ १४८७ ॥

जैसीं तैसीं तरी । शरणांगतें[7] तुझीं हरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां न पाहिजे केलें । ब्रीद लटिकें आपुलें ॥ ध्रु ॥
शुद्ध नाहीं चित्त । परी ह्मणवितों भक्त ॥ २ ॥

---

१ पं. वंद बंदाचा कोपीन ।.—२ पं. एकांता.—३ " वाच्यावाच्यत्वें " असावें.—४ पं. " निवडितों " याबद्दल " निवडी. "—५ पं. सर्वकाळ.—६ पं. इंद्रिय.—७ पं. तुझीं शरणांगतें हरी.

मज कोण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ॥ ३ ॥

॥ १४८८ ॥

नाशवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नामें चि तारिले कोटयान हे कोटी । नामें हे[1] वैकुंठीं बैसविले ॥ ध्रु ॥

नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुह्मी मनीं आठवाना ॥ २ ॥

तुका ह्मणे नाम वेदांसी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाटीं ॥ ३ ॥

॥ १४८९ ॥

ओ[2]ळवितां बाळें । मातेतें सुख आगळें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ द्यावें आवडी भातुकें । पाहे निवे कवतुकें ॥ ध्रु ॥

लेवूं[3]नि अळंकार । दृष्टी करावी सादर ॥ २ ॥

आपुलिये पदीं । बैसवूनि कोडें वंदी ॥ ३ ॥

नेदी लागों दिठी । उचलोनि लावी कंठीं ॥ ४ ॥

तुका ह्मणे लाभा । वारि घ्यां[4] वो पद्मनाभा ॥ ५ ॥

॥ १४९० ॥

तप तीर्थ दान व्रत आचरण । गातां हरिगुण वारूं नये ॥ १ ॥

॥ ध्र. ॥ कोटि कुळें[5] त्याचीं वाटुली पाहाती । त्या तया घडती ब्रह्महत्या ॥ ध्रु ॥

आपुलिया पापें न सुटे सायासें । कोणा काळें ऐसें निस्तरेल ॥ २ ॥

व्हावें साह्य तया न घलावें भय । फुकासाटीं पाहे लाभ घात ॥ ३ ॥

---

१ पं. ची.–२ पं. आळविती.–३ पं लेउनि.–४ पं. घ्यावें.–५ पं. कुळी.

तुका ह्मणे हित माना या वचना । सुख दुःख जाणा सांचे फुका ॥ ४ ॥

॥ १४९१ ॥

देवासाटीं जाणा तयासी च आटी । असेल ज्या गांठीं पुण्यराशी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ निर्बळा पाठवी बळें वाराणसी । गेला[1] आला त्यासी अर्ध पुण्य ॥ ध्रु ॥
कथे निद्राभंग करावा भोजनीं । तया सुखा धणी पार नाहीं ॥ २ ॥
यागीं ऋणें[2] घ्यावें द्यावें सुख लाहीं । बुडतां चिंता नाहीं उभयतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे वर्म जाणोनि करावें । एक न घलावें[3] एकावरी ॥ ४ ॥

॥ १४९२ ॥

अग्नीमाजी पडे धातु । लीन होउनि राहे आंतु[4] ॥
होय शुद्ध न पवे घातु । पटतंतुप्रमाणें[5] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बाह्यरंगाचें कारण । मिथ्या अवघें चि भाषण[6] ।
गर्व ताठा हें अज्ञान । मरण[7] सर्वे वाहातसे ॥ ध्रु ॥
पुरें मातलिया नदी । लव्हा नांदे जीवनसंधी ।
वृक्ष उन्मळोनि भेदी । परि तो कधीं भंगेना ॥ २ ॥
हस्ती परदळा[8] जो भंगी । तया पायीं न मरे मुंगी ।
कोण जाय संगी । पाणीवाणी तयेच्या[9] ॥ ३ ॥
पिटितां घणें वरि सैरा । तया पोटीं राहे हिरा ।
तैशा काय तगती गारा । तया थोरा होऊनि ॥ ४ ॥
लीन दीन हें चि सार । भव उतरावया पार ।

---

१ दे. त. मेला.—२ दे. त. रीण. पं. रुण.—३ पं. घालावें.—४ दे. अतु. त. अतुं. पं. आतु.—५ दे. पं. पटतंतुप्रमाण.—६ दे. भषण. पं. भूषण.—७ पं. मरणा.—८ त. परदळा तें भंगी. दे. परदळ तें भंगी.—९ पं. तयाच्या.

बुडे माथां भार । तुका ह्मणे वांहोनि[1] ॥ ५ ॥

॥ १४९३ ॥

आह्मी वीर जुंझार । करूं जमदाढे मार ।
तोंपटिले[2] भार । मोड जाला दोषांचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाला हांहाकार[3] । आले हांकीत जुंझार ।
शंखचक्रांचे शृंगार । कंठीं हार तुळसीचे ॥ ध्रु ॥
रामनामांकित बाण । गोपी लाविला चंदन ।
झळकती निशाणें[4] । गरुडटके पताका ॥ २ ॥
तुका ह्मणे काळ । जालों जिंकोनि निश्चळ ।
पावला सकळ । भोग आह्मां आमचा ॥ ३ ॥

॥ १४९४ ॥

आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आहे तें अधीन आपुले हातीं । आणिकां ठेविती काय बोल ॥ध्रु॥
जाणतिया पाठीं लागला उपाध । नेणता[5] तो सिद्ध भोजनासी ॥ २ ॥
तुका ह्मणे भय बांधलेंसे[6] गांठी । चोर लागे पाठी दुम तया ॥ ३ ॥

॥ १४९५ ॥

आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी । धड तें नासोनि भलता टाकी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं[7] ॥ध्रु॥
ओल शुद्ध काळी[8] काळें जिरें बीज । कैंचें लागे निज हातां[9] तेथें ॥ २ ॥
एकें[10] गहू करिती अनेक प्रकार । सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ॥ ३ ॥

---

१ पं. राहोनि.—२ पं. थापटिले भार । मोड जाला महा दोषां ।—३ पं. हाहःकार.—४ पं. निशाण.—५ पं. नेणता तो सावध भजनासी ।—६ दे. बांधलें गांठीं. त. बांधियेलें.—७ त. अळंकारें.—८ पं. काळी.—९ पं. हातीं.—१० पं. एका गहु करी.

तुका ह्मणे विषा रुचि एकां हातीं । पाधानी नासिती नवनीत ॥ ४ ॥

॥ १४९६ ॥

वाटे या जनाचें थोर बा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ ध्रु ॥
काय मानुनियां राहिले निश्चिंती । काय जाब देती यमदूतां ॥ २ ॥
कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ३ ॥
काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणों ॥४॥
कां[1] हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ५ ॥
काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥ ६ ॥
तुका ह्मणे कां[2] हीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥ ७ ॥

॥ १४९७ ॥

काय एकां जालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण[3] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥देखतील डोळां ऐकतील[4] कानीं । बोलिलें पुराणीं तें ही ठावें ॥ ध्रु ॥
काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥ २ ॥
कां हें कळों नये आपुलें[5] आपणा । बाळत्व तारुण्य वृद्धदशा ॥ ३ ॥
कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणा[6] आलें ॥ ४ ॥
कां हें जन्म वांयां घातलें उत्तम । कां हे रामराम न ह्मणती ॥ ५ ॥
काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥ ६ ॥
काय करिती हे बांधलिया[7] काळें । तुका ह्मणे बळें वज्रपाशीं ॥ ७ ॥

---

१ पं. एक.—२ पं. " कां हीं " याच्याबद्दल " कां हे. "—३ पं. ह्मणे.—४ दे. पं. ऐकती.—५ पं. आपण.—६ पं. कामा ( ह्मणजे " कामा " असें दोन वेळ आहे ).—७ पं. बांधियेले.

॥ १४९८ ॥

जुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्यां ॥ १ ॥
॥ध्रु.॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्यां मनीं बैसलासे ॥ध्रु॥
ऊर्ध्व पुंड्र[1] भाळीं कंठीं[2] शोभे माळ । कांपिजे कळिकाळ[3] तया भेणें ॥ २ ॥
तुका ह्मणे शंखचक्रांचे शृंगार । नामामृतसार मुखामाजी ॥ ३ ॥

॥ १४९९ ॥

जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छीतसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संचितासी जाय मिळोनियां खोडी। पतनाचे ओढीवरी[4] हांव ॥ध्रु॥
बांधलें गांठी तें लागलें[5] भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ॥ २ ॥
तुका ह्मणे जया गांवां जाणे जया । पुसोनियां तया[6] वाट चाले ॥ ३ ॥

॥ १५०० ॥

मानी भक्तांचे उपकार । ऋणीया[7] ह्मणवी निरंतर ।
केला निर्गुणीं आकार । कीर्ति[8] मुखें वर्णितां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा ।
जाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडावया ॥ ध्रु ॥
अंबऋषीकारणें । जन्म घेतले नारायणें ।
एवढें भक्तीचें लहणें[9] । दास्य करी हां[10] दासाचें ॥ २ ॥
ह्मणियें[11] करितां शंका न धरी । रक्षपाळ बळिच्या द्वारीं ।
भक्तीचा आभारी । रीग न पुरे जावया ॥ ३ ॥
अर्जुनाचे रथवारु । ते वागवी सर्वेश्वरु ।

१ दे. ऊर्ध पुंड भाळीं. त. उर्ध्व पुंड भाळीं. पं. ऊर्ध्व पुंड भाळ.—२ दे. कंठीं शोभे माळीं. त. कंटीं शोभे माळ.—३ त. काळि काळें.—४ पं. जोडीवरि.—५ पं. लागतें.—६ पं. "तया" हा शब्द नाहीं.—७ दे. त. रुणीया.—८ पं. कीर्ति मुखें गर्जतां.—९ पं. लाहाणें.—१० त. पं. "हा" शब्द नाहीं.—११ पं. मनीयें.

एवढे भक्तीचे उपकारु । मागें मागें हिंडतसे ॥ ४ ॥
पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउलीं[1] विटेवरी ।
न वजे कट करीं । धरूनि तेथें राहिला ॥ ५ ॥
भावभक्तीचा अंकित । नाम साजे दिनानाथ ।
ह्मणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनि ॥ ६ ॥

॥ १५०१ ॥

सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्यांचा आह्मांसी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥ ध्रु
रिद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥ २ ॥
तुका ह्मणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥ ३ ॥

॥ १५०२ ॥

ठाकलोंसें द्वारीं । उभें याचक भीकारी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मज भीक कांहीं देवा । प्रेमभातुकें[2] पाठवा ॥ ध्रु ॥
याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥ २ ॥
तुका ह्मणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥ ३ ॥

## सदाशिवावर अभंग ॥ २ ॥

॥ १५०३ ॥

काय धर्म नीत । तुह्मां[3] शिकवावें हित ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघें रचियेलें हेळा । लीळा ब्रह्मांड सकळा ॥ ध्रु ॥
नाम महादेव । येथें निवडला भाव ॥ २ ॥

---

१ पं. पाउलें.—२ पं. प्रेम बाहेरी पाठवा.—३ पं. तुज.

तुका ह्मणे वेळे । माझें तुह्मां कां न कळे ॥ ३ ॥

॥ १५०४ ॥

भांडावें तें[1] गोड । पुरे सकळ ही कोड ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसा घरींचा या मोळा । ठावा निकटां जवळां ॥ ध्रु ॥

हाक देतां दारीं । येती जवळी सामोरीं ॥ २ ॥

तुका ह्मणे शिवें । मागितलें हातीं द्यावें ॥ ३ ॥ ॥ २ ॥

॥ १५०५ ॥

ऐसें[2] कां जालें तें मज हीं न कळे । कीर्तनाचे रळेपळे जगीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कैसें तुह्मां देवा वाटतसे बरें । संतांचीं उत्तरें लाजविलीं ॥ ध्रु॥

भाविकां कंटक करितातीं पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥ २ ॥

तुका ह्मणे नाम निर्वाणीचा बाण । याचा अभिमान नाहीं तुह्मां ॥ ३ ॥

॥१५०६ ॥

तुह्मी बैसलेती निर्गुणाचे खोळे । आह्मां कां हे डोळे कान दिले ॥१॥

॥ ध्रु. ॥ नाइकवे तुझी अपकीर्त्ति देवा । अं[3]व्हेरली सेवा न देखवे ॥ ध्रु ॥

आपुले पोटीं तों राखियेला वाव । आह्मांसी कां भाव अल्प दिला ॥ २॥

तुका ह्मणे दुःखी अ[4]सें हें कळों द्या । पुढिलिया धंद्या मन नेघे[5] ॥ ३ ॥

॥ १५०७ ॥

सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सारा अवघें गाबाळ । डोळ्या आडील पडळ ॥ ध्रु ॥

शुद्ध भावाविण । जो जो केला तो तो सीण ॥ २ ॥

---

१ त. तों.—२ पं. ऐसें कां जालें मज तें हीन कळे.—३ पं. अव्हेरिले.—४ पं. ऐसें. त. आहे.—

तुका ह्मणे कळे । पारि होताती अंधळे ॥ ३ ॥

॥ १५०८ ॥

अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ ध्रु ॥

माझी कोणी न धरो शंका । हो[1] कां लोकां निर्द्वंद्व[2] ॥ २ ॥

तुका ह्मणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें[3] ॥ ३ ॥

॥ १५०९ ॥

सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ ध्रु ॥

अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ २ ॥

तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्याविण ॥ ३ ॥

॥ १५१० ॥

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ थोरींव सांडिली आपुली परिसें । [4]नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥ ध्रु ॥

जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें[5] ॥ २ ॥

भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ३ ॥

तुका ह्मणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ४ ॥

॥ १५११ ॥

जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुह्मी सांभाळिलों[6] संतीं । भय निवारली[7] खंतीं ॥ ध्रु ॥

[8]कृतकृत्य जालों । इच्छा केली ते पावलों ॥ २ ॥

---

१ पं. ऐसें हो कां निर्द्वंद.—२ दे. निद्वंद. त. निर्द्वंद.—३ पं. ऐसा.—४ दे. नेणसि वो. पं. नेणो सिवो.—५ पं. पर उपकारें.—६ पं. सांभाळिलें.—७ पं. निरसली.—८ दे. त. कृत्याकृत्य. पं. कृत्यकृत्य.

तुका ह्मणे काळ । आतां करूं न शके बळ ॥ ३ ॥

॥ १५१२ ॥

काय पुण्यराशी । गेल्या भेदूनि आकाशीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मी जालेति कृपाळ । माझा केला जी सांभाळ ॥ ध्रु ॥
काय वोळलें संचित । ऐसें नेणें अगणित ॥ २ ॥
तुका ह्मणे नेणें । काय केलें नारायणें ॥ ३ ॥

॥ १५१३ ॥

असें येथींचिया दीनें[1] । भाग्यहीन[2] सकळां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मांडवल एवढें गांठी । नाम कंठीं धरियेलें ॥ ध्रु ॥
आणिक तें दुजें कांहीं । मज नाहीं यावरी ॥ २ ॥
तुका ह्मणे केला कोणें । एवढा नेणें लौकिक ॥ ३ ॥

॥ १५१४ ॥

गायें नाचें वायें[3] टाळी । साधन कळीं[4] उत्तम हें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय जाणों तरले किती । नाव ऐती या बैसा[5] ॥ ध्रु ॥
सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ॥ २ ॥
तुका ह्मणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ॥ ३ ॥

॥ १५१५ ॥

सर्वकाळ माझे चित्तीं । हे चि खंती राहिली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बैसलें तें रूप डोळां । वेळोवेळां आठवे ॥ ध्रु ॥
वेव्हाराची सरली मात । अखंडित अनुसंधान ॥ २ ॥
तुका ह्मणे वेध जाला । अंगा आला श्रीरंग ॥ ३ ॥

---

१ दे. पं. दिनें.—२ त. भाग्यहीने.—३ त. पं. वाहें.—४पं. कली.—५ दे. " बैसती या नावेवरी " असें मागून शोध व अंक घालून केलें आहे. प्रथम पं. व त. यांजप्रमाणेंच पाठ होता. त. नाव आइती.

॥ १५१६ ॥

जैसें[1] दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ दुःख पावायाचें मूळ । रहणी[2] ठाव नाहीं ताळ ॥ ध्रु ॥

माळामुद्रांवरी । कैंचा सोंगें जोडे हरि ॥ २ ॥

तुका ह्मणे देखें । ऐसे[3] परीचीं बहुतेकें ॥ ३ ॥

॥ १५१७ ॥

अवघा तो शकुन । ह्रदयीं देवाचे चरण[4] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥ ध्रु ॥

संग हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥ २ ॥

तुका ह्मणे हरिच्या दासां । शुभकाळ अवघ्या दिशा ॥ ३ ॥

॥ १५१८ ॥

ब्रह्मरूपाचीं कर्मै ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ठेविलिया दिसे[5] रंगाऐसी शिळा। उपाधि निराळा स्फटिक मणि ॥ ध्रु ॥

नानाभाषामतें[6] आळविती बाळा । प्रबोध[7] तो मूळा जननीठायीं ॥ २ ॥

तुका ह्मणे माझें नमन जाणतियां। लागतसें[8] पायां वेळोवेळां ॥ ३ ॥

॥ १५१९ ॥

नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वाऱ्या हातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ति मुख त्याचें नारायण ॥ ध्रु ॥

---

१ पं. जैसा.–२ दे. रहनी.–३ पं. ऐसीं.–४ पं. चिंतन.–५ त. दावी.–६ त. नानाभाषा मत्यें आळवितां बाळा. पं. नानाभाषे माते आळविती बाळें.–७ पं. प्रबोधी तो मूळ जननी०.–८ दे. लागती.

प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तंव[1] जन सकळ साक्षी ॥ २॥
तुका ह्मणे बरा सत्याचा सायास । नवनीता नाश नाहीं पुन्हा ॥ ३ ॥

॥ १५२० ॥

तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसे विष्णुदास नव्हती सावडे । एकाचिया पडे पायां एक ॥ध्रु॥
अक्षरें आणिती अंगासी जाणीव । इच्छा ते गौरव पूज्य व्हावें ॥ २ ॥
तुका ह्मणे विधिनिषेधाचे डोहीं । पडिले[2] त्यां नाहीं देव कधीं ॥ ३ ॥

॥ १५२१ ॥

पटे ढाळूं आह्मी विष्णुदास जगीं । लागों नेदूं अंगीं पापपुण्य ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ निर्भर अंतरीं सदा सर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥ ध्रु ॥
बळिवंत जेणें रचिलें सकळ । आह्मां त्याचें बळ अंकितांसी ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी देखत चि नाहीं । देवाविण कांहीं दुसरें तें ॥ ३ ॥

॥ १५२२ ॥

कथेचा उलंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओळखा[3] तो ॥१॥
॥ ध्रु. ॥ कासया जीऊन जाला भूमी भार । अनउपकार[4] माते कुंसी ॥ध्रु॥
निद्रेचा आदर जागरणीं वीट । त्याचे पोटीं कीट कुपथ्याचें ॥ २ ॥
तुका ह्मणे दोन्ही बुडविलीं कुळें । ज्याचें[5] तोंड काळें कथेमाजी ॥ ३ ॥

॥ १५२३ ॥

सांडोनियां[6] दों अक्षरां । काय करूं हा पसारा ।

१ पं. तं.— २ पं. बुडाले.—३ पं. ओळखावा तो.—४ दे. आन्ह. त. आण. ("अनुपकार" याच्याबद्दल "अनउपकार" असा कवीचा अभिप्राय दिसतो. ).—५ पं. त्याचें.— ६ दे. त. सांडोनी.

विधिनिषेधाचा भारा । तेणें दातारा नातुडसी[1] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणोनि बोबड्या[2] उत्तरीं । वाचे जपें निरंतरीं ।

नाम तुझें हरी । भवसागरीं तारूं तें[3] ॥ ध्रु ॥

सर्वमय ऐसें वेदांचें वचन । श्रुति गर्जती[4] पुराणें ।

नाहीं आणीक ध्यान[5] । रे साधन मज चाड ॥ २ ॥

शेवटीं[6] ब्रह्मार्पण । या चि मंत्राचें कारण ।

काना मात्रा[7] वांयांविण । तुका ह्मणे बिंदुलीं[8] ॥ ३ ॥

॥ १५२४ ॥

हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधुपार उतरलों[9] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ फावलें फावलें आतां । पायीं संतां विनटलों ॥ ध्रु ॥

हरिनामाचा शस्त्र घोडा । संसार गाढा छेदिला ॥ २ ॥

हरिनामांचीं[10] धनुष्यकांडें । विन्मुख तोंडें कळिकाळ ॥ ३ ॥

येणें चि बळें सरते आह्मी । हरिचे नामीं[11] [12]लोकीं तिहीं ॥ ४ ॥

तुका ह्मणे जालों साचे । श्रीविठ्ठलाचे डिंगर ॥ ५ ॥

॥ १५२५ ॥

नव्हे[13] हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आरूप हा शब्द देवाचा प्रसाद । करविला वाद तैसा केला ॥ ध्रु ॥

देहपिंड दान दिला एकसरें । मुळिचें तें खरें टांकसाळ ॥ २ ॥

तुका ह्मणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट धाय ॥ ३ ॥

---

१ दे. नातुडेसी.—२ दे. त. बोबडा.—३ पं. हें.—४ पं. बोलती.—५ पं. नाहीं आन ध्यान । साधनें मज चाड ॥.—६ पं. सेवटीं हें ब्रह्मार्पण ।.—७ दे. त. मात्र.—८ पं. बिंदुलें.—९ त. उतरीलों. पं. उतरले.—१० त. पं. हरिनामाचें.—११ दे. नामें.—१२ पं. तिहीं लोकीं.—१३ पं. नव्हे गुरुत्व.

॥ १५२६ ॥

घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेवीं[1] ।
तैसा नारायण जीवीं । जीवसाक्षीवर्तनें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं ।
विचित्र ये रंगीं । रंगें रंगला गोसावी ॥ ध्रु ॥
देह संकल्पासारिखें[2] । एक एकांसी पारिखें ।
सुख आणि दुःखें । अंगीं कर्मं त्रिविध ॥ २ ॥
तुका ह्मणे कोडें । न कळे तयासी सांकडें ।
त्याचिया निवाडें । उगवे[3] केलें विंदान ॥ ३ ॥

॥ १५२७ ॥

सद्गदित कंठ दांटो[4] । येणें फुटो[5] ह्रदय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चिंतनाचा एक लाहो । तुमच्या अहो[6] विठला ॥ ध्रु ॥
नेत्रीं जळ वाहो[7] सदा । आनंदाचे रोमांच ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ३ ॥

॥ १५२८ ॥

जेथें देखें तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ डोळां बैसलें बैसलें । ध्यान राहोनि संचलें ॥ ध्रु ॥
सरसावलें मन । केलें सोज्वळ लोचन ॥ २ ॥
तुका ह्मणे सवें । आतां असिजेत[8] देवें ॥ ३ ॥

---

१ त. तेवी.—२ पं. संचल्यासारिखें.—३ पं. उठाव (पण हा लेखकप्रमाद आहे.)—४ त. दाटे.—५ त. फुटे.—६ पं. हो.—७ त. वाहे—८ असिजेतें ?

॥ १५२९ ॥

तान्हे तान्ह प्याली । भूक[1] भुकेनें खादली ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जथें तें च नाहीं जालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥ ध्रु ॥

वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पायीं ॥ २ ॥

शेष उरला तुका । जीवों[2] जीवीं जाला चुका ॥ ३ ॥

॥ १५३० ॥

पाणिपात्र दिगंबरा[3] । हस्त करा सारिखे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आवश्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥ ध्रु ॥

भिक्षा कामधेनुऐशी । अवकाशीं शयन ॥ २ ॥

पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं[4] ॥ ३ ॥

॥ १५३१ ॥

विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥ ध्रु ॥

लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥ २ ॥

तुका ह्मणे गंगासागरसंगमीं । अवघ्या जाल्या ऊर्मि एकमय ॥ ३ ॥

॥ १५३२ ॥

कृष्णरामनाम[5] मांडीं पांवोळी[6] । तेणें होइल होळी पापा धुनी[7] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥ ध्रु ॥

जोडी तरी ऐसी करावी न सरे ॥ पुढें आस नुरे[8] मागुताली ॥ २ ॥

तुका ह्मणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ॥ ३ ॥

---

१ त. भूक भुकेली च ठेली ।.—२ पं. जीव जीवा जाला०.—३ दे. त. दिगांबरा. पं. दिगांबर.—४ पं. त आलक्षीं.—५ पं. रामकृष्णनाम.—६ त. पं. मांडी पारे वोळी. ( मांडीं रे पांवोळी असावें. )—७ पं. पापधुनी.—८ पं. उरे.

॥ १५३३ ॥

परमार्थी तो न ह्मणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥ १ ॥

॥ धृ. ॥ थोडा चि स्फुलिंग बहुत दावाग्नि । वाढतां इंधनीं[1] वाढविला ॥ धृ ॥

पितियानें तैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देवें[2] वसे ॥ २ ॥

तुका ह्मणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ३ ॥

॥ १५३४ ॥

ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥ १ ॥

॥ धृ. ॥ देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें[3] ॥ धृ ॥

कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ २ ॥

तुका ह्मणे भेदाभेद । गेले[4] वाद खंडोनि ॥ ३ ॥

॥ १५३५ ॥

सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेदकाम निवारूनि ॥ १ ॥

॥ धृ. ॥ न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघें चि घरीं बैसलिया ॥ धृ॥

देवाचीं च नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥ २ ॥

तुका ह्मणे आहे[5] भावें चि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥ ३ ॥

॥ १५३६ ॥

ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ १ ॥

॥ धृ. ॥ ह्मणोनियां ऐसें[6] सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ धृ ॥

वेदपरायण[7] पंडित वाचक । न मिळती एक एकांमधीं ॥ २ ॥

पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥ ३ ॥

---

१ त. विंधनीं.—२ पं. देवकाजीं.—३ दे. त. पं. दरुषणें.—४ पं. गेला—५ पं. होय.—६ पं. ह्मणउनि आवघे सांडीं रे उपाया.—७ दे. वेदपारायण.—पं. एकामतीं.

आपुलिया नाहीं निवाले जे अंगें[1] । योगी करती रागें गुरगुरु ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज कोणांचा पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां ॥ ५ ॥

॥ १५३७ ॥

पंढरीची वाट पाहें निरंतर । निडळावरी कर ठेवूनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जातियां निरोप पाठवीं माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥ध्रु॥
पैलें[2] कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिकें चतुर्भुज ॥ २ ॥
तुका ह्मणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवां पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १५३८ ॥

ऐसी जोडी करा राम[3] कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नासिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा सीण तें चि फळ ॥ध्रु॥
नाव धड करा सहस्रां[4] नामांची । जे भवसिंधूची थडी पावे ॥ २ ॥
तुका ह्मणे काळा हाणा तोंडावरी । भाता भरा हरिरामबाणीं[5] ॥ ३ ॥

॥ १५३९ ॥

पाहें मजकडे भरोनियां दृष्टी । बहुत हिंपुटी[6] जालों माते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करावेंसें वाटे जीवा स्तनपान । नव्हे हें वचन शृंगारिक[7] ॥ ध्रु॥
सत्यासाटीं माझी शब्दविवंचना । जोडिल्या वचनाचें तें नव्हे ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी कळवळ्याची कींव । भागलासे जीव कर्तव्यानें ॥ ३ ॥

॥ १५४० ॥

तुज ह्मणतील कृपेचा सागर । तरि कां केला धीर पांडुरंगा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आझुनि कां नये तुज माझी दया । काय देवराया पाहातोसि ॥ध्रु॥

---

१ पं. आंग । येकी करती०.–२ पं. हें कडवें नाहीं.–३ पं. नाम.–४ पं. त. सहस्र.–५ पं. हरिराम बाणें.–६ दे. हिंपुष्टी.–७ दे. त. श्रुंघारिक. पं. शृंघारिक.

आळवितों जैसें पाडस कुरंगिणी । पीडिलिया वनीं तान[1]भूक ॥ २ ॥
प्रेमरसपान्हा पाजीं माझे आई । धांवें वो विठाई वोरसोनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें कोण [2]हेरी दुःख । तुजविण एक पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १५४१ ॥

भक्ति [3]तों कठिण शुळावरील पोळी । [4]निवडे तो बळी विरळा शूर ॥ १ ॥
॥धु.॥ जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत । पायाविण [5]भिंतें तांतडीची ॥ ध्रु ॥
[6]कामावलें तरि पाका ओज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥ २ ॥
तुका ह्मणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥ ३ ॥

॥ १५४२ ॥

पापी ह्मणों तरि आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐशा [7]विचाराचे घालूनि कोंडणी । काय चक्रपाणी [8]निजलेती ॥ ध्रु ॥
एकवेळ जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें कैसें नेलें दुःख ॥ २ ॥
तुका ह्मणे अहो वैकुंठनायका । चिंता कां सेवका तुमाचिया ॥ ३ ॥

॥ १५४३ ॥

उगविल्या गुंती । ऐशा मागें नेणों किती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ [9]ख्याती केली अजामेळें । होतें निघालें दिवाळें ॥ ध्रु ॥
मोकलिला प्रायश्चित्तीं । कोणी न धरिती हातीं ॥ २ ॥
तुका ह्मणे मुक्त वाट । वैकुंठीची घडघडाट ॥ ३ ॥

---

१ त. तान भुके.—२ पं. हरिल.—३ पं. ते.—४ पं. "निवडे तो" याबद्दल "निवडतो".—५ पं. भीत.—६ पं. कामाविलें तरी पिका वोज घडे.—७ पं. विचाराची.—८ पं. पाहातोसी.—९ दे. त. ख्यात.

॥ १५४४ ॥

सरळीं हीं[1] नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्णा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पुण्य पर्वकाळ तीर्थें हीं सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ॥ ध्रु ॥

अवघे चि लाभ बैसलिया घरा । येती भाव धरा एके ठायीं ॥२ ॥

सेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती ह्मैसी । कामधेनु तैसी नव्हे एके[2] ॥ ३ ॥

तुका ह्मणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभ चि ॥ ४ ॥

॥ १५४५ ॥

पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील रासी पातकाच्या ॥ ध्रु ॥

देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ २ ॥

काय त्यां उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥ ३ ॥

तुका ह्मणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ४ ॥

॥ १५४६ ॥

पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । जालिया भेटी हरिदासांची ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसें बळ नाहीं आणिकांचे अंगीं । तपें[3] तिर्थें जगीं दानें व्रतें ॥ ध्रु ॥

चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचे माथां ॥ २ ॥

भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥ ३ ॥

तुका ह्मणे मन जालें समाधान । देखिले चरण वैष्णवांचे ॥ ४ ॥

---

१ पं. हें.–२ पं. एकी.–३ पं. तप तीर्थ जगीं दान व्रतें । .–४ पं. हें कडवें लेखकप्रमादानें लिहिण्याचें राहिलें आहे.

॥ १५४७ ॥

येणें बोधें आह्मी असों सर्वकाळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आह्मी भूमीवरी एक देइवांचे[1] । निधान हें वाचे सांपडलें ॥ध्रु॥

तरतील कुळें दोन्ही उभयतां । गातां आइकतां सुखरूप ॥ २ ॥

न चळे हा मंत्र न ह्मणों[2] यातीकुळ । न लगे काळ वेळ विचारावी ॥३॥

तुका ह्मणे माझा विठ्ठल विसांवा । सांटवीन हांवा ह्रदयांत ॥ ४ ॥

॥ १५४८ ॥

बहुतां जन्मींचें[3] संचित । सबळ होयें[4] जरि बहुत ।

तरि चि होय हरिभक्त । कृपावंत मानसीं[5] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणवी ह्मणियारा तयांचा । दास आपुल्या दासांचा ।

अनुसरले[6] वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥ ध्रु ॥

असे भूतदया मानसीं । अवघा देखे ह्रषीकेशी ।

जीवें न विसंबे त्यांसी[7] । मागें मागें हिंडतसे ॥ २ ॥

तुका ह्मणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर ।

जे जे अनुसरले नर । तयां जन्म[8] चुकलें ॥ ३ ॥

॥ १५४९ ॥

तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ लुटा लुटा संतजन । अमुप हें रासी धन ॥ ध्रु ॥

जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ २ ॥

तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥ ३ ॥

---

१ पं. " दैवांचे " याबद्दल छंदासाठीं " दइवांचे " असें सर्व प्रतींत लिहिलें आहे.—२ पं. न ह्मणे.—३ पं. जन्मांचें.—४ पं. जरि होय.—५ पं. अंतरीं.—६ पं. अनुसरल्या.—७ दे. त. तयासी.—८ पं. जन्मा.

॥ १५५० ॥

आळवीन स्वरें । कैशा मधुरा[1] उत्तरें ॥ १ ॥

॥ध्रु.॥ यें वो यें वो पांडुरंगे । प्रेमपान्हा मज दें गे ॥ ध्रु ॥

पसरूनि चोंची । वेचनें[2] हीं करुणेचीं ॥ २ ॥

तुका ह्मणे बळी । आह्मी लेंडिवाळें[3] आळीं ॥ ३ ॥

॥ १५५१ ॥

सकळिकांचें समाधान । नव्हे[4] देखिल्यावांचून ॥ १ ॥

॥ ध्रु ॥ रूप[5] दाखवीं रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥ ध्रु ॥

शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ॥ २ ॥

तुका ह्मणे कान्हा । भूक लागली नयनां ॥ ३ ॥

॥ १५५२ ॥

पतितपावना । दिनानाथा नारायणा ॥ १ ॥

॥ ध्रु.॥ तुझें रूप माझे मनीं । राहो नाम जगो वाणी ॥ ध्रु ॥

ब्रह्मांडनायका । भक्तजनाच्या पाळका ॥ २ ॥

जीवांचिया[6] जीवा । तुका ह्मणे देवदेवा ॥ ३ ॥

॥ १५५३ ॥

करीं हें चि काम । मना जपें राम राम ॥ १ ॥

लागो हा चि छंद । मना गोविंद गोविंद ॥ २ ॥

तुका ह्मणे मना । मज भीक द्यावी दीना ॥ ३ ॥

---

१ पं. मधुर.—२ दे. वचन हें करुणेची. पं. वचनें हे करुणेची.—३ त. पं. आळी.—४ पं. नाहीं.—५ त. रूप दावीं रे अनंता ।.—६ पं. जीवींचिया.

॥ १५५४ ॥

आपुलिया लाजा । धांवे भक्तांचिया काजा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाम धरिलें दिनानाथ । सत्य करावया व्रत ॥ ध्रु ॥
आघात[1] निवारी । छाया पीतांबरें[2] करी ॥ २ ॥
उभा कर कटीं । तुका ह्मणे याजसाटीं ॥ ३ ॥

॥ १५५५ ॥

साधावया भक्तिकाज । नाहीं[3] लाज हा धरीत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसियासी शरण जावें । शक्ती जीवें न वंची ॥ ध्रु ॥
भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षीलें ॥ २ ॥
तुका ह्मणे साक्ष[4] हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ॥ ३ ॥

॥ १५५६ ॥

धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळकापें घरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसें करीं वो माझे आई । ठाव देउनि राखें पायीं ॥ ध्रु ॥
काढितां तळमळी । जिवनाबाहेर मासोळी ॥ २ ॥
तुका ह्मणे कुडी । जीवाप्राणांची आवडी ॥ ३ ॥

॥ १५५७ ॥

हरिजनाची कोणां न घडावी निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रूपा येऊनियां धरी अवतार । भक्तां अभयंकर खळां कष्ट ॥ ध्रु ॥
दुर्वास हा[5] छळों आला आंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळित फिरे ॥ २ ॥

१ पं. "आघात" याबद्दल "घात आघात".—२ त. पीतांवर.—३ पं. नाहीं लाज धरीत.—४ पं. साक्षी.—५ पं. "हा" नाहीं.

द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांति । होऊनि श्रीपाति साह्य केलें ॥ ३ ॥
न साहे चि बभ्रु पांडवां पारिखा । धुडाविला सखा बळिभद्र ॥ ४ ॥
तुका ह्मणे अंगीं राखिली दुर्गंधि । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥ ५ ॥

॥ १५५८ ॥

ज्यासी आवडी हरिनामांची । तो चि एक बहु शुचि ॥ १ ॥
जपतो[2] हरिनाम बीज । तो चि वर्णांमाजी द्विज ॥ २ ॥
तुका ह्मणे वर्णा धर्म । अवघें आहे सम ब्रह्म ॥ ३ ॥

॥ १५५९ ॥

विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मां विठ्ठल जीवन । टाळ चिपळिया धन ॥ ध्रु ॥
विठ्ठल[3] हे वाणी । अमृत हे संजिवनी ॥ ३ ॥
रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें[4] ॥ ३ ॥

॥ १५६० ॥

विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापा निर्मूळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भाग्यवंता छंद मनीं । कोडें[5] कानीं ऐकती ॥ ध्रु ॥
विठ्ठल हें दैवत भोळें । चाड काळें न धरावी ॥ २ ॥
तुका ह्मणे भलते याती । विठ्ठल चित्तीं ते[6] शुद्ध ॥ ३ ॥

॥ १५६१ ॥

ह्मणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मग तो[7] हो का कोणी एक । आदि करोनि ब्रह्मादिक ॥ ध्रु ॥

---

१ दे. त. साहे.—२ पं. जपे हरिनाम बीज. दे. जपतो हरिनामें बीज.—३ पं. विठ्ठल विठ्ठल वाणी ।.—४ पं. सर्व अंगें—५ पं. कोड.—६ पं. शुद्ध ते.—७ पं. " तो " नाहीं.

नाहीं[1] विठ्ठल जया ठावा । तो ही डोळां न पाहावा ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं । त्याची भीड मज कांहीं ॥ ३ ॥

॥ १५६२ ॥

एक पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नेव्हा[2] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मारा हाक देवा भय अटाहासें[3] । जंव काळाऐसें जालें नाहीं ॥ ध्रु ॥
मरणांची तंव गांठोडी पदरीं । जिणें तों चि[4] वरि माप भरी ॥ २ ॥
तुका ह्मणे धिंगें[5] वाहाती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ॥ ३ ॥

॥ १५६३ ॥

संतांसी तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अव्हेरितो[6] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि तया न वजावें ठाया । होतसे घात या दुर्बळाचा[7] ॥ध्रु॥
भावहीना आड येतसे आशंका । उचितासी चुका घालावया ॥ २ ॥
तुका ह्मणे जया संकोच दर्शनें । तया ठाया जाणें अनुचित ॥ ३ ॥

॥ १५६४ ॥

संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हेंडग्याच्या[8] आळां अवघीं चिपाडें । काय तेथें[9] गोडें निवडावीं ॥ ध्रु ॥
ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥ २ ॥
तुका ह्मणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला सेटीं[10] विचार त्या ॥ ३ ॥

॥ १५६५ ॥

जीतीचें[11] तें चढे प्रेम । पक्षी स्मरे राम राम ॥ १ ॥

---

१ पं. जया विठ्ठल नाहीं ठावा.—२ पं. व्हाना.—३ पं. अटाहास्य.—४ पं. जिणें तो चि माप भरे.।—५ दे. त. पं. धींग (पण हंसकोशांत " धिंग " असा आहे.)—६ पं. अव्हेरितीं.—७ पं. दुर्बळासी.—८ पं. हेंडगाच्या.— ९ पं. तेथी.— १० पं. सेवटीं.— ११ पं. जातीच्याला चढे.०

॥ ध्रु. ॥ ते काय गुण लागती येरां । कांगा[1] पिंजरा शोभेना ॥ ध्रु ॥
शिकविलें तें[2] सुजात सोसी । मँग[3] तयासी मोल चढे ॥ २ ॥
तुका ह्मणे वेषधारी । हिजड्या नारी नँव्हेति[4] ॥ ३ ॥

॥ १५६६ ॥

वँसोनि[5] थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं देखिला ना ठावा । तोंड पिटी करी हांवा ॥ ध्रु ॥
फुँगतें[6] काउळें । ह्मणे मी राजहंसा आगळें ॥ २ ॥
गजाहूनि खर । ह्मणे चांगला मी फार ॥ ३ ॥
मुलाम्याचें नाणें । तुका ह्मणे नव्हे सोनें ॥ ४ ॥

॥ १५६७ ॥

मुक्त होता परी बळें जाला बद्ध । घेउनियां छंद माझें माझें ॥ १ ॥
पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणे कोण कँरिता[7] तो ॥ २ ॥
तुंका[8] ह्मणे वांयां गेलें वांयां विण । जैसा मृगशीण मृगजळीं ॥ ३ ॥

॥ १५६८ ॥

पंढरिये माझें माहेर साजणी । ओंविये कांडणीं गाऊं गीतें[9] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता मांहियेर[10] ॥ध्रु॥
उद्धव अक्रूर व्यास आंबऋषि । भाई नारदासी गौरवीन ॥ २ ॥
गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक । यांचें कवतुक वाटे मज ॥ ३ ॥
मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओंवियेसी ॥ ४ ॥
निवृत्ति ज्ञान देव सोपान चांगया । जिवलगा माझिया नामदेवा ॥ ५ ॥

---

१ पं. कागा न शोभे पिंजरा.—२ पं. "तें" नाहीं.—३ पं. मग मोल चढे त्यासी. ४ पं. न होती. दे. नव्हती.—५ दे. त. वसनें.—६ दे त. फुगातें.—७ पं धरिता.—८ पं. तुका ह्मणे गेले व्यर्थ वांयां विणें । जैसा मृग शीणें मृगजळें.—९ पं. त. गीती.—१० पं. माहेर माझें.

नागोजन मित्रा नरहरि सोनारा । रोहिदास[1] कबिरा सोईरिया ॥ ६ ॥
परसो[2] भागवता सुरदास सांवता । गाईन नेणतां सकळांसी ॥ ७ ॥
चोखामेळा संत जिवाचे सोइरे । न पडे विसर यांचा घडी ॥ ८ ॥
जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाटका[3] कान्हया मिराबाई ॥९॥
आणीक ही[4] संत महानुभाव मुनि । सकळां चरणीं जीव माझा ॥१०॥
आनंदें ओविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी[5] ॥११॥
तुका ह्मणे माझा बळिया बापमाय । हर्षें[6] नांदों सये घराचारी ॥ १२ ॥

॥ १५६९ ॥

पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पोटाभेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥ ध्रु ॥
जप तप अनुष्ठान । पोटासाटीं जाले दीन ॥ २ ॥
पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥ ३ ॥
पोट काशियानें भरे । तुका ह्मणे झुरझुरूं मरे ॥ ४ ॥

## आरत्या ॥ १३ ॥

॥ १५७० ॥

जगदीश[7] जगदीश तुज ह्मणती । परि या जनामाजी असशील युक्ति ।
पुण्यपापविरहित[8] सकळां अधिपति । द्रष्टा परि नळणी अलिप्त गति ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जय देव जय देव जय पंढरिनाथा । श्रीपंढरिनाथा ।
नुरे[9] पाप विठ्ठल ह्मणतां सर्वथा ॥ ध्रु ॥
आगम निगम तुज नेणती कोणी । परि तूं भाव भक्ति जवळी च दोन्ही ।
नेणतां विधियुक्त राते पूंजेनी[10] । न माये ब्रह्मांडीं संपुष्टशयनीं ॥ २ ॥

---

१ पं. रोहिदासा — २ पं. परसा. — ३ पं. पाठक हा कान्हा मिराबाई ।. त. पाटक कान्हया०. दे. पाटका०. —४ दे. हे. —५ दे. वारेकरी. —६ दे. त. हरुषें. पं. हर्षें नांदे. — ७ दे. त. जगदेश जगदेश. —८ पं. पुण्यपापाविरहित. —९ पं. नुरे चि पाप. —१० ( "पूजनीं" अथवा "पूजेनें" असें असावें. ) पं.० पुजूनी । न माय ब्रह्मांडीं तो संतुष्ट०.

असुरां काळ भासे विक्राळ पुढें । पसरी मुख एक चावितो धुडें ।
भक्ता शरणागता चाले तो पुढें । दावी वाट जाऊं नेदी वांकडें ॥ ३ ॥
एकाएकीं बहु विस्तरला सुखें । खेळे त्याची लीळा तो चि कवतुकें ।
तेथें नरनारी कवण बाळकें । काय पापपुण्य कवण सुखदुःखें ॥ ४ ॥
सकळां वर्मी तूं चि जाणशी एक । बद्ध मोक्ष प्राप्त आणि सुखदुःख ।
जाणों ह्मणतां तुज ठकलीं बहुतेकें[1] । तुका ह्मणे शरण आलों मज राखें[2] ॥५॥

॥ १५७१ ॥

दैत्यभारें पीडिली पृथ्वी[3] बाळा । ह्मणोनि तूज येणें जालें गोपाळा ।
भक्तिप्रतिपाळक उत्सव[4] सोहळा । मंगळें तुज गाती ओंवळ बाळा[5] ॥१॥
॥धृ.॥ जय देव जय देव जय गरुडध्वजा । श्रीगरुडध्वजा[6] ।
आरती ओवाळूं तुज भक्तीकाजा ॥ धृ ॥
गुण रूप नाम नाहीं जयासी । चिंतितां तैसा चि होसी तयांसी[7] ।
मत्स्य कूर्म वराह नरसिंह जालासी । असुरां काळ ह्मण ठाके ध्यानासी
॥ २ ॥
सहस्र रूपें नाम सांवळा ना गोरा । श्रुति नेती ह्मणती तुज विश्वंभरा ।
जीवनां जीवन तूं चि होसी दातारा । न कळे पार ब्रह्मादिकां सुरवरां
॥ ३ ॥
संतां महंतां घरीं[8] ह्मणवी ह्मणियारा । शंखचक्रगदाआयुधांचा भारा ।
सुदर्शन घरटी फिरे अंवश्वरा[9] । सकुमार ना स्थूळ होसी गोजिरा ॥ ४ ॥
भावेंविण तुझें न घडे पूजन । सकळ ही गंगा जाल्या तुजपासून ।

---

१ पं. त. बहुतेक.–२ त. राख.–३ दे. पृथुवी.–४ पं.० उत्साहो सोहळा । मंगळ तुज गाती आवळा बाळा.–५ त. आवळें बाळा.–६ पं. एवढा चरण नाहीं – ७ त. जयांसी.–८ दे. मुणि.–९ पं. ह्मणवी घरीं.–१० पं. आवस्वरा ( अवसरा ? ).

उत्पत्ति प्रळय तूं[1] चि करिसी पाळण । धरूनि राहिला तुका निश्चयीं चरण
॥ ५ ॥

॥१५७२ ॥

काय तुझा महिमा वर्णूं मी किती । नाममात्रें[2] भवपाश तुटती ।
पाहातां पाउलें[3] हे विष्णुमूर्ती । कोटिकुळां सहित जे[4] उद्धरती ॥१ ॥
॥ ध्रु.॥ जय देव जय देव जय[5] पंढरिराया । श्रीपंढरिराया ।
करूनियां कुरवंडी । सांडीन काया ॥ ध्रु ॥
मंगळआरतीचा थोर महिमा । आणीक द्यावया नाहीं उपमा ।
श्रीमुखासहित देखे जो कर्मा । पासुन सुटे जैसा रवि नासी तम। ॥ २॥
धन्य व्रतकाळ हे एकादशी । जागरण उपवास घडे जयांसी ।
विष्णूचें पूजन एकाभावेंसी । नित्यमुक्त पूज्य तिहीं लोकांसी ॥ ३ ॥
न वजे वांयां काळ जे तुज ध्याती । अ[6]से तुझा वास तयांच्या चित्तीं ।
धाले सुखें सदा प्रेमें डुल्लती । तीर्थं मळि[7]ग वास तयांचा पाहाती ॥४॥
देव भक्त तूं चि जालासी दोन्ही । वाढावया सुख भक्ति हे जनीं ।
जड जीवां उद्धार होय लागोनि । शरण तुका वंदी पाउलें दोन्ही ॥ ५॥

॥ १५७३ ॥

कंसरायें गर्भ वधियेले सात ।
ह्मणोनि गोकुळासी आले अनंत ।
घ्यावया अवतार जालें[8] हें चि निमित्तें[9] ।
असुर संहारूनि तारावे भक्त ॥ १ ॥

---

१ पं. करिसी तूं चि पाळण.–२ दे. पं. नामें मात्रें.–३ दे. पं. पाउले.–४ पं. "जे" याबद्दल "जग".–५ पं. "जय" नाहीं.–६ पं. अखंड तुझा वास जयांच्या चित्तीं.–७ त. मळिणें. दे. पं. मळिन–८ पं. "जालें" शब्द नाहीं.–९ दे. त. पं. निमित्य.

॥ धृ. ॥ जय देव जय देव जय विश्वरूपा । श्रीविश्वरूपा ।
ओवाळीन तुज देहदीपें बापा ॥ धृ ॥

स्थूळरूप होऊनि भाविकांस मानें ।
जैसा भाव तैसा तयां कारणें ।
दैत्यांसी भासला सिंह गजानें ।
काळासी महाकाळ यशोदेसी तान्हें ॥ २ ॥

अनंत वर्णी कोणा न कळे ति पार ।
सगुण कीं निर्गुण हा ही निर्धार ।
पांगलीं साही अठरा करितां विचार ।
तो वळितसे गौळियांचें खिल्लार ॥ ३ ॥

तेहतिस कोटि तिहीं देवांसी श्रेष्ठ ।
पाउलें पाताळीं नेणती स्वर्गी मुगुट ।
गिळिलीं चौदा भुवनें तरि न भरे ति पोट ।
तो खाउन धाला गोपाळांचें उच्छिष्ट ॥ ४ ॥

महिमा वर्णू तरि पांगलिया श्रुति ।
शिणला शेष चिरल्या जिह्वा करितां स्तुती ।
भावेंविण कांहीं न चले ति युक्ति ।
राखें शरण तुकयाबंधु करी विनंती ॥ ५ ॥

॥ १५७४ ॥

परमानंदा परमपुरुषोत्तमरामा ।

१ पं. "श्रीविश्वरूपा नाहीं.—२ दे. सिंहीं गजान. त. सिंहीं गजानें.—३ दे. स
४ पं. तो हा वळितसे.—५. पं पाउलें पाताळीं स्वर्गी मुगुट.

अच्युता अनंता हरि मेघश्यामा ।
अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा ।
अकळकळा कमळापती न कळे महिमा ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ जय देव जय देव जय[1] जी श्रीपती ।
मंगळशुभदायका करीन आरती ॥ छ ॥
गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा ।
गिरिधरकर भवसागरतारक दधिमथना ।
मधुसूदन मुनिजीवन धरणीश्रमहरणा ।
दीनवत्सळ सकळां मूळ जय जयनिधाना ॥ २ ॥
विश्वंभरा[2] सर्वेश्वर जगदाधारा ।
चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा ।
सुखसागर गुणआगर मुगुटमणी शूरा ।
कल्याणकैवल्यमूर्ति मनोहरा ॥ ३ ॥
गरुडासना शेषशयना नरहरी ।
नारायणा ध्याना सु[3]रवरहरगौरी ।
नंदा नंदनवंदन त्रिभुवनांभीतरी ।
अनंतनामीं ठसा अवतारांवरी ॥ ४ ॥
सगुणनिर्गुणसाक्ष श्रीमंत संतां ।
भग[4]वाना भगवंता काल[5]कृतांता ।

---

१ दे. त. जया जी श्रीपती.—२ पं. विश्वंभरा सर्वेश्वरा जगदोद्धारा.—३ दे. त. सुरहरवरगौरी.—४ पं. " भगवाना " नाहीं.—५ दे. त. कालकृदांता ( कालकृदंता ? ).

उत्पत्तिपाळणपासुन संहारणसत्ता ।
शरण तुकयाबंधु तारीं रिति बहुतां ॥ ५ ॥

॥ १५७५ ॥

पंढरि पुण्यभूमी भीमा दक्षिणवाहिनी ।
तीर्थ हें चंद्रभागा महा पातकां धुनी ।
उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जय देवा पांडुरंगा जय[1] अनाथनाथा ।
आरती ओंवाळीन तुह्मां लक्ष्मीकांता ॥ ध्रु ॥
नित्य नवा सोहळा हो[2] महा[3]वाद्यांचा गजर ।
सन्मुख गरुड पारीं उभा जोडुनि कर ।
मंडितचतुर्भुजा कटीं मिरवती कर ॥ २ ॥
हरिनाम कीर्तन[4] हो आनंद महाद्वारीं ।
नाचती प्रेमसुखें नर तेथिंच्या नारी ।
जीवन्मुक्त लोक नित्य पाहाती हरी ॥ ३ ॥
आषाढी कार्तिकी हो ग[5]रुडटकयां भार ।
गर्जती नाम[6]घोषें महावैष्णववीर ।
पापासी रीग नाहीं असुर कांपती सुर ॥ ४ ॥
हें सुख पुंडलिकें कसें आणिलें बापें ।
निर्गुण साकारलें आ[7]ह्मांलागिं हें सोपें ।
ह्मणोनि चरण धरोनि तुका राहिला सुखें ॥ ५ ॥

---

१ दे. त. जया.—२ पं. ही.—३ दे. महावाद्यां गजर.— ४ पं. कीर्तनें.— ५ पं. गरुडटकियांचा.—६ दे. नाम घोष.—७ पं. आह्मांलागीं सोपें.

॥ १५७६ ॥

अवतार गोकुळीं हो जन तारावयासी ।
लावण्यरूपडें हें तेज[1]पुंजाळरासी ।
उगवतां कोटि बिंबें रवि लोपले शशी ।
[2]उत्साव सुरवरां मही थोर मानसीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जय देवा कृष्णनाथा जय रखुमाईकांता ।
आरती ओंवाळीन तुह्मां देवकीसुता ।
जय देवा कृष्णनाथा ॥ ध्रु ॥
वसुदेवदेवकीची बंद फो[3]डुनी शाळ ।
होउनि विश्वजानिता तया पोटिंचा बाळ ।
दैत्य हे त्रासियेले समूळ कं[4]सासी काळ ।
राज[5]या उग्रसेना केला मथुरापाळ ॥ २ ॥
राखतां गोधनें हो इंद्र कोपला भा[6]री ।
मेघ जो कडाडिला शिळा वर्षतां धारीं ।
राखिलें गोकुळ [7]हें नखीं धरिला गिरी ।
निर्भय लोकपाळ अवतरले हरी ॥ ३ ॥
कौतुक पाहावया माव ब्रह्म्यानें केली ।
वत्सें हीं चोरुनियां सत्यलोकासि नेलीं ।
गोपाळ गा[9]ईवत्सें दोहीं ठायीं [10]राखीलीं ।
सुखाचा प्रेमसिंधु अनाथांची माउली ॥ ४ ॥

---

१ पं. तेजः पुंजाळ रासी.—२ पं. उत्साह.—३ पं. फोडिली.—४ पं. कंसादि.—५ पं. राज्यया. ६ दे. वरि.—७ त. हो.—८ पं. वत्सें हे चारोनियां. दे. वत्सें चोरोनियां.—९ पं. गाई वत्स.—१० त. पं. रक्षिली.

तारिलें भक्तजना दैत्य निर्दाळूनि ।
पांडवां साह्यकारी आडल्यां निर्वाणीं ।
गुण मी काय वर्णूं मति केवढी वाणी ।
विनवितो दास तुका ठाव देईं चरणीं ॥ ५ ॥

॥ १५७७ ॥

सुंदर अंगकांति मुख भाळ सुरेख ।
बाणली उटी अंगीं टिळा मांजिरे रेख ।
मस्तकीं मुगुट कानीं कुंडलें तेज फांके ।
आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जय देवा चतुर्भुजा जय लावण्यतेजा ।
आरती ओंवाळीन भवतारिया ह्या वोजा । जय० ॥ ध्रु ॥
उदार जुंझार हा जया वाणिती श्रुति ।
परतल्या नेति ह्मणती तयां न कळे गति ।
भाट हा चतुर्मुखें अनुवाद करितां ।
पांगलीं साही अठरा रूप न गति ॥ २ ॥
ऐकोनि रूप ऐसें तुजलागीं मुंडिती ।
बोडके नग्न एक निराहार यति ।
साधनें योग नाना तपें दारुण किती ।
सांडिलें सुख दिली संसारा शांती ॥ ३ ॥
भरूनि माजी लोकां तिहीं नांदसि एक ।

१ दे. बाणूं.—२ पं. मागे.—३ दे. मुख. प. मुकुट.—४ पं. माजिरा.—५ पं. कुंडलें.—६ दे. त. जया.—७ त. भवतारिया वोजा. पं. भवतारी हा वजा.—८ दे. ईति. त. इति.—९ पं. वपवी.—१० पं.० दिले संसाराची त्या शांति ।

कामिनी मनमोहना रूप नाम अनेक ।
नासति नाममात्रें भवपातकें[1] शोक ।
पाउलें वंदिताती[2] सिद्ध आणि साधक ॥ ४ ॥
उपमा द्यावयासी दुजें काय हें तुज ।
तत्त्वासि तत्त्वसार मूळ जालासी बीज ।
खेळसि बाळलीळा अवतार सहज ।
विनवितो दास तुका कर जोडोनि तुज ॥ ५ ॥

॥ १५७८ ॥

सकुमार मुखकमळ निजसारनिर्मळ ।
सावळी सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ ।
झळकति दिव्य तेजें दंत माज पातळें[3] ।
मिरवलिं मयूरपत्रें[4] मुगुट कुंडलें माळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जय देवा जगदीश्वरा ।
धन्य रखुमाईवरा । आरती करीन काया ।
ओंवाळिन सुंदरा । जय० ॥ ध्रु ॥
गोजिरें ठाणमान[5] भुजा मंडित चारी ।
शोभति शंखचक्रगदापद्म मोहरी ।
त्द्दयीं ब्रह्मपद बाणलें शृंगारीं ।
गर्जति चरणीं वांकी कंठ कोकिळास्वरीं[6] ॥ २ ॥

---

१ पं. भवपातक.—२ पं. वंदिती.—३ पं. पाताळ.—४ दे. त. पं. मयोरपत्रें.—५ दे. ठाणमाण.—६ पं. कोकिळस्वरीं.

घवघवित उटी अंगीं बावन चंदनांची ।
ल्लाटीं[1] कस्तुरिचा कास पितांबराची ।
कटिसूत्र[2] वरि साजिरें प्रभा वर मोतियांची ।
संगीत सकळ मुद्रा पाउलें कुंकुमाचीं ॥ ३ ॥
सौभाग्यसुख सागर गुणलावण्यखाणी ।
लाघवी दीनवत्सळ विश्व लाविलें ध्यानीं ।
आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनि ।
धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ॥ ४ ॥
वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेति ।
रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती ।
उदार सुर गंभीरें[3] पूर्ण आनंदमूर्ति ।
तुकयाबंधु ह्मणे स्तवूं मी काय किती ॥ ५ ॥

॥ १५७९ ॥

महा जी महादेवा महाकाळमर्दना ।
मांडियेलें उग्रतप महादीप्त दारुणा ।
परिधान व्याघ्रांबर चिताभस्मलेपना[4] ।
स्मशान[5] क्रीडास्थळ तुह्मा जी त्रिनयना ॥ १ ॥
॥ ध्रु. । जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा ।
आरती ओंवाळिन कैवल्यदातारा । जय० ॥ ध्रु ॥
रुद्र हें नाम तुह्मां उग्र संहारासी[6] ।

१ दे. लल्हाट. पं. लल्लाट.—२ पं. ही पंक्ति नाहीं.—३ पं.० गंभीर आनंद हे
४ दे. चिदाभस्मलेपना.—५ पं. स्मशानीं.—६ पं. त. संहाररासी.

शंकर शिव भोळा उदार सर्वस्वीं ।
उदक बेलपत्र टाळी वाहिल्या देसी ।
आपुलें पद दासां ठाव देई[१] कैलासीं ॥ २ ॥
त्रैलोक्यव्यापका हो जन आणि विजन[२] ।
विराटस्वरूप हें तुझें साजिरें ध्यान ।
करितो[३] वेद स्तुती कीर्ती मुखें[४] आपण ।
जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ॥ ३ ॥
बोलतां नाम महिमा असे आश्चर्य जगीं ।
उपदेश केल्यानंतरें पापें पळती वेगीं ।
हरहर वाणी गर्जे प्रेम संचरे अंगीं ।
राहिलि दृष्टी चरणीं रंग मीनला रंगीं ॥ ४ ॥
पुजूनि[५] लिंग उभा तुका जोडोनी हात ।
करितो विज्ञापना परिसावी हे मात ।
अखंड राहू द्यावें माझें[६] चरणीं चित्त ।
घातले साष्टांग मागे मस्तकीं हात ॥ ५ ॥

॥ १५८० ॥

अवतारनामभेद गणा आदि अगाद[७] ।
जयासि पार नाहीं पुढें खुंटला वाद ।
एक चि दंत शोभे मुख विक्राळ दोंद ।
ब्रह्मांडामाजि दावी अनंत हे छंद ॥ १ ॥

---

१ पं. देसी.—२ पं. वन.—३ पं. कारिती.—४ पं. मुख्य.—५ पं. पूजिलें.—६ पं. माझे.—७ पं. अगाध.

॥ ध्रु. ॥ जय जया गणपती ओंवाळिन आरती ।
साजिऱ्या सरळ भुजा फरशकमळ शोभती ॥ ध्रु ॥
हे मही ठेंगणी हो तुज नृत्यनायका ।
भोंवरि फेर देतां असुर मर्दिले एकां ।
घातले तोडरीं हो भक्तजनपाळका ।
[1]सहस्र नाम तुज भुक्तिमुक्तिदायका ॥ २ ॥
सुंदर शोभला हो रूपें लोपलीं तेजें ।
उपमा काय देऊं असे आणिक दुजें ।
रविशशितारा[2]गणें जयामाजी सहजें ।
उदरीं सामावलीं जया ब्रह्मांडबीजें ॥ ३ ॥
वर्णिता शेष लीळा तया भागलीं मुखें ।
पांगुळले वेद चारी कैसे राहिले सुखें ।
अवतार जन्मला हो लिंगनाभी या मुखें ।
अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखें ॥ ४ ॥
विश्व हें रूप तुझें हस्त पाद मुखडें ।
ऐसा चि भाव देईं तया नाचतां पुढें ।
धूप दीप पंचारति ओंवाळिन निवाडें ।
[3]राखें या शरणागता तुका खेळतां लाडें ॥ ५ ॥

॥ १५८१ ॥

कनकाच्या परियेळीं उजळूनि आरती ।

---

१ पं. ही पंक्ति नाहीं.—२ त. ०तारांमणें०.—३ त. राख या शरणांगता. पं. राखे शरणांगता.

रत्नदीपशोभा[1] कैशा पाजळल्या ज्योती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ओंवाळूं गे माये सबाह्य साजिरा ।
राहिरखुमाईसत्यभामेच्या वरा ॥ ध्रु ॥
मंडितचतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें ।
श्रीमुखाची शोभा पाहातां तेज फांकलें ॥ २ ॥
वैजयंती माळ[2] गळां शोभे श्रीमंत ।
शंखचक्रगदापद्म आयुधें शोभत ॥ ३ ॥
सांवळा सकुमार जैसा कर्दळीगाभा ।
चरणींचीं नेपुरें वांकी गर्जती नभा ॥ ४ ॥
ओंवाळितां मन हें[3] उभें ठाकलें ठायीं ।
समदृष्टि[4] समाधि तुकया लागली पायीं ॥ ५ ॥

॥ १५८२ ॥

भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योती ।
पंचप्राण जीवें भावें ओंवाळूं आरती ॥ १ ॥
ओंवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा ।
दोन्ही कर जोडोनि चरणीं ठेवीन माथा ॥ ध्रु ॥
काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती ।
कोटि ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ॥ २ ॥
राही रखुमाई दोहीं दों बाहीं ।
मयूर पिच्छचामरें ढाळिति ठायीं ठायीं ॥ ३ ॥

---

१ पं. रत्नदीपप्रभा.—२ पं. माळा.—३ पं. " हें " नाहीं.—४ पं. समदृष्टि समान तुकया लागला पायीं.

तुका ह्मणे दीप घेऊनि उन्मनति शोभा ।
विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ४ ॥ *

॥ १५८३ ॥

धन्य दिवस आजि दर्शन संतांचें [1] । नांदे तया घरीं दैवत पंढरीचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्य पुण्य रूप कैसा जाला संसार ।
देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥ छ ॥
धन्य पूर्व पुण्य वोडवलें निरुतें । संतांचें दर्शन जालें भाग्यें बहुतें ॥ २ ॥
तुका ह्मणे धन्य आह्मां जोडली जोडी । संतांचे चरण आतां [2] जीवें न सोडीं ॥ ३ ॥

॥ १५८४ ॥

गाऊं [3] वाणूं तुज विठो तुझा करूं अनुवाद ।
जिकडे पाहें तिकडे सर्वमय गोविंद ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आनंद रे विठोबा जाला माझे मनीं ।

---

१ दे. त. दरुषण.—२ त. आतां न विसंभें घडी ।.—३ पं. गाऊं नाचूं विठु तुझा.

* या अभंगाच्या पुढें रामेश्वर भटाचा एक अभंग तळेगांवच्या प्रतींत आहे तो:—
तूं चि आत्माराम नव्हेसी देहधारी । स्तुति जरीं होय झडो माझी वैखरी ।
पातकीं मूढ जन पडतील अघोरीं । यालागीं अवतार केला महीवरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जय जय भक्तराया धर्ममूर्ति तुकया । आरती वोंवाळीं भावें तुझिया पायां ॥ छ ॥
तुझे ठायीं असे भ्रम कोणा नकळे नेम । जन हें काय जाणे अनुभवितो राम ।
टाकोनि अभिमान जीवीं धरिलें प्रेम । बोलोनि महिमा तुझा जना दिला विश्राम ॥ २ ॥
अद्भुत महिमा तुझा काय वर्णूं दातारा । उदकीविण अन्न दिवस क्रमिले तेरा ।
आतां हे ऐसी प्राप्ति काय घडेल येरां । उदकीं कागद दिन रक्षिले अठरा ॥ ३ ॥
ऐकतां तुझें वचन मन होय उन्मन । सच्चिदानंद गाभा तुजठायीं पूर्ण ।
नित्य हें असो माझें तुझे पायीं अनुसंधान । करूनि कृपादान देईं इतुकें दान ॥ ४ ॥
शास्त्र आणि वेदांत शिष्टाचार समस्त । आणिला एकवाक्या जनलोक कृतार्थ ।
विशेष रामेश्वरा प्रेम दिलें बहुत । विनवितों तुज आतां ठेवीं मस्तकीं हात ॥ ५ ॥

देखिले[1] लोचनीं विटेसहित पाउले ॥ ध्रु ॥
न[2] करीं तपसाधनें रे मुक्तीचे सायास ।
हा चि जन्मोजन्मीं गोड[3] भक्तीचा रस ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मां प्रेमा उणें तें काई ।
पंढरीचा राणा सांटविला ल्हदयीं ॥ ३ ॥

॥ १५८५ ॥

मागणें तें एक तुजप्रति आहे । देशी तरि पाहें पांडुरंगा ॥ १ ॥
या संतांसी निरवीं हें मज देईं । आणिक दुजें काहीं न मगें[4] तुज ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां उदार होईं । मज ठेवीं पायीं संतांचिया ॥ ३ ॥

॥ स्वामींनीं काया ब्रह्म केली ते अभंग ॥ २४ ॥

॥ १५८६ ॥

शोधितां चि नये । ह्मणोनि वोळगतों पाये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां दिसों नये जना । ऐसें करा नारायणा ॥ ध्रु ॥
परतोनि मन । गेलें ठायीं चि मुरोन ॥ २ ॥
विसरला तुका । बोलों चालों जाला मुका ॥ ३ ॥

॥ १५८७ ॥

रज्जुसर्पाकार । भासयेलें[5] जगडंबर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणोनि आँठवती[6] पाय । घेतों आलाय बलाय ॥ ध्रु ॥
दृश्य[7] द्रुमाकार लाणी । केलों सर्वस्वासी[8] धणी ॥ २ ॥
तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनि उरला लोकां[9] ॥ ३ ॥

---

१ त. देखिलें लोचनीं विटेसहित पाउलें ।. दे. पं. (पाउल शब्द पुल्लिंगी धरिला आहे).— २ त. न करीं तप रे मुक्तीचे०. पं. न करीं तप साधन मुक्तीचे०.—३ त. सेवीं.—४ पं. मागें.— ५ त. भासयेलें.— ६ पं. आठवितों.— ७ दे. द्रुश द्रुमाकार०. त. पं. दृश्य दृमाकार०.— ८ दे. सर्व सासी.— ९ पं. जोकां.

॥ १५८८ ॥

ह्मणवितों दास । परि मी असें उदास ॥ १ ॥

॥ ध्रु० ॥ हा चि निश्चय माझा । परि मी निश्चयाहुनि दुजा ॥ ध्रु

सरतें कर्तृत्व[1] माझ्यानें । परि मी त्याहीं[2] हून भिन्न ॥ २ ॥

तुका तुकासी तुकला । तुका तुकाहुनि निराळा ॥ ३ ॥

॥ १५८९ ॥

घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिती सांडवीन ॥ १

॥ ध्रु.॥ ब्रह्मभूत[3] होते काया च कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥

तीर्थभ्रामकासी[4] आणीन आळस । कडु स्वर्गवास करिन भोग ॥ २

सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ३ ॥

भक्तिभाग्यप्रेमा[5] साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ४

धन्य ह्मणवीन येहं[6] लोकीं लोकां । भाग्य आह्मीं तुका देखियेला ॥ ५

॥ १५९० ॥

संसाराचे अंगीं अवघीं च व्यसनें[7] । आह्मी या कीर्तनें शुद्ध जालों ॥१

॥ ध्रु. ॥ आतां हें सोंवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें ॥ध्रु

ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ २ ॥

तुका ह्मणे आह्मां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥ ३ ॥

॥ १५९१ ॥

तुह्मी सनकादिक संत । ह्मणवितां कृपावंत ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ एवढा करा उपकार । देवां[8] सांगा नमस्कार ॥ ध्रु ॥

---

१ दे. त. कर्तुत्व.–२ पं.० त्याहूनि असें भिन्न ।–३ पं. ब्रह्मभूत काया हा तसे कीर्तनीं ।.–४ दे. तीर्थ भ्रमकासी.–५ पं. भक्ति भाग्य सीमा०.–६ दे. येहे. पं. येही. "इह" ह्याबद्दल.–७ दे. त. वेसनें.–८ पं. सांगा देवा.

भाकूनि[1] करुणा । विनवा वैकुंठींचा[2] राणा ॥ २ ॥
तुका ह्मणे मज आठवा । मूळ[3] लवकरी पाठवा ॥ ३ ॥

॥ १५९२ ॥

आपुल्या माहेरा जाईन मी आतां । निरोप या संतां हातीं आला ॥ १ ॥ ध्रु. ॥ सुख दुःख माझें ऐकिलें कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥ध्रु॥
करुनी सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसें एकें[4] न्यावयासी ॥ २ ॥
त्या चि पंथें माझें लागलेंसे चित्त । वाट पाहें नित्य माहेरांची[5] ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलिया मायबाप ॥ ४ ॥

॥ १५९३ ॥

चिन्हें उमँटती[6] अंगीं । शकुना जोगीं उत्तम ॥ १ ॥
॥ ध्रु. आठवला बापमाय । येइल काय मूळ नेणों ॥ ध्रु ॥
उत्कंठित जालें मन । ते[7] चि खुण तेथींचि ॥ २ ॥
तुका ह्मणे कांम[8] वारीं । आळस घरीं करमेना ॥ ३ ॥

॥ १५९४ ॥

आरोनियां पाहे वाट । कटकट सोसेना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आलियांस पुसें मात । तेथें चित्त लागलें ॥ ध्रु ॥
दळीं कांडीं लोकांऐसें । परि मी नसें ते ठायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे येथें पिसें । तेथें[9] तैसें असेल ॥ ३ ॥

॥ १५९५ ॥

येथीलियां[10] अनुभवें । कळों जीवें[11] हें येतसे ॥ १ ॥

---

१ पं. भाकावी.—२ पं. पंढरीचा.—३ दे. त. पं. मुळ.—४ पं. एक.—५ आठवाची.—६ दे. उमटताती.—७ पं. ते खुण०.—८ त. पं. कामा.—९ पं. तैसें तेथें.—१० पं. येथील या.—११ पं. ०जीवें येतसे.

॥ ध्रु. ॥ दोहीं ठायीं एक जीव । माझी कींव त्या अंगीं ॥ ध्रु ॥
भूक भुके चि खाउनि धाय । नाहीं हाय अन्नाची ॥ २ ॥
तुका ह्मणे सुख जालें । अंतर धालें त्यागुणें ॥ ३ ॥

॥ १५९६ ॥

पैल आले हरि । शंख चक्र शोभे करीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गरुड येतो फडत्कारें[1] । ना भी ना भी ह्मणे त्वेरे[2] ॥ ध्रु ॥
मुगुटकुंडलांच्या दीप्ति । तेजें[3] लोपला गभस्ति ॥ २ ॥
मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥ ३ ॥
चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रुळती ॥ ४ ॥
पींताबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ५ ॥
तुका जालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ[4] ॥ ६ ॥

॥ १५९७ ॥

शंचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ना भी ना भी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥ ध्रु ॥
दुरूनि येतां दिसे दृष्टी । धाकें दोष पळती सृष्टी ॥ २ ॥
तुका देखोनि एकला । वैकुंठींहूनि हरि आला ॥ ३ ॥

॥ १५९८ ॥

पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥ १ ॥
आला पंढरीचा राणा । दिसतील त्याच्या खुणा ।
सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरती ॥ ध्रु ॥

---

१ पं. फडात्कारें.–२ पं. खरें.–३ पं. तेज.–४ पं. " वैकुंठपीठ " याबद्दल " वैकुंठ.

उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥ २ ॥
तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥ ३ ॥

॥ १५९९ ॥

चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं ।
फेडा[1]वया धणी प्रेमसुखाची आजि ॥ ध्रु ॥
पुढें आले कृपावंत । मायबाप साधुसंत ॥ २ ॥
तुका आळंगिला बाहीं । ठेविला विठोबाचे पायीं ॥ ३ ॥

॥ १६०० ॥

पाहुणे घरासी । आजि आले हृषीकेशी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कांय[2] करूं उपचार । कोंप मोडकी जर्जर ।
कण्या दरदर । पाण्यामाजी रांधिल्या ॥ ध्रु ॥
घरीं मोडकिया बाजा । वरि वाकळांच्या शेजा ॥ २ ॥
मुखशुद्धि तुळसी दळ । तुका ह्मणे मी दुर्बळ ॥ ३ ॥

॥ १६०१ ॥

संतीं केला अंगीकार । त्यासी अभिमान थोर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कांहीं ठेविलें चरणीं । घेती तें चि पुरवूनि ।
तुका पायवणी । घेऊनियां निराळा ॥ ध्रु ॥
नसतां कांहीं संचित । भेटी[3] जाली अवचित ॥ २ ॥
देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥ ३ ॥

---

१ पं. "फेडावया० आजि ।" इतकें नाहीं.—२ पं. "दरदरीत पाण्या माजी रांधियेल्या कण्या ।" एवढेंच ध्रुवपद आहे.—३ पं. "भेटी जाली०" आणि "पुढच्या कडव्यांवलें "देंव मिळोनियां०" हे दोन चरण एकमेकाशीं बदलले आहेत.

॥ १६०२ ॥

अवघियांच्या आलों मुळें । एका[1] वेळे न्यावया ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें । आधीं ठावें करितों ॥ ध्रु ॥

जोंवरि ते[2] घटिका दुरी । आहे उरी तो काळ ॥ २ ॥

मंगळाचे वेळे उभे । असों[3] शोभे सावध ॥ ३ ॥

अवघियांचा योग घडे । तरि जोडे श्लाघ्यता ॥ ४ ॥

तुका ह्मणे पाहें वाट । बहु आट करूनि ॥ ५ ॥

॥ १६०३ ॥

सकळ ही माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुह्मीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कर्मधर्में[4] तुह्मां असावें कल्याण । घ्या माझें वचन आशीर्वाद ॥ध्रु॥

वाढवूनि दिलों[5] एकाचिये हातीं । सकळ निश्चिती जाली तेथें ॥ २ ॥

आतां मज जाणें प्राणेश्वरासवें । माझिया भावें अनुसरलों ॥ ३ ॥

वाढवितां लोभ होईल उशीर । अवघींच स्थिर करा ठायीं ॥ ४ ॥

धर्म अर्थ काम जाला एके ठायीं । मेळविला जिहीं होता होत ॥ ५ ॥

तुका ह्मणे आतां[6] जाली हे चि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥ ६ ॥

॥ १६०४ ॥

बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें[7] पुण्य कोण माझे गांठीं ॥ १ ॥

॥ ध्रु.॥ जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी । काळक्षेप आह्मी करूं कोठें ॥ ध्रु ॥

न घडे यावरि न धरवे धीर । पीडतां राष्ट्र देखोनि जग ॥ २ ॥

---

१ पं. एक.—२ पं. हे.—३ पं. असा.—४ पं. कर्म धर्म.—५ पं. दिले.—६ दे. "आतां जाली" यावर "तुह्मां आह्मां" असा पाठ घातला आहे.—७ पं. काय ऐसें पुण्य माझे गांठी ।.

तुका ह्मणे तुह्मी दिसे मोकलिलें । काय आतां आलें जीवित्वाचें ॥३॥

॥ १६०५ ॥

करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघें एकमय । राज्य बोलों चालों नये ॥ ध्रु ॥
दुजयाची सत्ता । न चलेसी जाली आतां ॥ २ ॥
आतां नाहीं तुका । पुन्हा हारपला लोकां ॥ ३ ॥

॥ १६०६ ॥

आह्मी जातों तुह्मी कृपा असों द्यावी । सकळा सांगावी विनंती माझी ॥१॥
वाढवेळ जाला उभा पांडुरंग । वैकुंठा श्रीरंग बोलावितो ॥ २ ॥
अंतकाळीं विठो आह्मांसी पावला । कुडीसहित जाला गुप्त तुका ॥ ३ ॥

॥ १६०७ ॥

तुका[१] उतरला तुकीं । नवल जालें तिहीं लोकीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नित्य करितों कीर्तन । हें चि माझें अनुष्ठान ॥ ध्रु ॥
तुका बैसला विमानीं । संत पाहाती लोचनीं ॥ २ ॥
देव भावाचा भुकेला । तुका वैकुंठासी नेला ॥ ३ ॥

॥ १६०८ ॥

न देखिजे ऐसें केलें । या विठ्ठलें दुःखासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कृपेचिये सिंहासनीं[२] । अधिष्ठानीं बैसाविलें ॥ ध्रु ॥
वाजता तो नलगे वारा । क्षीरसागरा शेयनीं ॥ २ ॥
तुका ह्मणे अवघे ठायीं । मज पायीं राखिलें ॥ ३ ॥

॥ १६०९ ॥

वाराणसीपर्यंत असों सुखरूप । सांगावा निरोप संतांसी हा ॥ १ ॥

---

१ पं. नयनी.—२ दे. त. पं. सिंव्हासनीं.

येथूनियां आह्मां जाणें निजधामा । सर्वें असे आह्मां गरुड हा ॥ २ ॥
कृपा असों द्यावी मज दीनावरी । जातसों[1] माहेरी तुका ह्मणे ॥ ३ ॥
॥ २४ ॥

शके १५७१ एकोहत्तरीं[2] विरोधनामसंवत्सरीं फाल्गुनवद्य द्वितीया सोमवासरीं प्रथमप्रहरीं[3] तुकोबा[4] गुप्त जाले ॥ १ ॥

---

॥ १६१० ॥

जाती पंढरीस । ह्मणे जाईन तयांस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तया आहे संवसार[5] । ऐसें बोले तो माहार ॥ ध्रु ॥
असो नसो भाव । जो हा देखे पंढरिराव ॥ २ ॥
चंद्रभागे न्हाती । तुका ह्मणे भलते याती ॥ ३ ॥

॥ १६११ ॥

धरियेलीं सोंगें । येणें अवघीं पांडुरंगें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तें हें ब्रह्म विटेवरी । उभें चंद्रभागे तिरीं ॥ ध्रु ॥
अंतर्व्यापी[6] बाहे । धांडोळितां[7] कोठें नोहे[8] ॥ २ ॥
योगयागतपें । ज्याकारणें दानजपें[9] ॥ ३ ॥
दिले नेदी जति । भोग सकळ ज्या होती ॥ ४ ॥
अवघी लीळा पाहे । तुका ह्मणे दासां साहे ॥ ५ ॥

॥ १६१२ ॥

ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥

---

१ त. जातसें. दे. जातोंसों.—२ पं. "एकाहातरीं" नाहीं.—३ पं. "प्रथम प्रहरीं तुकोबा गुप्त जाले" याबद्दल "प्रात काळीं स्वामी गुप्त जाले असे."—४ त. "तुकोबा गुप्त जाले" याबद्दल "तुकाराम गुप्त."—५ पं. त. संसार.—६ दे. त. अंतर व्या०.—७ पं. धुंडाळितां.—८ दे. पं. नाहीं.—९ पं. ज्ञान.

॥ ध्रु. ॥ तो हा पंढरीचा राणा । पुसा सा चौं अठरां जणां ॥ ध्रु ॥
चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति[1] कामारी दासी ॥ २ ॥
वैकुंठासी जावें । तुका ह्मणे ज्याच्या नांवें ॥ ३ ॥

॥ १६१३ ॥

ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन्य पडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुती ॥ ध्रु ॥
सिणलीं[2] सहस्र तोंडें । शेष[3]फणीऐसें धेंडें ॥ २ ॥
तुका ह्मणे मही । पत्र सिंधु न पुरे शांही[4] ॥ ३ ॥

॥ १६१४ ॥

देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तें ही अमृत पाहीं[5] ॥ ध्रु ॥
न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं[6] यमबाधा ॥ २ ॥
तुका ह्मणे नारायण । येतां[7] गोळ्या वारी बाण ॥ ३ ॥

॥ १६१५ ॥

कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दिनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नको पाहों केलें पापपुण्य ॥ ध्रु ॥
पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार[8] उद्धरिले ॥ २ ॥
तुकयाबंधु ह्मणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥ ३ ॥

॥ १६१६ ॥

कोठें गुतलासी कोणांच्या धांवया । आली देवराया निद्रा तुज ॥ १ ॥

---

१ पं. रिद्धिसिद्धी होती दासी.–२ दे. सिणलें.–३ दे. शेषाफणी ऐसें.–४ "शाई" याबद्दल.–५ त. पं. "पाहीं" नाहीं.–६ दे. "कधीं" याबद्दल "कधीं कधीं" आहे.–७ पं. ये ऊन.–८ पं. ब्रीद.

॥ ध्रु. ॥ कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें । न सुटती मुखें गोपिकांचीं ॥ ध्रु. ॥
काय पडिलें तुज कोणाचें संकट । दुरी पंथ वाट न चालवे ॥ २ ॥
काय माझे तुज गुण दोष दिसती । ह्मणोनि श्रीपती कोपलासी ॥ ३ ॥
काय जालें सांग माझिया कपाळा । उरला जीव डोळां तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६१७ ॥

परस्त्रीतें ह्मणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय बोलोनियां तोंडें । मनामाजी कानकोंडें ॥ ध्रु. ॥
धर्मधारिष्टगोष्टी सांगे । उष्ट्या हातें नुडवी काग ॥ २ ॥
जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥ ३ ॥
बोले तैसा चाले । तुका ह्मणे तो अमोल ॥ ४ ॥

॥ १६१८ ॥

असत्य वचन होतां सर्व जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों तें ॥ ध्रु. ॥
वदविलें मुखें नारायणें धर्मा । अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां सांभाळा रे पुढें । अंतरीचें कुडें देईल दुःख ॥ ३ ॥

॥ १६१९ ॥

जळो त्यांचें तोंड । ऐसीं कां न व्याली रांड ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सदा सोवयासी गांठी । क्रोध धडधडीत पोटीं ॥ ध्रु. ॥
फोडिली गोंवरी । ऐसी दिसे तोंडावरी ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ३ ॥

---

१ दे. सुटती.–२ पं. चलवे.–३ त. जाला.–४ त. न उडवी. पं. नुडवी.–५ पं. कोटि.–६ त. असे.–७ पं. तिचें.–८ पं. ऐसीपावें.–९ पं. आटी.

॥ १६२० ॥

तोंडें खाये फार । पादे बोचा करी मार ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ एक ऐसे ते शाहाणे । आपुले अधीन तें नेणे ॥ ध्रु ॥

कुले घालूनि उघडे । रागें पाहे लोकांकडे ॥ २ ॥

खेळे द्यूतकर्म । मग बोंबली जुलूम ॥ ३ ॥

निजतां आला मोहो । वीतां ह्मणे मेला गोहो ॥ ४ ॥

तुका ह्मणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी ॥ ५ ॥

॥ १६२१ ॥

पतिव्रता नेणे आणिकांची स्तुती । सर्वभावें पति ध्यानीं मनीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तैसें माझें मन एकाविध जालें । नावडे विठ्ठलेंविण दुजें ॥ ध्रु ॥

सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा । गाय ते कोकिळा वसंतेंसी ॥ २ ॥

तुका ह्मणे बाळ मातेपुढें नाचे । बोल आणिकांचे नावडती ॥ ३ ॥

॥ १६२२ ॥

पंडित ह्मणतां थोर सुख । परि तो पाहातां अवघा मूर्ख ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय करावें घोकिलें । वेदपठण वांयां गेलें ॥ ध्रु ॥

वेदीं[3] सांगितलें तें[4] न करी । सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥ २ ॥

तुका देखे जीवीं शिव । हा चि तेथींचा अनुभव ॥ ३ ॥

॥ १६२३ ॥

पांडित तो चि एक भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अवघें सम ब्रह्म पाहे । सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ ध्रु ॥

---

१ दे. जुत.—२ पं. दुजें कांहीं.—३ पं. वेदें.—४ त. पं. "तें" नाहीं.—५ पं. जीव-शिव—६ दे. हा तेथींचा.—७ पं. पांडित तो भला.

रिता नाहीं कोणी ठाव । सर्वां भूतीं वासुदेव ॥ २ ॥
तुका ह्मणे तो चि दास । त्या[1] देखिल्या जाती दोष ॥ ३ ॥

॥ १६२४ ॥

ऐका पंडितजन । तुमचे वंदितों चरण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नका करूं नरस्तुती । माझी परिसो[2] हे विनंती ॥ ध्रु ॥
अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धा अधीन ॥ २ ॥
तुका ह्मणे वाणी । सुखें वेचा नारायणीं ॥ ३ ॥

॥ १६२५ ॥

विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥ ध्रु ॥
विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥ २ ॥
विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥ ३ ॥

॥ १६२६ ॥

काय तुझें वेचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥ध्रु॥
काय तुझें आह्मां करावें वैकुंठ । भेऊं[3] नको भेट आतां मज ॥ २ ॥
तुका ह्मणे तुझी नलगे दसोडी । परि आंहे[4] आवडी दर्शनाची ॥ ३ ॥

॥ १६२७ ॥

संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर ते यमपुरी ॥ १ ॥

---

१ दे. त्यां.—२ पं. ० परिसावी विनंती.—३ दे. पं. भेवों.—४ पं. "आहे" याबद्दल "हे."

॥ ध्रु. ॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें[1] जना होय पीडा ॥ ध्रु ॥
संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिता चि नर्कवासी ॥ २ ॥
तुका ह्मणे तो[2] नष्ट । जाण्या गाढव तो स्पष्ट ॥ ३ ॥

॥ १६२८ ॥

आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबा घरीं पाणी ॥ ध्रु ॥
पांडवांचा साहाकारी । राज्यावरोनि केले दुरी ॥ २ ॥
तुका ह्मणे उगेचि राहा । होईल तें सहज पाहा ॥ ३ ॥

॥ १६२९ ॥

निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे[3] नाना छंदें गोविंद हा ॥ ध्रु ॥
मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं[4] ॥ ३ ॥

॥ १६३० ॥

काम क्रोध आह्मी वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां कोण पाहे मागें परतोनि । गेले[5] हारपोनि देहभाव ॥ ध्रु ॥
रिद्धिसिद्धी सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी विठोबाचे दास । [6]करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥

॥ १६३१ ॥

उठाउठीं अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥ १ ॥

---

१ पं. "संगें" याच्याबद्दल "ज्याच्या संगें".—२ पं. "तो" नाहीं.—३ पं. नाचे हा गोविंद नाना छंदें ।. दे. व त. यांतही प्रथमतः हाच पाठ होता, परंतु मागून आंकडे घालून वर छापल्याप्रमाणें फिरविल आहे.—४ त. नामासाठीं.—५ पं. गेला.—६ त. गिळूनि. दे. मुळीं हाच पाठ होता.

॥ ध्रु. ॥ तें यां पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥ ध्रु ॥
अश्रूंचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ॥ २ ॥
तुका ह्मणे काला । कोठें अभेद देखिला[2] ॥ ३ ॥

॥ १६३२ ॥

पंढरी पंढरी । ह्मणतां पापाची बोहरी[3] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्य धन्य जगीं ठाव । होतो नामाचा उत्साव ॥ ध्रु ॥
रिद्धिसिद्धी लोटांगणीं । प्रेमसुखाचिया खाणी ॥ २ ॥
अधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ १६३३ ॥

अल्प माझी मति । ह्मणोनि येतों काकुलती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां दाखवा दाखवा । मज[4] पाउलें केशवा ॥ ध्रु ॥
धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ २ ॥
तुका ह्मणे दया । मज करा अभागिया ॥ ३ ॥

॥ १६३४ ॥

भार घालीं देवा । न लगे देश डोई घ्यावा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देह प्रारब्धा अधीन । सोसें अधिक वाढे सीण ॥ ध्रु ॥
व्यवसाय निमित्त । फळ देतसे संचित ॥ २ ॥
तुका ह्मणे फिरे । भोंवडीनें दम जिरे ॥ ३ ॥

॥ १६३५ ॥

भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करुनी ठेवा ॥ १ ॥

---

१ पं. हे.—२ पं. राहिला.—३ दे. बोहोरी.—४ पं. तुमचीं.

॥ ध्रु. ॥ शांति धरणें जिवासाटीं । दशा उत्तम गोमटी ॥ ध्रु ॥
देह लेखावें असार । सत्य परउपकार ॥ २ ॥
तुका ह्मणे हे मिरासी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥ ३ ॥

॥ १६३६ ॥

येथें बोलोनियां काय । व्हावा गुरु तरि जाय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मज न साहे वांकडें । ये विठ्ठलकथेपुढें ॥ ध्रु ॥
ऐकोनी मरसी कथा । जंव आहेसि तुं जीता ॥ २ ॥
दुरमतीची चाड । तेणें न करावी बडबड ॥ ३ ॥
पुसेल कोणी त्यास । जा रे करीं उपदेश ॥ ४ ॥
आह्मी विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शीर ॥ ५ ॥
घेऊं पुढती जन्म । वाणूं कीर्ति[1] मुखें नाम ॥ ६ ॥
तुका ह्मणे मुक्ती । नाहीं आस चि ये चित्तीं ॥ ७ ॥

॥ १६३७ ॥

अनुहातीं[2] गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मदें मातें[3] तया नाहीं देहभाव । आपुले अवयव[4] आवरितां ॥ ध्रु ॥
आणिकांची वाणी वेद तेणें मुखें । उपचारदुःखें नाठवती ॥ २ ॥
तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे बाह्य रंग तो विठ्ठल । अंतर[5] निवालें ब्रह्मरसें ॥ ४ ॥

॥ १६३८ ॥

ब्रह्मरसगोडी तयांसी फावली । वासना निमाली सकळ ज्यांची ॥ १ ॥

---

१ पं. कीर्ती.–२ दे. त. आनुहातीं.–३ त. मातलें. पं. माजे.–४ दे. त. पं. आवेव.–५ पं. अंतरीं.

॥ ध्रु. ॥ नाहीं त्यां विटाळ अखंड सोंवळीं[1] । उपाधीवेगळीं जाणिवेच्या ॥ध्रु॥
मन हें निश्चळ जालें एके ठायीं । तयां उणें काई निजसुखा ॥ २ ॥
तीं[2] चि पुण्यवंतें परउपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्यांचे पायीं पायपोस । होऊनियां वास करिन तेथें ॥ ४ ॥

॥ १६३९ ॥

जैसें तैसें राहे देवाचें[3] हें देणें । यत्न करितां तेणें काय न्हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यास ॥ ध्रु
मागों नेणे परी माय जाणे वर्म । बाळा नेदी श्रम पावों कांहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥ ३ ॥

॥ १६४० ॥

आह्मां हरिच्या दासां कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥ ध्रु ॥
जैसा केला तैसा होय । धांवे सोय धरोनि ॥ २ ॥
तुका ह्मणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥ ३ ॥

॥ १६४१ ॥

परद्रव्यपरनारीचा अभिळास । तेथूनि हारास सर्वभाग्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घटिका दिवस मास वर्षे[4] लागती तीन । बांधलें पतन गांठोडीस ॥ ध्रु ॥
पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसी ॥ २ ॥

---

१ पं. ०सोवळा । उपाधीवेगळा जाणिवेसी ॥ मन हें संचलें जालें०. त. ०सोवळें । उपाधी वेगळें वासनेसी ॥–२ पं. तेचि पुण्यवंत पर० –३ त. पं. देवाचें देणें.– ४ दे. वरुं लागेतीन.

तुका ह्मणे एकां तडताथवड । काळ लागे नाड परी खरा ॥ ३ ॥

॥ १६४२ ॥

समर्थाचें केलें । कोणां जाईल मोडिलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वांयां करावी ते उरे । खटपट सोस पुरे ॥ ध्रु ॥

ठेविला जो ठेवा । आपुलाला तैसा खावा ॥ २ ॥

ज्याचें त्याचे हातीं । भुंके[4] तयाची फजिती ॥ ३ ॥

तुका ह्मणे कोटी । बाळे जाले शूळ पोटी ॥ ४ ॥

॥ १६४३ ॥

हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥ ध्रु ॥

देऊनियां जीव । बळी साधिला हा ठाव ॥ २ ॥

तुका ह्मणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ॥ ३ ॥

॥ १६४४ ॥

नेणे गति काय कवण अधोगति । मानिली निश्चिती तुझ्या पायीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कर्म धर्म कोण नेणें हा उपाव । तुझ्या पायीं भाव ठेवियेला ॥ध्रु॥

नेणें निरसूं पाप पुर्ण्य नेणें काय । ह्मणऊनि पाय धरिले तुझे ॥ २ ॥

---

१ पं. गेला.—२ दे. खटपटें.—३ त. तुका ह्मणे ज्याचे०. पं. प्रतींतून येथें छापलेलें "तुका ह्मणे कोटी " हें कडवें तळेगांवची प्रत लिहिणारास लब्ध न झाल्यामुळें याच कडव्यांत "तुका ह्मणे " हें घातलें असावें असें वाटतें.—४ दे. भुके.—५ पं. प्रतींत मात्र हें कडवें आहे. दे. प्रतींत नाहीं; परंतु तींत शेवटच्या कडव्यांत "तुका" हा शब्द नाहीं यावरून "तुका ह्मणे कोटी" हें कडवें लिहिणें राहिलें असावें.—६ दे. "देवा हे माझी०." येथें "देवा" हें मागूनच घातलें आहे.—७ दे. "वडिलीं." असें "बळी" याच्या ठिकाणीं मागून केलें आहे.—८ पं. पुण्य काय.

वेडा मी अविचार न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज करितां नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥ ४ ॥

॥ १६४५ ॥

तुझा ह्मणऊनि जालों उतराई । त्याचें वर्म[1] काई तें मी नेणें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हातीं धरोनियां दावीं मज वाट । पुढें कोण नीट तें चि देवा ॥ध्रु॥
देवभक्तपण करावें जतन । दोहीं पक्षीं जाण तूं चि बळी ॥ २ ॥
अभिमानें तुज लागली हे लाज । शरणागतां काज करावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु नेणता मी फार । ह्मणऊनि[2] विचार जाणविला ॥ ४ ॥

॥ १६४६ ॥

मारगीं चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सर्व सुख लागे घेऊनियां पाठीं । आवडीचा कंठीं रस ओती ॥ ध्रु ॥
पीतांबरें[3] छाया करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥ २ ॥
तुका ह्मणे हें चि करावें जीवन । वाचे नारायण तान भूक[4] ॥ ३ ॥

॥ १६४७ ॥

जालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ठाव द्यावा पायांपाशीं । मी तों पातकांची राशी ॥ ध्रु ॥
सकळ ही गोवा । माझा उगवूनि देवा ॥ २ ॥
तुका ह्मणे भय । करों[5] जवळी तें नये ॥ ३ ॥

॥ १६४८ ॥

अंतरींचें जाणां । तरि कां येऊं दिलें मना ॥ १ ॥

---

१ पं. कर्म.–२ पं. ह्मणोनि.–३ पं. पीतांबर छाया.–४ पं. ताहान भूक. त. तानभुके.–५ त. कदा.

॥ ध्रु. ॥ तुमची करावी म्यां सेवा । आतां अव्हेरितां देवा ॥ ध्रु ॥
नव्हती मोडामोडी । केली मागें ते चि घडी ॥ २ ॥
तुका ह्मणे दिला वाव । पायीं लागों दिला भाव ॥ ३ ॥

॥ १६४९ ॥

पवित्र होईन चरित्रउच्चारें । रूपाच्या आधारें गोजिरिया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठी । पायीं घालीं मिठी पाहें डोळां ॥ ध्रु ॥
गाईन ओंविया शिष्टांच्या आधारें । सारीन विचारें आयुष्या या ॥ २ ॥
तुका ह्मणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलिया ॥ ३ ॥

॥ १६५० ॥

काय ऐसा जन्म जावा वांयांविण । कांहीं तरी ऋण असो माथां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥ ध्रु ॥
शता एका तरी जन्माच्या शेवटीं । कृपाळुवा पोटीं होईल दया ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं फांकों तरी देत । सर्वांचें उचित सांपडलें ॥ ३ ॥

॥ १६५१ ॥

नाहीं कोणी दिस जात वांयांविण । साध्य नाहीं सीण लटिका चि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एकाचिये माथां असावें निमित्त । नसो नाहीं हितें कपाळीं तें ॥ ध्रु ॥
कांहीं एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥ २ ॥
तुका ह्मणे वर्में कळों येती कांहीं । ओळखी जे नाहीं होईल ते ॥ ४ ॥

---

१ पं. येईल.—२ पं. " हित " नाहीं.

॥ १६५२ ॥

काय करील तें नव्हे विश्वंभर । सेवकां दारिद्र[1] लाज नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ॥ध्रु॥[2]
नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची ॥ २॥
तुका ह्मणे नेणों किती वांयां गेले । तयां उद्धारिलें पांडुरंगें ॥ ३ ॥

॥ १६५३ ॥

संध्या करितोसी केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ किती या सांगावें करूनि फजित । खळ नेणे हित जवळी तें ॥ ध्रु ॥
माजल्या न कळे उचित तें काय । नै[3] घ्यावें तें खाय घ्यावें सांडी ॥ २ ॥
तुका ह्मणे घेती भिंती सवें डोकें । वावसी तीं[4] एकें अंधारलीं ॥ ३ ॥

॥ १६५४ ॥

दुधाचे घागरी मद्याचा हा बुंदे[5] । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसें खळां मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥ ध्रु ॥
काय करावीं तीं[6] बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वांयां गेलीं[7] ॥ २ ॥
तुका ह्मणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैशी संवसर्गें[8] ॥ ३ ॥

॥ १६५५ ॥

सांगावें तें बरें असतें[9] हें पोटीं । दुःख देते खोटी बुद्धि मग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आपला आपण करावा वेव्हार[10] । जिंकोनि अंतर मन ग्वाही ॥ ध्रु ॥

---

१ पं. दारिद्र.–२ पं. "ऐसें हें कळों आलें माझ्या मना । हरिचिया जना नाश नाहीं ॥" हें कडवें येथें जास्त आहे.–३ दे. नेघावें०.–४ दे. तें. पं. तें एक अंधा०.–५ पं. बिंद–६ दे. पं. तें.–७ त. पं. गेले.–८ दे. सवें श्वर्गें. त. संवश्वर्गें. पं. संवसंगें.–९ पं. असावें.–१० पं. विचार.

नाहीं मागें येत बोलिलें वचन । पावावा तो सीग बरा मग ॥ २ ॥
तुका ह्मणे बहु भ्यालों खटपटे । आतां देवा खोटे शब्द पुरे ॥ ३ ॥

## ॥ वाराणसीस यात्रा चालली तेव्हां स्वामींनीं भागीरथीस पत्र धाडिलें–ते अभंग ॥ ३ ॥

॥ १६५६ ॥

परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भागीरथी महादोष निवारणी । सकळां स्वामिणी तीर्थांचिये ॥ध्रु॥
जीतां भुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तिरीं । अैहिक्यपरत्रीं सुखरूप ॥ २ ॥
तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठविलें ॥ ३ ॥

॥ १६५७ ॥

तुह्मी विश्वनाथ । दीनरंक मी अनाथ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कृपा कराल ते थोडी । पायां पडिलों बराडी ॥ ध्रु ॥
काय उणें तुह्मांपाशीं । मी तों अल्पें चि संतोषी ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । कांहीं भातुकें पाठवा ॥ ३ ॥

॥ १६५८ ॥

पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें जालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥ ध्रु ॥
केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ३ ॥

॥ ३ ॥

---

१. त. "मस्तक०" व दुसऱ्या चरणांतील "सकळां०" या दोन चरणांच्या जागा परस्पराशीं बदलल्या आहेत.–२ पं. जितां.–३ त. आहिक्य.– ४ दे. पोसनें.– ५ दे. त. वागपुष्प.–६ पं. पडतों.–७ पं. अल्प.

॥ १६५९ ॥

मथुरेच्या राया । माझें दंडवत पायां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुमचे कृपेचें पोसणें । माझा समाचार घेणें ॥ ध्रु ॥

नाम धरिलें कंठीं । असें आर्तभूत पोटीं ॥ २ ॥

जीवींचें तें जाणा । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

॥ १६६० ॥

जाय तिकडे लागे पाठीं । नाहीं तुटी आठवाची ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हरूनियां नेलें चित्त । माझें थीत भांडवल ॥ ध्रु ॥

दावूनियां रूप डोळां । मन चाळा लाविेयेलें ॥ २ ॥

आणीक तोंडा पाडिली मिठी । कोंन गोष्टी नाइकती ॥ ३ ॥

बोलिल्याचा आठव न घडे । वाणी ओढे ते सोई ॥ ४ ॥

तुका ह्मणे प्रेमधगी । भरली अंगीं अखंड ॥ ५ ॥

॥ १६६१ ॥

नको ऐसें जालें अन्न । भूक तान ते गेली ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ गोविंदाची आवडी जीवा । करीन सेवा धणीवरी ॥ ध्रु ॥

राहिलें तें राहो काम । सकळ धर्म देहींचे ॥ २ ॥

देह धरिला त्याचें फळ । आणीक काळ धन्य हा ॥ ३ ॥

जाऊं नेदीं करितां सोस । क्षेमा दोष करवीन ॥ ४ ॥

तुका ह्मणे या च पाठीं । आतां साटी जीवाची ॥ ५ ॥

---

१ दे. त. पोसनें.—२ पं. लावूनियां.—३ पं. कानगोष्टी.—४ त. धरिलें. पं. "धरिला त्याचें" याबद्दल "धरिल्याचें".—५ दे. पं. क्षेमा.—६ पं. पाटी.

॥ १६६२ ॥

वाट पाहें हरि कां नये आझूनि । निष्ठुर कां मनीं धरियेलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ॥ ध्रु ॥

नाहीं माझा धांवा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ॥ २ ॥

नाहीं आलें कळों अंतरा अंतर । कृपावंत फार ऐकतो ॥ ३ ॥

बहुता दिसांचें राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुरवाळिलें[1] ॥ ४ ॥

तुका ह्मणे देई एकवेळा भेटी ॥ शीतळ हें पोटीं होइल मग ॥ ५ ॥

॥ १६६३ ॥

नाहीं दिलें कधीं कठिण उत्तर । तरी कां अंतर पडियेलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि आतां वियोग न साहे । लांचावलें देहें संघ ष्टणें

वेळोवेळां वाचे आठवितों नाम । अधिक चि प्रेम चढे घेतां ॥ २ ॥

तुका ह्मणे पांडुरंगे जननिये । घेऊनि कडिये बुझाविलें ॥ ३ ॥

॥ १६६४ ॥

आतां न करीं सोस । सेवीन हा ब्रह्मरस ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ओंह्मां[2] लक्षण[3] अमृत । ब्रह्मपदींचें निश्चित ॥ ध्रु ॥

तुमचा निज ठेवा । आह्मी पाडियेला ठावा ॥ २ ॥

तुका ह्मणे देवराया । आतां लपालेती[4] वांयां ॥ ३ ॥

॥ १६६५ ॥

जेथें जेथें जासी । तेथें मज चि तूं पोहसी[5] ॥ १ ॥

---

१ दे. त. कुरवाळिलें.—२ दे. सुखें सेवीन अमृत । ०.—३ त. लक्षणें.—४ पं. लेपालेती.—
५ दे. त. पासी.

॥ ध्रु. ॥ ऐसा पसरोनि भाव । रिता नाहीं कोणी ठाव ॥ ध्रु ॥
चित्त जडलें पायीं । पाळती हें ठायीं ठायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे पोटीं । देव घालुनि सांगें गोष्टी ॥ ३ ॥

॥ १६६६ ॥

सांपडला हातीं । तरी[1] जाली हे निश्चिती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं धांवा[2] घेत मन । इंद्रियांचें समाधान ॥ ध्रु ॥
सांडियेला हेवा । अवघा संचिताचा ठेवा ॥ २ ॥
तुका ह्मणे काम । निरसुनियां घेतों नाम ॥ ३ ॥

॥ १६६७ ॥

मुक्तिपांग नाहीं विष्णुचिया दासां । संसार तो कैसा न देखती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बैसला गोविंद जडोनियां चित्तीं । आदि[3] ते चि अंतीं अवसानीं[4] ॥ ध्रु ॥
भोग नारायणा देऊनि निराळीं । ओंविया मंगळीं तो चि गाती ॥ २ ॥
बळ बुद्धि त्यांची उपकारासाटीं । अमृत तें पोटीं सांटवलें ॥ ३ ॥
दयावंत तरी देवा च सारिखीं । आपुलीं पारखीं नोळखती ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्यांचा जीव तो चि देव । वैकुंठ तो ठाव वसती ते[5] ॥ ५ ॥

॥ १६६८ ॥

सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं[6] । वैष्णवां चरणीं[7] होइन जोडा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें जन्म आतां मज देईं देवा । आवडी हे जीवा सर्व काळ ॥ ध्रु ॥
त्यांचे चरणरज येती अंगावरी । वंदीन[8] ते शिरीं जाइन मागें ॥ २ ॥

---

१ पं. तरी.—२ पं. धांव.—३ पं. आदि तो चि अवसानीं.—४ दे. त. अवसान.—५ दे. पं. तो.—६ पं. चरणीं.—७ त. पं. वैष्णवांचे न्हाणी होइन किडा.—८ त. पं. वंदीन.

तुका ह्मणे येथें राहिलासे भाव । सकळ ही वाव जाणोनियां ॥ ३ ॥

॥ १६६९ ॥

क्षेम देयाला[1] हो । स्फुरताती दंड बाहो ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां झडझडां चालें । देई उचलूं पाउलें ॥ ध्रु ॥

सांडीं[2] हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ॥ २ ॥

तुका ह्मणे आई । श्रीरंगे विठाबाई ॥ ३ ॥

॥ १६७० ॥

जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कंठ कंठा मिळों देई । माझा वोरस तूं घेई ॥ ध्रु ॥

नको पीतांबर । सांवरूं हे अळंकार ॥ २ ॥

टाकीं वो भातुकें । लौकिकाचें[3] कवतुकें ॥ ३ ॥

हातां[4] पायां नको । कांहीं वेगळालें राखों ॥ ४ ॥

तुका ह्मणे यावरी । मग सुखें अळंकारीं ॥ ५ ॥

॥ १६७१ ॥

कृपेचा ओलावा । दिसे वेगळा चि देवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मी हें इच्छीतसें साचें । न लगे फुकटशाई[5] काचें ॥ ध्रु ॥

जेणें जाय कळसा । पाया उत्तम तो तैसा ॥ २ ॥

तुका ह्मणे घरीं । तुझ्या अवघिया परी ॥ ३ ॥

॥ १६७२ ॥

दावूनिया कोणां कांहीं । ते चि वाहीं चाळविलीं ॥ १ ॥

---

१ "द्यायाला" याबद्दल.—२ पं. सांडीं हे संगती.—३ पं. लौकिकाची.—४ पं. आतां.—५ पं. फुकटसाई काचें.

॥ ध्रु. ॥ तैसें नको करूं देवा । शुद्धभावा माझिया ॥ ध्रु ॥

रिद्धिसिद्धी[1] ऐसीं आड । येती नाड नागवूं ॥ २ ॥

उदकाऐसी[2] दावुनि ओढी । उर फोडी झळई[3] ॥ ३ ॥

दर्पणींचें दिलें धन । दिसे पण चरफड[4] ॥ ४ ॥

तुका ह्मणे पायांसाटीं । करीं[5] आटी[6] कळों द्या ॥ ५ ॥

॥ १६७३ ॥

काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आवडीनें गळां मिठी । घाली उठी बैसवी ॥ ध्रु ॥

लावूं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ॥ २ ॥

भावंडाचें भातें दावी । आपुलें लावी त्यास जी ॥ ३ ॥

माझें थोडें त्याचें फार । उत्तर हें वाढवी ॥ ४ ॥

तुका ह्मणे नारायणा । तुह्मी जाणां बुझावूं ॥ ५ ॥

॥ १६७४ ॥

तरीं आह्मी तुझी धरियेली कास । नाहीं कोणी दास वांयां गेला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आगा पंढरीशा[7] उभ्या[8] विटेवरी । येई लवकरी धांवें[9] नेटें ॥ ध्रु ॥

पाल्लवितों[10] तुज उभी करोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ॥ २ ॥

तुका ह्मणे तुज बहु कान डोळे । कां[11] हे माझे वेळे ऐसी परी ॥ ३ ॥

॥ १६७५ ॥

करावा कांटाळा नव्हे हें उचित । आधीं च कां प्रीत लावियेली ॥ १ ॥

---

१ दे. रिद्धिसिद्धी ऐसे आड ।—२ दे. उदकाऐसे.—३ पं. झळाळी.—४ दे. चरफडी.—५ पं. करितों.—६ दे. आट.—७ दे. पंढरीच्या—८ पं. उभा.—९ त. पं. धांव.—१० पं. पाल वितों वरी उभारोनि बाहे.— ११ पं. कांगा माझे०.

॥ ध्रु. ॥ जाणतसां तुह्मीं रूपाचें लाघव । आपुलें तें जीव घेतें ऐसा ॥ ध्रु.॥
काय ह्मणऊनि आलेती आकारा । आह्मां उजगरा करावया ॥ २ ॥
तुका ह्मणे भीड होती आजिवरी । आतां देवा उरी कोण ठेवी ॥ ३ ॥

॥ १६७६ ॥

धरूनि पालव असुडीन करें । मग काय बरें दिसे लोकीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय तें विचारा ठायींचें आपणां । जो हो नारायणा अवकाश ॥ ध्रु.॥
अंतर पायांसी तों वरी या गोष्टी । पडिलिया मिठी हालों नेदीं ॥ २ ॥
रुसलेती तरी होइल बुझावणी । तांतडी करूनि साधावें हें ॥ ३ ॥
सांपडलिया आधीं कारणासी ठाव । येथें करूं भाव दृढ आतां ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझे ठाउके बोभाट । मग खटपट चुकली ते ॥ ५ ॥

॥ १६७७ ॥

निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग । आहे लागभाग ठायींचा चि ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ तूं माझा जनिता तूं माझा जनिता । रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥ ध्रु. ॥
मुळींच्या ठेवण्यां आहे अधिकार । दुरावोनि दूर गेलों होतों ॥ २ ॥
पोटींच्या आठवा पडिला विसर । कांहीं आला भार माथां तेणें ॥ ३ ॥
राखिला हा होता बहु चौघां चार । साक्षीनें व्यवहार निवाडिला ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं बोलणें न लगे । आतां पांडुरंगे तूं मी ऐसें ॥ ५ ॥

॥ १६७८ ॥

सांगतां गोष्टी लागती गोडा । हा तो रोकडा अनुभव ॥ १ ॥

---

१ पं. आपुलाले जीव०.—२ दं. जोडा नारा०.—३ त. पं. ठेवण्या.—४ दे त. वेव्हार.—
५ पं. " तूं मी " याबद्दल " तुझी."

॥ ध्रु. ॥ सुख जालें सुख जालें । नये बोलें बोलतां ॥ ध्रु ॥
अंतर तें नये दिसों । आतां सोस[1] कासया ॥ २ ॥
तुका ह्मणे जतन करूं । हें चि धरूं जीवेंसी ॥ ३ ॥

॥ १६७९ ॥

मजशीं पुरें न पडे वादें । सुख दोहींच्या संवादें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तूं चि आगळा काशानें । शिर काय पायांविणे ॥ ध्रु
वाहों तुझा भार । दुःख साहोनि अपार ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं भेद । देवा करूं नये वाद ॥ ३ ॥

॥ १६८० ॥

तुज नाहीं शक्ति । काम घेसी आह्मां हातीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें अनुभवें पाहीं । उरलें बोलिजेसें नाहीं ॥ ध्रु ॥
ल्पोनियां आड । आह्मां तुझों[2] कैवाड ॥ २ ॥
तुका ह्मणे तुजसाटीं । आह्मां संवसारें[3] तुटी ॥ ३ ॥

॥ १६८१ ॥

तुंझ्याठायीं[4] ओस । दोन्ही पुण्य आणि दोष ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ झडलें[5] उरलें किती । आह्मीं धरियेलें चित्तीं ॥ ध्रु ॥
कळलासी नष्टा । यातिक्रियाकर्मभ्रष्टा ॥ २ ॥
तुका ह्मणे बोला । नाहीं ताळा गा विठ्ठला ॥ ३ ॥

॥ १६८२ ॥

मांडावें तों हित । ठायीं पडों[6] तें उचित ॥ १ ॥

---

१ पं. करावा.—२ पं. ० तुझा कधी वाड ।—३ पं. संसार तुटी.—४ दे. त. तुझ्या
५ पं. झडले किती आह्मी । आह्मीं धरि०.—६ पं. पडतें उचित.

॥ ध्रु. ॥ नये खंडों देऊं वाद । आह्मां भांडवलभेद ॥ ध्रु ॥
शब्दसारसें[1] भेटी । नये पडों देऊं तुटी ॥ २ ॥
तुका ह्मणे आळस । तो चि कारणांचा नास ॥ ३ ॥

॥ १६८३ ॥

नव्हों गांढे आळसी । जो तूं आह्मांपुढें जासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अरे दिलें आह्मां हातीं । वर्म वेवादाचें[2] संतीं ॥ ध्रु ॥
धरोनियां वाट । जालों[3] शिरोमणि थोंट ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । वाद करीन खरी सेवा ॥ ३ ॥

॥ १६८४ ॥

तुझा विसर नको माझिया जीवा । क्षण एक[4] केशवा मायबापा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाओ राहो देह आतां ये चि घडी । कायसी आवडी याची मज ॥ ध्रु ॥
कुश्चीळ[5] इंद्रियें आपुलिया गुणें । यांचिया पाळणें कोण हित ॥ २ ॥
पुत्र पत्नी बंधु सोयरीं खाणोरीं । यांचा कोण धरी[6] संग आतां ॥ ३ ॥
पिंड हा उसना आणिला पांचांचा । सेकीं लागे ज्याचा त्यासी देणें ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं आणिक सोइरें । तुजविण दुसरें पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ १६८५ ॥

ऐसें सत्य माझें[7] येईल[8] अंतरा । तरि मज करा कृपा देवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वचनांसारिखें तळमळी चित्त । बाहेरि तो आंत होइल भाव ॥ ध्रु ॥

---

१ पं. शब्द सरसे.—२ "विवादाचें" याबद्दल.—३ पं. जाला.—४ पं. रे.—५ पं. कुश्चळ.—६ त. करी.—७ त. पं. माझा.—८ पं. देईल.

तरि मज ठाव द्यावा पायांपाशीं । सत्यत्वें जाणसी दास खरा ॥ २ ॥
तुका ह्मणे सत्य निकट सेवेंकें[1] । तरि च भातुकें प्रेम द्यावें ॥ ३ ॥

॥ १६८६ ॥

आदि वर्तमान जाणसी भविष्य । मागें पुढें नीस संचिताचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां काय देऊं पायांत परिहार । जाणां तो विचार करा देवा ॥ ध्रु ॥
आपुलें तें येथें काय चाले केलें । जोडावें तें भलें होतें पुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे फिके बोल माझे वारा । कराल दातारा होईल तें ॥ ३ ॥

॥ १६८७ ॥

सुखें न मनीं अवगुण । दुःख[2] भोगी[3] त्याचें कोण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें कां ठायींचें न कळे । राती करा झांकुनि डोळे ॥ ध्रु ॥
चालोनि आड वाटे । पायीं मोडविले कांटे ॥ २ ॥
तुका ह्मणे कोणा । बोल ठेवितो शाहाणा ॥ ३ ॥

॥ १६८८ ॥

आह्मी न देखों अवगुणां । पापी पवित्र शाहाणा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥ ध्रु ॥
[4]मज भक्तीसवें चाड । नेणें पापाग धातु वाड ॥ २ ॥
तुका ह्मणे घोटीं । विष अमृत तुजसाटीं ॥ ३ ॥

॥ १६८९ ॥

मज नाहीं तुझ्या ज्ञानाची[5] ते चाड । घेतां वाटे गोड नाम तुझें ॥ १ ॥

१ पं. सेवक.—२ पं. दुःख त्याचें भोगी कोण ।.—३ त. भोगील.—४ दे. मज मुक्ती सर्वे०.—५ त. ज्ञानाची हे चाड. दे. ज्ञानाची चाड.

॥ ध्रु. ॥ नेणतें लेंकरूं आवडीचें तान्हें । बोलतों वचनें आवडीनें ॥ ध्रु॥
भक्ती नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं । घातला विठाई भार तुज ॥ २ ॥
तुका ह्मणे नाचें निर्लज्ज होऊनि । नाहीं माझे मनीं दुजा भाव ॥ ३॥

॥ १६९० ॥

काय माझी संत पाहाती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय[1] चाड ॥ध्रु
बोबड्या[2] उत्तरीं ह्मणें हरिहरि । आणीक भीकारी नेणें दुजें ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ॥ ३॥

॥ १६९१ ॥

जीवाचें जीवन अमृताची तनु । ब्रह्मांड भूषणु नारायण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सुखाचा सांगात अंतकासी अंत । निजांचा निर्वांत नारायण ॥ध्रु॥
गोडाचें ही गोड हर्षाचें ही कोड । प्रीतीचा ही लाड नारायण ॥ २॥
भावाचा निज भाव नांवांचा ही[3] नांव । अवघा पंढरिराव [4]अवतरलासे ॥ ३ ॥
तुका[5] ह्मणे जें हें साराचें हें सार । माझा अंगीकार तेणें केला ॥ ४ ॥

॥ १६९२ ॥

आतां मी सर्वथा न[6]व्हें गा दुर्बळ । यातिहीनकुळ दैन्यवाणा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ॥ध्रु॥
बापुडा मी नव्हें दुर्बळ ठेंगणा । पांगिला हा कोणा आणिकांसी ॥ २ ॥
दुं[7]ष्ट नव्हों आह्मी अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारि हा ॥ ३ ॥

---

१ त. कोण.—२ दे. त. बोबडा.—३ दे त. हा.—४ पं. अवतरला.—५ पं. तुका ह्मणे हें साराचें ही सार.—६ पं. नोव्हें.—७ दे. त. पं. दुष्ट.

संवसार आह्मां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ॥ ४ ॥
तुका ह्मणे जालों निर्भर मानसीं । जोडलिया रासी सुखाचिया ॥ ५ ॥

॥ १६९३ ॥

केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव चि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥ ध्रु ॥
त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥ २ ॥
तुका ह्मणे आपओपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुह्मां ॥ ३ ॥

॥ १६९४ ॥

हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि सेवा देवाची हे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आवडी विठ्ठल गाईजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा ॥ ध्रु ॥
आणीकां अंतरीं न द्यावी वसति । करावी हे शांती वासनेची ॥ २ ॥
तुका ह्मणे बाण हा चि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचूं नये ॥ ३ ॥

॥ १६९५ ॥

हो कां नर अथवा नारी । ज्यांचा आवडता हरि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ते मज विठोबासमान । नमूं आवडी ते जन ॥ ध्रु ॥
ज्यांचें अंतर निर्मळ । त्याचें सबाह्य कोमळ ॥ २ ॥
तुका ह्मणे भावें । जिन्हें प्रेम वोसंडावें ॥ ३ ॥

---

१ दे. उबगें.—२ दे. त. पं. ०आपण्यां.—३ दे. त. चित्त शुद्ध.—४ दे. नेदावी.—५ त. पं. आवडीनें.—६ त. अंतरीं निर्मत्सर। सबाह्य कोमळ जिव्हार ॥. दे. मूळ पाठ कायम ठेवून हा पाठ समासांत दाखविला आहे.—७ पं. तुका ह्मणे जीवें । जिहीं प्रेम०

॥ १६९६ ॥

हरिची हरिकथा नावडे जया । अधम ह्मणतां तया वेळ लागे ।
मनुष्यदेहीं तया नाट लागलें । अघोर सांधिलें कुंभपाक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होऊन पडिला नाहीं ॥
उपजे मरोनि वेळोवेळां भांड । पंरि लाज लंड न धरी कांहीं ॥ ध्रु ॥
ऐसियाची माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी ।
देवधर्माविण चांडाळ हा नर । न साहे भूमि भार क्षणभरी ॥ २ ॥
राम ह्मणतां तुझें कांय तें वेचलें । कां हित आपुलें न विचारिसी ।
जन्मोजन्मींचा होईल नरकीं । तुका ह्मणे चुकी जंरी यासी ॥ ३ ॥

॥ १६९७ ॥

उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आईकिली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां काय ब्रीद सांडील आपुलें । ठायींचें धरिलें जाणोनियां ॥ ध्रु ॥
माझ्या दोषासाटीं होइल पाठमोरा । ऐसा कोण पुरा भोग बळी ॥ २ ॥
तुका ह्मणे रूप आमुच्या कैवारें । धरिलें गोजिरें चतुर्भुज ॥ ३ ॥

॥ १६९८ ॥

आवडीसारिखें संपादिलें सोंग । अनंतें हें मग जालें नाम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचा हीं साक्षी ॥ ध्रु ॥

---

१ पं. ०नाट पैं लागला । अघोर साधिला कुंभ०.—२ त. साधिलें.—३ दे. परिलाज न०. पं. परि न धरी लंड लाज कांहीं.—४ दे. त. तो हा चांडाळ ।.—५ दे. त. काय वेचेल.—६ पं. होसील.—७ पं. जयासी.—८ त. पं. पाठीमोरा.—९ पं. अनंत हीं मग जालीं नामें.

हातें जेवी एक मुखीं मागे घांस । माउली जयास तैसी बाळीं ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें ध्यान विटेवरी । तैसी च गोजिरी दिसे मूर्ति ॥ ३ ॥

॥ १६९९ ॥

धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्य जालों आतां यासि संदेह नाहीं । न पडों या वाहीं काळा हातीं ॥ ध्रु ॥
ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगती सर्वकाळ ॥ २ ॥
तुका ह्मणे पोट धालें चि न धाय । खादलेंचि खायें आवडीनें ॥ ३ ॥

॥ १७०० ॥

आवडी न पुरे सेवितां न सरे । पडियली धुरेसवें गांठी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न पुरे हा जन्म हें सुख सांटितां । पुढती ही आतां हें चि मागों ॥ ध्रु ॥
मारगाची चिंता पालखी बैसतां । नाहीं उसंतितां कोमेपणी ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूक तान ॥ ३ ॥

॥ १७०१ ॥

नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । ह्मणऊनि मन स्थिरावलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धरियेलीं जीवीं पाउलें कोमळीं । केली एकावळी नाममाळा ॥ ध्रु ॥
शीतळ होऊनियां पावलों विश्रांती । न साहे पुढती घालीं चित्ता ॥ २ ॥
तुका ह्मणे जाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ३ ॥

---

१ दे. माळा.–२ पं. यावा कांहीं.–३ दे. धरे.–४ पं. कोवळी । केली एका०.–५ पं. पांडुरंगा.

॥ १७०२ ॥

मायबापापुढें लाडिकें लेंकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कृपावंता घालीं प्रेमपान्हारस । वोळली वोरेस पांडुरंग ॥ ध्रु ॥

नाहीं धीर खुंटी जवळी हुंबरे । ठायीं च पाखर कवळिते ॥ २ ॥

तुका ह्मणे मज होऊं नेदी सीण । कळों नेदी भिन्न आहे ऐसें ॥ ३ ॥

॥ १७०३ ॥

आठवों नेदी आवडी आणीक । भरूनियां लोक तिन्ही राहे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मन धांवे तेथें तिचें चि दुभतें । संपूर्ण आइतें सर्वकाळ ॥ध्रु॥

न लगे वेळावीं इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥ २ ॥

तुका ह्मणे समपाउलाचा खुंट । केलों बळकट हालों नेदी ॥ ३ ॥

॥ १७०४ ॥

उत्तम घालावें आमुचिये मुखीं । निवारावें दुःखी होऊंनि तें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ न बैसे न वजे जवळूनि दुरी । मागें पुढें वारी घातपात ॥ ध्रु॥

नाहीं शंका असो भलतिये ठायीं । मावळले पाहीं द्वैताद्वैत ॥ २ ॥

तुका ह्मणे भार घेतला विठ्ठलें । अंतरीं भरलें बाह्य रूप ॥ ३ ॥

॥ १७०५ ॥

आह्मां अळंकार मुद्रांचे शृंगार । तुळसीचे हार वाहों कंठीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ लाडिके डिंगर पंढरिरायाचे । निरंतर वाचे नामघोष ॥ ध्रु ॥

आह्मां आणिकांची चाड चि पैं नाहीं । सर्व सुखें पायीं विठोबाच्या ॥ २ ॥

तुका ह्मणे आह्मी नेघों चि या मुक्ती । एकाविण चित्तीं दुजें नाहीं ॥३॥

---

१ दे. लाटिकें.–२ दे. वोरसे.–३ दे. त. वोळावीं.–४ पं. जाला.–५ पं. होऊं नेदी.–६ पं. राहो.–७ पं. वाचा.–८ दे. चाड चि नाहीं. पं. चाड चित्तीं नाहीं.–९ पं. त. सुख.–१० दे. त. नेघों या.–११ दे. त. एकाविण.

॥ १७०६ ॥

चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ॥ ध्रु. ॥[1]

संतां[2] महंतां होतील भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ २ ॥

तें[3] तीर्थांचें माहेर । सर्वसुखाचें भांडार ॥ ३ ॥

जन्म नाहीं रे आणीक । तुका ह्मणे माझी भाक ॥ ४ ॥

॥ १७०७ ॥

पैल घरीं जाली चोरी । देहा करीं[4] बोंब ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हाबा हाबा करिसी काये । फिराऊनि नेय्यां वांयें[5] ॥ ध्रु. ॥

सांडुनियां शुद्धी । निजलासी गेली बुद्धि ॥ २ ॥

चोरीं तुझा काढिला बुर । वेगळें भावा घातलें दूर ॥ ३ ॥

भलतियासी देसी वाव । लाहेसि तूं एवढा ठाव ॥ ४ ॥

तुका ह्मणे अझुनि तरी । उरलें तें[6] जतन करीं ॥ ५ ॥

॥ १७०८ ॥

किती वेळा खादला दगा । अझून कां गा जागसी ना ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ लाज नाहीं हिंडतां गांवें । दुःख नवें नित्य नित्य ॥ ध्रु. ॥

सवें चोरा हातीं फांसे । देखतां कैसे न देखसी ॥ २ ॥

तुका ह्मणे सांडिती वाट । तळपट करावया ॥ ३ ॥

॥ १७०९ ॥

मुदलामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥ १ ॥

---

१ त. " होईल सज्जन । संतजन भेटती ॥ " हें कडवें आढळतें. दे. हें मागून बाहेर घातलें आहे. पं. हें मुळींच नाहीं. याचा अर्थ पुढील कडव्यांत आला आहे.—२ दे. पं. यांत हें कडवें आहे; त. नाहीं. पं. संत महंता०.—३ पं. तेथें.—४ पं. देहा बोंब करी.—५ पं. वाये.—६ त. तया.

॥ ध्रु. ॥ आणिकांची कां लाज नाहीं । आळसा जिहीं तजिलें ॥ ध्रु ॥
एके सांते सरिखीं[1] वित्तें । हानि हित वेगळालीं ॥ २ ॥
तुका ह्मणे हित धरा । नव्हे पुरा गांवढाळ ॥ ३ ॥

॥ १७१० ॥

निरोप सांगतां । न धरीं भय न करीं चिंता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ असो ज्याचें त्याचे[2] माथां । आपण करावी ते कथा ॥ ध्रु ॥
उतरावा भार । किंवा न व्हावें सादर ॥ २ ॥
तुका ह्मणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥ ३ ॥

॥ १७११ ॥

शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ केला न संडी कैवाड । जीवेंसाटीं तों हे होड[3] ॥ ध्रु ॥
धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥ २ ॥
तुका ह्मणे हरि । दासां रक्षितो[4] निर्धारीं ॥ ३ ॥

॥ १७१२ ॥

हरिच्या दासां भये । ऐसें बोलों तें[5] ही नये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ राहोनियां आड । उभा देव पुरवी कोड ॥ ध्रु ॥
हरिच्या दासां चिंता । अघटित हे वार्ता ॥ २ ॥
खावें ल्यावें द्यावें । तुका ह्मणे पुरवावें ॥ ३ ॥

॥ १७१३ ॥

दासां सर्व काळ । तेथें सुखाचे[6] कल्लोळ ॥ १ ॥

---

१ पं. सारिखे.—२ दे. " त्याचे " याबद्दल " त्याचे त्याचे ".—३ पं. होड.—४ त. रक्षिता.—५ पं. " तेंही " याबद्दल " परी ".—६ पं. सुखाचा.

॥ ध्रु. ॥ जेथें वसती हरिदास[1] । पुण्य पिके पापा नास ॥ ध्रु ॥
फिरे सुदर्शन । घेऊनियां नारायण ॥ २ ॥
तुका ह्मणे घरीं । होय ह्मणियारा कामारी ॥ ३ ॥

॥१७१४ ॥

आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मायबापाचीं लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥ ध्रु ॥
नाहीं निपरादें[2] । कोणां आह्मांमध्यें भेद ॥ २ ॥
तुका ह्मणे मान । अवघें आमचें हें धन ॥ ३ ॥

॥ १७१५ ॥

काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न । खरा[3] विलेपन चंदनाचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नको नको देवा खळाची संगति । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥ ध्रु ॥
काय सेज बाज माकडा विलास । अळंकारा नास करुनी टाकी ॥२॥
तुका ह्मणे काय पाजूनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥ ३ ॥

॥ १७१६ ॥

आनंदें एकांतीं प्रेमें वोसंडत । घेऊं अगणित प्रेमसुख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गोप्य धन नये वारा लागों यास । पाहों नेदूं वास दुर्जनासी ॥ ध्रु ॥
ह्मणी दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ॥ २ ॥
तुका[4] ह्मणे हें बहु सकुमार । न साहावे भार वचनाचा ॥ ३ ॥

---

१ पं. हरिचे दास.–२ त. निपराध. पं. निरपराध.–३ पं. खरासी लेपन.–४ पं. तुका ह्मणे बहु असे सकुमार ।.

॥ १७१७ ॥

मोक्षपदें तुच्छ केलीं याकारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुडतीपुडती आस सेवावें हें ॥ ध्रु ॥
देवा हातीं रूप धरविला आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ २ ॥
तुका म्हणे चित्त निवांत राहिलें । ध्याई तीं पाउलें विटेवरि ॥ ३ ॥

॥ १७१८ ॥

नको बोलों भांडा । खीळ घालुन बैस तोंडा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐक विठोबाचे गुण । करीं सादर श्रवण ॥ ध्रु ॥
प्रेमसुखा आड । काय वाजतें चाभाड ॥ २ ॥
तुका म्हणे हिता । कां रे नागवसी थीता ॥ ३ ॥

॥ १७१९ ॥

अति जालें उत्तम वेश्येचें लावण्य । परि ते सवासीण न ह्मगावी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल वाव थोरपण ॥ ध्रु ॥
शूरत्वावांचूनि शूरांमाजी ठाव । नाहीं आविर्भाव आणिलिया ॥ २ ॥
तुका ह्मणे सोंग पोटाचे उपाय । कारण कमाईविण नाहीं ॥ ३ ॥

॥ १७२० ॥

शूरां साजती हतियारें । गांढ्यां हांसतील पोरें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय केली विटंबण । मोतीं नासिकावांचून ॥ ध्रु ॥
पतिव्रते रूप साजे । सिंदळ काजळ लेतां लाजे ॥ २ ॥

---

१ पं. नाहीं.—२ पं. पुढपुढती आस सेवावी हे ।—३ पं. धरवूं.—४ पं. नये.—५ दे. वाजातें.—६ दे. त. पं. आयुर्भाव.

दासी पत्नी सुता । नव्हे सरी एक[1] पिता ॥ ३ ॥

मान बुद्धिमंतां[2] । थोर न मानिती[3] पिता ॥ ४ ॥

तुका ह्मणे तरी । आंत शुद्ध दंडे[4] वरी ॥ ५ ॥

॥ १७२१ ॥

काय केलें जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हा तों ठायींचा विचार । आहे यातिवैराकार ॥ ध्रु ॥

श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ॥ २ ॥

तुका ह्मणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥ ३ ॥

॥ १७२२ ॥

वाइटानें भलें । हीनें दाविलें[5] चांगलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ एकाविण एका । कैंचें मोल होतें फुका ॥ ध्रु ॥

विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥ २ ॥

काळिमेनें ज्योती । दिवस[6] कळों आला राती ॥ ३ ॥

उंच निंच गारा । हिरा परिस मोहरा ॥ ४ ॥

तुका ह्मणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ५ ॥

॥ १७२३ ॥

असो खळ[7] ऐसे फार । आह्मां त्यांचे उपकार ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ करिती पातकांची धुनी । मोल न घेतां सांबणीं[8] ॥ ध्रु ॥

फुकाचे मजुर । ओझें वागविती भार ॥ २ ॥

पार उतरून ह्मणे तुका । आह्मां आपण जाती नरका ॥ ३ ॥

---

१ त.एक चि पिता.—२ दे. पं. बुद्धिवंतां.—३ त. ह्मणावा.—४ पं. दंड.—५ पं. दाखविलें.—६ पं. दिवसें कळों आली राती ।.—७ पं. ऐसे खळ.—८ दे. साबनीं.

॥ १७२४ ॥

संत पंढरीस जाती । निरोप धाडीं[1] तया हातीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥ ध्रु ॥

केरसुणी महाद्वारीं । ते मी असें निरंतरीं ॥ २ ॥

तुमचे पायीं पायतन[2] । मोचे माझे तन मन ॥ ३ ॥

तांबुलांची[3] पिकधरणी । ते मी असें मुख पसरूनि ॥ ४ ॥

तुमची विष्ठा[4] पंढरीराया । ते[5] सारसुबी माझी काया ॥ ५ ॥

लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥ ६ ॥

तुका ह्मणे पंढरिनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥ ७ ॥

॥ १७२५ ॥

इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ यांचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाहीं ॥ ध्रु ॥

सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले[6] जाणतां ॥ २ ॥

पिंड पाळितां ओसरे । अवघी[7] घेऊनि मागें सरे ॥ ३ ॥

करितां उपचार । कोणा नाहीं उपकार ॥ ४ ॥

अल्प जीवन करीं । तुका ह्मणे साधीं हरी ॥ ५ ॥

॥ १७२६ ॥

यज्ञनिमित्त तें[8] शरिरासी बंधन । कां रे तृष्णा वांयांविण वाढविली ॥ १ ॥

॥ ध्रु॰ ॥ नव्हे ते भक्ति परलोकसाधन । विषयांनीं बंधन केलें तुज ॥ ध्रु॥

आशा धरूनि फळाची । तीर्थीं व्रतीं मुक्ति कैंची ॥ २ ॥

---

१ पं. धाडिन.–२ दे. त. पाइतन.–३ पं. तांबोल पिकधरणी.–४ दे. पं. इष्टा.–५ पं. "ते" शब्द नाहीं.–६ पं. फिरला.–७ पं. अवघें.–८ पं. "तें" नाहीं.

तुका ह्मणे सिणसी वांयां । शरण न वजतां पंढरिराया ॥ ३ ॥

॥ १७२७ ॥

संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारितां ।
न वेचे मोल कांहीं लगती न सायास । तरी कां आळस करिसी ह्मणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें हें सार कां नेघेसी[1] फुकाचें । काय तुझें वेचे मोल तया ॥ ध्रु ॥
पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा ।
अनाथांच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलूनि परलोका ॥ २ ॥
अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम राम उच्चारिलें ।
तंव त्या दिनानाथा कृपा आली । त्यानें [2]तियेसि वैकुंठा नेलें ॥ ३ ॥
अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी [3]असे ।
तुका ह्मणे भावें [4]स्मरा राम राम । कोण जाणे तये दशे ॥ ४ ॥

॥ १७२८ ॥

दुष्टाचें चित्त न [5]भिने अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला ।
पालथे घागरी घातलें जीवन । न धरी च [7]जाण तें ही त्याला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जन्मा येउनि तेणें पतन चि साधिलें । [8]तमोगुणें व्यापिलें जया नरा ।
जळो जळो हें त्याचें ज्यालेपण । कासया हें आलें संवसारा ॥ ध्रु ॥
पाषाण जीवनीं असतां कल्पवरी । पाहातां अंतरीं कोरडा तो ।
कुचर मुग [9]नेये चि पाका । पाहातां सारिखा होता तैसा ॥ २ ॥
तुका ह्मणे असे उपाय सकळां । न चले या खळा [10]प्रयत्नें कांहीं ।

---

१ पं. न घेसी.—२ दे. तयेसी.—३ त. उभा.—४ पं. स्मरतां.—५ पं. चिंतन भिन्न तें अंतरीं ।.—६ दे. त. भिन्ने.—७ पं. जाणें.—८ पं. तमोगुण.—९ पं. नये चि हा पाका.—१० दे त. पं. प्रेम.

ह्मणऊनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व हित ॥ ३ ॥

॥ १७३० ॥

कासियानें पूजा करूं केशीराजा । हा चि संदेह माझा फेडीं आतां ॥१॥
॥ धु. ॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूप[1] तें तुझें । तेथें काय माझें वेचे देवा ॥ ध्रु ॥
गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥ २ ॥
फळदाता तूंच तांबोल अक्षता । तरी काय आतां वाहों[2] तुज ॥ ३ ॥
वाहूं दक्षिणा जरी[3] धातु नारायण । ब्रह्म तें चि अन्न दुजें काई ॥ ४ ॥
गातां तूं ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया थार[4] नाहीं कोठें ॥ ५ ॥
तुका ह्मणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहारि ॥ ६ ॥

॥ १७३१ ॥

गातां आइकतां कांटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥ १ ॥
॥ धु. ॥ रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिलें कासया मुख कान ॥ ध्रु ॥
विषयांच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ॥ २ ॥
वेचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ॥ ३ ॥
तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्टें लोभें[5] ॥ ४ ॥
तुका ह्मणे मग[6] केला साहे दंड । नाइकती लंड सांगितलें ॥ ५ ॥

॥ १७३२ ॥

तुझें ह्मणवितां काय नास जाला । ऐकें बा विठला कीर्ती तुझी ॥ १ ॥

---

१ दे. स्वरूप तुझें. तं. स्वरूप चि तुझें.–२ पं. वाहूं.–३ पं. तरी.–४ पं. पार–५ पं. पुष्टिलोभें.–६ पं. केला मग.

॥ ध्रु. ॥ परी तुज नाहीं आमचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ॥ ध्रु ॥
समूळीं संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥ २ ॥
लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यांसी नाहीं थार ऐसें केलें ॥ ३ ॥
मृत्तिका पाषाण तैसें केलें धन । आपले ते कोण पर नेणों[1] ॥ ४ ॥
तुका ह्मणे जालों देहासी उदार । आणीक विचार काय तेथें ॥ ५ ॥

॥ १७३३ ॥

जाऊनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ अंतरींचें शुद्ध कासयानें जालें । भूषण त्वां[2] केलें आपणया ॥ध्रु ॥
वृंदावन[3] फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडे चि ना ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदां तुह्मी ॥ ३ ॥

॥ १७३४ ॥

बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येऊनि अंतरीं राहील[4] गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥ध्रु॥
राम कृष्ण हरि मुकुंद मुरारि । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होईल[5] भाव एकविध ॥ ३ ॥

॥ १७३५ ॥

धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरिये ॥ १[6] ॥
॥ ध्रु. ॥ न पवीजे केल्या तपांचिया रासी । तें[7] जनलोकांसी दाखविलें ॥ ध्रु ॥

१ पं. नेणें.—२ दे. तों.—३ दे. त. इंद्रावण.—४ त. राहेल.—५ पं. होय.—६ पं. "न करीं आळस आलिया संसारीं । पाहें पा पंढरी भूवैकुंठ ॥" हें कडवें जास्त आहे. त. हें समासावर आलीकडे कोणी घातलें आहे; परंतु हें मूळचें येथलें नव्हे असें वाटतें.—७ त. तें हें जन०.

सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥ २ ॥
विष्णुपद गया [1]रामधाम काशी । [2]अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ [3]याँ नास अहंकाराचा ॥४॥

॥ १७३५ ॥

धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलिकें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्य तो हि लोक अवघा दैवांचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥ ध्रु ॥
धन्य ते [4]ही भूमी धन्य तरुवर । [5]धन्य तें सरोवर तीर्थरूप ॥ २ ॥
धन्य त्या नरनारि मुखीं नाम ध्यान । आनंदें [6]भवन गर्जतसे ॥ ३ ॥
धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण [7]अवतरला ॥ ४ ॥
तुका ह्मणे धन्य संसारातें आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ५ ॥

॥ १७३६ ॥

मायबाप करिती चिंता । पोर नाइके सांगतां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नको जाऊं देउळासी । नेतो बागुल लोकांसी ॥ ध्रु ॥
कर्णद्वारें पुराणिक । भुलवी [8]शब्दें लावी [9]भीक ॥ २ ॥
वैष्णवां संगती । हातीं [10]पडेली नेणों किती ॥ ३ ॥
आह्मा कैंचा मग । करिसी उघडियांचा संग ॥ ४ ॥
तुका ह्मणे जाणें नरका । त्यांचा उपदेश आइका ॥ ५ ॥

॥ १७३७ ॥

मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥ १ ॥

---

१ त. पं. रामनाम.–२ पं. अवघें –३ पं. चि.–४ पं. "ही" नाहीं.–५ दे. धन्य ते सुरवर०. पं धन्य सरोवर.–६ प. भुवन.–७ पं. अवतरलासे.–८ पं. शब्द.–९ त. भीके.–१० पं. पडी.

॥ध्रु.॥ आतां तूं उदास नव्हें नारायणा । धांवें मज दीना गांजियेलें ॥ ध्रु ॥
धांव घालीं पुढें इंद्रियांचे ओढी । केलें तेंडातोडी[2] चित्त माझें ॥ २ ॥
तुका ह्मणे माझा न चले सायास । राहिलों हे आस धरुनी तुझी ॥ ३ ॥

॥ १७३८ ॥

मागतियाचे दोनि च कर । अमित भांडार दातियाचें ॥ १ ॥
॥ध्रु.॥ काय करूं आतां कासयांत भरूं । हा मज विचारु पडियेला ॥ ध्रु ॥
एकें सांटवणें प्रेमें वोसंडलीं । जिव्हा हे भागली करितां माप ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां आहे तेथें असो । अंखुनियां बैसों पायांपाशीं ॥ ३ ॥

॥ १७३९ ॥

जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा[3] विकळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ ध्रु ॥
सुखाची विश्रांति । उमटे मातेचिये चित्तीं ॥ २ ॥
तुका ह्मणे संत । तुह्मी बहु कृपावंत ॥ ३ ॥

॥ १७४० ॥

यावें माहेरास । हे च सर्वकाळ आस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घ्यावी उच्छिष्टाची धणी । तीर्थ इच्छी पायवणी ॥ ध्रु ॥
भोग उभा आड । आहे तोंवरी च नाड ॥ २ ॥
तुका ह्मणे देवें । माझें सिद्धी पाववावें ॥ ३ ॥

॥ १७४१ ॥

लेंकराचें हित । वाहे माउलीचें चित्त ॥ १ ॥

---

१ पं. धांव—२ दे. तडातडी.—३ दे. तयेचा.

॥ ध्रु. ॥ ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभेंविण प्रीती ॥ ध्रु ॥
पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्व ही साहे ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें । तैसें तुह्मां संतां ओझें ॥ ३ ॥

॥ १७४२ ॥

आह्मां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळें ॥ ध्रु ॥
आह्मीं जना भ्यावें । तरि कां न लाजिजे देवें ॥ २ ॥
तुका ह्मणे देश । जाला[1] देवाविण ओस ॥ ३ ॥

॥ १७४३ ॥

तुह्मी पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां बाधूं न सके काळ । जालीं विषम शीतळ ॥ ध्रु ॥
भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भये । आतां स्वप्नीं[2] ही तें नये ॥ ३ ॥

॥ १७४४ ॥

काळाचे ही काळ । आह्मी विठोबाचे लडिवाळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करूं सत्ता सर्वां ठायीं । वसों निकटवासें[3] पायीं ॥ ध्रु ॥
ऐसी कोणाची वैखरी । वदे आमुचे समोरी ॥ २ ॥
तुका ह्मणे बाण । हातीं हरिनाम तीक्ष्ण ॥ ३ ॥

॥ १७४५ ॥

जन्मा येऊन उदार जाला । उद्धार केला वंशाचा ।

---

१ त. देवा विण पडिला ओस ।. पं. जाले देवाविण०.—२ पं. स्वप्नीं तें ही. दे. स्वप्नीं ही नये.—३ त. पं.० वास.

मेळवूनि धन मेळवी मानी । सदा विपत्ती भोगीतसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलिया ।
धर्म करितां ऐके कानीं । वांये निजोनि डोकियासी ॥ ध्रु ॥
घरा व्याही पाहुणा आला । ह्मणे त्याला बरें नाहीं ।
तुमचे गावीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ॥ २ ॥
उजवूं किती होतिल पोरें । मरतां बरें ह्मणे यांसी ।
ह्मणऊनि देवा नवस करी । दावी घरींहुनि बोर्णे ॥ ३ ॥
पर्वकाळीं भट घरासी आला । बोंब घाला ह्मणे पोरां ।
तुमचा उणा होईल वांटा । काळ पिठासी आला ॥ ४ ॥
दाढी करितां अडका गेला । घरांत आला वाइलेपें ।
ह्मणे आतां उगवीं मोडी । डोई बोडीं आपुली ॥ ५ ॥
तीर्थ स्वधर्मी नेणे गंगा । पूजन लिंगा गांविंचिया ।
आडकुनि दोर बैसे दारीं । आल्या घर ह्मणे ओस ॥ ६ ॥
तुका ह्मणे ऐसे आहेत गा हरी । या ही नारीं जीवांसी ।
माझ्या भय वांटे चित्तीं । नरका जाती ह्मणोनि ॥ ७ ॥

॥ १७४६ ॥

जाणे वर्तमान । परि तें न वारे त्याच्यानें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तो ही कारणांचा दास । देव ह्मणवितां पावे नास ॥ ध्रु ॥
वेची अनुष्ठान । सिद्धी कराया प्रसन्न ॥ २ ॥
तुका ह्मणे त्याचें । मुदल गेलें हाटवेचें ॥ ३ ॥

१ त. मेळविलें.—२ त. पाहुणा व्याही.—३ पं. होती.—४ त. येईल.—५ पं. पिठास आला.—६ पं. द्वार बैसे द्वारीं.

॥ १७४७ ॥

घातला दुकान । पढीये तैसा आहे वान ॥ १ ॥

॥ध्रु.॥ आह्मी भांडारी देवाचे । द्यावें घ्यावें माप वाचे ॥ ध्रु ॥

उगवूं जीर्णी मोडी । जाली नव्हे त्याची जोडी ॥ २ ॥

तुका ह्मणे पुडी । मोलें तैसी खरी कुडी ॥ ३ ॥

॥ १७४८ ॥

सादाविलें एका । सरें अवघियां लोकां ॥ १ ॥

॥ध्रु.॥ आतां आवडीचे हातीं । भेद नाहीं ये पंगती ॥ ध्रु ॥

मोकळी च पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥ २ ॥

तुका ह्मणे बरा । आहे ढेसाळ वेव्हारा ॥ ३ ॥

॥ १७४९ ॥

तडामोडी करा । परि उत्तम तें भरा ॥ १ ॥

॥ध्रु.॥ जेणें खंडे एके खेपे । जाय तेथें लाभें वोपे ॥ ध्रु ॥

दाविल्या सारिखें । मागें नसावें पारिखें ॥ २ ॥

मागें पुढें ऋण । तुका ह्मणे फिटे हीण ॥ ३ ॥

॥ १७५० ॥

नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ॥ १ ॥

॥ध्रु.॥ जाय तेथें पावे मान । चाले बोलिलें वचन ॥ ध्रु ॥

राहों नेदी बाकी । दान ज्याचें त्यासी टाकी ॥ २ ॥

होवा वाटे जना । तुका ह्मणे साटीं गुणा ॥ ३ ॥

---

१ पं. जाणें.—२ पं. मोला तैसी०.—३ त. ढीसाळ.—४ पं. ज्याचें दान.—५ पं. व्हावा.

## ॥ अनवडसिद्धाच्या शब्देंकरून रामेश्वरभटाच्या शरीरीं दाह जाला तो ज्यानें शमला तो अभंग ॥२॥

॥ १७५१ ॥

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे[1] न खाती सर्प तया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विष तें अमृत आघात[2] तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ध्रु॥
दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ २ ॥
आवडेल जीवां जीवाचिये[3] परी । सकळां अंतरीं एक भाव ॥ ३ ॥
तुका ह्मणे कृपा केली नारायणें । जाणिजेते येणें अनुभवें ॥ ४ ॥

॥ १७५२ ॥

लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मोजुंनि[4] झिजलों मापाचिया परी । जाळावी हे[5] थोरी लाभाविण ॥ ध्रु॥
कोमळ कंटक तीक्षण अगरीं । पोचट ते वरी अंगकांति ॥ २ ॥
चित्रींचें लेप शृंगारिलें निकें । जीवेंविण फिकें रूप त्याचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे दिसें वांयां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ४ ॥

॥ १७५३ ॥

बोलविसी माझें मुखें[6] । परी या जना वाटे दुःख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जया जयाची आवडी । तया लागीं तें चरफडी ॥ ध्रु ॥
कठीण देतां काढा । जल्पे रोगी मेळवी दाढा ॥ २ ॥
खाऊं नये तें चि मागे । निवारितां रडों लागे ॥ ३ ॥

---

१ पं. ही.–२ दे. अघातें हित –३ दे. जीवाचें.–४ दे. त. मजुनि.–५ पं. ते.–६ पं. मुखें.

वैद्या भीड काय । अतित्याई जीवें जाय ॥ ४ ॥
नये भिडा सांगों आन । पथ्य औषधा[1] कारण ॥ ५ ॥
धन माया पुत्र दारा । हे तों[2] आवडी नरका थारा ॥ ६ ॥
तुका ह्मणे यांत । आवडे ते करा मात ॥ ७ ॥

॥ १७५४ ॥

पतिव्रते आनंद मनीं । सिंदळ खोंचे व्यभिचारवचनीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जळो वर्म लागो आगी । शुद्धपण भलें जगीं ॥ ध्रु ॥
सुख पुराणीं आचारशीळा । दुःख वाटे अनर्गळा ॥ २ ॥
शूरा उल्हास अंगीं । गांढ्या मरण ते प्रसंगीं ॥ ३ ॥
शुद्ध सोनें उजळे अगी । हीन काळें धांवे रंगीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे तो चि हिरा । घनघायें निवडे पुरा ॥ ५ ॥

॥ १७५५ ॥

चालिती आड वाटा । आणिकां दाविती जे नीटा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न मनीं तयांचे उपकार । नाहीं जोडा तो गंव्हार ॥ ध्रु ॥
विष सेवूनि वारी मागें । प्राण जातां जेणें संगें ॥ २ ॥
बुडतां हांक[3] मारी । ठाव नाहीं आणिकां वारी ॥ ३ ॥
तुका ह्मणे न करीं हिकां[4] । गुण घेऊन अवगुण[5] टाका ॥ ४ ॥

॥ १७५६ ॥

कुळींचें दैवत ज्याचें पंढरीनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करीं भलते ठायीं दास तुझा ॥ ध्रु ॥

---

१ दे. पं. औषधाकारण.–२ त. "तों" नाहीं.–३ पं. हाका.–४ दे. हिंका.–५ त. अगुण.

पंढरीस कोणी जाती वारेकरी[1] । होईन त्यांचे घरीं पशुयाति ॥ २ ॥
विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतन त्याचे पायीं ॥ ३ ॥
तुळसीवृंदावन जयाचे अंगणीं । होइन केरसुणी त्याचे घरीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे हा चि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिका गती चाड मज ॥ ५ ॥

॥ १७५७ ॥

अवघिया चाडा कुंटित करूनि । लावीं आपुली च गोडी ।
आशा मनसा तृष्णा कल्पना । करूनियां देशधडी ।
मीतूंपणापासाव गुंतलों । मिथ्या संकल्प तो माझा तोडीं ।
तुझिये चरणीं माझे दोन्ही पक्ष । अवघी करूनि दाखवीं पिंडी रे रे[2] ॥ १ ॥
॥ध्रु.॥ माझें साच काय केलें मृगजळ । वर्णा याती कुळ अभिमान ।
कुमारी भातुकें खेळती कवतुकें । काय त्यांचें साचपण ॥ ध्रु. ॥
वेगळाल्या भावें चिंत्ता[3] तडातोडी । केलों देशधडी मायाजाळें ।
गोत वित्त माय बाप बहिणी सुत । बंधुवर्ग माझीं बाळें ।
एका एक न धरी संबंध पुरलिया । पातलिया जवळी काळें ।
जाणोनियां त्याग सर्वस्वें केला । सांभाळीं आपुलें जाळें ॥ २ ॥
एकां जवळी धरी आणिकां अंतरीं । [4]तीं काय सोयरीं नव्हतीं माझीं ।
एकांचें पाळण एकांसी भांडण । चाड कवणिये[5] काजीं ।
अधिक असे उणें कवण कवण्या गुणें । हे भाव न कळे चि तुझी ।
ह्मणोनि चिंतनीं राहिलों श्रीपती । तुका ह्मणे भाक माझी ॥ ३ ॥

॥ १७५८ ॥

आणिकां छळावया जालासी शाहाणा । स्वहिता घातलें खानें[6] ।

---

१ पं. वारकरी.–२ पं. पीडि रे रे.–३ पं चिंता.–४ पं. "तीं" नाहीं.–५ पं. कवणे ये–
६ पं. खाणें. त. खाण.

आडिके पैके करूनि सायास । कृपणें सांचलें धन ।
न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याती तयाचा गुण ।
तारुण्यदशे अधम मातला । दवडी हात पाय कान ॥ १ ॥
॥ध्रु.॥ काय जालें यांस वांयां कां ठकले । हातीं सांपडलें टाकीतसे ॥
घेउनि स्फटिकमणी टाकी चिंतामणी । नागवले आपुले इच्छे ॥ ध्रु ॥
सिद्धीं सेविलें सेविती अधम । पात्रासारिखें फळ ।
सिंपिला[१] मोतीं जन्मलें स्वाती । वरुषलें सर्वत्र जळ ।
कापुस पट नये चि कारणा । तयास पातला काळ ।
तें चि भुजंगें धरिलें कंठीं । मा[२] विष जालें त्याची गरळ ॥ २ ॥
भक्षूनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलुनि केळें ।
घालुनियां घसां अंगोळिया[३] । वांती करूं पाहे बळें ।
कुंथावयाची आवडी वोंवां[४] । उन्हवेंणी[५] रडवी बाळें ।
तुका ह्मणे जे जैसें करिती । ते पावती तैसीं च फळें ॥ ३ ॥

॥ १७५९ ॥

चंदनाचे गांवीं सर्पांची[६] वसति । भोगिती[७] ते होती द्वीपांतरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥ ध्रु ॥
क्षीराची[८] वसति अशुद्ध सेवावें । जवळी तें जावें भोगें दुरी ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरे देवा ॥ ३ ॥

---

१ पं. सिंपिला तों मोती जन्मलें स्वातीचें । वरुषलें०.–२ दे. माविश. त. मावित.– ३ दे. अंगोळिया हातें वांत करूं०.–४ पं. देवा.–५ पं. उन्हवनी.–६ दे. सर्पांच्या.–७ दे. भोगीत ते होती०. त. भोगीते ते होती०.–८ पं. क्षीराच्या.

॥ १७६० ॥

तुज दिलें आतां करीं यत्न याचा । जीवभाववाचाकायामन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भागलों दातारासीण जाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥ ध्रु ॥
नेणतां सोसिली तयाची आटणी । नव्हतां ही कोणी कांहीं माझीं ॥ २ ॥
वर्म नेणें दिशा हिंडती मोकाट । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥ ३ ॥
वेरझारीफेरा सिणलों सायासीं । आतां हृषीकेशी अंगिकारीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे मन इंद्रियांचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥ ५ ॥

॥ १७६१ ॥

स्वयें पाक करी । संशय तो चि धरी ।
संदेहसागरीं आणीक परी बुडती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाणे विरळा एक । जालें तथींचें हें सुख ।
देखिले बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥ ध्रु ॥
तो चि जाणे सांवळें । शोधी विकल्पाचीं मुळें ।
नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिले ॥ २ ॥
तो चि साधी संधी । सावध त्रिकाळ जो बुद्धी ।
संदेहाचा संधी । वेठी आणीक धरियेले ॥ ३ ॥
अखंड तें ध्यान । समबुद्धि समाधान ।
सोंग यांयांविण । ते झांकून बैसती ॥ ४ ॥
करणें जयासाटीं । जो नातुडे कवणे आटी ।

१ पं. मनें.–२ पं. मोकाट.–३ पं. वेरझारी पोरा. दे. वेरझारी फेरा.–४ पं. स्वयपाक.– ५ पं. ही.–६ दे. आणि करियेले. पं. आणीक धरियेली.

तुका ह्मणे साटीं । चित्तवित्तेंवांचूनि ॥ ५ ॥

॥ १७६२ ॥

माझिया संचिता । दृढ देखोनि बळिवंता ।
पळसी पंढरिनाथा । भेगें आतां तयाच्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरि मज कळलासी । नव्हतां भेटी जाणिवेसी ।
एक संपादिसी । मान करिसी लोकांत ॥ ध्रु ॥
तरि हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें ।
काय तुज म्यां कोडें । रे[1] सांकडें घालावें ॥ २ ॥
भोगें[2]धीपति क्रियमाण । तें तुज नांगवे आझून ।
तरि का वांयांविण । तुज म्यां सीण करावा ॥ ३ ॥
तुज नव्हतां माझें कांहीं । परि मी न संडीं भक्तिसोई ।
हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥ ४ ॥
तूं भितोसि माझिया दोषा । कांहीं मागणें ते आशा ।
तुका ह्मणे ऐसा । कांहीं न धरीं[3] संकोच ॥ ५ ॥

॥ १७६३ ॥

लोकमान देहसुख । सं[4]पत्तिउपभोग अनेक ।
विटंबना दुःख । तुझिये भेटीवांचूनि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरी मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट ।
थोरें[5] पुण्यें वीट । तुज दैवें चि लाधली ॥ ध्रु ॥
काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें मा[6]वेचें मापाडें ।

१ पं. सांकडे रे.—२ पं. भोगाधिपति.—३ पं. धरणें.—४ पं. संपत्तिभोग.—५ पं. पुण्य वीट । तुज दैव चि लाधली. ॥—६ त. मापाचें.

भेटीविण कुडें । तुझिये अवघें मज वाटे ॥ २ ॥
आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार ।
न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥ ३ ॥
रिद्धिसिद्धी काय करूं । अथवा [1]अगम्य विचारु ।
भेटीविण भारु । तुझिये वाटे मज यांचा ॥ ४ ॥
तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिया जीवें ।
तुका ह्मणे द्यावें । दरुषण पायांचें ॥ ५ ॥

॥ १७६४ ॥

तुझा ह्मणवून तुज नेणें । ऐसें काय माझें जिणें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरि मज कवणाचा आधार । करोनियां राहों धीर ॥ ध्रु ॥
काय [2]शब्दीं चि ऐकिला । भेटी [3]नव्हेतां गा विठ्ठला ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां । अभय देई पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ १७६५ ॥

उद्धवअक्रूरासी । आणीक व्यासआंबऋषी ।
[4]रुक्मांगदप्रल्हादासी । दाविलें तें दाखवीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण ।
उताविळ मन । तयाकारणें तेथें ॥ ध्रु ॥
जनकश्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी ।
विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुकें ॥ २ ॥
पांडवां अकांतीं । तेथें [6]पावसी स्मरती ।

१ पं. आगम.–२ पं. शब्द.–३ पं. नसतां.–४ दे. रुक्मांगदा.–५ पं. प्रल्हादा[illegible]
६ पं. पावती.

घातलें द्रौपदी । यागीं बिरडें चोळीचें[1] ॥ ३ ॥
करी गोपीचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख ।
दावीं तें चि मुख । दृष्टी माझ्या आपुलें ॥ ४ ॥
तरि तूं अनाथाचा दाता । मागतियां शरणागतां ।
तुका ह्मणे आतां । कोड पुरवीं हें[2] माझें ॥ ५ ॥

॥ १७६६ ॥

मागता भिकारी जालों तुझे द्वारीं । देईं मज हरी कृपादान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचरावें ह्रदयामाजी ॥ध्रु॥
सर्वभावें शरण आलों पांडुरंगा । कृपाळु तूं जगामाजी एक ॥ २ ॥
तापत्रयें[3] माझी तापविली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ॥ ३ ॥
संबंधीं जनवाद[4] पीडलों परोपरी । अंतरलों दुरी तुजसी तेणें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां तुझा शरणागत । करावें सनाथ मायबापा ॥ ५ ॥

॥ १७६७ ॥

भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न मनीं नाम न मनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासीं ॥ ध्रु ॥
नाहीं चाड देवाची कांहीं । छळणें टोंके तस्करघाई ॥ २ ॥
तुका ह्मणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शअंग ॥ ३ ॥

॥ १७६८ ॥

दिनदिन शंका वाटे । आयुष्य नेणवतां गाढें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कैसीं भुललीं बापुडीं । दंभें[5]विषयांचे सांकडीं ॥ ध्रु ॥

१ पं. चोळीस.—२ पं. "हें" नाहीं.—३ पं. तापत्रयीं.—४ पं. जनवादी.—५ दे. दंभ०. त. वंद०.

विसरलीं[1] मरण । त्याची नाहीं आठवण ॥ २ ॥
देखत देखत पाहीं । तुका ह्मणे आठव नाहीं ॥ ३ ॥

॥ १७६९ ॥

माझें मज आतां न देखें निरसतां । ह्मणऊन आधार केला ।
संसाराची आस सांडुनि लौकिक । जीव भाव तुज दिला ।
नव्हतीं माझीं कोणी मी कवणांचा । अर्थ मोहो[2] सांडवला ।
तारीं मारीं करीं भलतें दातारा । होऊन तुझा[3] आतां ठेलों[4] रे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ असो माझें कोडें तुज हें सांकडें । मी असेन निवाडें सुखरूप ।
बाळकासी चिंता काय पोटवेथा । जया शिरीं मायबाप ॥ छ ॥
पापपुण्यें श्रुति आटिल्या । शास्त्रांस न लगे चि ठाव ।
विधिनिषेधें गोविलीं पुराणें । वेदांसी तो अहंभाव ।
ओंकाराचें मूळ व्यापिलें माया । तेथें न धरे[5] च भाव ।
ह्मणऊन काबाड सांडिलें उपसतां । धरिलें तुझें चि नांव ॥ २ ॥
तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों । सर्व आशा तुझे पायीं ।
तप तीर्थ दान करवूं कवणा । हातीं अधीन तें मज काई ।
आहिक्यें परत्रें चाड नाहीं सर्वथा । जन्म सदा मज देई[6] ।
मायामोहपाश करीं विष तैसें । तुका ह्मणे माझ्याठायीं ॥ ३ ॥

॥ १७७० ॥

तुझें[7] नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळ ही ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रसना येरां रसां विटे । घेतां घोट अधिक हें ॥ छ ॥
आणिकां रसें मरण गांठी । येणें तुटी संसारें[8] ॥ २ ॥

---

१ दे. विसरला.–२ पं. मोहें सांडला.–३ पं. आतां तुझा.–४ त. ठेला रे.–५ पं. धरवे.–६ दे. देहीं.–७ पं. "तुझें" नाहीं.–८ पं. संसारा.

तुका ह्मणे आहार जाला । हा विठ्ठला[1] आह्मांसी ॥ ३ ॥

॥ १७७१ ॥

धालों सुखें ढेंकर देऊं । उमटे जेवूं तोंवरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ क्रीडा करूं निरंजनीं[2] । न पुरे धणी हरिसवें ॥ ध्रु ॥
अवघे खेळों अवघ्यामधीं । डाई न पडों ऐसी बुद्धि ॥ २ ॥
तुका ह्मणे वांचविता[3] आह्मां सत्ता समर्थ ॥ ३ ॥

॥ १७७२ ॥

एकल्या[4] नव्हे खेळ चांग । धरिला संग ह्मणऊनि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उमटे तेव्हां कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥ ध्रु ॥
दुसरा परी एक ऐसा । न वजे रिसा निकुरें ही ॥ २ ॥
तुका ह्मणे कळत्यां[5] कळे । येरें[6] खेळे खेळ ह्मण ॥ ३ ॥

॥ १७७३ ॥

बोलविलें जेणें । तो चि याचें[7] गुह्य जाणे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मी तों काबाडाचा धनी । जेवूं मागावें थिंकोनि ॥ ध्रु ॥
मजुराच्या हातें । माप[8] जालें गेलें रितें ॥ २ ॥
जाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥ ३ ॥
मायबापासवें । बाळें कौतुकें खेळावें ॥ ४ ॥
जैसा करिती धंदा । तैसा पडोनियां छंदा ॥ ५ ॥
त्याच्या साच गाई ह्मैसी । येणें खेळावें मातीशीं ॥ ६ ॥
तुका ह्मणे बोल । माझा बोलतो विठ्ठल ॥ ७ ॥

---

१ त. पं. विठ्ठल.—२ दे. त. पं. निरांजनीं —३ दे. वांचवीत.—४ पं. एकल्यानें नव्हे खे-ळ चांग । धरी संग०.— ५ त. कळे त्या कळे ।. पं. कळत्या काळें ।.— ६ पं. येरा खेळे०. त. येरां खेळ खेळ०.—७ पं. त्याचें.—८ पं. माप केलें जालें रितें.

॥ १७७४ ॥

कां हो तुह्मी[1] माझी वदविली वाणी । नेदा हे[2] निवडूनि पांडुरंगा ॥१॥
॥ ध्रु. ॥ आणीक म्यां कोणां पुसावा विचार । मुळीं[3] संवसार दुराविला ॥ ध्रु ॥
स्वामिसेवा ह्मूण घेतली पदरीं । सांगितलें करीं कारण तें ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥ ३ ॥

॥ १७७५ ॥

सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी[4] हा प्राण जाय त्याचा ॥१॥
॥ ध्रु. ॥ आणिकांचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं[5] टळों नये ॥ ध्रु ॥
समय सांभाळूनि आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥ २ ॥
तुका ह्मणे तरी ह्मणवावें सेवक । खादलें तें अन्न[6] हक होय ॥ ३ ॥

॥ १७७६ ॥

नये पुसों आज्ञा केली एकसरें । आह्मांसी दुसरें आंतां[7] नाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ज्याचे[8] तो बळिवंत सर्व निवारिता । आह्मां काय चिंता करणें लागे ॥ ध्रु ॥
बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया ॥२॥
तुका ह्मणे मज होईल वारिता । तरी काय सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥

---

१ पं. माझी तुह्मी.–२ पं. "हे" नाहीं.–३ पं. समुळीं०.–४ पं. तोंवरी.–५ त. निरोपावांचूनि.०.–६ दे. त. हाक अन्न.–७ पं. नाहीं आतां.–८ पं. ज्याचा. दे. ज्याचें.

॥ १७७७ ॥

बळिवंत आह्मी समर्थांचे दास । घातली या कास कळिकाळासी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तेथें मानसाचा[1] कोण आला पाड । उलंघोनि जड गेलों आधीं ॥ ध्रु ॥

संसाराचे बळी साधिलें निधान । मारिले दुर्जन षडवर्ग ॥ २ ॥

तुका ह्मणे एक उरला धरिता ठाव । येर केले वाव तृणवत ॥ ३ ॥

॥ १७७८ ॥

एका गावें आह्मीं विठोबाचें नाम । आणिकांपें काम नाहीं आतां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मोडूनियां वाटा सूक्षेम[2] सगर । केला राज्यभार चाले ऐसा ॥ ध्रु ॥

लावूनि मृदंग[3] टाळश्रुतिघोष[4] । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ॥ २ ॥

तुका ह्मणे महापातकी पतित । ऐसियांचें हित हेळामात्रें ॥ ३ ॥

॥ १७७९ ॥

वाचेच्या[5] चापल्यें बहु जालों कुशळ । नाहीं बीजमूळ हाता आलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणोनि पंढरिराया दुखी होतें मन । अंतरींचें कोण जाणे माझें ॥ ध्रु ॥

पूज्य जालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥ २ ॥

तुका ह्मणे खूण न[6] कळे चि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥ ३ ॥

॥ १७८० ॥

आतां काढाकाढी करीं बा पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जाणतां बैसलों दगडाचे नावे । तिंचा[7] धर्म घ्यावे प्राण हा चि ॥ ध्रु ॥

---

१ पं. माणसाचा.—२ पं. सूक्ष्म.—३ दे. त. मृदांग.— ४ पं. श्रुतिटाळघोष.— ५ दे. त. वाचाचापल्ये.—६ पं. न कळे निरुती.—७ पं. तिचा तो स्वभाव प्राण घ्यावा.

मनाचा स्वभाव इंद्रि[1]यांचे ओढी । पे[2]तनाचे जोडी वरी हांव ॥ २ ॥
तुका ह्मणे जाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावीं ॥ ३ ॥

॥ १७८१ ॥

सज्जन तो शब्द सत्य जो मानी । छळी दुर्जन आणिकांसी ॥ १॥
॥ ध्रु. ॥ एक गुण तो केलों[3] दोंठायीं । ज्याचा त्यास पा[4]हीं जैसा तैसा ॥ ध्रु ॥
भाविक[5] शब्द बोले वाणीचा । लटिका वाचा वाचाळ तो ॥ २ ॥
परउपकार घ[6]डे तो भला । नाठ्याळ तया दया नाहीं ॥ ३ ॥
जाणीवंत तो[7] पायरी जाणे । अधम तो नेणे खुंट जैसा ॥ ४ ॥
हित तें अनहित केलें कैसें । तुका ह्मणे पिसें लागलें या[8]सं ॥ ५ ॥

॥ १७८२ ॥

तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा ते चि घडी झडो माझी ॥१॥
॥ ध्रु. ॥ हें मज देई हें मज देई । आणिक दुजें कांहीं न मगें तुज ॥ध्रु॥
बाहिर कान तुझी कीर्ती नाइकतां । पाय न देखतां जात डोळे ॥ २ ॥
मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग तें चांडाळ जळो जळो ॥ ३ ॥
हातपाय तेणें पंथें न च[9]लतां । जां[10]वे ते अनंता गळोनियां ॥ ४ ॥
तुजविण जिणें नाहीं मज चाड । तुका ह्मणे गोड नाम तुझें ॥ ५ ॥

॥ १७८३ ॥

म्हणसी होऊनी निश्चिं[11]ता । हरूनियां अवघी चिंता ।

---

१ पं. इंद्रियांची.—२ पं. पतनाचो.—३ पं. केलासे दोठायीं.—४ पं. पाहिजे.—५ पं. भाविक तो शब्द.—६ पं. पडे तो चि भला.—७ पं. तो चि पायरी०.—८ पं. त्या.—९ त. पं. चालतां.—१० त. जावो तें. पं. जावो ते.—११ पं. निश्चिता.

मग जाऊं एकांता । भजन करूं ।

संसारसंभ्रमें आशा लागे पाठी । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सेकीं नाडसील नाडसील ॥ विषयसंगें अवघा नाडसील ।

मागुता पडसील भवडोहीं ॥ ध्रु ॥

शरीर सकळ माथिचा बांधा । यासी नाहीं कधीं[1] अराणूक ।

कारिती तडातोडी अंत बाह्यात्कारीं[2] । ऐसे जाती चारी दिवस वेगीं ॥२॥

मोलाची घडी जाते वांयांविण । न मिळे मोल धन देतां कोडी ।

जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका ह्मणे हाय करिसी मग ॥ ३ ॥

॥ १७८४ ॥

कनवाळू कृपाळू भक्तांलागीं मोही ।

गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई[3] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पांडुरंगे ये[4] वो पांडुरंगे ।

जीवाचे जिवलगे ये[4] वो पांडुरंगे ॥ ध्रु ॥

भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले ।

आंबऋषीकारणें जन्म दाहा घेतले ॥ २ ॥

प्रेल्हादाकारणें[5] स्तंभीं अवतार केला ।

विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ३ ॥

उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं ।

पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ॥ ४ ॥

कौरवीं[6] पांचाळी सभेमाजी आणिली ।

---

१ त. पं. कदा.—२ पं. अंतर्बाह्यात्कारी.—३ पं. विठाबाई.—४ पं. येई वो. दे. येंवो ('येईवो' याबद्दल आहे ह्मणून).— ५ पं. प्रऱ्हादाकारणें.—६ त. कौरवें.

वस्त्रहरणीं[1] वस्त्रें कैसी जाली माउली ॥ ५ ॥
दुर्वास पातला धर्मा[2] छळावया वनीं ।
धांवसी लवलाहीं शाखादेठ[3] घेऊनि ॥ ६ ॥
कृपाळू माउली भुक्तिमुक्तिभांडार ।
करीं माझा अंगीकार तुका ह्मणे विठ्ठले[4] ॥ ७ ॥

॥ १७८५ ॥

कवणा पाषाणासी धरूनि भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां ।
ह्मणऊनि निश्चित राहिलों मनीं । तूं चि सर्वां खाणीं देखोनियां ॥१॥
॥ ध्रु. ॥ कवणाचें कारण न लगे चि कांहीं । सर्वां सर्वां ठायीं तूं मज एक[5] ।
कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें काई न दिसे देवा ॥ध्रु॥
जळें जळ काय धोविलें[6] एक । कवण तें पातक हरलें तेथें ।
पापपुण्य हे[7] वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ २ ॥
पितरस्वरूपी तूं चि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य ।
तुका ह्मणे जीत पिंड तुह्मां हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥ ३ ॥

॥ १७८६ ॥

सिणलों दातारा करितां येरझारा । आतां सोडवीं संसारापासोनियां ॥१॥
॥ ध्रु. ॥ न सुटे चि बाकी नव्हे झाडापाडा । घातलोंसें खोडा हाडांचिया ॥ ध्रु ॥
मायबापें[8] माझीं जीवाचीं सांगातीं । तीं[9] देतील हातीं काळाचिया ॥२॥
पडताळूनि सुरी बैसली सेजारीं । यमफासा करीं घेऊनियां ॥ ३ ॥

---

१ त. पं. वस्त्राहरणीं.–२ पं. धर्म.–३ पं. शाखापत्र.–४ पं. विठ्ठल.–५ दे. त. सर्वांठायीं तूं एक.–६ पं. धोवियेलें.–७ त. हें.–८ पं. मायबाप.–९ पं. ते.

पाठी पोटीं एकें लागलीं सरसीं । नेती नरकापाशीं ओढूनियां ॥ ४ ॥
जन साक्षभूत[1] असे या सकळां । मी एक निराळा परदेशी ॥ ५ ॥
कोणां काकुलती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥ ६ ॥
तुका ह्मणे मज तुझाची भरवसा । ह्मणऊनि आशा मोकलिली ॥ ७ ॥

॥ १७८७ ॥

देवाचा[2] भक्त तो देवासी[3] गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची ।
कवणाचा सोइरा नव्हे च सांगाती । अवघियां हातीं अंतरला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ निष्काम वेडें ह्मणती[4] बापुडें । अवघियां[5] सांकडें जाला कैसा ।
माझें ऐसें तया न ह्मणती[6] कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥ ध्रु ॥
प्रातःस्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी ।
कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । ह्मणती या चांडाळा काय जालें ॥ २ ॥
गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती आई बाप भाऊ ।
घरीं बाइल ह्मणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ[7] मरता तरी ॥ ३ ॥
जन्मोनि[8] जाला अवघियां वेगळा । ह्मणोनि गोपाळा दुर्लभ तो ।
तुका ह्मणे जो[9] संसारा रुसला । तेणें चि टाकिला सिद्धपंथ ॥ ४ ॥

॥ १७८८ ॥

कस्तुरी भिनली जये मृत्तिके । तयेसी आणिके कैसी सरी ॥ १ ॥
लोखंडाचे अंगीं लागला परिस । तया आणिकास कैसी सरी ॥ २ ॥
तुका ह्मणे मी न वर्जें यातीवरी । पूज्यमान करीं वैष्णवांसी ॥ ३ ॥

---

१ दे. त. साहेभूत.– २ त. देवभक्त.–३ पं. देवासी च.–४ दे. ह्मणतील.–५ पं. अवघी.–६ दे. त. ह्मणत.–७दे. त. शंड. पं. षंढ.–८ पं. जन्मोनियां.–९ पं. जो या संसारा.

॥ १७८९ ॥

अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सकळां जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ ध्रु ॥
ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तें च ब्रह्म नव्हे ॥ २ ॥
काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लगतां[1] उन्मनीचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे नका पिंडाचें पाळण । स्छापूं नारायण आतुडेना ॥ ३ ॥

॥ १७९० ॥

नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितों कोपाल संत झणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगेसंगें[2] व्यापूनियां ॥ ध्रु ॥
मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥ २ ॥
राम कृष्ण हरी मुकुंदा मुरारि । बोंबडया[3] उत्तरीं हें चि ध्यान ॥ ३ ॥
तुका ह्मणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥ ४ ॥

॥ १७९१ ॥

देवासी लागे सकळांसी[4] पोसावें । आह्मां न लगे खावें काय चिंता[5] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देवा[6] विचारावें लागे पापपुण्य । आह्मासी हें जन अवघें भलें ॥ ध्रु ॥
देवासी उत्पत्ति लागला संहार । आह्मां नाहीं फार थोडें कांहीं ॥ २ ॥
देवासी काम लागला[7] धंदा । आह्मासी ते सदा रिकामीक ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ॥ ४ ॥

---

१ पं. लागतां.–२ त. पं. अगसंग.–३ दे. त. बोबडा.–४ पं. सकळां.–५ पं. आह्मां काय खावें न लगे चिंता.–६ पं. देवासी.–७ पं. लागला हा धंदा.

॥ १७९२ ॥

घेईन मी जन्म याजसाटीं देवा । तुझी चरणसेवा साधावया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हरिनामकीर्तन संतांचें पूजन । घालूं लोटांगण महाद्वारीं ॥ध्रु॥
आनंदें निर्भर असों भलते ठायीं । सुखदुःखें[1] नाहीं चाड आह्मां ॥ २ ॥
आणीक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्व भावें ॥ ३ ॥
मोक्ष आह्मां घरीं कामारी ते दासी । होय सांगों तैसी तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १७९३ ॥

देवा तुज मज पण । पाहों आगळा तो कोण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरी साच मी पतित । तूं च खोटा दिनानाथ ।
ग्वाही साधुसंत[2] जन । करूनि अंगीं लावीन ॥ ध्रु ॥
आह्मी धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छेद ॥ २ ॥
न चले तुझें कांहीं त्यास । आह्मी बळकाविले दोष ॥ ३ ॥
दिशा भरल्या माझ्या मनें । लपालासी त्याच्या भेणें ॥ ४ ॥
तुका ह्मणे चित्त । करी तुझी माझी नीत ॥ ५ ॥

॥ १७९४ ॥

लापनिकशब्दें[3] नातुडे हा देव । मनिंचे[4] गुह्य भाव शुद्ध बोला ॥ १ ॥
अंतरिंचा भेद जाणे परमानंद । जेयासी[5] संवाद करणें लागे ॥ २ ॥
तुका ह्मणे जरी आपुलें स्वहित । तरी करीं चित्त शुद्धभावें ॥ ३ ॥

॥ १७९५ ॥

नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां सिद्ध[6] । जंव हा[7] आत्मबोध नाहीं चित्तीं ॥ १ ॥

---

१ दे. पं. सुखदुःख.—२ दे. त. साधुसंत.—३ पं. त. लापणीक०.—४ पं. मनिचा.—५ पं. तयासी.—६ त. पं. बोलतां हें सिद्ध.—७ त. पं. "हा" नाहीं.

॥ ध्रु. ॥ काय करिसी वांयां लटिका चि पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ ध्रु ॥

मी च देव ऐसें[1] सांगसी[2] या लोकां । विषयांच्या सुखा टोंकोनियां ॥२॥

अमृताची गोडी पुढिलां सांगसी । आपण उपवासी मरोनियां ॥ ३ ॥

तुका ह्मणे जरि राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥ ४ ॥

॥१७९६ ॥

गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं । अवगुण तो कांहीं अमृतासी ॥ १ ॥

॥ ध्रु.॥ रवि दीप काळिमा काय जाणे हिरा । आणिकां तिमिरां नाश[3] तेणें ॥ ध्रु ॥

कर्पूरकांडणी काय कोंडा कणी । सिंधू मिळवणीं काय चाले ॥ २ ॥

परिस चिंतामणि आणिकांचा गुणी । पालटे लागोनि नव्हे तैसा ॥ ३ ॥

तुका ह्मणे तैसे जाणा संतजन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ४ ॥

॥ १७९७ ॥

परिस[4] काय धातु परिस काय धातु । फेडितो निभ्रांतु लोहपांगु ॥ १ ॥

काय[5] तयाहूनि जालासी बापुडें । फेडितां सांकडें माझें एक ॥ ध्रु ॥

कल्पतरु कोड पुरवितो रोकडा । चिंतामणि खडा चिंतिलें तें ॥ २ ॥

चंदनाच्या वासें वसतां चंदन । होती काष्ठ आन वृक्षयाती ॥ ३ ॥

काय त्याचें उणें जालें त्यासी देतां । विचारीं अनंता तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १७९८ ॥

तोडुनि पुष्पवाटिका फळवृक्षयाती । बाभळा राखती करूनि सार ॥ १ ॥

---

१ पं. ऐसा.—२ त. सांगसील.—३ दे. नासे.—४ दे. "परिस काय धातु" इतकें एकदांच आहे. पं. परिस काय धातु सोनें करितु ॥ फेडी निभ्रांतु०.—५ पं. काय वे तयाहूनि.

॥ ध्रु. ॥ कोण हित तेणें देखिलें आपुलें । आणीक पाहिलें सुख काई ॥ ध्रु ॥
धान्यें बीजें जेणें जाळिलीं सकळें । पेरितो काळें जिरें बीज ॥ २ ॥
मोडोनियां वाटा पुढिलांची सोय । आडरानें जाय घेउनि लोकां ॥ ३ ॥
विषाचें अमृत ठेवूनियां नाम । करितो अधम ब्रह्महत्या ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्यास नाइके सांगतां । तया हाल करितां पाप नाहीं ॥ ५ ॥

॥ १७९९ ॥

संसाराच्या भेणें । पळों न लाहेसें कलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जेथें तेथें आपण आहे । आह्मीं करावें तें काये ॥ ध्रु ॥
एकांतीसि ठाव । तिहीं लोकीं नाहीं वाव ॥ २ ॥
गांवा जातां ऐसें । न लगे ह्मणावें तें कैसें ॥ ३ ॥
स्वप्नाचे परी । जागा पाहे तंव घरीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे काये । तुझें घेतलें म्यां आहे ॥ ५ ॥

॥ १८०० ॥

आण काय सादर । विशीं आह्मां कां निष्ठुर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ केलें भक्त तैसें देई । तुझें प्रेम माझ्याठायीं ॥ ध्रु ॥
काय पंगतीस कोंडा । एकांतासी साकरमांडा ॥ २ ॥
काय एकपण । पोतां घालूनि गांठी खूण ॥ ३ ॥
काय द्यावें ऐसें । तया आपण अनारिसें ॥ ४ ॥
तुका ह्मणे मधीं । आतां तोडूं भेद बुद्धी ॥ ५ ॥

---

१ त. हित.—२ पं. धान्यबीज जेणें जाळिलें सकळ. । पेरितो कारळे जिरें०. त. पेरितो तें काळें.—३ पं. एकांतासी.—४ पं. आपण.—५ पं. धन.—६ पं. तैसें.—७ पं. संधी.

॥ १८०१ ॥

चित्त तुझ्या पायीं । ठेवुनि[1] जालों उतराई ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥ ध्रु ॥

आह्मी सर्वस्वें उदार । तुज देऊंनियां धीर ॥ २ ॥

इंद्रियांची होळी । संवसार दिला बळी ॥ ३ ॥

न पडे विसर । तुझा आह्मां निरंतर ॥ ४ ॥

प्रेम एकासाटीं । तुका ह्मणे न वेचे[2] गांठी ॥ ५ ॥

॥ १८०२ ॥

आह्मी पतित ह्मणोनि तुज आलों शरण । करितों चिंतन दिवस रात्रीं ॥

नाहीं तरी मज काय होती चाड । धरावया भीड तुज चित्तीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आह्मां न तारावें तुह्मी काय करावें । सांगीजोजी[3] भावें नारायणा ॥ ध्रु ॥

अन्याय एकाचा अंगीकार करणें । तया हातीं देणें लाज ते चि ।

काय तें शूरत्व मिरवूनि बोलणें । जनामाजी दावणें बळरया ॥ २ ॥

पोह्या अन्नछत्र[4] घालूनियां घरीं । दंडितो बाहेरी आलियासी ।

नव्हे कीर्त[5] कांहीं न मानें[6] लोकां । काय विटंबणा तैसी[7] ॥ ३ ॥

प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण[8] । पाहातां दर्पण साक्ष काई ।

तुका ह्मणे तरी आह्मां कां न कळे । तरलों[9] किंवा आह्मी नाहीं ॥ ४ ॥

॥ १८०३ ॥

काग बग रिठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥ १ ॥

---

१ पं. देऊनि वेव्हार.—२ पं. वजे.—३ सांगीजे जी.—४ पं. ०अन्नसत्र० दंडी जो बाहेरी०.—५ पं. कीर्ति.—६ पं. माने चि लोकां.—७ पं. तैसी तैसी.—८ त. द्यावें तें प्रमाण. पं. द्यावें गा प्रमाण.—९ पं. तरलों अथवा किंवा आह्मी नाहीं.

॥ ध्रु. ॥ तो मज दावा तो मज दावा । नंदानंदन जीवा आवडे तो[1] ॥ ध्रु ॥
गोवर्धन गिरी उचलिला करीं । गोकुळ[2] भीतरी राखियेलें ॥ २ ॥
वधुनि भौमासुरा आणिल्या गोपांगना । राज्य उग्रसेना मथुरेचें ॥ ३ ॥
पांडव जोहरीं राखिले कुसरी । विवराभीतरीं चालविले ॥ ४ ॥
तुका ह्मणे हा भक्तांचा कृपाळ । दुष्टजना काळ नारायण ॥ ५ ॥

॥ १८०४ ॥

तुजविण देवा । कोणा ह्मणे माझी जिव्हा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरि हे हो कां शतखंड । पडो झडोनियां रांड ॥ ध्रु ॥
कांहीं इच्छेसाटीं । करिल[3] वळवळ करंटी ॥ २ ॥
तुका ह्मणे कर । कटीं तयाचा विसर ॥ ३ ॥

॥ १८०५ ॥

आह्मां सर्वभावें[4] हें चि काम । न विसंभावें तुझें नाम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न लगे करावी हे चिंता । तरणें करणें काय आतां ॥ ध्रु ॥
आसनीं भोजनीं[5] शयनीं । दुजें नाहीं ध्यानीं मनीं ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपानिधी । माझी तोडिली उपाधी ॥ ३ ॥

॥ १८०६ ॥

नव्हें कांहीं कवणाचा । भाव जाणवला साचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणोनि तुझ्या पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ ध्रु ॥
शरीर जायाचें कोंपट । याची काय खटपट ॥ २ ॥
तुका ह्मणे वांयांविण । देवा कळों आला सीण ॥ ३ ॥

---

१ त. पं. आवडतो.—२ त. गोकुळा.—३ त. करी.—४ पं. "सर्वभावें" याबद्दल "सर्व".—
५ पं. "भोजनीं" नाहीं

॥ १८०७ ॥

रज्जु धरूनियां हातीं । भेडसाविलीं नेणतीं ।
कळों येतां चित्तीं । दोरी दोघां सारिखी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मांआह्मांमध्यें हरी । जाली होती तैसी[1] परी ।
मृगजळाच्या पुरीं । ठाव पाहों तरावया ॥ ध्रु. ॥
सरीं चिंताक[2] भोंवरी । अळंकाराचिया परी ।
नामें जालीं दुरी । एक सोनें आटितां ॥ २ ॥
पिसांचीं पारवीं । करोनि बाजागिरी दावी ।
तुका ह्मणे तेवीं । मज नको चाळवूं ॥ ३ ॥

॥ १८०८ ॥

नेघें तुझें नाम । न करीं सांगितलें काम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वाढे[3] वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥ ध्रु. ॥
आतां तुझ्या घरा । कोण करी येरझारा ॥ २ ॥
तुका ह्मणे ठायीं । मजपाशीं काय नाहीं ॥ ३ ॥

॥ १८०९ ॥

व्यवहार तो खोटा । आतां न वजों तुझ्या वाटा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एका नामा नाहीं ताळ[4] । केली सहस्रांची माळ[5] ॥ ध्रु. ॥
पाहों जातां घाई । खेळसी[6] लंपडाई ॥ २ ॥
तुका ह्मणे चार । बहु करितोसी फार ॥ ३ ॥

---

१ त. ऐसी.—२ त. चितांक.—३ पं. वाटे.—४ पं. ताळा.—५ पं. माळा.—६ पं. खेळसील. त. "खेळसी तूं."

॥ १८१० ॥

लटिका चि केला । सोंग पसारा दाविला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अवघा बुडालासी ऋणें । बहुतांचें देणें[1] घेणें ॥ ध्रु ॥

लाविये[2]लीं चाळा । बहु दावूनि पुतळा ॥ २ ॥

तुका ह्मणे हात । आह्मी अवरिली मात ॥ ३ ॥

॥ १८११ ॥

दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ थोंटा झोडा शिरोमणी । भेटलासी नागवणी ॥ ध्रु ॥

सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी थार ॥ २ ॥

तुका ह्मणे काय । तुझें घ्यावें उरे हाय ॥ ३ ॥

॥ १८१२ ॥

लाज ना विचार । बाजारी तूं[3] भांडखोर ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसें ज्याणें व्हावें । त्याची गांठी तुजसवें ॥ ध्रु ॥

फेडिसी[4] लंगोटी । घेसी सकळांसी तुटी ॥ २ ॥

तुका ह्मणे चोरा । तुला आप ना दुसरा ॥ ३ ॥

॥ १८१३ ॥

ठाव नाहीं बुड । घरें वसविसी[5] कुड ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भलते ठायीं तुझा वास । सदा एरवी उदास ॥ ध्रु ॥

जागा नां[6] निजेला । धाला ना भुकेला ॥ २ ॥

न पुसतां भलें । तुका ह्मणे बुझें बोलें ॥ ३ ॥

---

१ पं. घेणें देणें.—२ पं. "लावियेलीं" येथपासून तों पुढील अभंगांत "भेटलासी नागवणी" येथपर्यंत ग्रंथ मुळींच नाहीं.—३ पं. तो.—४ पं. फेडी.—५ पं. वसविली.—६ पं. चि.

॥ १८१४ ॥

श्वाना दिली सवें । पायांभोंवतें तें भोंवे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसी जाली मज परी । वसे निकट सेजारीं ॥ ध्रु ॥
जेवितां जवळी । येऊनियां पुच्छ घोळी ॥ २ ॥
कोपेल तो धनी । तुका ह्मणे नेणें मनीं ॥ ३ ॥

॥ १८१५ ॥

वटवट केली । न विचारितां मना आली ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मज कराल तें क्षमा । कैसें नेणों पुरुषोत्तमा ॥ ध्रु ॥
उचित न कळे । जिव्हा भलतें चि बरळे ॥ २ ॥
तुका ह्मणे कांहीं । लौकिकाची चाड नाहीं ॥ ३ ॥

॥ १८१६ ॥

जीवें व्हावें साटी । पडे संवसारें तुटी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐशीं बोलिलों वचनें । सवें घेउनि नारायण ॥ ध्रु ॥ [३]
नाहीं जन्मा आलों । करील ऐसें नेदीं बोलों ॥ २ ॥
ठाव पुसी सेणें[४] । तुका ह्मणे खुंटी येणें ॥ ३ ॥

॥ १८१७ ॥

आतां पंढरीराया । माझ्या निरसावें भया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मनीं राहिली आशंका । स्वामिभयाची सेवका ॥ ध्रु ॥
ठेवा माथां हात । कांहीं बोला अभयमात ॥ २ ॥
तुका ह्मणे लाडें । खेळें ऐसें करा पुढें ॥ ३ ॥

---

१.–दे. त. पुंस.–२ पं. तुका ह्मणे धणी । कोपले हें मना नाणी ।.–३ पं. “येणें नाहीं जाणें । केलें कोणा न मागणें ॥” हें कडवें जास्त आहे.–४ पं. येणें.–५ त. पं. स्वामी भयाची.

॥ १८१८ ॥

कवतुकवाणें । बोलों बोबड्या वचनें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हें तों नसावें अंतरीं । आह्मां धरायाचें दुरी ॥ ध्रु ॥

स्तुति तैसी निंदा । माना सम[2] चि गोविंदा ॥ २ ॥

तुका ह्मणे बोलें । मज तुह्मीं शिकविलें ॥ ३ ॥

॥ १८१९ ॥

असो मागें जालें । पुढें गोड तें चांगलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां[1] माझे मनीं । कांहीं अपराध न मनीं ॥ ध्रु ॥

नेदीं अवसान । करितां[3] नामाचें चिंतन ॥ २ ॥

तुका ह्मणे बोलें । तुज आधीं च गोविलें ॥ ३ ॥

॥ १८२० ॥

मातेविण बाळा । आणीक न माने सोहळा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तैसें जालें माझ्या चित्ता । तुजविण पंढरिनाथा ॥ ध्रु ॥

वाट पाहे मेघा बिंदु । नेघे चातक सरिता सिंधू ॥ २ ॥

सारसांसी निशीं । ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥ ३ ॥

जीवनाविण[4] मत्स्य । जैसें धेनूलागीं वत्स ॥ ४ ॥

पतिव्रते जिणें । भ्रताराच्या वर्त्तमानें ॥ ५ ॥

कृपणाचें धन । लोभालागीं जैसें मन ॥ ६ ॥

तुका ह्मणे काय । तुजविण प्राण राहे ॥ ७ ॥

---

१ पं. आतां.–२ पं. "सम चि" याबदल "समान".–३ पं. करीं.–४ पं. जीवनालागीं.

॥ १८२१ ॥

तुजऐसा कोणी न देखें उदार । अभयदानशूर पांडुरंगा ॥ १ ॥
॥ध्रु.॥ शरण येती त्यांचे न विचारिसी दोष । न मागतां त्यांस अढळ देसी॥
॥ ध्रु ॥
धांवसी आडणी ऐकोनियां धांवा । कइवारें देवा भक्तांचिया ॥ २ ॥
दोष त्यांचे जाळी कल्पकोटिवरी । नामासाटीं हरि आपुलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज वाणूं कैशा परी । एक मुख हरी आयुष्य थोडें ॥ ४ ॥

॥ १८२२ ॥

काय तुझे उपकार पांडुरंगा । सांगों मी या जगामाजी आतां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जतन हें माझें करूनि संचित । दिलें अवचित आणूनियां ।
॥ ध्रु ॥
वडल्या दोषांचे न घली च भरी । आली यास थोरी कृपा देवा ॥ २ ॥
नव्हतें ठाउकें आइकिलें नाहीं । न मगतां पाहीं दान दिलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे याच्या उपकारासाटीं । नाहीं माझे गांठी कांहीं एक ॥ ४ ॥

॥ १८२३ ॥

बाळूनियां जन सांडी मज दुरी । करिसिलि हरी ऐसें कधीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥
॥ ध्रु ॥
नावडती जिवा आणीक प्रकार । आवडी ते फार एकांताची ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसी धरितों वासना । होईं नारायणा साह्य मज ॥ ३ ॥

---

१ पं. धांवसील.--२ पं. दोषांची.--३ पं. मागतां.

॥ १८२४ ॥

सांगतों या मना तें माझें नाइके । घातावरी टेंके चांडाळ हें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि पाहे तरतें बुडतें । न लोहे पुरतें बळ करूं ॥ ध्रु. ॥
काय तें संचित न कळे पाहातां । मतिमंदचिंत्ता उपजतें ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पाहोनियां वेगीं पार टाकीं ॥ ३ ॥

॥ १८२५ ॥

आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाईच्या ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आचरावे दोष हें आह्मां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥ ध्रु. ॥
आह्मी तों आपुलें केलेंसें जतन । घडो तुह्मांकून घडेल तें ॥ २ ॥
तुका ह्मणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ३ ॥

॥ १८२६ ॥

मुखें बोलावें तें जीविंचें जाणसी । विदित पायांपाशीं सर्व आहे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां हें चि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणां तुह्मी त्याचा ॥ ध्रु. ॥
आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वांहीं पडों नये ॥ २ ॥
तुका ह्मणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ३ ॥

॥ १८२७ ॥

कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नवल हे लीळा करित्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥ ध्रु. ॥

---

१ पं. तें.–२ दे. त. ल्हाये.–३ पं. चिंता.–४ पं. तुह्मांकडून .–५ पं. याचा.–६ दे. त. साधनाचा.–७ पं. तृणवत्.–८ दे. करात्याचें. पं. करत्याचें.

लोभालोभ एका धनाचिये ठायीं। आणिकांची सोई चाड नाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भूक न विचारी प्रकार । योजे [1]तें चि सार यथाकाळें ॥ ३॥

॥ १८२८ ॥

बांधे सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोविती आपणां बळें ॥ १॥
॥ ध्रु. ॥ भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भाव पालटिला ॥ ध्रु ॥
घरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई घेऊनि फोडी ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा गेलीं विसरोन । आतां वर्म कोण दावी यांसी ॥ ३ ॥

॥ १८२९ ॥

कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ध्रु ॥
[2]कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ २ ॥
कवण तें रूप कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ३ ॥
सर्वां ठायीं तूं चि सर्व ही जालासी । तुका ह्मणे यासी दुजें नव्हे ॥ ४ ॥

॥ १८३० ॥

जेथें देखें तेथें तुझीं च पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें ।
रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें ।
[3]जातां लोटांगणीं अवघी च मेदिनी । सकळ देव पाट जाले ।
सदा पर्वकाळ सुदिन सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥ १ ॥

१ पं. "तें चि" याबदल "तें तें".—२ पं. कवण भोगविता कवण भोगता ।.—३ पं. जातों.

॥ ध्रु. ॥ अवघा आह्मां तूं च जालासी देवा । संसार हेवा कामधंदा ।
न लगे जाणें कोठें कांहीं च करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥ ध्रु ॥
वाचा बोले ते तुझे चि गुणवाद । मंत्रजप कथा स्तुति ।
भोजन सारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती ।
चालतां [1]प्रदक्षिण निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रति ।
देखोन दृष्टी परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मूर्ति ॥ २ ॥
जाल्या तीर्थरूप बावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें ।
महाल मंदिरें माडया तनघरें । झोपडया अवघीं देव देवाइलें ।
ऐकें कानीं त्या हरिनामध्वनी । नाना शब्द [2]होतें जाले ।
तुका [3]ह्मणे या विठोबाचे दास । सदा प्रेमसुखें [4]धाले ॥ ३ ॥

॥ १८३१ ॥

जे दोष घडले न फिटे करितां कांहीं । सरते तुझ्या पायीं जाले तैसे ।
॥ध्रु.॥ माझा कां हो करूं नये अंगीकार ।जालेती निष्ठुर पांडुरंगा ॥ध्रु॥
यातिहीन नये ऐकों ज्यां वेद । तयां दिलें पद वैकुंठीचें ॥ २ ॥
तुका ह्मणे कां रे एकांचा आभार । घेसी माथां भार वाहोनियां ॥ ३ ॥

॥ १८३२ ॥

हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणोनि हिंडे मागें मागें । घरटी जागे घालितसे ॥ ध्रु ॥
निर्लज्ज भोजें [5]नाचतें रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचें ॥ २ ॥
तुका ह्मणे विकलें देवें । आपण भावें [6]संवसाटीं ॥ ३ ॥

---

१ दे. पं. प्रदक्षणा.–२ पं. होते.–३ पं. ह्मणे आह्मी या०.–४ पं. धालों.–५ पं. नाचे.
–६ पं. समसाटीं.

॥ १८३३ ॥

साधन संपत्ति हें चि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ शीतळ हा पंथ माहेराची वाट । जवळी च नीट सुखरूप ॥ ध्रु॥

वैष्णवांचा संग रा[1]मनाम गाणें । मंडित भू[2]षणें अळंकार ॥ २ ॥

भवनदी आड नव्हतीसी जाली । को[3]रडी च चाली जावें पायीं ॥ ३ ॥

मा[4]यबाप दोघे पाहातील वाट । ठेवूनियां कटीं कर उभीं ॥ ४ ॥

तुका ह्मणे केव्हां देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥ ५ ॥

॥ १८३४ ॥

यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी ।

वेदश्रुति तुज नेणती कोणी । चोवीस ठेंगणीं धांडोळितां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां मज क्षमा क[5]रावें देवा । सलगी ते केशवा बोलियेलों ॥ ध्रु॥

सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार । न कळे हा पार वेदां श्रुतीं ।

तो[6] आम्ही भावें केलासी लहान । ठेवूनियां नांवें पाचारितों ॥ २ ॥

सहस्रमुखें शेष सीणला स्तवितां । पार न कळतां ब्रह्मा ठेला ।

तेथें माझी देहबुद्धि तें काई । थोर मी अन्यायी तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १८३५ ॥

कृ[7]ष्ण गातां गीतीं कृष्ण ध्यातां चित्तीं । ते ही कृष्ण होती कृष्णध्यानें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । ह्मणा रे भो[8]गिता नारायण ॥ ध्रु॥

ओवियें दळणीं गावा नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥ २ ॥

नर नारी याति हो कोणी भलतीं । भावें ऐ[9]का प्रीती नारायणा ॥ ३ ॥

---

१ दे. रामगाणें।.—२ दे. भूषण.—३ पं. कोरडे.—४ पं. मायबापें.—५ पं. करावें तें देवा । सलगी केशवा०.—६ पं. केलासी लहान तो तूं आला भावें.—७ पं. कृष्णध्यातां चित्तीं कृष्ण गातां गीतीं ।—८ पं. भोक्ता.—९ त. एका प्रति.

तुका ह्मणे एका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप एक ॥ ४ ॥

॥ १८३६ ॥

डोळियां पाझर कंठ माझा दाटे[1] । येऊं देईं भेटे[2] पांडुरंगे[3] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बहु दिस टाकिलें निरास कां केलें । कोठें वो गुंतलें चित्त तुझें ॥ ध्रु. ॥
बहु धंदा तुज नाहीं वो आठव । राहिलासे जीव माझा कंठीं ॥ २ ॥
पंढरीस जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं धाडीं ॥ ३ ॥
तुजविण कोण सांवा धांवा करी । ये वो झडकरी पांडुरंगे[3] ॥ ४ ॥
काय तुझी वाट पाहों कोठवरी । कृपाळु[4] कांपरी विसरलासी ॥ ५ ॥
एक वेळ[5] माझा धरूनि आठव । तुका ह्मणे ये वो न्यावयासी ॥ ६ ॥

॥ १८३७ ॥

अधिक कोंडितां चरफडी । भलतीकडे घाली उडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय करूं या मना आतां । कां विसरतें[6] पंढरिनाथा ।
करी संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती ॥ ध्रु. ॥
भजन नावडे श्रवण । धांवे विषय अवलोकून ॥ २ ॥
बहुत चंचळ चपळ । जातां येतां न लगे वेळ ॥ ३ ॥
किती राखों दोनी काळ । निजलिया जागे वेळ[7] ॥ ४ ॥
मज राखें आतां । तुका ह्मणे पंढरिनाथा ॥ ५ ॥

॥ १८३८ ॥

कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ॥ १ ॥

---

१ पं. दाटी.–२ पं. भेटी.–३ पं. पांडुरंगा.–४ पं. कृपाळुवा हरी विसरलासी. त. कृपाळुवा परी.०–५ पं. वेळे–६ दे. त. विसरातें.–७. दे. वेळे.

॥ ध्रु. ॥ करीं यापरी स्वहित । विचारूनि धर्म नीत ॥ ध्रु ॥

देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥ २ ॥

विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ॥ ३ ॥

हत्या क्षत्र[1]धर्म । नव्हे निष्काम तें कर्म ॥ ४ ॥

तुका ह्मणे संतीं । करूनि ठेविली आइती ॥ ५ ॥

॥ १८३९ ॥

पडोनियां राहीं । उगा च संतांचिये पायीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ न लगे [2]पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करीं भावें ॥ ध्रु ॥

सहज ते स्थिति । उपदेश पर[3]युक्ति ॥ २ ॥

तुका ह्मणे भाव । जवळी धरूनि आणी देव ॥ ३ ॥

॥ १८४० ॥

देवाचे घरीं देवें केली चोरी । देवें देव नागवूनि केला भिकारी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धांवणियां धांवा धावणियां धांवा । माग चि नाहीं जावें कवणिया गांवा ॥ ध्रु ॥

सवें चि होता चोर घरिचिया घरीं । फावलियावरी केलें अवघें वाटोळें ॥ २ ॥

तुका ह्मणे येथें कोणी च नाहीं । नागवलें कोण गेलें कोणाचें काई ॥ ३ ॥

॥ १८४१ ॥

[4]अवघे चि निजों नका अवघिये ठायीं ।
वेळ अवेळ तरी सांभाळावी कांहीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जतन करा रे जतन करा ।
घालूं पाहे घरावरी घाला चोरटें ॥ ध्रु ॥

---

१ त. क्षेत्रधर्म.–२ त. पुसावें.–३ दे. परवृत्ति.–४ पं. "अवघे० कांहीं" ह्या दोन ओळी "जतन० चोरटें" ह्या दोन ओळींच्या पुढें आहेत.

सीतरिलीं[1] फार खाती भोंवताले फेरे ।
गेलें नये हातां सेकीं[2] तळमळ उरे ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी करूं आपलें जतन ।
न लगे कांहीं कोणां द्यावें उघडा रे कान ॥ ३ ॥

॥ १८४२ ॥

काळोखी खाऊन कैवाड केला धीर ।
आपुलिया हितें जालें[3] जनामध्यें शूर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कां रे तुह्मी नेणां कां रे तुह्मी नेणां ।
अल्पसुखासाटीं पडशी विपत्तीचे घाणां ॥ ध्रु ॥
नाहीं ऐसी लाज काय तयांपें आगळें ।
काय नव्हे केलें आपुलिया बळें ॥ २ ॥
तुका ह्मणे तरी सुख अवघें चि बरें ।
जतन करून हीं[4] आपुलालीं ढोरें ॥ ३ ॥

॥ १८४३ ॥

जाय परतें काय आणिला कांटाळा । बोला एक वेळा ऐसें तरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कां हो केलें[5] तुह्मी निष्ठुर देवा । मानेना हे सेवा करितों ते ॥ ध्रु ॥
भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ॥ २ ॥[6]
तुका ह्मणे तुह्मापासूनि अंतर । न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ३ ॥

---

१ पं. सींतरीली० भोंवताली.—२ पं. सेखी.—३ पं. जालों.—४ दे. हें आपुलालीं०. पं. हे आपुलीं०.—५ पं. कां हो तुह्मीं केली निष्ठुरता देवा. त. कां हो केलें तुह्मी निष्ठुर हे देवा.—६ पं. "तुज ऐसा स्वामी असोनि मस्तकीं । होतसे या चुकी संचिताची ॥" हें कडवें जास्त आहे.

॥ १८४४ ॥

अनुभवें कळों येतें पांडुरंगा । हसावें तें कां गा तुह्मांवरी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आवरितां चित्त नावरे दुर्जन । घात करी मन माझें मज ॥ध्रु॥

अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार । ह्मणोनि अंतर तुझ्या पायीं ॥ २ ॥

तुका ह्मणे काय करूं नेणें वर्म[1] । आलें तैसें कर्म सोसूं पुढें ॥ ३ ॥

॥ १८४५ ॥

तुजकरितां होतें आनाचें आन । तारिले पाषाण उदकीं देवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कां नये कैवार करूं अंगीकार । माझा बहु भार जडे[2] जाला ॥ ध्रु ॥

चुकलासी ह्मणों तरी जीवांचा ही जीव । रिता नाहीं ठाव उरों दिला ॥ २ ॥

तुका ह्मणे ऐसें[3] काय सत्ताबळ । माझें[4] परी कृपाळ आहां तुह्मी ॥ ३ ॥

॥ १८४६ ॥

फळ देंठींहून झडे । मग मागुतें[5] न जोडे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणोनि तांतडी[6] खोटी । कारण उचिताचे पोटीं ॥ ध्रु ॥

पुढें चढे हात । त्याग मागिलां उचित ॥ २ ॥

तुका ह्मणे रणीं । नये पाहों परतोनि ॥ ३ ॥

॥ १८४७ ॥

अगी देखोनियां सती । अंगीं रोमांच उठती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हा तो नव्हे उपदेश । सुख अंतरीं उल्हास[7] ॥ ध्रु ॥

वित्तगोतांकडे । चित्त न घाली न रडे ॥ २ ॥

आठवूनि एका । उडी घाली म्हणे तुका ॥ ३ ॥

---

१ पं. वर्म.—२ दे. चढ.—३ पं. काय ऐसें.—४ दे. पं. माझे.—५ पं. मागुती न जडे.—६ पं. तातडी.—७ दे. त. उल्हासे.

॥ १८४८ ॥

फळ पिके देंठीं[1] । निमित्य वारियाची भेटी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हा तों अनुभव रोकडा ॥ कळों येतो खरा कुडा ॥ ध्रु ॥
तोडिलिया बळें । वांयां जाती कांचीं फळें ॥ २ ॥
तुका म्हणे मन । तेथें[2] आपुलें कारण ॥ ३ ॥

॥ १८४९ ॥

हालवूनि खुंट । आधीं करावा बळकट ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मग तयाच्या आधारें । करणें[3] अवघें चि बरें ॥ ध्रु ॥
सुख दुःख साहे । हर्षामर्षीं[4] भंगा नये ॥ २ ॥
तुका म्हणे जीवें । आधीं मरोनि राहावें ॥ ३ ॥

॥ १८५० ॥

धांवे माते सोई । बाळ न विचारितां[5] कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मग त्याचें जाणें निकें । अंग वोडवी कौतुकें ॥ ध्रु ॥
नेणे सर्प दोरी । अग्नी भलतें हातीं धरी ॥ २ ॥
[6]तीविणें तें नेणे । आणीक कांहीं तुका म्हणे ॥ ३ ॥

॥ १८५१ ॥

भोग द्यावे देवा । त्याग भोगीं च बरवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ॥ ध्रु ॥
योजे यथाकाळें । उत्तम पाला कंदें[7] मूळें ॥ २ ॥
[8]वंचक त्यासी दोष । तुका ह्मणे मिथ्या सोस ॥ ३ ॥

---

१ पं. देटीं । निमित्य वारियाचे०.–२ पं. सकळ.–३ पं. करणें तें अवघें बरें.– ४ पं. हर्षामर्ष.–५ पं. विचारी.–६ दे. तीविन. त. तीविण.–७. पं. कंदमुळें.–८ पं. वंचकासी दोष.

॥ १८५२ ॥

पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ॥ ध्रु ॥

नव्हे हा उपदेश । तुमचें बडबडिलों शेष ॥ २ ॥

तुमचे कृपेचें पोषणें[1] । जन्मोजन्मीं तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १८५३ ॥

जायांचें अंगुलें लेतां[2] नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविलें ॥ १ ॥

घुंसाळितां[3] ताक कांडितां[4] भूस । साध्य नाहीं क्लेश जाती वांयां ॥ २ ॥

तुका ह्मणे नाहीं स्वता भांडवल । भिकेचें तें फोल बीज नव्हे ॥ ३ ॥

॥ १८५४ ॥

न बोलावें परी पडिला प्रसंग । हाकलितें जग तुझ्या नामें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ लटिकें चि सोंग मांडिला पसारा । भिकारी तूं खरा कळों आलें ॥ ध्रु ॥

निलाजिरीं आह्मी करोनियां धीर । राहिलों आधार धरूनियां ॥ २ ॥

कैसा नेणों[5] आतां कारिसी शेवट । केली कटकट त्याची पुढें ॥ ३ ॥

तुका ह्मणे कांहीं न बोलसी देवा । उचित हे सेवा घेसी माझी ॥ ४ ॥

॥ १८५५ ॥

नाहीं जालें मोल कळे देतां काळीं । कोण पाहों बळी दोघांमध्यें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आह्मी तरी जालों जीवासी उदार । कैंचा हा धीर तुजपाशीं ॥ ध्रु ॥

बहु चाळाविलें मागें आजिवरी । आतां पुढें हरी जाऊं नेदीं ॥ २ ॥

---

१ दे. पं. पोसणें.—२ पं. लेव.—३ दे. गुसळितां.—४ पं. कांडितां पै भूस.—५पं. नेणें.

नव्हती जों भेटी नामाची ओळखी । ह्मणऊनि दुःखी बहु जालों ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं राहों नेदीं बाकी । एकवेळा चुकी जाली आतां ॥ ४ ॥

॥ १८५६ ॥

कैसा कृपाळु हें[2] न कळसी देवा । न बोलसी सेवा घेसी माझी ॥ १ ॥
॥ध्रु.॥ काय ऐसें बळ आहे तुजपाशीं । पाहों[3] हा[4] रिघसी कोण आड ॥ ध्रु ॥
पाडियेला ठायीं तुझा थारा मारा । अवघा दातारा लपसी तो ॥ २ ॥
आतां तुह्मां आह्मां उरी तों चि बरें । काय[5] हीं उत्तरें वाढवूनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज साह्य जाले संत । ह्मणऊनि मात फावली हे ॥ ४ ॥

॥ १८५७ ॥

चुकालिया आह्मां करितसां दंड । हाकासी कां खंड पांडुरंगा ॥ १ ॥
चाळविलीं[6] एकें रिद्धिसिद्धीवरी । तैसा मी भिकारी नव्हें देवा ॥ ध्रु ॥
कां मी येथें गुंतों मांडूनि पसारा । मागुता दातारा दंभासाटीं ॥ २ ॥
केलें म्यां जतन आपुलें वचन । ठायींचें धरून होतों पोटीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे ताळा घातला आंडाखीं[7] । ठावें होतें सेकीं आडविसी ॥४॥

॥ १८५८ ॥

कृपावंता कोप न धरावा चित्तीं । छळूं वक्रोक्ती स्तुती करूं ॥ १ ॥
॥ धु. ॥ आह्मी तुझा पार काय जाणों देवा । नेणों कैसी सेवा करावी ते ॥ ध्रु ॥
अनंता अरूपा अलक्षा अच्युता । निर्गुणा सं[8]चिता सर्वोतमा ॥ २ ॥

१. दे. जालें.—२ पं. "हें" नाहीं.—३ पं. पाहों हरी घेसी कोण आड.—४ दे. रिघेसी.—५ दे. हें. पं. तें.—६ पं. चाळविले एक रिद्धी वारी.—७ दे. आडांखीं.—८ पं. सच्चिदा नारायणा. दे. त. सचिता.

चांगलीं हीं नामें घेतलीं ठेवून । जालासी लाहान भक्तिकाजा[1] ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझ्या पायांवरी सदा । मस्तक गोविंदा असो माझा ॥ ४ ॥

॥ १८५९ ॥

आतां तुझा भाव कळों आला देवा । ठकूनियां[2] सेवा घेसी माझी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ टाकूनि सांकडें आपुलिये माथां । घातला या संतावरी भार ॥धृ॥
स्तुती करवूनि पिटिला डांगोरा । तें[3] कोण दातारा साच करी ॥ २ ॥
जातीचें वाणी मी[4] पोटींचें कुडें । नका मजपुढें ठकाठकी ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं आलें अनुभवा । आधीं च मी देवा कैसें[5] नाचों ॥ ४ ॥

॥ १८६० ॥

जन पूजी याचा मज कां आभार । हा तुह्मी विचार जाणां देवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पत्र कोण मानी वंदितील सिक्का । गौरव सेवका त्यां[6] चि मुळें ॥ धृ ॥
मी मीपणें होतों जनामधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥ २ ॥
आतां तूं भोगिता सर्व नारायणा । नको आह्मां दीनां पीडा करूं ॥ ३ ॥
आपुलिया हातें देसील मुशारा । तुका ह्मणे खरा तो चि आह्मां ॥ ४ ॥

॥ १८६१ ॥

आमची कां नये तुह्मासी करुणा । किती नारायणा आळवावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय जाणां तुह्मी दुर्बळाचें जिणें । वैभवाच्या गुणें आपुलिया ॥ धृ ॥
देती घेती करिती खटपटा आणिकें । निराळा कौतुकें पाहोनियां ॥ २ ॥

---

१ त. भक्तिकाजीं.—२ पं. करूनियां.—३ पं. तो.—४ पं. असें.—५ पं. कैसा.—६. पं. या.

दिवस बोटीं आह्मीं धरियेलें माप । वाहातों संकल्प स्वहिताचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे मग देसी कोण्या काळें । चुकुर दुर्बळें होतों आह्मी ॥ ४ ॥

॥ १८६२ ॥

तुह्मां[1] आह्मां तुटी होईल यावरी । ऐसें मज हरी दिसतसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥ ध्रु ॥
सारिलें संचित होतें गांठी कांहीं । पुढें ऋण तें ही नेदी कोणी ॥ २ ॥
जावें चि न लगे कोणांचिया घरा । उडाला पातेरा तुझ्या संगें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां हा चि लाभ जाला । मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १८६३ ॥

देव मजुर देव मजुर । नाहीं उजुर सेवेपुढें ॥ १ ॥
देव गांढ्याळ देव गांढ्याळ । देखोनियां बळ लपतसे[2] ॥ २ ॥
देव तर काई देव तर काई । तुका ह्मणे राई तरी[3] मोटी ॥ ३ ॥

॥ १८६४ ॥

देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥ १ ॥
देव उदार देव उदार । थोड्यासाटीं[4] फार देऊं जाणे ॥ २ ॥
देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥ ३ ॥

॥ १८६५ ॥

देव बासर देव बासर । असे निरंतर जेथें तेथें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव खोळंबा देव खोळंबा । मज झळंबा म्हूण कोंडी ॥ ध्रु ॥

---

१ पं. आह्मा तुह्मा.—२ दे. तपतसे.—३ पं. तर.—४ पं. थोड्यासी.

देव [1]लागट देव [1]लागट । लाविलिया चट जीवीं जडे ॥ २ ॥
देव बावळा देव बावळा । भावें जवळा लुडबुडी ॥ ३ ॥
देव न व्हावा देव न व्हावा । तुका ह्मणे गोवा करी कामीं ॥ ४ ॥

॥ १८६६ ॥

देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥ १ ॥
देव [2]अेकुळी देव [2]अेकुळी । भलते [3]ठायीं सोयरीक ॥ २ ॥
देव लिगाडया देव लिगाडया । [4]तुका ह्मणे भाडया दंभें ठकी ॥ ३ ॥

॥ १८६७ ॥

देव बराडी देव बराडी । घाली [5]दैठासाटीं उडी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देव भ्याड देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥ ध्रु ॥
[6]देवँ भाविक भाविक । होय [7]दासांचा सेवक ॥ २ ॥
देव होया देव होया । जैसा ह्मणे तैसा तया ॥ ३ ॥
[8]देवँ लाहान लाहान । तुका ह्मणे अनुरेण ॥ ४ ॥

॥ १८६८ ॥

देव भला देव भला । मिळोनि जाय जैसा त्याला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ [9]देवँ उदार उदार । देतां नाहीं थोडें फार ॥ ध्रु ॥
देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥ २ ॥
देव व्हावा देवं व्हावा । [10]आंवडे तो सर्वां जीवां ॥ ३ ॥
[11]देवँ चांगला चांगला । तुका चरणीं लागला ॥ ४ ॥

---

१ पं. लगट.—२ त. पं. आकुळी.—३ पं. स्थळीं.—४ पं. तुका भाडया दंभ टाकी.—५ त. शंडें —६ पं. देव भाविक देव भाविक.—७ दे. दासाचें.—८ पं. देव लहान देव लहान.—९ पं. देव उदार देव उदार.—१० त आवडतो सर्वां०.—११ पं देव चांगला देव चांगला। तुका चरणासी लागला ॥.

॥ १८६९ ॥

देव पाहों देव पाहों । उंचे ठायीं उभे राहों ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देव[1] देखिला देखिला । तो नाहीं कोणां भ्याला ॥ ध्रु ॥

देवा[2] कांहीं मागों मागों । जीव भाव त्यासी सांगों ॥ २ ॥

देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचिये[3] खुणे ॥ ३ ॥

देव[4] कातर कातर । तुका ह्मणे अभ्यंतर ॥ ४ ॥

॥ १८७० ॥

देव[5] आमचा आमचा । जीव सकळ जीवांचा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देव आहे देव आहे । जवळी आह्मां अंतरबाहे[6] ॥ ध्रु ॥

देव गोड देव गोड । पुरवी कोडाचें हीं कोड ॥ २ ॥

देव आह्मां राखे राखे । घाली कळिकाळासी काखे ॥ ३ ॥

देव दयाळ देव दयाळ । करी तुक्याचा सांभाळ ॥ ४ ॥

॥ १८७१ ॥

जाऊं देवाचिया गांवां । देव देईल विसांवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देवा सांगों सुखदुःख । देव निवारील भूक ॥ ध्रु ॥

घालूं देवासी च भार । देव सुखाचा सागर ॥ २ ॥

राहों जवळी देवापाशीं । आतां जडोनि पायांसी ॥ ३ ॥

तुका ह्मणे आह्मी बाळें । या देवाचीं लडिवाळें ॥ ४ ॥

॥ १८७२ ॥

प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी ॥ १ ॥

---

१ पं. देव देखिला देव देखिला ।—२ पं. देवासी.—३ त. अंतरींचे.—४ पं. देव कातर-देव कातर ।—५ पं. देव आमुचा देव आमुचा ।—६ पं. अंतर्बाह्य.

॥ ध्रु. ॥ प्रेमें[1] यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां ॥ ध्रु ॥
प्रेमें[2] पाठीं लागे बळें । भक्त देखोनियां भोळे[3] ॥ २ ॥
प्रेम न वजे दवडितां । शिरे बळें जेथें कथा ॥ ३ ॥
तुका ह्मणे थोर आशा । प्रेमा घरीं[4] विष्णुदासां ॥ ४ ॥

॥ १८७३ ॥

संत मानितील मज । तेणें वाटतसे लाज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मी कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥ ध्रु ॥
गोविलों थोरिवां[5] । दुःख वाटतसे जीवा ॥ २ ॥
तुका ह्मणे माया । अवरा हे पंढरिराया ॥ ३ ॥

॥ १८७४ ॥

नाहीं तुह्मी केला । अंगीकार तो विठ्ठला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सोंगें[6] न पवीजे थडी । माजी फुटकी सांगडी ॥ ध्रु ॥
प्रेम नाहीं अंगीं । भले ह्मणविलें जगीं ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । मज वांयां कां चाळवा ॥ ३ ॥

॥ १८७५ ॥

आतां चक्रधरा । झणी आह्मांस अव्हेरा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुमचीं ह्मणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ॥ ध्रु ॥
काळ आह्मां खाय । तरी तुझें नांव जाय ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । आतां पण सिद्धी न्यावा ॥ ३ ॥

---

१ दे. त. प्रेम.—२ दे. प्रेमें.—३ त. भोळें. दे. " भोळें " असतां " भोळे" केलें आहे.—४ पं. धरी.—५ दे. थोरिवां.—६ पं. सांगें.

॥ १८७६ ॥

मज ऐसें कोण उद्धरिलें सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हातींच्या कांकणां कायसा[1] आरिसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥ ध्रु ॥
धेन्वंतरी[2] हरी रोग्याचिये वेथे । तें तों कांहीं येथें न देखिजे ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाउगें कोण मानी ॥ ३ ॥

॥ १८७७ ॥

काय तें सामर्थ्य न चले या काळें । काय जालीं[3] बळें शक्तिहीण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझिया संचितें आणिलासी हरी । जालें तुजवरी वरिष्ठ तें ॥ ध्रु ॥
काय गमाविली सुदर्शन गदा । [4]नो बोला गोविंदा लाजतसां ॥ २ ॥
तुका ह्मणे काय ब्रिदाचें तें काम । सांडों[5] परतें नाम दिनानाथ ॥ ३ ॥

॥ १८७८ ॥

बळ बुद्धी वेचुनियां शक्ती । उदकें[6] चालवावें युक्ती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं चळण तया अंगीं । धांवे लवणामागें[7] वेगीं ॥ ध्रु ॥
पाट मोट कळा । भरित पखाला[8] सगळा[9] ॥ २ ॥
बीजा ज्यासी द्यावें । तुका ह्मणे तैसें व्हावें ॥ ३ ॥

॥ १८७९ ॥

न ह्मणे साना थोर । दुष्ट[10] पापी अथवा चोर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सकळां द्यावी ऐकी[11] चवी । तान हरूनि निववी ॥ ध्रु ॥
न ह्मणे दिवस राती । सर्व काळ सर्वां भूतीं ॥ २ ॥

---

—१ पं. काय तो आरसा.—२ दे. त. धनमंत्री. पं. धनवंत्री.—३ पं. जाले.—४ पं. त्याभेणें गोविंदा०.—५ पं. सांडीं० दिनानाथा॥.—६ पं. उदका.—७ त. लवनामागें.—८ दे. पखाळा.—९ पं. सगळा.—१० दे. त. पं. दृष्ट.—११ पं. एक.

तुका ह्मणे झारी । घेतां तांब्यानें खापरी ॥ ३ ॥

॥ १८८० ॥

इच्छा चाड नाहीं । न धरी संकोच ही कांहीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥ ध्रु ॥

मोहरी[1] कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ॥ २ ॥

तुका ह्मणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥ ३ ॥

॥ १८८१ ॥

बरले ते मागें आपुलिया सत्ता । कमाई अनंता करूनियां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ उसणें फेडितां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य[2] तुह्मी त्यांसी ॥ ध्रु ॥

मज ऐसा कोण सांगा[3] वांयां गेला । तो तुह्मी तारिला पांडुरंगा ॥ २ ॥

तुका ह्मणे नांवासारिखी[4] करणी । न देखें हें[5] मनीं समजावें ॥ ३ ॥

॥ १८८२ ॥

कवणांशीं भांडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धरिलें उदास दुरदुरांतरें[6] । सांडी एकसरें केली माझी ॥ ध्रु ॥

आइकोन माझे नाइकसी बोल । देखोनियां खोळ बुंथी घेसी ॥ २ ॥

तुका ह्मणे एके गांवींची वसती । ह्मणऊनि खंती वाटे देवा ॥ ३ ॥

॥ १८८३ ॥

आळवितां कंठ शोकला भीतरें[7] । आयुष्य वेचे धीर[8] नाहीं मना ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अझून कां नये हें तुझ्या अंतरा । दिनाच्या माहेरा पांडुरंगा ॥ ध्रु ॥

---

१ दे. मुहरि. पं. मुहुरी.—२ दे. अनन्य.—३ पं. सांगावया गेला.—४ पं. नामासारिखी.—५ पं. "हें" नाहीं.—६ "दूरदूर अंतरें" असावें?.—७ दे. त. भीतरु.—८ त. धीरु.

धन दिसे डोळा दगडाचे परी । भोग ते शरीरीं विष जालें ॥ २ ॥
चुकलों काय तें मज क्षमा करीं । आळिंगूनि हरी प्रेम द्यावें ॥ ३ ॥
अवस्था राहिली रूपाची अंतरीं । बाहेर भीतरी सर्व काळ ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आतां ॥ ५ ॥

## ॥ शिवाजी राजे यांनीं स्वामीस अबदागिरी, घोडा, कारकून असे न्यावयास पाठविले ते अभंग ॥ १४ ॥

॥ १८८४ ॥

दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां येथें पंढरिराया । मज गोंविसी कासया ॥ ध्रु ॥
मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्ठा ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । माझे सोडववणे धांवा ॥ ३ ॥

॥ १८८५ ॥

नावडे जें चित्ता । तें चि होसी पुरविता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कां रे पुरविली पाठी । माझी केली जीवेसाटीं ॥ ध्रु ॥
न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ १ ॥
सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥
जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥
तुका ह्मणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ५ ॥

॥ १८८६ ॥

विरंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ युक्तीचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेंसी ॥ ध्रु॥
ऐसा तुझा प्रेमा कळे कांहीं एक । पाहूनियां लेख पत्रिकींचे ॥ २ ॥
शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचें कीं ॥ ३ ॥
व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनि मोकळा जालासी तूं ॥ ४ ॥
हेहता लागला आमुचिये भेटी । पत्रामाजी गोष्टी हे चि थोर ॥ ५ ॥
याचें हें उत्तर ऐक गा भूपती । लिहिली विनंती हेताची हे ॥ ६ ॥
अरण्यवासी आह्मी फिरों उदासीन । दर्शन ही हीन अमंगळ ॥ ७ ॥
वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ॥ ८ ॥
रोडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ ९ ॥
तुका ह्मणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥ १० ॥

॥ १८८७ ॥

ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे । हे त्या करुणा आहे त्हृदयस्थाची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नहों कीविलवाणें नाहीं आह्मी दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ ध्रु ॥
पांडुरंग आह्मां पाळिता पोसिता । आणिकांची कथा काय तेथें ॥ २ ॥
तुझी भेट घेणें काय हें मागणें । आशेचें हें शून्य केलें आह्मीं ॥ ३ ॥
निराशेचा गांव दिधला आह्मांसी । प्रवृत्तिभागासी सांडियेलें ॥ ४ ॥
पतिव्रतेचें हे मन पति भेटो । तैसे आह्मी विठोमाजी नांदों ॥ ५ ॥
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझें ही तयामाजी ॥ ६ ॥
तुज ही विठ्ठल ऐसें चि वाटलें । परि एक आलें आडवें हें ॥ ७ ॥

सद्गुरुश्रीरामदासाचें भूषण । तेथें घालीं मन चळों नको ॥ ८ ॥
बहुतां ठायीं वृत्ति चावळली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥ ९ ॥
तुका ह्मणे बापा चातुर्यसागरा । भक्तिभाव तारा भाविकांसी ॥ १० ॥

॥ १८८८ ॥

तुह्मांपाशीं आह्मी येऊनियां काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासी हे[1] थार चिंध्या बिदी ॥ ध्रु ॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ २ ॥
तेथें काय करणें कवणाची आस । वांयां होय नाश आयुष्याचा ॥ ३ ॥
राजगृहा यावें मानाचिये आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥
रायाचिये घरीं भाग्यवंता मान । इतरां सामान्यां[2] मान नाहीं ॥ ५ ॥
देखोनियां वस्त्रें भूषणांचें जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ६ ॥
ऐकोनियां मानाल उदासता जरी । तरी आह्मां हरि उपेक्षीना ॥ ७ ॥
आतां हें चि तुह्मा सांगणें कौतुक । भिक्षे ऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥
तपव्रतयाग महां भले जन । आशाबद्ध हीन वर्ततातीं ॥ ९ ॥
तुका ह्मणे तुह्मी श्रीमंत मानाचे । पूर्वीं च दैवांचे हरिभक्त ॥ १० ॥

॥ १८८९ ॥

आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जेणें योगें तुह्मां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ ध्रु ॥
निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ती चित्तीं आणूं नका ॥ २ ॥

१ दे. "हें" नाहीं.—२ त. सामान्य.

परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनियां ॥ ३ ॥
सांगणें न लगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ४॥
हें चि ऐकोनियां चित्त समाधान । आणीक दर्शनें चाड नाहीं ॥ ५ ॥
घेऊनियां भेटी कोण, हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥
एकदोनी कर्में जाणोनियां वर्में[1] । आपुलिया भ्रमें राहूं आतां ॥ ७ ॥
कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वां भूतीं देख एक आत्मा ॥ ८ ॥
आत्मारामीं मन ठेवूनियां राहें । रामदासीं पाहें आपणेयां ॥ ९ ॥
तुका ह्मणे राया धन्य जन्म क्षिती । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥ १० ॥

॥ १८९० ॥

आतां हे विनवणी प्रधानअष्टक[2] । प्रभूसी विवेक समजावा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ प्रतिनिधि मानरक्षक चतुर । सात्विकाचें घर तुह्मांपाशीं ॥ ध्रु ॥
मजुमुचे धणी लेखनकारक । पत्रींचा विवेक समजावा ॥ २ ॥
पेशवे सुरनिस चिटनिस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ३ ॥
भूषण पंडितराय विद्याधन । वैद्यराजा नमन माझें असे ॥ ४ ॥
पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनि । विवंचोनि श्रवणीं घाला तैया[3] ॥५॥
सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥
यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वांयां जाऊं नेदा ॥ ७ ॥
भिडेसाटीं बोला गाळूनि अर्थातें । अनर्थकारी तुमतें होइल तेणें ॥ ८ ॥
तुका ह्मणे तुह्मां नमन अधिकाऱ्यां । सांगणें तें राया पत्र माझें ॥ ९ ॥

॥ १८९१ ॥

जाणोनि अंतर । टाळिसील करकर ॥ १ ॥

---

१ दे. वर्म.–२ त. अष्टका । प्रभूसी विवेका०.–३ त. राया.

॥ ध्रु. ॥ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ ध्रु ॥
उठविसी दारीं । धरणें एखादिया परी ॥ २ ॥
तुका ह्मणे पाये । कैसे सोडीन ते पाहें ॥ ३ ॥

॥ १८९२ ॥

नाहीं विचारीत । मेघ [१]हागणदारी सेत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नये पाहों त्याचा अंत । ठेवीं कारणापें चित्त ॥ ध्रु ॥
वर्जीत गंगा । नाहीं उत्तम अधम जगा ॥ २ ॥
तुका ह्मणे मळ । नाहीं अग्नीसी विटाळ ॥ ३ ॥

॥ १८९३ ॥

काय दिला ठेवा । आह्मां विठ्ठल चि [२]व्हावा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मी कळलेती उदार । साटीं परिसाची गार ॥ ध्रु ॥
जीव दिला [३] तरी । वचना माझ्या नये सरी ॥ २ ॥
तुका ह्मणे धन । आह्मां गोमासासमान ॥ ३ ॥

॥ १८९४ ॥

पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पुढें उरे खातां देतां । नव्हे खंडण मवितां ॥ ध्रु ॥
खोलीं पडे ओली बीज । [४]तरीं च हातीं लागे निज ॥ २ ॥
तुका ह्मणे धनी । विठ्ठल [५]अक्षरें हीं तिन्ही ॥ ३ ॥

॥ १८९५ ॥

मुंगी आणि राव । आह्मां सारखाचि जीव ॥ १ ॥

---

१ दे. हागनदारी.—२ पं. आह्मी.—३ पं०. देतां तरी । वचना नये एकासरी ॥२॥ गोमासासमान । तुका ह्मणे आह्मां धन ॥ ३ ॥.—४ पं. तरी ह्मता लागे०.—५ दे. अक्षरी हीं०. पं. अक्षरे हे०.

॥ ध्रु. ॥ गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ ध्रु
सोनें आणि माती । आह्मां समान हें चित्तीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आलें । घरा वैकुंठ[1] सगळें ॥ ३ ॥

॥ १८९६ ॥

तिहीं त्रिभुवनीं । आह्मी वैभवाचे धनी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हातां आले घाव डाव । आमचा मायबाप देव ॥ ध्रु ॥
काय त्रिभुवनीं बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ २ ॥
तुका ह्मणे सत्ता । अवघी आमुची च आतां ॥ ३ ॥

॥ १८९७ ॥

आह्मी तेणें सुखी । ह्मणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ ध्रु ॥
कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ २ ॥
ह्मणवा हरिचे दास । तुका ह्मणे मज हे आस ॥ ३ ॥

॥ १८९८ ॥

नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमेरा[2] सुमन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ ध्रु ॥
पदरीं घालीं पिळा । बाप निर्बळ साटीं बाळा ॥ २ ॥
तुका ह्मणे भावें । भेणें देवें[3] आकारावें ॥ ३ ॥

॥ १८९९ ॥

भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥ १ ॥

---

१ पं. सावळें.—२ पं. भ्रमरापासून.—३ दे. देवा.

॥ ध्रु. ॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥ ध्रु ॥
बैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥ २ ॥
तुका ह्मणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥ ३ ॥

॥ १९०० ॥

भा[1]वाचिया बळें । आह्मी निर्भर दुर्बळें[2] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं आणिकांची सत्ता । सदा समाधान चित्ता ॥ ध्रु ॥
तर्का नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ॥ २ ॥
एकछत्री रां[3]ज । तुक्या पांडुरंगीं काज ॥ ३ ॥

॥ १९०१ ॥

स[4]त्तावर्त्ते मन । पा[5]ळी विठलाची आँ[6]न ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आज्ञा वाहोनियां शिरीं । सांगितलें तें चि करीं ॥ ध्रु ॥
सरलीसे धांव । न लगे वाढवावी हांव ॥ २ ॥
आहे नाहीं त्याचें । तुका ह्मणे कळे साचें ॥ ३ ॥

॥ १९०२ ॥

खावें ल्यावें द्यावें । जमाखर्च तुझ्या नांवें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां चुकली खटपट । झाडया पाडयाचा बोभाट ॥ ध्रु ॥
आहे नाहीं त्याचें । आह्मां काम सांगायाचें ॥ २ ॥
तुका ह्मणे चिंता । भार वाहे[7] तुझ्या माथां ॥ ३ ॥

॥ १९०३ ॥

आतां बरें जालें । माझे माथांचें निघालें ॥ १ ॥

---

१ पं. भावाचेया.–२ पं. निर्बळ.–३ पं. राज्य.–४ दे. सत्तावृतें ( सत्ताव्रतें?).–५ पाळीं?.–६ पं. त. आण.–७ पं. वाह.–८ पं. त्याचे.

॥ ध्रु. ॥ चुकली हे मरमर । भार माथांचे डोंगर ॥ ध्रु ॥
नसतां कांहीं जोडी । करिती बहुतें तडातोडी ॥ २ ॥
जाला झाडापाडा । तुका ह्मणे गेली पीडा ॥ ३ ॥

॥ १९०४ ॥

संचित[1] चि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां पुरे हे चाकरी । राहों बैसोनियां घरीं ॥ ध्रु ॥
नाहीं काम हातीं । आराणूक दि[2]वसराती ॥ २ ॥
तुका ह्मणे सत्ता । पु[3]रे पराधीन आतां ॥ ३ ॥

॥ १९०५ ॥

ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरी च जोडिलें तें[4] भोगे । कांहीं आघात न ले[5]गे ॥ ध्रु ॥
वाढवावी थोरी । मु[6]खें ह्मणे तुझें हरी ॥ २ ॥
तुका ह्मणे हे गोमटी । दासा न घा[7]लावी तुटी ॥ ३ ॥

॥ १९०६ ॥

माझा तुह्मी देवा केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कां हो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहें तैसा ॥ ध्रु ॥
लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥ ३ ॥

॥ १९०७ ॥

तोंडें बोलावें तें तरी वाटे खरें । जीव ये[8]रयेरें वंचिजे ना ॥ १ ॥

---

१ दे. त. संचितें.—२ दे. दिसराती.—३ पं. आतां पुरे पराधीनता.—४ पं. "तें" नाहीं. ५ पं लागे.—६ पं. सुखें०. त. मुखें ह्मणे तुझें०.—७ दे. घलावी.—८ पं. येरयेरें.

॥ ध्रु. ॥ हें तुह्मां सांगणें काय उगवूनि । जावें समजोनि पांडुरंगा ॥ ध्रु ॥
जेवित्याची खूण वाढित्या अंतरीं । प्रीतीनें हे धरी चाली तेथें ॥ २ ॥
तुका ह्मणे बहु परीचे आदर । अत्यंत वेव्हारसंपादणी ॥ ३ ॥

॥ १९०८ ॥

न पालटे एक । भोळा भक्त चि भाविक ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येरां नास आहे पुढें । पुण्य सरतां उघडें ॥ ध्रु ॥
नेणे गर्भवास । एक विष्णूचा चि दास ॥ २ ॥
तुका ह्मणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ३ ॥

॥ स्वामींनीं पत्र पंढरिनाथास पंढरीस पाठविलें ते अभंग ॥ ३६ ॥

॥ १९०९ ॥

कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात । चालें तुज पंढरिनाथ बोलावितो ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मग मी न धरीं आस मागील बोभाट । वेगीं धरिन वाट माहेराची ॥ ध्रु ॥
निरांजलें[3] चित्त करितें[4] तळमळ । केधवां देखती मूळ आलें डोळे[5] ॥ २ ॥
तुका ह्मणे कई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥ ३ ॥

॥ १९१० ॥

कां माझा विसर पडिला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कैसा कंठूनियां राहों संवसार । काय एक धीर देऊं मना ॥ ध्रु ॥
नाहीं निरोपाची पावली वारता । करावी[6] ते चिंता ऐसी कांहीं ॥ २ ॥

---

१ पं. नाश.—२ दे. चाल पंढरिनाथ. "तुज" खोडलें आहे.—३ दे. निरांजिरें. त. निरांजळें.—४ पं. करी.—५ पं. डोळां.—६ पं. न करावी ते चिंता ऐसे कांहीं ।.

तुका ह्मणे एक वेचूनि वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥ ३ ॥

॥ १९११ ॥

कांहीं माझे कळों आले गुणदोष । ह्मणऊनि उदास धरिलें ऐसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं तरी येथें न घडे अनुचित । नाहीं ऐसी रीत तया घरीं ॥ ध्रु ॥
कळावें तें मना आपुलिया सवें । ठायींचें हें घ्यावें विचारूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे मज अव्हेरिलें देवें । माझिया कर्तव्यें[1] बुद्धीचिया ॥ ३ ॥

॥ १९१२ ॥

नव्हे धीर कांहीं पाठवूं निरोप । आला तरीं कोप येऊ सुखें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोंपोनियां तरी देईल उत्तर । जैसें तैसें पर फिरावूनि ॥ ध्रु ॥
नाहीं तया तरी काय एक पोर । मज तों माहेर आणीक नाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे असे तयामध्यें हित । आपण निवांत असों नये ॥ ३ ॥

॥ १९१३ ॥

आतां पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय करूं आतां न गमेसें[2] जालें । बहुत सोसिलें बहु[3] दिस ॥ ध्रु ॥
घर लागे पाठी चित्ता उभे वारे । आपुलें तें झुरे पाहावया ॥ २ ॥
तुका ह्मणे जीव गेला तरी जावं[4] । धरिला तो देव भाव सिद्धी[5] ॥ ३ ॥

॥ १९१४ ॥

विनवीजे ऐसें भाग्य नाहीं देवा । पायांशीं केशवा सलगी केली ॥ १ ॥

---

१ पं. कर्त्तव्य बुद्धीचिया.–२ दे. नमगेसें.–३ पं. बहुत.–४ पं. जावो.–५ पं. शुद्ध.

॥ ध्रु. ॥ धीटपणें पत्र लिहिलें आवडी । पार नेणे थोडी मति माझी ॥ ध्रु ॥
जेथें देवा तुझा न कळे चि पार । तेथें मी पामर काय वाणूं ॥ २ ॥
जैसे तैसे माझे बोल अंगीकारीं । बोबड्या उत्तरीं गौरवितों ॥ ३ ॥
तुका ह्मणे विटेवरि जीं पाउलें । तेथें म्यां ठेविलें मस्तक हें ॥ ४ ॥

॥ १९१५ ॥

देवांच्या ही देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याती त्रिभुवनीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पातकांच्या रासी नासितोसी नामें । जळतील कर्में महा दोष ॥ ध्रु ॥
सर्व सुखें तुझ्या वोळगती पायीं । रिद्धि सिद्धि ठायीं मुक्तिचारी ॥ २ ॥
इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीतें[1] गातां छंद वातां[2] टाळी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जड जीव शक्तिहीन । त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १९१६ ॥

काय जालें नेणों माझिया कपाळा । न देखिजे डोळां मूळ येतां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बहु दिस पाहें वचनाची वास । धरिलें उदास पांडुरंगा ॥ ध्रु ॥
नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसें तों उतर निष्ठुर न पाहिजे ॥ २ ॥
पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहूनि गोविंदा जरूरसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलें वेचाचें सांकडें । देणें घेणें पुढें तो ही धाक ॥ ४ ॥

॥ १९१७ ॥

एवढा संकोच तरि कां व्यालासी । आह्मी कोणांपाशीं तोंड वासूं ॥ १ ॥

---

१ पं. गीति.—२ त. वाह्यातां.

॥ ध्रु. ॥ कोण मज पुसे सिणलें भागलें । जरी मोकलिलें तुह्मीं देवा ॥ ध्रु ॥

कवणाची वाट पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जीवलग ॥ २ ॥

कोण जाणे माझे जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें[1] ॥ ३ ॥

तुका म्हणे तुह्मी देखिली निश्चिंती[2] । काय माझे[3] चितीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १९१८ ॥

देई डोळे भेटी न धरीं संकोच । न घलीं कांहीं वेच तुजवरी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुज बुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतां थोडें ॥ ध्रु ॥

फार थोडें काहीं करूनि पातळ । त्याजमध्यें काळ कडे लावूं ॥ २ ॥

आहे माझी ते चि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥ ३ ॥

तुका ह्मणे आह्मां लेंकराची जाती । भेटावया खंती वाटतसे ॥ ४ ॥

॥ १९१९ ॥

सीण भाग हरे तेथींच्या निरोपें । देखिलिया रूप उरी नुरे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ इंद्रियांची धांव होईल कुंटित । पावेल हें चित्त समाधान ॥ ध्रु ॥

माहेर आहेसें लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥ २ ॥

आस नाहीं परी उरी[4] बरी वाटे । आपलें तें भेटे आपणासी ॥ ३ ॥

तुका ह्मणे माझी अविट आवडी । खंडणें[5] तांतडी होऊं नेदीं ॥ ४ ॥

॥ १९२० ॥

धरितों वासना परी नये फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तळमळी चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीचिया ॥ ध्रु ॥

---

१ पं. वास.—२ पं. उगविलें.—३ पं. निश्चिती.—४ पं माझी.—५ त. " उत्तरी " असें मागून केलें आहे.—६ पं. खंडणा.

प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥ २ ॥
जातों तळा येतों मा[1]गुताला वरी । वोळशाचे फेरी सांपडलों ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु करितों विचार । उतरें डोंगर एक चढें ॥ ४ ॥

॥ १९२१ ॥

कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हें न कळे पाप यांचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥ ध्रु ॥
कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेमे[2] कां हस्तक न पवती ॥ २ ॥
कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होईना जिव्हा कीर्ती ॥ ३ ॥
तुका ह्मणे कई जाऊनि मोटॅ[3]ळें । प[4]डेन हा लोळें महाद्वारीं ॥ ४ ॥

॥ १९२२ ॥

काय पोरें जालीं फार । किंवा न साहे करकर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणऊनि केली सांडी । घांस घेऊं नैं[5] ल्हां तोंडीं ॥ ध्रु ॥
करूं कलागती । तुज भांडणें भोंवतीं ॥ २ ॥
तुका ह्मणे टांचें । घरीं जौलिंसेवरोचें[6] ॥ ३ ॥

॥ १९२३ ॥

कांहीं चिंतेविण । नाहीं उपजत सीण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरी हा पडिला विसर । माझा तुह्मां जाला भार ॥ ध्रु ॥
आली कांहीं तुटी। गेली सुटोनियां गांठी ॥ २ ॥
तुका ह्मणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥ ३ ॥

---

१ पं. मागुता लौकरी. दे. "मागुता लौकरी" याचें "मागुताला वरी" केलें आहे.—२ पं. क्षम.—३ पं. मोटाळें.— ४ पं. पडेना हा — ५ पं. न ल्हाये.—६ त. जालेंसेंवरोचे. अथ बरोबर समजत नाहीं सबब पदच्छेद केला नाहीं.

॥ १९२४ ॥

निरोपासी वेचे । काय बोलतां फुकाचें ॥ १ ॥

परी हें [1]नेघेवे चि यश । भेओं नको सुखी आस ॥ ध्रु ॥

सुख समाधानें । कोण पाहे देणें घेणें ॥ २ ॥

न लगे निरोपासी मोल । तुका ह्मणे वेचे बोल ॥ ३ ॥

॥ १९२५ ॥

जोडीच्या हव्यासें । लागे [2]धनाचें चि पिसें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मग आणीक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥ ध्रु ॥

पाहे रुक्याकडे । मग अवघें ओस पडे ॥ २ ॥

तुका ह्मणे देवा । तुला बहुत चि हेवा ॥ ३ ॥

॥ १९२६ ॥

मविलें मविती । नेणों रासी पडिल्या किती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ परि तूं धाला चि न धासी । आलें उभाउभीं घेसी ॥ ध्रु

अवघ्यां [3]अवघा काळ । वाटा [4]पाहाती सकळ ॥ २ ॥

तुका ह्मणे नाहीं । अराणूक तुज कांहीं ॥ ३ ॥

॥ १९२७ ॥

न बैससी खालीं । [5]सम उभा च पाउलीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसे जाले बहुत दिस । जालीं युगें अठ्ठाविस ॥ ध्रु ॥

नाहीं भाग सीण । अराणूक एक क्षण ॥ २ ॥

तुका ह्मणे किती । मापें केलीं देती घेती ॥ ३ ॥

१ पं. न घेवे.—२ पं. धन्याचें.—३ पं. अवघ्या.—४ पं. वाहाती.—५ पं. उभा सम
६ पं. बहु.

॥ १९२८ ॥

जोडी[1] कोणांसाटीं । एवढी करितोसी आटी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जरी हें आह्मां नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥ ध्रु ॥

करूनि जतन । कोणा देसील हें[2] धन ॥ २ ॥

आमचे तळमळे । तुझें[3] होईल वाटोळें ॥ ३ ॥

घेसील हा श्राप । माझा होऊनियां बाप ॥ ४ ॥

तुका ह्मणे उरी । आतां न ठेवीं यावरी ॥ ५ ॥

॥ १९२९ ॥

करूनि चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जरि तूं होऊनि उदास । माझी बुढविसी आस ॥ ध्रु ॥

येथें न करीं काम । मुखें नेघें तुझें नाम ॥ २ ॥

तुका ह्मणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥ ३ ॥

॥ १९३० ॥

समर्थाचे पोटीं । आह्मी जन्मलों करंटीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसी जाली जगीं कीर्ति । तुझ्या[4] नामाची फजिती ॥ ध्रु ॥

येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ न्याया ॥ २ ॥

तुका ह्मणे जिणें । आतां खोटें जीवपणें ॥ ३ ॥

॥ १९३१ ॥

पुढें तरी चित्ता । काय येईल तें आतां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मज सांगोनियां धाडीं । वाट पाहाणों बराडी ॥ ध्रु ॥

---

१ त. जोडी केली कोणा० —२ पं. "हें" नाहीं.—३ पं. तुमचें.—४ पं. माझ्या.

कंठीं धरिला प्राण । पायांपाशीं आलें मन ॥ २ ॥
तुका ह्मणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥ ३ ॥

॥ १९३२ ॥

कैंचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जें या मनासी आवरूं । आंतें पोटीं वाव धरूं ॥ ध्रु ॥
कैंची शुद्ध मति । भांडवल ऐसें हातीं ॥ २ ॥
तुका ह्मणे अंगा । कोण दशा आली सांगा ॥ ३ ॥

॥ १९३३ ॥

समर्पक वाणी । नाहीं ऐकिजेसी कानीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आंतां भावें करूनि साचा । पायां पडिलों विठोबाच्या ॥ ध्रु ॥
न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥ २ ॥
तुका ह्मणे विनंती । विनविली धरा चित्तीं ॥ ३ ॥

॥ १९३४ ॥

येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥ ध्रु ॥
पत्र हातीं दिलें । जैया जेथें पाठविलें ॥ २ ॥
तुका ह्मणे येती । जाइन सामोरा पुढती ॥ ३ ॥

॥ १९३५ ॥

रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसें माझें दंडवत । निरोप सांगतील संत ॥ ध्रु ॥

---

१ त. आतां.—२ त. आतां समर्पक.—३ त. आतां पायां पडिलें पायां पडिलों ।. दे हू-च्या प्रतींत याप्रमाणें च होतें, पण मागून वर छापल्या प्रमाणें केलें आहे.—४ त. विनविलें. ५ पं. तया तेथें पाठाविलें ।.—६ दे. रुळें.—७ दे. सांगा निरोप हा संत.

पडे दंडकाठी । देह भलतीसवा लोटी ॥ २ ॥
तुका ह्मणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥ ३ ॥

॥ १९३६ ॥

तुह्मी संतजनीं । माझी करावी[1] विनवणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥ ध्रु ॥
भाका बहुतां रीती । माझी[2] कींव काकुलती ॥ २ ॥
न देखे पंढरी । तुका चरण विटेवरी ॥ ३ ॥

॥ १९३७ ॥

होइल कृपादान । तरी मी येईन धांवोन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ होती संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ ध्रु ॥
रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥ २ ॥
तुका ह्मणे ताप । हरती देखोनियां बाप ॥ ३ ॥

॥ १९३८ ॥

परिसोनि उत्तर । जाब देईजे सत्वर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जरी तूं होसी कृपावंत । तरि हा बोलावीं पतित ॥ ध्रु ॥
नाणीं कांहीं मना । करूनि पापाचा उगाणा ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं । काय शक्ति तुझे पायीं ॥ ३ ॥

॥ १९३९ ॥

ऐकोनियां कीर्ती । ऐसी वाटती विश्रांती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माते सुख डोळां पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥ ध्रु ॥

---

१ त. पं. करा.—२ पं. कीव माझी.

बोलतां[1] ये वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥ २ ॥
तुका ह्मणे धांवे । वासना[2] ते रस घ्यावे ॥ ३ ॥

॥ १९४० ॥

किती करूं शोक । पुढें वाढे दुःखें दुःख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥ ध्रु ॥
पुण्य होतें[3] गांठी । तरि कां लागती हे आटी ॥ २ ॥
तुका ह्मणे बळ । माझी राहिली तळमळ ॥ ३ ॥

॥ १९४१ ॥

करील आबाळी । माझ्या दांताची कसाळी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जासी एखादा मरोन । पाठी लागेल हें जन ॥ ध्रु ॥
घरीं लागे कळह[4] । नाहीं जात तो शीतळ ॥ २ ॥
तुका ह्मणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥ ३ ॥

॥ १९४२ ॥

आतां आशीर्वाद । माझा असो सुखें नांद ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ह्मणसी कोणा तरी काळें । आहेतसीं माझीं बाळें ॥ ध्रु ॥
दुरी दूरांतर । तरी घेसी समाचार ॥ २ ॥
नेसी कधीं तरी । तुका ह्मणे लाज हरी[5] ॥ ३ ॥

॥ १९४३ ॥

आतां हे सेवटीं । माझी आइकावी गोष्टी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां दावा वचनाचा । जाव कळे[6] तैसा याचा ॥ ध्रु ॥

---

१ पं. बोलतां एकाचे ।—२ त वासना हे रस०.— पं. रसना ते रस०.—३ पं. होतीं.—४ पं. काळ हे. दे. त. काळ्हे.—५ पं. धरीं.—६ पं. कळेल.

आतां करकर । पुढें न करीं उत्तर ॥ २ ॥
तुका ह्मणे ठसा । तुझा आहे राखें[1] तैसा ॥ ३ ॥

॥ १९४४ ॥

बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ १ ॥
॥ धु. ॥ क्षमा करावे[2] अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ ध्रु ॥
स्तुती निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥ २ ॥
तुका ह्मणे लाड । दिला तैसें[3] पुरवा कोड ॥ ३ ॥ ॥ ३६ ॥

॥ १९४५ ॥

माहेरिंचा काय येईल निरोप । ह्मणऊनि झोंप नाहीं डोळां ॥ १ ॥
॥ धु. ॥ वाट पाहें आस धरूनियां जीवीं । निडळा हे ठेवीं वरी बाहे ॥ ध्रु ॥
बोटवरी माप लेखितों दिवस । होतों कासावीस धीर नाहीं ॥ २ ॥
काय नेणों संतां पडेल[4] विसर । कीं नव्हे सादर मायबाप ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें होईल दाटणी । कोण माझें आणी मना तेथें ॥ ४ ॥

॥ १९४६ ॥

परि तो आहे कृपेचा सागर । तोंवरी अंतर पडों नेदी ॥ १ ॥
॥ धु. ॥ बहुकानदृष्टी आइके[5] देखणा । पुरोनियां जना उरलासे ॥ ध्रु ॥
सांगितल्याविणें जाणे अंतरिंचें । पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥ २ ॥
बहुमुखें कीर्ती आइकिली कानीं । विश्वास हा मनीं आहे माझ्या[6] ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं जात वांयांविण । पाळितो वचन बोलिलों तें ॥ ४ ॥

---

१ पं. राख.—२ पं. करावा.—३ पं. तैसा.—४ पं. पडिला.—५ त. आईकें.—६ दे. त. माझा.

॥ १९४७ ॥

यावरि न कळे संचित आपुलें । कैसें वोडवलें होइल पुढें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करील विक्षेप धाडितां मुळासी । किंवा धाडा ऐसी तांतडी हे ॥ ध्रु. ॥
जोंवरी हे डोळां देखें[१] वारकरी । तों हें भरोवरी करी चित्त ॥ २ ॥
आस वाढविते बुद्धीचे[२] तरंग । मनाचे[३] ही वेग वावडती ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेव्हां होतील निश्चळ । इंद्रियें सकळ निरोपानें ॥ ४ ॥

॥ १९४८ ॥

होईल निरोप घेतला यावरी । राउळाभीतरीं जाऊनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करूनियां दधिमंगळभोजन । प्रयाण शकुनसुमुहूर्तें[४] ॥ ध्रु. ॥
होतील दाटले सद्गदित कंठीं । भरतें यां[५] पोटीं वियोगाचें ॥ २ ॥
येरयेरां भेटी क्षेम आलिंगनें । केलीं समाधानें[६] होतीं संतीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे चाली न साहे मनास । पाहाती कळस परपरतों[७] ॥ ४ ॥

॥ १९४९ ॥

ऐसी ते सांडिली होईल पंढरी । येर्त[८] वारकरी होते वाटे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देखिले सोहळे होती आठवत । चालती ते मात करूनियां ॥ ध्रु. ॥
केली आइकिली होईल जे कथा । राहिलें तें चित्ता होइल प्रेम ॥ २ ॥
गरुडटके टाळ मृदंग[९] पताका । सांगती[१०] ते एकां एक सुख ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां येती लवलाहीं । आलिंगूनि बाहीं देइन क्षेम ॥ ४ ॥

---

१ पं. देखों.—२ त. बुद्धीचा.— ३ पं. चित्ताचे ते वेग वावरती.— ४ पं. शकुनसुमुहूर्त. —५ पं. त्या.—६ दे. समाधान.—७ पं. परतोनि.—८ दे. येते वारकरी होत वाटे । त. येते वारकरी होते वाटे.—९ दे. त. पं. मृदांग.—१० सांगताती.

॥ १९५० ॥

क्षेम [1]मायबाप पुसेन हें आधीं । [2]ने घलीं हें मधीं सुख दुःख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न करीं तांतडी आपणांपासूनि । आइकेन कानीं सांगती तें ॥ध्रु॥
अंतरींचें संत जाणतील गूज । निरोप तो मज सांगतील ॥ २ ॥
पायांवरी डोई ठेवीन आदरें । प्रीतिपडिभरें [3]आंळिगून ॥ ३ ॥
तुका ह्मणे काया करीन कुरवंडी । ओंवाळून सांडीं त्यांवरून ॥ ४ ॥

॥ १९५१ ॥

होइल माझी संतीं भाकिली करुणा । जे त्या नारायणा मनीं बैसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ शृंगारूनि माझीं बोबडीं उत्तरें । होतील विस्तारें सांगितलीं ॥ ध्रु ॥
क्षेम आहे ऐसें होइल सांगितलें । [4]पाहिजे धाडिलें शीघ्र मूळ ॥ २ ॥
अवस्था जे माझी ठावी आहे संतां । होइल कृपावंता [5]निरोपिली ॥ ३॥
तुका ह्मणे सवें येईल [6]मुऱ्हाळी । किंवा कांहीं उरी राखतील ॥ ४ ॥

॥ १९५२ ॥

दोहींमध्यें एक घडेल विश्वासें । भातुकें सरिसें मूळ तरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करिती [7]निरास निःशेष न घडे । [8]कांहीं तरी ओढे चित्त माये॥ध्रु॥
लौकिकाची तरी वारितील लाज । काय माझ्या काज आचरणें ॥ २ ॥
अथवा कोणाचें घेणें लागे रीण । नाहीं तरी [9]हीनकर्मी कांहीं ॥ ३ ॥
व्यालीचिये अंगीं असती वेधना । तुका ह्मणे मना मन [10]साक्ष ॥ ४ ॥

१ पं. ०मायबापा पुसेन आधीं ।–२ पं. न घालीं०.–३ पं. आलिंगन.–४ पं. होईल.–५ पं. निरूपिली.–६ “ मुळहारी ” असावें ?–७ पं. निराश.–८ पं. कांहीं तरि चि ओढे०.–९ पं. हीन कर्म.–१० पं. साक्षी.

॥ १९५३ ॥

बैसतां कोणापें नाहीं समाधान । विवरे हें मन ते चि सोई ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ घडी घडी मज आठवे माहेर । न पडे विसर क्षणभरी ॥ ध्रु ॥

नो[1] बोलावें ऐसा करितों विचार । प्रेसंगीं तों फार आठवतें ॥ २ ॥

इंद्रियांसी वाहो पडिली ते चाली । होती विसांवली ये चि ठायीं ॥ ३ ॥

एकसरें सोस माहेरासी जावें । तुका ह्मणे जीवें घेतलासे ॥ ४ ॥

॥ १९५४ ॥

नाहीं हांनि परी न राहावे निसुर । न पडे विसर काय करूं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पुसाविसी वाटे मात कापडियां । पाठविती न्याया मूळ मज ॥ ध्रु ॥

आणिक या मना नावडे सोहळा । करितें टकळा माहेरींचा ॥ २ ॥

बहु कामें केलें बहु कासाविस । बहु जाले दिस भेटी नाहीं ॥ ३ ॥

तुका ह्मणे त्याचें न कळे अंतर । अवस्था तों फार होते मज ॥ ४ ॥

॥ १९५५ ॥

तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें । जों नाहीं बरवें कळों आलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कोणाचिया मुखें तंट नाहीं मागें । वचन वाउगें बोलों नये ॥ ध्रु ॥

दिसे हानि परी निरास न घडे । हे तंव रोकडे अनुभव ॥ २ ॥

आपुलिया भोगें होईल उशीर । तोंवरि कां धीर केला नाहीं ॥ ३ ॥

तुका ह्मणे गोड करील सेवट । पाहिली ते वाट ठायीं आहे ॥ ४ ॥

---

१ त. पं. न.—२ पं. पडतो विसर प्रसंगीं तो.—३ पं. जीव.—४ त. पं. हाणी. दे. "हानि" असतां मागून "हाति" केलें आहे.—५ पं. वे फार होत मज.—६ पं. वंट.—७ पं. ठावी.

॥ १९५६ ॥

माहेरींचें आलें तें मज माहेर । सुखाचें उत्तर करिन त्यासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पायांवरी माथा आळिंगीन बाहीं । घेईन लवलाहीं पायवणी ॥ ध्रु. ॥
सुख समाचार पुसेन सकळ । कैसा पै[1]र्वकाळ आहे त्[2]यास ॥ २ ॥
आपुले जीवींचें सुखदुःख भावें । सांगेन अघवें आहे तैसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे वीट नेघें आवडीचा । बोलिली च वाचा बोलवीन ॥ ४ ॥

॥ १९५७ ॥

वियोग न घडे सन्निध वसलें । अखंड राहिलें होय चित्तीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ विसरु न पडे विकल्प न घडे । आलें तें आवडे तया पंथें ॥ ध्रु. ॥
कामाचा विसर नाठवे शरीर । रसना मधुर नेणे फिकें ॥ २ ॥
निरोपासी काज असो अनामिक । निवडितां एक नये मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे हित चित्तें ओढियेलें । जेथें तें उगलें जावें यणें ॥ ४ ॥

॥ १९५८ ॥

आतां माझे सखे येती वा[3]रकरी । जीवा आस थोरी ला[4]गली ते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांगतील माझ्या निरोपाची मात । सकळ वृत्तांत माहेरींचा ॥ ध्रु. ॥
काय लाभ जाला काय होतें केणें । काय काय कोणें सांटविलें ॥ २ ॥
मागणें तें काय धाडिलें भातुकें । पुसेन तें सुखें आहेतसीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय सांगती ते कानीं । ऐकोनियां मनीं धरुनी राहें ॥ ४ ॥

॥ १९५९ ॥

काय करावें म्यां केले ते विचार । घडेल साचार काय पाहों ॥ १ ॥

---

१ पं. पूर्वकाळ.—२ त. ऐसा.—३ दे. त. वारेकरी.—४ पं. लागलीसे.

॥ ध्रु. ॥ काय मन नाहीं धरीत आवडी । प्रारब्धीं जोडी ते चि खरी ॥ ध्रु ॥

काय म्यां तेर्थांचें रांधिलें चाखोनि । तें हें करीं मनीं विवंचना ॥ २ ।

आणीक ही त्यासी बहुत कारण । बहु असे जिणें ओढीचें ही ॥ ३ ॥

तुका ह्मणे आह्मां बोळविल्यावरी । परती माघारी केली नाहीं ॥ ४ ॥

॥ १९६० ॥

आह्मां अरागूक संवसारा हातीं । पडिली नव्हती आजिवरी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पुत्रदाराधन होतों मनीं धंदा । गोविंयेलों सदा होतों कामें ॥ ध्रु ॥

वोडवलें ऐसें दिसतें कपाळ । राहिलें सकळ आवरोनि ॥ २ ॥

मागें पुढें कांहीं न दिसे पाहातां । तेथूनियां चिंता उपजली ॥ ३ ॥

तुका ह्मणे वाट पाह्याचें कारण । येथोचियां हिंणें जालें भाग्य ॥ ४ ॥

॥ १९६१ ॥

बहु दिस नाहीं माहेरिंची भेटी । जाली होती तुटी व्यवसायें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आपुलाल्या होतों गुंतलों व्यासंगें । नाहीं त्या प्रसंगें आठवलें ॥ ध्रु ॥

तोडिलें तुटतें जडती जडलें । आहे तें आपुलें आपणापें ॥ २ ॥

बहुं निरोपाचें पावलें उत्तर । जवळी च पर एक तें ही ॥ ३ ॥

काय जाणों मोह होईल सांडिला । बहु दिस तुटला तुका ह्मणे ॥ ४ ॥

१ त. परारब्धीं. पं. प्रारब्धें.–२ पं. होतीं.–३ पं. गोविंयेलें सदा होतें कामें ।.–४ पं. तेर्थांचिया.–५ त. हीन.–६ त. तोडिनां तुटातं०. दे. तुटातें. पं. तोडिलें तुटतें जोडिलें जडलें ।.–७ प. नाहीं.

॥ १९६२ ॥

होतीं नेणों जालीं कठिणें कठीण । जवळी च मन मनें ग्वाही ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मी होतों सोई सांडिला मारग । घडिलें तें मग तिकून ही ॥ ध्रु ॥
निश्चितीनें होते पुढिलांची सांडी । न चाली ते कोंडी मायबापा ॥ २ ॥
आह्मां नाहीं त्यांचा घडिला आठव । त्यांचा बहु जीव विखुरला ॥३॥
तुका ह्मणे जालें धर्मांचें माहेर । पडिलें अंतर आह्मांकूनि ॥ ४ ॥

॥ १९६३ ॥

आतां करावा कां सोस वांयांविण । लटिका चि सीण मनासी हा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ असेल तें कळों येईल लौकरी । आतां वारकरी आल्यापाठीं ॥ ध्रु ॥
बहु विलंबाचें सन्निध पातलें । धीराचें राहिलें फळ पोटीं ॥ २ ॥
चालिलें तें ठाव पावेल सेवटीं । पुरलिया तुटी पाउलांची ॥ ३ ॥
तुका ह्मणे आसे लागलासे जीव । ह्मणऊनि कींव भाकीतसें ॥ ४ ॥
॥ १९ ॥

॥ १९६४ ॥

भागलेती देवा । माझा नमस्कार घ्यावा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मी क्षेम कीं सकळ । बाळ अवघे गोपाळ ॥ ध्रु ॥
मारगीं चालतां । श्रमलेती येतां जातां ॥ २ ॥
तुका ह्मणे कांहीं । कृपा आहे माझ्या ठायीं ॥ ३ ॥

---

१ पं. नेणें. त. जाली नेणों.—२ पं. निश्चितीनें.—३ पं. “ कां ” नाहीं.

॥ १९६५ ॥

घालूनियां ज्योती । वाट पाहें दिवसराती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बहु उताविळ मन । तुमचें व्हावें दरुषण ॥ ध्रु ॥
आलों बोळवीत । तैसें या चि पंथें चित्त ॥ २ ॥
तुका ह्मणे पेणीं । येतां जातां दिवस गणीं ॥ ३ ॥

॥ १९६६ ॥

आजि दिवस धन्य । तुमचें जालें दरुषण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांगा माहेरींची मात । अवघा विस्तारीं वृत्तांत ॥ ध्रु ॥
आइकतों मनें । करूनि सादर श्रवण ॥ २ ॥
तुका ह्मणे नाम । माझा सकळ संभ्रम ॥ ३ ॥

॥ १९६७ ॥

बोलिलीं तीं काय । माझा बाप आणि माय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें सांगा जी झडकरी । तुह्मी सखे वारकरी ॥ ध्रु ॥
पत्राचें वचन । काय दिलें फिरावून ॥ २ ॥
तुका ह्मणे कांहीं । मना आणिलें कीं नाहीं ॥ ३ ॥

॥ १९६८ ॥

काय पाठविलें । सांगा भातुकें विठ्ठलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आसे लागलासे जीव । काय केली माझी कींव ॥ ध्रु ॥
फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ॥ २ ॥
तुका ह्मणे सांगा । कैसें आर्त पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १९६९ ॥

आजिचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें । सुखी जालें मन कल्पवेना ॥ १ ॥

---

१ त. पं. मनें.

॥ ध्रु. ॥ आर्तभूत माझा जीव जयांसाटीं । त्यांच्या जाल्या भेटी पायांसवें ॥ ध्रु ॥

वाटुलीं पाहातां सिणले नयन । बहु होतें मन आर्तभूत ॥ २ ॥

माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर । होइल समाचार सांगती तो ॥ ३ ॥

तुका ह्मणे भेटी निवारला[1] ताप । फळले[2] संकल्प संत आले ॥ ४ ॥

॥ १९७० ॥

आजि बरवें जालें । माझें माहेर भेटलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ डोळां देखिले[3] सज्जन । निवारला भाग सीण ॥ ध्रु ॥

धन्य जालों आतां । क्षेम देऊनियां संतां ॥ २ ॥

इच्छेचें पावलों । तुका ह्मणे धन्य जालों ॥ ३ ॥

॥ १९७१ ॥

वोरसोनि येती । वत्सें[4] धेनुवेच्या चित्तीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझा[5] कराया सांभाळ । वोरसोनियां कृपाळ ॥ ध्रु ॥

स्नेहें भूक तान । विसरती जाले सीण ॥ २ ॥

तुका ह्मणे कौतुकें । दिलें प्रेमाचें भातुकें ॥ ३ ॥

॥ १९७२ ॥

आलें तें आधीं खाईन भातुकें । मग कवतुकें गाईन ओव्या ॥ १ ॥

सांगितला आधीं आइकों निरोप । होइल माझा बाप पुसे[6] तो तें ॥२॥

तुका ह्मणे माझे सखे वारकरी । आले हे माहेरीहून आजि ॥ ३ ॥

---

१ त. निरसला पं. निवाला.—२ दे. त. फळलें.—३ पं. देखिला.—४ पं. वत्स.—५ पं. करावा.—६ पं. पुसे तो चि. दे. पुंसें तों तें.

॥ १९७३ ॥

आमुप जोडल्या सुखाचिया रासी। पार त्या भाग्यासी नाहीं आतां ॥१॥
काय सांगों सुख जालें आलिंगनें[1] । निवाली दर्शनें कांति माझी ॥ २ ॥
तुका ह्मणे योंच्या[2] उपकारासाटीं । नाहीं माझे गांठी कांहीं एक ॥३॥

॥ १९७४ ॥

पवित्र व्हावया घालीन लोळणी । ठेवीन चरणीं मस्तक हें ॥ १ ॥
जोडोनि हस्तक करीन विनवणी । घेइन पायवणी धोवोनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें भांडवल सुचें । संतां हें ठायींचें ठावें आहे ॥ ३ ॥

*पत्राचे अभंग समाप्त । ३६ । १९ । ११ ॥ ६६ ॥

॥ १९७५ ॥

मना एक करीं । ह्मणें[3] जाइन पंढरी ।
उभा विटेवरी । तो पाहेन[4] सांवळा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करीन सांगसी[5] तें काम । जरी जपसी हें नाम ।
नित्य वाचे राम । हरि कृष्ण गोविंदा[6] ॥ ध्रु ॥
लागें[7] संतांचिया पायां । कथे उल्हास गावया ।
आलों मागावया । शरण देईं उचित ॥ २ ॥
नाचें रंगीं[8] वाहें टाळी । होय सादर ते काळीं ।
तुका ह्मणे मळी । सांडूनियां अंतरीं[9] ॥ ३ ॥

॥ १९७६ ॥

न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं[10] त्रिपुटी ।

---

१ दे. आलिंगन.—२ पं. त्याच्या.—३ दे. त. ह्मणे. पं. ह्मणे मी जाईन०.—४ पं. पाहिन.—५ दे. सांगती.—६ पं. गोविंद.—७ पं. लागन.—८ पं. रंगें.—९ पं. अंतरींची.—१० पं. क्षीरसागरा.—* संतांबरोबर पाठविल्या पत्राचे अ० ३६; या पत्राच्या उत्तराच्या मार्गप्रतीक्षेचे अ० १९; व संत परत आले त्यांची भेट झाली ते अभंग ११; एकंदर अभंग ६६.

जाय तेथें[1] दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ भाविक गे माये भोळें[2] गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ ध्रु ॥

जो नातुडे कवणिये परी । तपें दानें व्रतें थोरी ।
ह्मणतां[3] वाचे हरि । राम कृष्ण गोविंदा[4] ॥ २ ॥

चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं ।
करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची[5] ॥ ३ ॥

जया रूप ना आकार । धरी नाना अवतार ।
घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ४ ॥

ऐसा भक्तांचा ऋणी । पाहातां आगमीं पुराणीं ।
नाहीं तुका ह्मणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ५ ॥

॥ १९७७ ॥

स्वल्प वॉट[6] चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुह्मी आह्मी खेळीमेळीं । गदा रोळी आनंदें ॥ ध्रु ॥

ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ॥ २ ॥

तुका ह्मणे हें चि नीट । जवळी वाट[7] वैकुंठा ॥ ३ ॥

॥ १९७८ ॥

आनंदाच्या कोटी । सांटवल्या आह्मां पोटीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ प्रेम[8] चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ ध्रु ॥

अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ॥ २ ॥

थडी आहिक्य परत्र । तुका ह्मणे सम तीर ॥ ३ ॥

---

१ त. जेथें.—२ पं. भोळया.—३ पं. वाचे ह्मणतां हरि०. त० ह्मणतां नाचे हरि०.—४ पं. गोविंद.—५ पं. राहिची.—६ पं. वाटे.—७ पं. वाटे वैकुंठ.—८ पं. प्रेमा.

॥ १९७९ ॥

चाहाडाची माता । व्यभिचारीण तत्त्वता ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पाहे संतांचें उणें । छिद्र छळावया सुनें ॥ ध्रु ॥

जागों[1] त्याच्या बाचें । कांहीं सोडिलें गाठीचें ॥ २ ॥

तुका ह्मणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥ ३ ॥

॥ १९८० ॥

सापें ज्यासी खावें । तेणें प्राणासी मुकावें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंकी जन ॥ ध्रु ॥

विंचु होणी[2] नांगी । अग्न लावी आणिकां अंगीं ॥ २ ॥

तुका ह्मणे जाती । नरका पाउलीं चालती ॥ ३ ॥ ॥ ६ ॥

## ॥ स्वामींनीं स्त्रीस उपदेश केला ते अभंग ॥ ११ ॥

॥ १९८१ ॥

पिकल्या[3] सेताचा आह्मां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सत्तर टके बाकी उरली मागे तो हा । मागें झडले दाहा आजिवरी ॥ ध्रु ॥

हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज । माजघरीं बाजे[4] बैसलासे ॥ २ ॥

मज यासी भांडतां जाब नेदी बळें । ह्मणे ऐका[5] वेळे घ्याल वांटा ॥ ३ ॥

तुका ह्मणे स्त्रिये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ॥ ४ ॥

॥ १९८२ ॥

करितां विचार अवघें एक राज्य[6] । दुजा कोण मज पाठी घाली ॥ १ ॥

---

१ दे. "जेणों" (जणों!).—२ दे. हाणें.—३ पं. केल्या.—४ त. वाज.—५ पं. एक वेळे.—६ त. राज.

॥ ध्रु. ॥ कोण्या रीती जावें आह्मी वो पळोनि । मोकळे[1] अंगणीं मागें पुढें ॥ ध्रु ॥
काय तें गव्हाणें हिंडावीं वो किती । दूत ते लागती याचे[2] पाठी ॥ २ ॥
कोठें याची करूं गेलों[3] कुळवाडी । आतां हा न सोडी जीवें आह्मां ॥३॥
होऊनि बेबाख[4] येथें चि राहावें । देईल तें खावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १९८३ ॥

नागवूनि एकें नागवीं च केलीं । फिरोनियां आलीं नाहीं येथें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भेणें सुती कोणी न घेती पालवीं । करूनियां गोवी निसंतान ॥ध्रु॥
एकें तीं गोविलीं घेऊनि जमान । हांसतील जन लोक तयां ॥ २ ॥
सरले तयांसी घाली[5] वैकुंठीं । न सोडी हे साटी जीवें[6] जाली ॥३॥
तुका ह्मणे जालों जाणोनि नेणतीं । सांपडलों हातीं याचे आह्मी ॥४॥

॥ १९८४ ॥

आतां तूं तयास होईं वो उदास । आरंभला नास माझ्या जीवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जरूर हें जालें मज कां नावडे । उपास रोकडे येती आतां ॥ ध्रु ॥
बरें म्यां तुझिया जीवाचें तें काय । व्हावें तें[9] हें पाहें विचारूनि ॥२॥
तुज[7] मज तुटी नव्हे या विचारें । साहित लेंकुरें[10] राहों सुखें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरी तुझा माझा[8] संग । घडेल वियोग कधीं नव्हे ॥ ४ ॥

॥ १९८५ ॥

काय करूं आतां माझिया संचिता । तेणें जीवविता साटी केली ॥ १ ॥

---

१ त. मोकळा. दे. मोकळ.—२ दे. याच.—३ दे. केलों—४ पं. बोख.—५ पं. घालितो—६ पं. जाली जीवें.—७ पं. तुज.—८ त. पं. मा.—९ दे. हें तें.—१० पं. लेकरें.

॥ ध्रु. ॥ न ह्मणावें कोणी माझें हें करणें । हुकुम तो येणें देवें केला ॥ ध्रु ॥

करूनि मोकळा सोडिलों भिकारी । पुरविलीं तरी पाठी माझी ॥ २ ॥

पाणिया भोंपळा जेवावया पानें । लाविलीं वो येणें देवें आह्मां ॥ ३ ॥

तुका ह्मणे यासी नाहीं वो करुणा । आहे नागवणा ठावा मज ॥ ४ ॥

॥ १९८६ ॥

नको धरूं आस व्हावें या बाळांस । निर्माण तें त्यांस[1] त्यांचें आहे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आपुला तूं[2] गळा घेईं उगवूनि । चुकवीं जाचणी गर्भवास ॥ ध्रु ॥

ऐवज[3] देखोनि बांधितील गळा । ह्मणोनि निराळा पळतसें[4] ॥ २ ॥

देखोनियां त्यांचा अवघड मार । कांपे थरथर जीव माझा ॥ ३ ॥

तुका ह्मणे जरी आहे माझी चाड । तरी करीं वाड चित्त आतां ॥ ४ ॥

॥ १९८७ ॥

भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेंकुरें जालीं मज ॥ ध्रु ॥

आस निरसूनि कठिण हें मन । करीं वो समान वज्र तैसें ॥ २ ॥

किंचित हें सुख टाकीं वो थुंकोनि । पावसील धनी परमानंद ॥ ३ ॥

तुका ह्मणे थोर चुकती[5] सायास । भवबंधपाश[6] तुटोनियां ॥ ४ ॥

॥ १९८८ ॥

ऐक हें सुख होईल दोघांसी । सोहळा[7] हे ऋषि करिती देव ॥ १ ॥

---

१ पं. त्यांचें त्यांस.—२ पं. तो.—३ दे. त. अवेज.—४ दे. त. पं. पळतुसें. ५ पं. चुकती वो सत्यास ।.—६ दे. त. भवबंद पाश. ७ पं. सोहळे.

॥ ध्रु. ॥ जडितविमानें बैसविती मानें । गंधर्वांचें गाणें नामघोष ॥ ध्रु ॥
संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्वसुखा पुरे कोड तेथें ॥ २ ॥
आलिंगूनि लोळों[1] त्यांच्या पायांवरी । जाऊं तेथवरी मायबापें[2] ॥ ३ ॥
तुका ह्मणे तया सुखा वर्णूं काय । जेव्हां बापमाय देखें[3] डोळां ॥ ४ ॥

॥ १९८९ ॥

देव पाहावया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत[4] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दिन शुद्ध[5] सोम सकाळीं पातला । द्वादशी घडला पर्वकाळ ॥ ध्रु ॥
द्विजां पाचारूनि शुद्ध करीं मन । देई वो हें दान यथाविध ॥ २ ॥
नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुरी सांगतों पाल्हाळीं । परी तो जवळी आहे आह्मां ॥ ४ ॥

॥ १९९० ॥

सुख हें नावडे आह्मां कोणां[6] बळें ॥ नेणसी अंधळे[7] जालीशी तूं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भूक तान कैसी राहिली निश्चळ । खुंटलें चपळ मन ठायीं ॥ ध्रु ॥
द्रव्य जीवाहूनि आवडे या जना । आह्मांसी पाषाणाहूनि हीन ॥ २ ॥
सोइरे सज्जन जन आणि वन । अवघें समान काय गुणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां जवळी च आहे[8] । सुख दुःख साहे पांडुरंग ॥ ४ ॥

॥ १९९१ ॥

गुरुरूपे मज बोलविलें देवें । होईल हें[9] घ्यावें हित कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सत्य देवें माझा केला अंगीकार । आणीक विचार नाहीं आतां[10] ॥ ध्रु ॥

१ पं. लोळें.—२ पं. मायबाप.—३ पं. देखों.—४ पं. नाशिवंत.—५ पं. सोम शुद्ध.—६ पं. कोण्या.—७ दे. अंधळें.—८ पं. आहे.—९ पं. तें.—१० पं. दुजा.

होई बळकट घालूनियां कास । हा चि उपदेश तुज आतां ॥ २ ॥
सडा संमार्जन तुळसीवृंदावन । अतीतपूजन ब्राह्मणाचें ॥ ३ ॥
वैष्णवांची दासी होई सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥ ४ ॥
पूर्णबोध स्त्रीभ्रतारसंवाद । धन्य जिहीं वाद आइकिला ॥ ५ ॥
तुका ह्मणे आहे पांडुरंगकथा । तरेल जो चित्ता धरील कोणी ॥ ६ ॥
॥ ११ ॥

॥ ११९२ ॥

खडा खाळी साकर जाला नामाचा चि फेर ।
न दिसे अंतर । गोडी ठायीं निवडितां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मी आह्मी पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा ।
चाळविलें जगा । मी हें माझें यासाटीं ॥ ध्रु ॥
पायीं हातीं नाकीं शिरीं । हेम राहे अळंकारीं ।
मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें ॥ २ ॥
निजलिया लाभ हानी । तों च खरी ते स्वप्नीं ।
तुका ह्मणे दोन्ही । निवारलीं जागतां ॥ ३ ॥

॥ ११९३ ॥

आह्मी जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव ।
बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप ।
नव्हतों आह्मी आप । आपणासी देखिलें ॥ ध्रु ॥
एके ठायीं घरिच्याघरीं । न कळतां जाली चोरी ।

---

१ दे. जाळविलें.—२ त. साजे.

१ दे. जाळविलें.—२ त. साजे.

तेथें[1] तें चि दुरी । जाणें येणें खुंटलें ॥ २ ॥
तुका ह्मणे धरूनि हातीं । उेर[2] ठेविली मागुतीं ।
एकांतीं लोकांतीं । देवँभक्तिसोहळा[3] ॥ ३ ॥

॥ १९९४ ॥

कांहीं बोलिलों बोबडें । मायबापा तुह्मांपुढें ।
सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय जाणावा महिमा । तुमचा म्यां पुरुषोत्तमा ॥
आवडीनें सीमा । सांडविली मज हातीं ॥ ध्रु ॥
घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें[4] बापासी न भ्यावें ।
काय म्यां सांगावें । आहे ठावें तुह्मासी ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । प्रेम लोभ न संडावा ।
पाळिला पाळावा । ळळा पुढती आगळा ॥ ३ ॥

॥ १९९५ ॥

बहु भितों जाणपणा । आड न यो नारायणा ।
घेइन प्रेमपान्हा । भक्तिसुख निवाडें ॥ १ ॥
यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं ।
काला भात दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ ध्रु ॥
निमिषार्ध[5] संतसंगति । वास वैकुंठीं कल्पांतीं ।
मोक्षपदें होतीं[6] । ते विश्रांति बापुडी ॥ २ ॥
तुका ह्मणे हें चि देईं । मीतूंपणा खंड नाहीं ।

---

१ पं. तेथें चि दुसरी । जाणें०.—२ पं. उरी.—३ त. देवभक्त सोहळा.—४ त. बापें बाळ्ठासी निभावें. दे. "बाळें बापासी न भ्यावें" असें असतां मागून त. प्रमाणें केलें आहे.—५ त. पं. निमिष्यार्ध. दे. निमिशा अर्ध.—६ पं. येती । त्या विश्रांति०.

बोलिलों त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥ ३ ॥

॥ ४ ॥

॥ १९९६ ॥

देवा आतां ऐसा करीं उपकार । देहा[1]चा विसर पाडीं मज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरीं च हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥ ध्रु ॥
ठाव देईं चित्ता रा[2]खें पायांपाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ॥ २ ॥
आ[3]स भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा मा[4]झा ॥३॥
मागणें तें एक हें चि आहे आतां । नाम मुखीं सं[5]तसंग देईं ॥ ४ ॥
तुका ह्मणे नको वरपंग देवा । घे[6]ईं माझी सेवा भावशुद्ध ॥ ५ ॥

॥ १९९७ ॥

तुज न कारितां काय नव्हे एक । हे तों सकळिक संतवाणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घेईं माझा भार करीं कइवार । उतरीं हा पार भवसिंधु ॥ ध्रु॥
उचित अनुचित पापपुण्यकाला । हाँ तों नये मला निवडितां ॥ २ ॥
कुंटित राहिली बोलतां बोलतां । पार न पवतां वाणी पुढें ॥ ३ ॥
पुसतां ही कोणां न कळे हें गुज । राखें आतां लाज पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका ह्मणे बहु पाहिलें या जीवें । वर्म जालें जी ठावें नाम तुझें ॥५॥

॥ १९९८ ॥

मज त्याची भीड नुलंघवे देवा । जो ह्मणे केशवा दास तुझा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मज आवडती बहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥ध्रु॥
सांडूनियां लाज नाचेन त्यांपुढें । आइकतां कोडें नाम तुझें ॥ २ ॥

---

१ दे. त. देहेचा.–२ दे. त. राख.–३ दे. असे भय आतां लाज०. त. आशाभय०.–४ पं. मज.–५ पं. त. संतासंग. (संतां संग?).–६ पं. घ्यावी.–७ पं. हें.

न लगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांच्या घरीं उष्टावळी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाणों उचित अनुचित । विचारूनि हित तें चि करूं ॥ ४ ॥

॥ १९९९ ॥

तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आह्मां अंधां तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां[1] ॥ ध्रु ॥
मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥ २ ॥
पापपुण्य भेद नासिलें तिमिर । त्रिगुण[2] शरीर सांडियेलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा शरणागत ॥ ४ ॥

॥ २००० ॥

जेथें जातों तेथें[3] तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चालों वाटे आह्मी तुझा चि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ ध्रु ॥
बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों[4] देवा ॥ २ ॥
अवघे[5] जन मज जाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां खेळतों कौतुकें । जालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ४ ॥

॥ २००१ ॥

जालें पीक आह्मां अवघा सुकाळ । घेऊं अवघा काळ प्रेमसुख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाली अराणुक अवघियांपासून । अवघा गेला सीण भाग आतां ॥ ध्रु ॥
अवघा जाला आह्मां एक पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ॥ २ ॥

---

१ दे. त. चाळवितां.—२ त. पं. त्रिगुणें.—३ त. ०तेथें तुझा च सांगाती.—४ पं. केलें.—
५ दे. अवघें.

अवघे चि आह्मी ल्यालों अळंकार । शोभलों हि फार अवघ्यांवरी ॥३॥
तुका ह्मणे आह्मी सदैवांचे[1] दास । करणें न लगे आस आणिकांची ॥४॥
॥ ६ ॥

॥ २००२ ॥

साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण[2] सेवकें स्वामिसत्ता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्मरसें अलिप्त त्या ॥ध्रु॥
सांगणें[3] तें नाहीं करणें आपण । मोलही वचन बाध जालें[4] ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मां भांडवल हातीं । येरझारा खाती केवढियें ॥ ३ ॥

॥ २००३ ॥

शुभ जाल्या दिशा अवघा चि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे ते ही ॥ध्रु॥
सुख दुःखाहूनि नाहीं विपरीत । देतील आघात हितफळें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां आह्मांसी हें भलें । अवघे चि जाले जीव जंत ॥ ३ ॥

॥ २००४ ॥

पाप पुण्य दोन्ही वाहातीं मारग । स्वर्गनर्कभोग यांचीं[5] पेणीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एका आड ऐक[6] न लगे पुसावें । जेविल्या देखावें मागें भूक ॥ ध्रु ॥
राहाटीं पडिलें भरोनियां रितीं । होतील मागुतीं येतीं जातीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी खेळतियांमधीं । नाहीं केली बुद्धि स्थिर पाहों ॥३॥
॥ ३ ॥

---

१ पं. देवाचे. दे. सदेवांचे.—२ पं. प्रधान सेवकें.—३ दे. सांगणें तें तें नाहीं०.—४ पं. जालों.—५ पं. यांची खाणी.—६ पं. एका.

॥ २००५ ॥

हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव[1] देहीं[2] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हा चि एक धर्म निज बीजवर्म । हें चि जाळी कर्मे केलीं महा ॥ ध्रु ॥

चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ २ ॥

अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका ह्मणे गंगे मिळणी सिंधु ॥ ३ ॥

॥ २ ॥

॥ २००६ ॥

माझिये जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आवडे ज्या हरि अंतरापासूनि । ऐसियांचें[3] मनीं आर्त माझें ॥ ध्रु ॥

तयालागीं जीव होतो कासावीस । पाहातील वास नयन हे ॥ २ ॥

सुफळ[4] हा जन्म होईल तेथूनं[5] । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ३ ॥

तुका ह्मणे तो चि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरि ॥ ४ ॥

॥ २००७ ॥

आमुचें जीवन हें कथाअमृत । आणिक ही संतसमागम ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ ध्रु ॥

घालिया ढेंकर येती आनंदाचे । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥ २ ॥

पिकलें स्वरूप आलिया घुंमरी[6] । राशी ते अंबरीं न समाये ॥ ३ ॥

मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २००८ ॥

जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥ १ ॥

---

१ त. पं नाठवती .—२ त. देहभाव देहीं.—३ त. दे. ऐसियाचे मनीं आर्त माझें.—४ त. सफळ.—५ पं. येथून.—६ दे. घुंमरि.

॥ ध्रु. ॥ सिंचन सारूनि बांधिलें भरणें । तुंबिलें जीवन सांक्षेपें हें ॥ ध्रु ॥
शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाहीं एक जालें ॥ २ ॥
बीज तो अंकुर पत्र शाखा फळें । प्राप्तबीज मुळें अवघें नासे ॥ ३ ॥
तुका ह्मणे नामीं राहिलीसे गोडी । बीजांच्या परवडी होती जाती ॥ ४ ॥

॥ २००९ ॥

भक्तिभाव आम्हीं बांधिलासे गांठीं । सौदाविती हाटीं घ्या रे कोणी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सुखाचिया पेठे घातला दुकान । मांडियेलें वान रामनाम ॥ ध्रु ॥
सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवसिंधु ॥ २ ॥
मागें भाग्यवंत जाले थोर थोर । तिहीं केला फार हा चि सांटा ॥ ३ ॥
खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका ह्मणे चित्त शुद्ध करीं ॥ ४ ॥

॥ २०१० ॥

पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भूमि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बीज तें चि फळ येईल शेवटीं । लाभहानितुटी ज्याची तया ॥ ध्रु ॥
दीपाचिये अंगीं नाहीं दुजाभाव । धणी चोर साव सारिखे चि ॥ २ ॥
काउळें टोपरा कंकर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ॥ ४ ॥

॥ २०११ ॥

धीर तो कारण एकविधभाव । पतिव्रते नांहो सर्वभावें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चातक हें जळ न पाहाती दृष्टीं । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥ ध्रु ॥

---

१ त. आक्षेप हें. दे. आक्षेप हें.—२ त. आच्छादिलें फळ । प्राप्तबीजें मूळ अवघें०.—३ पं. मूळ. ४ पं—गोडी जाती.—५ दे. त. सांघाविती.—६ दे त. पं. प्रजन्यें.—७ दे. "नाहीं" शब्द नाहीं.—८ पं. चोर आणि साव सारिखाची ।.—९ पं. करकर तीतरा. त. कंकर तित्तरा. दे. कंकर तितरा. —१० त. नाम्हो.

सूर्यविकासिनी[1] नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्तउदयाची ॥ २ ॥
धेनु येऊं नेदी जवळी आणिकां । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥ ३ ॥
तुका ह्मणे नेम प्राणांसवेंसाटी[2] । तरी[3] च या गोष्टी विठोबाची ॥ ४ ॥
॥ ६ ॥

॥ २०१२ ॥

नामें[4] स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आणिकें दुरावलीं करितां खटपट । वांउगे[5] बोभाट वर्माविण ॥ध्रु॥
रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ॥ २ ॥
तुका ह्मणे केलें कळिकाळ[6] ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥ ३ ॥

॥ २०१३ ॥

वैष्णवांची कीर्ती गाइली पुराणीं । साही अठरांजणीं चहूं वेदीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसे कोणी दावा ग्रंथांचे वाचक । कर्मठ[7] धार्मिक पुण्यशील ॥ ध्रु ॥
आदिनाथ शंकर नारद मुनीश्वर[8] । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ॥२॥
तुका म्हणे मुगुटमणी हे भक्ति । आणीक विश्रांति आरतिया[9] ॥ ३ ॥

॥ २०१४ ॥

बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुम्हां ठावें जातिकुळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरि ॥ ध्रु ॥
वाचेचा चाळक जाला दावी वर्म[10] । उचित ते धर्म मजपुढें ॥ २ ॥
तुका म्हणे घडे अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥ ३ ॥

॥ २०१५ ॥

संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं परोवरीं[11] लोळतसें ॥ १ ॥

---

१ दे. सूर्यविकाशनी. त. ० विकासनी. पं. विकाशिनी.—२ पं. प्राणासंवसाटी.—३ पं. तरि च माझ्या गोष्टी. ०—४ दे. त. रामें.—५ पं. वाउगा.—६ त. कळिकाळा.—७ पं. कार्मिष्ठ.—८ दे. त. पं. मुनेश्वर.—९ दे. अरातिया.—१० पं. कर्में.—११ त. परवरी.

॥ ध्रु. ॥ चरणींचे रज लागती अंगास । तेणें बेताळीस उद्धरती ॥ ध्रु ॥

उच्छिष्ट हें जमा करूनि पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ॥ २ ॥

तुका म्हणे मी[1] आणीक विचार । नेणें हें चि सार मानीतसें ॥ ३ ॥

॥ ४ ॥

॥ २०१६ ॥

एक शेरा अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कां रे[2] तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥ ध्रु ॥

औटें[3] हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥ २ ॥

तुका म्हणे श्रम । एक विसरतां राम ॥ ३ ॥

॥ २०१७ ॥

आलें धरायेच[4] पेंठे । पुढें मागुतें[5] न भेटे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ होसी फजीती वरपडा । लक्ष चौऱ्यासींचे वेढां ॥ ध्रु ॥

नाहीं कोणांचा सांगात[6] । दुःख भोगितां आघात ॥ २ ॥

एका पाउलाची वाट । कोणां सांगावा बोभाट ॥ ३ ॥

जुंतिजेसी[7] घाणां । नाहीं मारित्या करुणा ॥ ४ ॥

तुका म्हणे हित पाहें । जोंवरि हें हातीं आहे ॥ ५ ॥

॥ २०१८ ॥

लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी ।

मनुष्यदेहा ऐसी । उत्तमजोडी जोडिली ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ घेई हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें ।

जालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ॥ ध्रु ॥

---

१ त. मज.–२ पं. काय तृष्णा.– ३ दे. ओट.– ४ पं. भरायेचि. दे. धरायच पेंठ.– ५ पं. मागुती.–६ पं सांगत –७ पं. जुतिजेसी.

घेउनि माप हातीं । काळ मोवी दिवस राती ।
चोर लाग घेती । पुढें तैसें पळावें ॥ २ ॥
हित सावकासें[1] । ह्मणे करीन तें पिसें ।
हातीं काय ऐसें । तुका ह्मणे नेणसी ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

॥ २०१९ ॥

सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥ १ ॥
॥ धु. ॥ मनें धरिला अभिळास[2] । मिठी घातली पायांस ॥ ध्रु
होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥ २ ॥
तुका ह्मणे जाला । लाभें लाभ दुणावला ॥ ३ ॥

॥ २०२० ॥

झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कइंचा ॥ १ ॥
॥ धु. ॥ जो हें माप तोंडें धरी । सळे जाली ते आवरी ॥ ध्रु ॥
जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥ २ ॥
तुका ह्मणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥ ३ ॥

॥ २०२१ ॥

आह्मी बोलों तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ॥ १ ॥
॥ धु. ॥ काय परिहाराचें काम । जाणे अंतरींचें राम ॥ ध्रु ॥
कळोनियां काय चाड । माझी लोकांसी बडबड ॥ २ ॥
कारण सर्वे एका । अवघें आहे ह्मणे तुका ॥ ३ ॥

---

१ त. पं. सावकाशें.—२ पं. अभिलाष.

॥ २०२२ ॥

उमटे तें ठायीं । तुझे निरोपावें पायीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आह्मीं करावें चिंतन । तुझें नामसंकीर्तन ॥ ध्रु ॥

भोजन भोजनाच्या काळीं । मागों करूनियां आळी ॥ २ ॥

तुका ह्मणे माथां । भार तुझ्या पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ २०२३ ॥

केला पण सांडी । ऐसियासी ह्मणती लंडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥ ध्रु ॥

आपला निवाड । आपण चि करितां गोड ॥ २ ॥

तुह्मीं आह्मीं देवा । बोलिला बोल सिद्धी न्यावा ॥ ३ ॥

ऐसें भुर उणें । मागें सरे तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २०२४ ॥

न व्हावें तें जालें । तुह्मां आह्मांसी लागलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां हालमाकलमें । भांडोनियां काढूं वर्मे ॥ ध्रु ॥

पाटोळियासर्वेसाटी । दिली रंगटयाची गांठी ॥ २ ॥

तुका ह्मणे हरी । आणूनियां करिन सरी ॥ ३ ॥

॥ २०२५ ॥

पतितमिरासी । ते म्यां धरिली जीवेंसी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां बळिया सांग कोण । ग्वाही तुझें माझें मन ॥ ध्रु ॥

पावनाचा ठसा । दावीं मज तुझा कैसा ॥ २ ॥

१ दे. आपणें.—२ त. ऐसें. दे. पं. आसे.—३ पं. आह्मां तुह्मांसी.—४ पं. पाटोळ्यासं साटी.—५ पं. रकटयाची.—६ दे. पावणांचा. त. पावणाचा.

[1]वाव तुका ह्मणे जालें । रोख पाहिजे दाविलें ॥ ३ ॥

॥ २०२६ ॥

करितां वेरझारा । उभा न राहासी वेव्हारा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ हे तों झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥ ध्रु ॥

[2]ओरोगुनी मुग । बैसलासी जैसा बग ॥ २ ॥

तुका ह्मणे किती । बुडविलीं आळवितीं ॥ ३ ॥

॥ २०२७ ॥

नाहीं देणें घेणें । गोंवी[3] केली अभिमानें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां कां हो निवडूं नेदां । पांडुरंगा येवढा धंदा ॥ ध्रु ॥

पांचांमधीं जावें । थोड्यासाटीं फजित व्हावें ॥ २ ॥

तुज ऐसीं नाहीं । पांडुरंगा आह्मी कांहीं ॥ ३ ॥

टाकूं तो वेव्हार । तुज बहु करकर ॥ ४ ॥

तुका ह्मणे आतां । निवडूं संतां हें देखतां ॥ ५ ॥ ॥ ९ ॥

॥ २०२८ ॥

सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे[4] सकळ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नको पृथकाचे[5] भरी । पडों एक मूळ धरीं ॥ ध्रु ॥

पाणचोऱ्याचें[6] दार । वरिल दाटावें तें थोर ॥ २ ॥

वश[7] जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥ ३ ॥

एक चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ॥ ४ ॥

तुका ह्मणे धांवा । आहे पंढरी[8] विसांवा ॥ ५ ॥

---

१ पं. "वाव" नाहीं.—२ दे. त. आरगुगी.—३ पं. गोंवा केला अभिमानें.—४ दे. त. पं. वोल्हावे.—५ पं. पृथुकाचे.—६ पं. पानचोऱ्याचें तें द्वार ।.—७ दे. त. पं. वश्य.— ८ दे. पंढरिये.

॥ २०२९ ॥

करूं याची कथा नामाचा गजर । आह्मां संवसार काय करी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ह्मणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तयाभेणें कळिकाळ ॥ ध्रु ॥

आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥ २ ॥

तुका ह्मणे करूं ऐसियांचा संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥ ३ ॥

॥ २ ॥

॥ २०३० ॥

काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥ ध्रु ॥

काय उंदीर नाहीं भोंवीं । राख लावी गाढव ॥ २ ॥

तुका ह्मणे गुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ३ ॥

॥ २०३१ ॥

मद्यें मातलें नागवें नाचे । अनुचित वाचे बडबडी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी धीट ॥ ध्रु ॥

आलें अंगासी तें बळिवंत गाढें । काय वेड्यापुढें धर्मनीत ॥ २ ॥

तुका ह्मणे कळों येईल तो भाव । अंगावरि घाव उमटतां ॥ ३ ॥

॥ २ ॥

॥ २०३२ ॥

सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥ ध्रु

अमृतें सागर भरवती गंगा । ह्मणवेल उगा राहें काळा ॥ २ ॥

१ त. पं. पोसयाचा.—२ पं नाहिडवी ।.—३ दे. त. अंगावरिल.—४ दे. भरवे ती.

भूत भविष्य कळों येईल वर्तमान । करवती प्रसन्न रिद्धिसिद्धी ॥ ३ ॥
स्छान मान कळों येती योगमुद्रा । नेववेल वारा ब्रह्मांडासी ॥ ४ ॥
तुका ह्मणे मोक्ष राहे ऑलीकडे[1] । इतर बापुडें काय तेथें ॥ ५ ॥
॥ १ ॥

॥ २०३३ ॥

भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेविती[2] कवतुकें धणीवरि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती ते[3] पदें सकुमारें ॥ ध्रु ॥
विसरले मुक्ती भक्तिअभिळासें[4] । ओढत सारिसें सुख[5] आलें ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ३ ॥

॥ २०३४ ॥

भक्तां समागमें सर्वभावें हरि । सर्व काम करी न सांगतां[6] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सांटवला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥ ध्रु ॥
मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥ २ ॥
तुका ह्मणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि[7] ते कांहीं न मागती[8] ॥ ३ ॥

॥ २०३५ ॥

प्रेमअमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सकळ ही तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ ध्रु ॥
सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप माजी तया ॥ २ ॥
तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ३ ॥
॥ ३ ॥

---

१ पं. ऐलीकडे.—२ दे. त. सेवितु.—३ प. ते पदें सकुमार.—४ पं. अभिळाष.—५ दे. त. सुखा.—६ दे. संगतां.—७ पं. ठेवूनियां कांहीं.—८ दे. मगती.

॥ २०३६ ॥

कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥ ध्रु ॥
नष्टदुष्टपण कवणाचें वाणूं । तयाहून अणु अधिक माझें ॥ २ ॥
कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिये ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी भांडवलें पुरता । तुंजसी पंढरिनाथा लावियेलें ॥ ४ ॥
॥ १ ॥

॥ २०३७ ॥

काळ जवळि च उभा नेणां । घाली झांपडी खुंटी कानां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कैसा हुशार सावध राहीं । आपुला तूं अपुलेठायीं ॥ ध्रु ॥
काळ जवळिच उभा पाहीं । नेदि कोणासि देऊं कांहीं ॥ २ ॥
काळें पुरविली पाठी । वरुषें जालीं तरी साठी ॥ ३ ॥
काळ भोंवताला भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ॥ ४ ॥
तुका ह्मणे काळा । कर्म मिळेनें तें जाळा ॥ ५ ॥ ॥ १ ॥

॥ २०३८ ॥

दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्यलाभ पुण्य त्याचें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकांवारि ॥ ध्रु ॥
मळ खाये संवदणी । करी आणिकांची उजळणी ॥ २ ॥
तुका ह्मणे त्याचा । प्रीती आदर करा साचा ॥ ३ ॥

॥ २०३९ ॥

साहोनियां टांकीघाये । पाषाण देव चि जाला पाहें ॥ १ ॥

१ दे. आनु. पं. अनु.—२ पं. तुज.—३ पं. मिळत.

॥ ध्रु. ॥ तया रीती दृढ मन । करीं साधाया कारण ॥ ध्रु ॥
बाण शस्त्र साहे गोळी । शूरां[1] ठाव उंच स्थळीं ॥ २ ॥
तुका ह्मणे सती । अग्नि[2] न देखे ज्या रीती ॥ ३ ॥ ॥ २ ॥

॥ २०४० ॥

तेणें वेशें माझीं चोरिलीं अंगें । मानावया जग आत्मैपणें[3] ।
नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें ।
भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एक चि पैणें[4] ।
विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं । भागलीं नुठित तेणें ॥ १ ॥
॥ ध्रु. आतां त्यांसीं काय चाले माझें बळ । जालोंसें दुर्बळ सत्त्वहीन ।
दग्ध पट दिसे संगीत बरवंट । काय त्याचें कारण ॥ ध्रु ॥
आळसें दृष्टी न पाहे आपुलें । एक चि देखिलें सर्वरूप ।
मानामान तेथें खुंटोनि राहिलें । पिशुन[6] तो कोण बाप ।
ज्योति ना अंधार अवघा एकंकार । तेथें काय पुण्यपाप ।
विठ्ठलावांचुनि कांहीं च नावडे । वेगळाल्या भावें रूप ॥ २ ॥
बळबडिवार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया ।
सुखदुःखाची वार्ता नाइके । अंतरलों दुरी तया ।
मीतूंपणनिष्काम[7] होऊनि । राहिलों आपुलिया ठायां ।
तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका ह्मणे देवराया ॥ ३ ॥ ॥ १ ॥

॥ २०४१ ॥

कथा पुराण[8] ऐकतां । झोपें[9] नाथिलें तत्त्वता ।

---

१ दे. सुरां. त. पं. शुरां.—२ त. "अगन" असें मागून केलें आहे.—३ त. आत्मैपणें. दे. "आत्मैपणें" असतां मागून "आतमपणें" केलें आहे. पं. आपणें.—४ पं. पेंण.—५ पं. दुरोनि.—६ दे. त. पिसुन. पं. पिसुण.—७ दे. पं. निःकाम.—८ पं. पुराणें.—९ दे. "झोंप नाथिलि" असतां मागून "झोपें नाथिलें" असें केलें आहे. त. झोपें नाथिला.

खाटेवरि पडतां । त्यासी चिंता तळमळ[1] ॥ १ ॥
॥ धु. ॥ ऐसी गहन कर्मगति । काय तयासी रडती ।
जाले जाणते जो चित्तीं । कांहीं नेघे आपुला ॥ ध्रु. ॥
उदक लावितां न धरे । चिंता करी केव्हां सरे ।
जाऊं नका धीरें । ह्मणे करितां टवाळ्या[2] ॥ २ ॥
जवळी गोंचिड क्षीरा । जैसी कमळणी दर्दुरा ।
तुका ह्मणे दुरा । देशत्यागें तयासी ॥ ३ ॥

॥ २०४२ ॥

संदेह बाधक आपआपणयांतें । रज्जुसर्पवत भासतसे ।
भेऊनियां काय देखिलें येणें । मारें[3] घायेंविण लोळतसे ॥ १ ॥
॥ धु. ॥ आपण[4] चि तारी आपण[4] चि मारी । आपण[4] उद्धरी आपणयां ।
शुकनाळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥ ध्रु. ॥
पापपुण्य कैसे भांजिले[5] अंकें[6] । दशकाचा एक उरविला
जाणोनियां काय होतोसी नेणता । शून्या[7] ठाव रिता नाहीं नाहीं ॥ २ ॥
दुरा दृष्टी पाहें न्याहाळूनि । मृगजळा पाणी न ह्मणें चाडा ।
धांवतां चि फुटे नव्हे समाधान[8] । तुका ह्मणे जाण पावे पीडा ॥ ३ ॥
॥ २ ॥

॥ २०४३ ॥

कथे उभा अंग राखेल[9] जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥ १ ॥
॥ धु. ॥ येथें तो पातकी न येतां[10] च भला । रणीं कुचराला काय चाले[11] ॥ ध्रु. ॥

---

१ पं. तळमळी.—२ पं. टवाळ्या.—३ त. विण घायें कैसें लोळतसें. दे. असेंच असतां मागून "मारें घायें विग लोळतसे" असें केलें आहे. पं. घायें विण कैसें०.—४ दे. आपणें. पं. "आपण उद्धरी" याबद्दल "आपण चि उद्धरी"—५ पं. भाजिले.—६ दे. त. अख. पं. अंख.—७ त. शून्याचा ठाव नाहीं जाला।. पं. शून्याचा ठाव रिता नाहीं।.—८ त. सावधान.—९ दे. राखे.—१० त. पं. येता.—११ पं. जालें.

कथे बैसोनी आणीक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐलपैल ते[2] थडीचे । बुडतील साच मध्यभागीं ॥ ३ ॥

॥ २०४४ ॥

नावडे ज्या कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे[3] वोजा ॥१॥
॥धु.॥ तो असे जवळी गोंचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाँय[4] तया दुरी ॥ध्रु॥
नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ २ ॥
तुका ह्मणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ३ ॥

॥ २०४५ ॥

जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ॥ १ ॥
॥ धु. ॥ कैसा पाहे चर्मदृष्टि[5] । दीप स्नेहाच्या शेवटीं ॥ ध्रु ॥
कां तेलेंसें श्वान । [6]तैसें दिशा हिंडे मन ॥ २ ॥
त्याचे कानीं हाणे । कोण बोंब तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २०४६ ॥

दुर्बळा वाणीच्या एक दोनि सिद्धि । सदैवा समाधि विश्वरूपीं ॥ १ ॥
॥ धु.॥ काय त्याचें वांयां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ ॥ ध्रु ॥
तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥ २ ॥
तुका ह्मणे एक वाहाती मोळिया । भाग्यें आगळिया घरा येती ॥ ३ ॥
॥ ४ ॥

॥ २०४७ ॥

परिमळें काष्ठ ताजवां तुळविलें । आणिक नांवांचीं[7] थोडीं ।

---

१ पं. कथे बैसोनियां आणिक करी चर्चा ।—२ पं. "ते" नाहीं—३ पं. बऱ्या.—४ दे. ठायें.—५ त. चद्रीदाटी. पं. चद्रीदृष्टी दे. "चद्रिदाष्टी" असतां "चर्मद्रिष्टि" केलें आहे.—६ पं दाहीं. दिशा०. —७ पं. नावडे चि.

एक तीं कांतिवें उभविलीं ढवळारें । एकाचिया कुड मेडी ।
एक दीनरूप आणिती मोळिया । एक त बांधोनि माडी ।
अवघियां बाजार एक चि जाला । मांविकलीं आपुल्या पाडीं ॥ १ ॥
॥ध्रु.॥ गुण तो सार रूपमध्यकार । अवगुण तो फार पीडीतसे ॥ ध्रु ॥
एक गुणें आगळे असती । अमोल्य नांवांचे खडे ।
एक समर्थ दुर्बळा घरीं । फार मोलाचे थोडे ।
एक झगझग करिती वाळवंटीं । कोणी न पाहाती तयांकडे ।
सभाग्य संपन्न आपुलाले घरीं । मायेक दैन्य बापुडें ॥ २ ॥
एक नामें रूपें सारिख्या असती । अनेकप्रकार याती ।
ज्याचिया संचितें जैसें आलें पुढें । तयाची तैसी चँ गति ।
एक उंचपदीं बैसोनि सुखें । दास्य करवी एका हातीं ।
तुका ह्मणे कां मानिती सुख । चुकलिया वांयां खंती ॥ ३ ॥ ॥ १ ॥

॥ २०४८ ॥

नाहीं आह्मां शत्रु सोसुरें पिशुन । दाटलें हें घन माहियेर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ॥ध्रु॥
लज्जा भय कांहीं आह्मां चिंता नाहीं । सर्वसुखें पायीं वोळगती ॥२॥
तुका ह्मणे आह्मी संदैवाचीं बाळें । जालों लडिवाळें सकळांचीं ॥ ३ ॥

॥ २०४९ ॥

गर्भी असतां बाळा । कोण पाळी त्याचा लळा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कैसा लाघवी सूत्रधारी । कृपाळुवा माझा हरी ॥ ध्रु ॥
सर्प पिलीं वितां चिं खाय । वांचलियेंा कोण माय ॥ २ ॥

१ दे. एक तें कातिवें. पं. एक तें कितीची.—२ पं. परी । मायेक दैन्यवाणें बापुडें.—३ पं. संचितीं.—४ पं. " च " नाहीं. —५ दे त. पं. बैसउनि.—६ पं. करविती.—७ पं. सोइरें.—८ दे. त. पं. पिसुन.—९पं. " चि" नाहीं.—१० पं. वांचवित.

गगनीं लागला कोसरा[1] । कोण पुरवी तेथें चारा ॥ ३ ॥
पोटीं पाषाणांचे जीव । कवण जीव[2] त्याचा भाव[3] ॥ ४ ॥
तुका म्हणे निश्चळ राहें । होईल तें सहज पाहें ॥ ५ ॥

॥ २०५० ॥

न म्हणे कवणां सिद्ध साधक गंव्हार । अवघा विश्वंभर वांचूनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें माझे बुद्धि काया वाचा मन । लावीं तुझें ध्यान पांडुरंगा ॥ध्रु
गातां प्रेमगुण शंका माझ्या मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ॥ २ ॥
देईं चरणसेवा भूतांचें भजन । वर्णा अभिमान सांडवूनि ॥ ३ ॥
आशापाश माझी तोडीं माया चिंता । तुजविण व्यथा नको कांहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सर्व भाव तुझे पायीं । राहे ऐसें देईं प्रेम देवा ॥ ५ ॥

॥ २०५१ ॥

अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तें च[4] ठेलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय उरलें तया पण । मागील तें नाम गुण ॥ ध्रु ॥
लोह लागे परिसा अंगीं । तो ही भूषण जाला जगीं ॥ २ ॥
सरिता ओहळा[5] ओघा । गंगे[6] मिळोनि जाल्या गंगा ॥ ३ ॥
चंदनाच्या वासें । तरु[7] चंदन जाले स्पर्शें ॥ ४ ॥
तुका जडला[8] संतां पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ५ ॥ ॥ ४ ॥

॥ २०५२ ॥

ऐशा भाग्यें जालों । तरी धन्य जन्मा आलों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ रुळें तळींले[9] पायरी । संत पाय देती वरी ॥ ध्रु ॥

---

१ दे. कोसरा—२ दे. त. वेथा.—३ पं. भावें—४ पं. "च" नाहीं.—५ पं. वोहळ. दे. वोहळा त. वोहोळा.—६ पं. मिळोनियां जाल्या गंगा.—७ पं. तरुवर.—८ पं. जवळा. दे. जला.—९ पं. तळील.

प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥ २ ॥

तुका ह्मणे सुखें । तया हरतील दुःखें ॥ ३ ॥

॥ २०५३ ॥

करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माथां पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥ ध्रु ॥

ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारितां कांहीं ॥ २ ॥

तुका ह्मणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥ ३ ॥ ॥ २ ॥

॥ २०५४ ॥

वेद जया गाती । आह्मां तयाची संगति ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाम धरियेलें कंठीं । अवघा सांटविला पोटीं ॥ ध्रु ॥

ॐकाराचें बीज । हातीं आमुचे तें निज ॥ २ ॥

तुका ह्मणे बहु मोटें । अ[1]गुराणियां धाकुटें ॥ ३ ॥

॥ २०५५ ॥

तूं[2] श्रीयेचा पति । माझी बहु हीन[3] याती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ दोघे असों एके ठायीं । माझा माथा तुझे पायीं ॥ ध्रु ॥

मा[4]झ्या दीनपणां पार । नाहीं बहु तूं उदार ॥ २ ॥

तुका ह्मणे पांडुरंगा । मी ओहोळ तूं गंगा ॥ ३ ॥

॥ २०५६ ॥

मी याचक तूं दाता । काय सत्य पाहों आतां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ म्या तों पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥ ध्रु ॥

---

१ पं. आणुरेणुयां.—२ पं. तुह्मी तरी हो श्रीपति. । दे. मूळांतल्याप्रमाणेंच होतें तें मागून पं. प्रतीप्रमाणें केलें आहे.—३ पं. दीन.—४ पं. माझा दीनपणा फार ।.

पं. प्रतीप्रमाणें केलें आहे.—३ पं. दीन.—४ पं. माझा दीनपणा फार ।.

आम्ही घ्यावें नाम । तुम्हां समाधान काम ॥ २ ॥
तुका म्हणे देवराजा । वाद खंडीं तुझा माझा ॥ ३ ॥

॥ २०५७ ॥

तुझे पोटीं वांव । व्हावा ऐसा माझा भाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करीं वासनेसारिखें । प्राण फुटे येणें दुःखें ॥ ध्रु ॥
अहंकार खोटे । वाटे श्वापदांचे[2] थाटे ॥ २ ॥
तुका म्हणे आई । हातीं धरूनि संग देई ॥ ३ ॥

॥ २०५८ ॥

दारीं परोवरी । कुंडीं[3] कवाडीं मी घरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुमच्या लागलों पोषणा । अवघे ठायीं नारायणा ॥ ध्रु ॥
नेदीं खाऊं जेवूं । हातींतोंडींचें ही घेऊं ॥ २ ॥
तुका म्हणे अंगीं । जडलों ठायींचा सलगी ॥ ३ ॥

॥ २०५९ ॥

मज कोणी कांहीं करी । उमटे तुमचे अंतरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ व्याला वाढविलें ह्मूण । मज सुख तुज सीण ॥ ध्रु ॥
माझें पोट धालें । तुझे अंगीं उमटलें ॥ २ ॥
तुका ह्मणे खेळें । तेथें[4] तुमचिया बळें ॥ ३ ॥

॥ २०६० ॥

जोडोनियां कर । उभा राहिलों समोर ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें चि माझें भांडवल । जाणे कारण विठल ॥ ध्रु ॥
भाकितों करुणा । आतां नुपेक्षावें दीना ॥ २ ॥

---

१ दे. ठाव.–२ दे. श्वापदांचीं थाटें. पं. श्वापदांची थाटे.–३ पं. कुटि.–४ पं. येथें.

तुका ह्मणे डोई । ठेवीं वेळोवेळां पायीं ॥ ३ ॥

॥ २०६१ ॥

आह्मी घ्यावें तुझें नाम । तुह्मी आह्मां द्यावें प्रेम ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें निवडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥ ध्रु ॥
माझी डोई पायांवरी । तुह्मी न धरोवी दुरी ॥ २ ॥
तुका ह्मणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥ ३ ॥

॥ २०६२ ॥

वारिलें लिगाड । बहुदिसांचें हें जाड ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न बोलावें ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुलें ॥ ध्रु ॥
जाला चौघांचार । गेला खंडोनि वेव्हार ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । करीन ते घ्यावी सेवा ॥ ३ ॥

॥ २०६३ ॥

पायरवे अन्न । मग करी क्षीदक्षीग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसे होती घातपात । लाभे विण संगें थीत ॥ ध्रु ॥
जन्माची जोडी । वाताहात एके घडी ॥ २ ॥
तुका ह्मणे शंका । हित आड या लौकिका ॥ ३ ॥

॥ २०६४ ॥

आह्मां वैष्णवांचा । नेम काया मनें वाचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धीर धरूं जिवासाटीं । येऊं नेदूं लाभा तुटी ॥ ध्रु ॥
उचित समय । लाज निवारावें भय ॥ २ ॥

---

१ पं. असों.—२ पं. धरावे.—३ त. क्षेदक्षीण.

तुका ह्मणे कळा । जाणों नेम नाहीं बाळा ॥ ३ ॥

॥ २०६५ ॥

उलंघिली लाज । तेणें साधियेलें काज ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सुखें नाचे पैलतीरीं । गेलों भवाचे सागरीं ॥ ध्रु ॥

नामाची सांगडी । सुखें बांधली आवडी ॥ २ ॥

तुका ह्मणे लोकां । उरली वाचा मारीं हाका ॥ ३ ॥

॥ २०६६ ॥

बैसलोंसें दारीं । धरणें कोंडोनि भिकारी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां कोठें हालों नेदीं । बरी सांपडली संदी ॥ ध्रु ॥

किती वेरझारा । मागें घातलिया घरा ॥ २ ॥

माझें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥ ३ ॥

भांडावें तें किती । बहु सोसिली फजिती ॥ ४ ॥

तुका ह्मणे नाहीं । लाज तुझे अंगीं कांहीं ॥ ५ ॥

॥ २०६७ ॥

जालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाहीं लागों दिलें अंगा । आड ठाकलों मी जगा ॥ ध्रु ॥

करूनियां नीती । दिल्याप्रमाणें चालती ॥ २ ॥

हातीं दंड काठी । उभा जिवाचिये साटीं ॥ ३ ॥

बळ बुद्धी युक्ती । तुज दिल्या सर्व शक्ती ॥ ४ ॥

तुका ह्मणे खरा । आतां घेईन मुशारा ॥ ५ ॥

---

१ त. मुखीं.—२ पं. संधी.

॥ २०६८ ॥

फळाची तों पोटीं । घडे वियोगें ही भेटी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करावें चिंतन । सार तें चि आठवण ॥ ध्रु ॥
चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । पावे अंतरींची सेवा ॥ ३ ॥

॥ १५ ॥

॥ २०६९ ॥

दुर्बळाचें कोण । ऐके घालूनियां मन ।
राहिलें कारण । तयावांचूनि काय तें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कळों आलें अनुभवें । पांडुरंगा माझ्या जीवें ।
न[1] संगतां ठावें । पडे चर्या देखोनि ॥ ध्रु ॥
काम क्रोध माझा देहीं । भेदाभेद गेले नाहीं ।
होतें तेथें कांहीं । तुज कृपा करितां ॥ २ ॥
हें तों नव्हे उचित । नुपेक्षावें शरणागत ।
तुका ह्मणे रीत । तुमची आह्मां न कळे ॥ ३ ॥

॥ २०७० ॥

आह्मी भाव जाणों देवा । न कळती तुझिया मावा ।
[2]गणिकेचा कुढावा । पतना न्यावा दशरथ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरी म्यां काय गा करावें ॥ कोण्या रीती तुज पावें ।
न संगतां ठावें । तुह्मांविण न पडे ॥ ध्रु ॥
दो[3]नी फाकलिया वाटा । गोवी केली[4] घटापटा ।

१ पं. नसतां हें ठावें.।–२ पं. गणिकेचा करिशी कुडावा.।–३ पं. दोही.–४ दे. केला.

नव्हे धीर फांटा । आड रानें भरती ॥ २ ॥
तुका ह्मणे माझे[1] डोळे । तुझे देखती हे चाळे ।
आतां येणें वेळे[2] । चरण जीवें न सोडीं ॥ ३ ॥

॥ २०७१ ॥

वेरझारीं जाला सीण । बहु केलें खेदक्षीण[3] ।
भांडणासी दिन । आजी येथें फावला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां काय भीड भार । धरूनियां लोकाचार[4] ।
बुडवूनि वेव्हार[5] । सरोबरी करावी ॥ ध्रु ॥
आलें बहुतांच्या मना । कां रे न होसी शाहाणा ।
मुळींच्या वचना । आह्मी जागों आपुल्या ॥ २ ॥
तुका ह्मणे चौघांमधीं । तुज नेलें होतें आधीं ।
आतां[6] नाहीं मधीं । उरी कांहीं राहिली ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

॥ २०७२ ॥

कल्पतरूखालीं । फळें येती मागीतलीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तेथें बैसल्याचा भाव । विचारूनि बोलें ठाव ॥ ध्रु ॥
द्यावें तें उत्तर । येतो प्रतित्याचा[7] फेर ॥ २ ॥
तुका ह्मणे मनीं । आपुल्या च लाभहानि ॥ ३ ॥

॥ २०७३ ॥

रंगलें या रंगें पालट न धरी । खेवलें अंतरीं पालटेना ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें[8] कैसे शोभा देती ॥ ध्रु ॥

---

१ पं. “ माझे ” नाहीं.—२ पं. काळें. त. बळें.—३ दे. क्षीदक्षीण. त. क्षेदक्षीण.—४ दे. त. लोकचार.—५ पं. व्यवहार.—६ दे त. आतां नामधीं ।—७ पं. प्रीवीचा चि. त. प्रतीत्याचाची.—८ पं. अंगसंग.

पवित्र जालें तें न लिंपे विटाळा । नेदी वैसों मेळा आडवरी ॥ २

तुका ह्मणे काळें काळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ॥ ३

॥ २०७४ ॥

जगा काळ खाय । आह्मी माथां दिले पाय ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंगें करी साहे ॥ ध्रु ॥

हरिच्या गुणें घाला । होता खात चि भुकेला ॥ २ ॥

तुका ह्मणे हळु । जाला कढत शीतळु ॥ ३ ॥ ॥ ३

॥ २०७५ ॥

ब्रह्मरस घेई काढा । जेणें[3] पीडा वारेल ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पथ्य नाम विठोबाचें । अणीक वाचे न सेवीं ॥ ध्रु ॥

भवरोगाऐसें जाय । आणीक काय क्षुल्लकें ॥ २ ॥

तुका ह्मणे नव्हे बाधा । [4]अणीक कदा भूतांची ॥ ३ ॥

॥ २०७६ ॥

अंगें अनुभव जाला मज । संतरजचरणांचा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सुखी जालों या सेवनें । दुःख नेणें यावरी ॥ ध्रु ॥

निर्माल्याचें तुळसीदळ । विष्णुजळ चरणींचें ॥ २ ॥

तुका ह्मणे भावसार । करूनि फार मिश्रित ॥ ३ ॥

॥ २०७७ ॥

वैद्य एक पंढरिराव । अंतर्भाव तो जाणे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ रोगाऐशा वाव्या वल्ली । जाणे जाली बाधा ते ॥ ध्रु ॥

१ दे. त. मला.—२ त. बेगें.—३ पं. तेणें.—४ पं. आणि कदा.०—५ पं. भवसार.

नेदी रुका वेचों मोल । पाहे बोल प्रीतीचे ॥ २ ॥
तुका ह्मणे दयावंता । सदा चिंता दीनांची ॥ ३ ॥

॥ २०७८ ॥

करितां कोणाचें ही काज । नाहीं लाज देवासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधु ॥ ध्रु ॥
करूनि अराणूक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥ २ ॥
बोले तैसी करणी करी । तुका ह्मणे एक हरि ॥ ३ ॥ ॥ ४ ॥

॥ २०७९ ॥

उभें चंद्रभागे तीरीं । कट धरोनियां करीं ।
पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ त्याचा छंद माझ्या जीवा । काया वाचा मनें हेवा ।
संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥ ध्रु ॥
रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे ।
मस्तक नावडे । उठों पायांवरोनि ॥ २ ॥
तुका ह्मणे नाम । ज्याचें नासी क्रोध काम ।
हरी भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥ ३ ॥

॥ २०८० ॥

आह्मां हें चि भांडवल । ह्मणों विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सुखें तरों भवनदी । सेंगें वैष्णवांची मांदी ॥ ध्रु ॥
बाखराचें वाण । सांडूं हें जेवूं जेवण ॥ २ ॥

---

१ पं. नुठों.—२ दे. संग.

न लगे वारंवार । तुका ह्मणे वेरझार ॥ ३ ॥

॥ २०८१ ॥

आतां माझ्या भावा । अंतराय नको देवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आलें भागा तें करितों । तुझें नाम उच्चारितों ॥ ध्रु ॥
दृढ माझें मन । येथें राखावें बांधोन ॥ २ ॥
तुका ह्मणे वाटे । नको फुटों देऊं फांटे ॥ ३ ॥ ॥ ३ ।

॥ २०८२ ॥

काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें[1] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करी अक्षरांची आटी । एके कवडी च साटीं ॥ ध्रु ॥
निंदी कोणां स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥ ३ ॥

॥ २०८३ ॥

मागणें तें मागों देवा । करूं भक्ती त्याची सेवा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय उणें तयापाशीं । रिद्धिसिद्धी ज्याच्या[2] दासी ॥ ध्रु ॥
कायावाचामन । करूं देवा[3] हें अर्पण ॥ २ ॥
तुका ह्मणे विश्वंभर । ज्यांच्यानें[4] हें चराचर ॥ ३ ॥

॥ २०८४ ॥

चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ असे भक्तांचिये घरीं । काम न सांगतां[5] करी ॥ ध्रु ॥
अनाथाचा बंधु । असे[6] अंगीं हा संबंधु ॥ २ ॥

१ पं. सुणें.—२ पं. त्याच्या.—३ पं. देवासीअर्पण.—४ पं. त्याच्यानें.—५ दे. संगतां.—
पं. अंगीं असे.

तुका ह्मणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥ ३ ॥

॥ २०८५ ॥

कर्कशसंगाति । दुःख उदंड फजिती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं इह ना परलोक । मजुर दिसे[1] जैसें रंक ॥ ध्रु ॥
वचन सेंटोवरि[2] । त्याचें ठेवूनि धिक्कारी[3] ॥ २ ॥
तुका ह्मणे पायीं बेडी । पडिली कपाळीं कुऱ्हाडी ॥ ३ ॥ ॥ ४ ॥

॥ २०८६ ॥

बीज पेरे[4] सेतीं । मग गाडेवरी वाहाती ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वांयां गेलें ऐसें दिसे । लाभ त्याचे अंगीं वसे ॥ ध्रु ॥
पाल्याची जतन । तरि प्रांतीं येती कण ॥ २ ॥
तुका ह्मणे आळा । उदक देतां लाभे फळा ॥ ३ ॥

॥ २०८७ ॥

जाणावें तें सार । नाहीं तरी दगा फार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ डोळे झांकिलिया रवि । नाहीं ऐसा होय जेवीं[5] ॥ ध्रु ॥
बहुथोडया आड । निवारितां लाभे जाड ॥ २ ॥
तुका ह्मणे खरें । नेलें हातींचें अंधारें ॥ ३ ॥

॥ २०८८ ॥

मुळीं नेणपण । जाला तरी अभिमान ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वांयां जावें हें चि खरें । केलें तेणें चि प्रकारें ॥ ध्रु ॥
अराणूक नाहीं कधीं । जाली तरि भेदबुद्धि ॥ २ ॥

---

१ त. जालें.—२ पं. सेटाधारी.—३ दे. त. धीकारी. पं. धी:कारी.—४ पं. परी.—५ पं. जीवीं.

अंतरली नाव । तुका ह्मणे नाहीं ठाव ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

॥ २०८९ ॥

संवेसारसांते आले हो आइका । तुटीचें तें नका केणें भरूं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ लाभाचा हा काळ अवघे विचारा । पारखी ते करा साह्य येथें ॥ ध्रु ॥

शृंगारिलें दिसे न कळे अंतर । गोविला पदर उगवेना ॥ २ ॥

तुका ह्मणे खोटें गुंपतां विसारें । हानिचिया खरें हानी घ्यावें ॥ ३ ॥

॥ २०९० ॥

सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पुढें जातियाचे उमटले माग । भांबावलें जग आडरानें ॥ ध्रु ॥

वेचल्याचा पाहे बराबरि झाडा । बळाचा निधडा पुढिलिया ॥ २ ॥

तुका ह्मणे जैसी दाखवावी वाणी । ते द्यावी भरोनी शेवट तों ॥ ३ ॥

॥ २०९१ ॥

बुद्धिमंदा शिरीं । भार फजिती पदरीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जाय तेथें अपमान । पावे हानि थुंकी जन ॥ ध्रु ॥

खरियाचा पाड । मार्गें लावावें लिगाड ॥ २ ॥

तुका ह्मणे करी । वर्म नेणें भरोवरी ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

॥ २०९२ ॥

पूर्वजांसी नर्का । जाणें तें एक आइका ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ निंदा करावी चाहाडी । मनीं धरूनि आवडी ॥ ध्रु ॥

मातागमना ऐसी । जोडी पातकांची रासी ॥ २ ॥

१ पं. संसारसातें.—२ पं. गोविला.—३ दे. बुद्धिमंद.—४ दे. त. पं. हाणी.

तुका ह्मणे वाट । कुंभपाकाची ते नीट ॥ ३ ॥

॥ २०९३ ॥

देहा[1] लावी वात । पालव घाली जाली रात ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वेडी[2] ते वेडी बहुतें[3] च वेडी । चाखतां गोडी चवी नेणे ॥ ध्रु ॥

कडिये मूल भोंवतें भोंये । मोकलुनि रडे धाये ॥ २ ॥

लेंकरें वित्त पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥ ३ ॥

आपुली शुद्धि जया नाहीं । आणिकांची ते जाणे काई ॥ ४ ॥

तुका ह्मणे ऐसे जन । नर्का जातां राखे कोण ॥ ५ ॥

॥ २०९४ ॥

आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ जें[4] जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥ ध्रु ॥

ठायीं पडिलिया तें चि लागे खावें । ठायींचें चि घ्यावें विचारूनि ॥ २ ॥

बीज पेरूनियां तें चि घ्यावें फळ । डोरलीस केळें[5] कैंचें लागे ॥ ३ ॥

तुका ह्मणे देवा कांहीं बोल नाहीं । तुझा तूं चि पाहीं शत्रु सखा ॥ ४ ॥

॥ २०९५ ॥

अडचणीचें दार । बाहेर माजी पैस फार ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय करावें तें मौन्य. । दाही दिशा हिंडे मन ॥ ध्रु ॥

बाहेर[6] दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥ २ ॥

नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥ ३ ॥

सारविलें निकें । वरि माजी अवघें फिकें ॥ ४ ॥

---

१ दे. पं. "देहा लावी०" हें कडवें "वेडी ते वेडी०" या ध्रुवपदाच्या पुढें आहे.–२ दे. वेडीं तें वेडीं बहुत चि वेडीं. ।–३ पं. बुडत.–४ पं. जया.–५ पं. केळें.–६ पं. बारीर.

तुका ह्मणे अंतीं । कांहीं न लगे चि हातीं ॥ ५ ॥

॥ २०९६ ॥

लय लक्षूनियां जालों ह्मणती देव । तो ही नव्हे भाव सत्य जाणा ॥ १ ॥
॥ ध्रु.॥ जालों बहुश्रुत न लगे आतां कांहीं । नको राहूं ते ही निश्चितीनें ॥ ध्रु ॥
तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥ २ ॥
कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी होईल निष्काम । तरि च होय राम देखे डोळां ॥ ४ ॥

॥ २०९७ ॥ ॥ ५* ॥

पुरली धांव कडिये घेईं । पुढें पायीं न चलवीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगे जिवलगे ॥ ध्रु ॥
अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥ २ ॥
तुका ह्मणे बोलवेना । लावीं स्तनां ईश्वरे[2] ॥ ३ ॥

॥ २०९८ ॥

जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां तूं चि बाह्यात्कारीं । अवघ्यापरी जालासी ॥ ध्रु ॥
नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्वसांगे[3] । पांडुरंगे दयाळे ॥ ३ ॥

॥ २०९९ ॥

जेथें माझी दृष्टि जाय । तेथें पाय भावीन ॥ १ ॥

---

१ त. काई.–२ दे. त. पं. विश्वरें.–३ पं. सर्वसंगे. * दे. त. " ४ " हा अंक आहे, पण तो चुकला असावा.

॥ ध्रु. ॥ [1]असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥ ध्रु ॥
अवघा च अवघे देसी । [2]सुखरासी संपन्न ॥ २ ॥
तुका ह्मणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

॥ २१०० ॥

नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भला भला पुंडलिका । मानलासी जनलोकां ॥ ध्रु ॥
कोण्या काळें सुखा । [3]ऐशा कोण पावता ॥ २ ॥
अवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥ ३ ॥
तुका ह्मणे धन्य जालें । भूमी वैकुंठ आणिलें ॥ ४ ॥

॥ २१०१ ॥

अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जीव देऊनियां बळी । अवघीं तारिलीं दुर्बळीं ।
केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥ ध्रु ॥
कांहीं न [4]मगे याची गती । [5]लुटाविती जगा हातीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भक्तराजा । कोण [6]वर्णी पार तुझा ॥ ३ ॥

॥ २१०२ ॥

प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्तांचा अंकिला ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न पुसतां जातां नये । खालीं बैसतां ही भिये ॥ ध्रु ॥
अवघा त्याचा [7]होतें । जीव भावा ही सहित ॥ २ ॥
वदे [8]उपचाराची वाणी । कांहीं माग ह्मणऊनि ॥ ३ ॥

---

१ पं. असें तया समाधानें.—२ दे. सुख घेववितसी संपन्य. । त. अवघ्याविसीं संपन्न. ।—३ पं. ऐसा.—४ त. मग.—५ त. लुटविती.—६ पं. पार वर्णी.—७ पं होय ।. जीवभाव सहित.—८ पं. उपचारवाणी

उदासीनाच्या लागें । तुका ह्मणे धांवे मागें ॥ ४ ॥

॥ २१०३ ॥

कांहीं न मागती देवा । त्यांची करूं धांवे सेवा ॥ १ ॥

॥ धृ. ॥ हळूहळू फेडी ऋण । होऊनियां रूपें दीन ॥ ध्रु ॥

होऊं न सके वेगळा । क्षण एक त्यां निराळा ॥ २ ॥

तुका ह्मणे भक्तिभाव । हा चि देवाचा ही देव ॥ ३ ॥

॥ २१०४ ॥

जाणे अंतरिंचा भाव । तो चि करितो उपाव ॥ १ ॥

॥ धृ. ॥ न लगे सांगावें मागावें । जीवें भावें अनुसरावें ।

अविनाश घ्यावें । फळ धीर धरोनि ॥ ध्रु ॥

बाळा न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥ २ ॥

तुका ह्मणे तरी । एकीं लंघियेले गिरी ॥ ३ ॥

॥ २१०५ ॥

आह्मी नाचों तेणें सुखें । वाऊं टाळी गातों मुखें ॥ १ ॥

॥ धृ. ॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी लळा ॥ ध्रु ॥

आह्मां जाला हा निर्धार । मागें तारिले अपार ॥ २ ॥

तुका ह्मणे संतीं । वर्म दिलें आह्मां हातीं ॥ ३ ॥

॥ २१०६ ॥

जालों निर्भर मानसीं । ह्मणऊनि कळलासी ॥ १ ॥

॥ धृ. ॥ तुझे ह्मणविती त्यांस । भय चिंता नाहीं आस ॥ ध्रु ॥

---

१ पं. मगती.—२ पं. रूप धरोनियां दीना. ।—३ पं. तो.—४ पं. बाळ.—५ पं. लंघियेली.

१ पं. मगती.—२ पं. रूप धरोनियां दीना. ।—३ पं. तो.—४ पं. बाळ.—५ प. लंघिये

चुकविसी पाश । गर्भवासयातना ॥ २ ॥
तुझें जाणोनियां वर्म । कंठीं धरियेलें नाम ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेणें[1] सुखें । विसरलों जन्मदुःखें[2] ॥ ४ ॥ ॥ ७ ॥

॥ २१०७ ॥

नको दुष्टसंग[3] । पडे भजनामधीं भंग ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ॥ ध्रु ॥
तुज निषेधितां । मज न साहि[4] सर्वथा ॥ २ ॥
एका माझ्या जीवें । वाद करूं कोणासवें ॥ ३ ॥
तुझे वर्णूं गुण । कीं हे राखों दुष्टजन ॥ ४ ॥
काय करूं एका । मुखें सांग ह्मणे तुका ॥ ५ ॥

॥ २१०८ ॥

विठ्ठल माझी[5] माय । आह्मां सुखा[6] उणें काय ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घेतों अमृताची धनी । प्रेम वोसंडलें स्तनीं ॥ ध्रु ॥
क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपावंत । ठेवीं आह्मांपाशीं चित्त ॥ ३ ॥

॥ २१०९ ॥

भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर जाले ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ ध्रु ॥
महा दोषां आला त्रास । जन्ममरणां केला नास ॥ २ ॥
सहस्रनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ ३ ॥

---

१ पं. " तेणें " नाहीं.—२ दे. जन्मदुःख.—३ दे. द्रुष्टसंग. त. द्दष्टसंग.—४ पं. साहवे.—५ त. माझा.—६ त. सुखें.

नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धी या कामारी ॥ ५ ॥ ॥ ३ ॥

॥ २११० ॥

पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥ ध्रु ॥
स्वहित कारण मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ॥ २ ॥
थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कां रे मरसी जातां ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां रे सकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ॥ ४ ॥

॥ २१११ ॥

कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ ध्रु ॥
देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ॥ २ ॥
त्याची निंदा करी त्याची कुष्ठ वाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम घ्यावें ॥ ४ ॥

॥ २११२ ॥

टाळघोळ सुख नामाचा गजर । घोषें जयजयकार ब्रह्मानंदु ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ गरुडटके दिंडी पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥ ध्रु ॥
आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहूनि भद्रजाति ॥ २ ॥
तेणें सुखें सुटे पाषाणां पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ३ ॥
तुका ह्मणे सोपें वैकुंठासी जातां । रामकृष्ण कथा हे चि वाट ॥ ४ ॥
॥ ३ ॥

---

१ पं. जातां मरसी.–२ पं. उतरले अपार बहु येणें. ।–३ दे. त. जेजेकार.

॥ २११३ ॥

देखोवेखीं करिती गुरु । नाहीं ठाउका विचारु ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ॥ ध्रु ॥
शिकों कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणां हातीं ॥ २ ॥
तुका ह्मणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥ ३ ॥

॥ २११४ ॥

भाग्यवंत ह्मणों तयां । शरण गेले पंढरिराया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तरले तरले हा भरवसा । नामधारकांचा ठसा ॥ ध्रु ॥
भुक्तिमुक्तीचें तें स्थळ । भोळेभा[1]विकां निर्मळ ॥ २ ॥
गाइलें पुराणीं । तुका ह्मणे वेदवाणी ॥ ३ ॥

॥ २११५ ॥

जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दुरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ न लगे द्यावा परिहार । या कोरडें उत्तर ।
असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥ ध्रु ॥
अवघें जाणे सूत्रधारी । कोण नाचे कोणे परी ॥ २ ॥
तुका ह्मणे बुद्धि । ज्यो[2]ची ते च तया सिद्धि ॥ ३ ॥

॥ २११६ ॥

नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥ १ ॥
[3]मुंगियांच्या मुखा गजाचा आहार । न साहावे भार जाय जीवें ॥ २ ॥
तुका ह्मणे आधीं करावा विचार । शूरपणें तीर मोकलावा ॥ ३ ॥

१ त. दे. भाविकनिर्मळ.—२ पं. ज्याची तया ते चि सिद्धि.।—३ पं. मुंगीचिया.

॥ २११७ ॥

तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तेथें घरीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पंढरीचोहोटां घातला दुकान । मांडियेले वान आवडीचे ॥ ध्रु ॥

आषाढी कार्तिकी भँरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ॥ २ ॥

मुक्ति कोणी तेथें हातीं नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥ ३ ॥

तुका ह्मणे संतसज्जन भाग्याचें । अनंता जन्मींचे सांटेकरी ॥ ४ ॥

॥ २११८ ॥

दुःखाचिये साटीं तेथें मिळे सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ उदाराचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥ ध्रु ॥

जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आलिंगी आवडी करूनियां ॥ २ ॥

शीण घेऊनियां प्रेम देतो साटी । न विचारी तुटी लाभा कांहीं ॥ ३ ॥

तुका ह्मणे असों अनाथ दुबळीं । आह्मांसी तो पाळी पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २११९ ॥

आणीक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मुखा तें चि गोड श्रवणां आवडी । चित्त माझें ओढी तुझे पायीं ॥ ध्रु ॥

जये पदीं नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आइकतां ॥ २ ॥

आणिकाचें मज ह्मणवितां लाज । वाटे हें सहज न बोलावें ॥ ३ ॥

तुका ह्मणे मज तूं च आवडसी । सर्वभावेंविसीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २१२० ॥

कळेल हें तैसें गाइन मी तुज । जनासवें काज कांय माझें ॥ १ ॥

---

१ पं. तया.—२ त. पं. पंढरीचोहटा.—३ त. पं. भरियेला.—४ पं. देतां घेतां.—५ पं. जन्माचे.—६ पं. श्रवणीं.—७ पं. बोलवें.—८ दे. त. सर्वभावेंविसीं.—९ पं. नाहीं.

जन्माचे.—६ पं. श्रवणीं.—७ पं. बोलवें.—८ दे. त.

॥ ध्रु. ॥ करीन मी स्तुती आपुले आवडी । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा ॥ ध्रु ॥
होऊनी निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ॥ २ ॥
काय करूं कळा युक्ती या कुसरी । जाणिवेच्या परी सकळिका[1] ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २१२१ ॥

तयासी नेणतीं बहु आवडती । होय जयां चित्तीं एक भाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उपमन्यु ध्रुरु हें[2] काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥ ध्रु ॥
[3]कोळी भिल्ल पशु श्वापदें [4]अपारें । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥ २ ॥
[5]काय तीं गोपाळें चांगलीं शाहाणीं । तयां चक्रपाणी जेवी सवें ॥ ३ ॥
तुका ह्मणे भोळा भाविक हा देव । आह्मी त्याचे पाव धरूनी ठेलों ॥ ४ ॥

॥ २१२२ ॥

न लगे पाहावें अबद्ध वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ [6]नाहीं वेळ नाहीं पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥ ध्रु ॥
पु[7]राणीं ही कोठें न मिळे पाहातां । तैशीं या अनंता ठेवूं नामें ॥ २ ॥
आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद [8]कथाकाळीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी आनंदें चि धालों । आनंद चि ल्यालों अळंकार ॥ ४ ॥

॥ २१२३ ॥

दैन्य दुःख आह्मां न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सर्व सुखें येती मानें लोटांगणीं । कोण यांसी आणी दृष्टीपुढें ॥ ध्रु ॥

---

१ पं. सकळिक.—२ दे. त. हें.—३ दे. कोळें भिल्लें. त. काळें भिल्लें.—४ पं. अपार.—५ दे. काय तें गोपाळें०. पं. काय ते गोपाळ०.—६ त. नेणों वेळा नाहीं.० पं. नाहीं वेळकाळ पंडितांचा०.—७ दे. 'पं. वेदीं जें प्रतिपाद्य न कळे पाहातां' हें दे. मागून केलें आहे. पूर्वी मूळांतल्याप्रमाणेंच होतें.—८ दे कथेकाळीं.

आमुची आवडी संतसमागम । आणीक त्या नाम विठोबाचें ॥ २ ॥

आमचें मागणें मागों त्याची सेवा । मोक्षाची निर्दैवा कोणा चाड ॥ ३

तुका ह्मणे पोटीं सांटविला देव । न्यून[1] तो हा भाव कोण आह्मां ॥ ४ ॥

॥ २१२४ ॥

काळतोंडा सुना । भलतें चोरूनि करी जना ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळुनि वर्ते मन ॥ ध्रु ॥

मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ॥ २ ॥

तुका ह्मणे थीत । नागवला नव्हे हित ॥ ३ ॥

॥ २१२५ ॥

विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हें बोलता ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मज न साहावें कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥ ध्रु ॥

हरिकथेतें विक्कारी[2] । शत्रु माझा तो वैरी ॥ २ ॥

सुना काळतोंडा । जो या देवा ह्मणे धोंडा ॥ ३ ॥

अहं ह्मणे ब्रह्म । नेणे भक्तीचें[3] तें वर्म ॥ ४ ॥

तुका ह्मणे क्षण । नको[4] तयाचें दर्षण ॥ ५ ॥

॥ २१२६ ॥

यमपुरी त्यांणीं वसविली जाणा । उच्छेद भजना विधी केला ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥ ध्रु ॥

काय ते नेणते होते मागें ऋषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥ २ ॥

द्रव्य दारा कोणें स्थापियेलें धन । पिंडाचें पाळण विषयभोग ॥ ३ ॥

---

१ त. नुन्य तो हा भाव. पं. नुन्य तो ही भाव — दे. नुन्य तो भाव.—२ दे. त. धीकारी. प. धीःकारी.—३ पं. भक्तिभाव वर्म.—४ त. तयाचें कोण दर्षण ।.

तुका ह्मणे दोहीं ठायीं हा फजित । पावे यमदूतजना हातीं ॥ ४ ॥

॥ २१२७ ॥

न कळतां कोणीं मोडियेलें व्रत । तया प्रायाश्चित्त चाले कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाणतियां वज्रलेप जाले थोर । तयांस अघोर कुंभपाक ॥छ॥
आतां जरी कोणी नाइके सांगतां । तया शिकवितां तें चि पाप ॥२॥
काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जना पाहा विचारूनी । सुख वाटे मनीं तें चि करा ॥ ४ ॥

॥ २१२८ ॥

वाचे विठल नाहीं । तो चि प्रेतरूप पाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥ छ ॥
न बैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ॥ २ ॥
जातां कांटाळे देउळा[1] । तो चि सुना मुखकाळा ॥ ३ ॥
हरिभक्तीविण । त्याचें[2] जळो शाहाणपण ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेणें । वंशा आणियेलें उणें ॥ ५ ॥

॥ २१२९ ॥

तारिलीं[3] बहुतें[4] चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाटीं ॥ छ ॥
जन्म नांव[5] धरी भक्तीच्या पाळणा । आकार कारणा या च साटीं ॥ २ ॥
असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥ ३ ॥

१ पं. राउळा.—२ पं. जळो त्याचें.—३ पं. वारिलीं—४ "बहुत" हें यमकास जुळतें; पण कोणत्याही प्रतींत तसें आढळत नाहीं.—५ पं. नाम.

१ पं. राउळा.—२ पं. जळो त्याचें.—३ पं. वारिलीं—४ "बहुत" हें यमकास जुळतें; पण कोणत्याही प्रतींत तसें आढळत नाहीं.—५ पं. नाम.

तुका ह्मणे दोहीं ठायीं हा फजित । पावे यमदूतजना हातीं ॥ ४ ॥

॥ २१२७ ॥

न कळतां कोणीं मोडियेलें व्रत । तया प्रायश्चित्त चाले कांहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाणतियां वज्रलेप जाले थोर । तयांस अघोर कुंभपाक ॥ध्रु॥
आतां जरी कोणी नाइके सांगतां । तया शिकवितां तें चि पाप ॥२॥
काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जना पाहा विचारूनी । सुख वाटे मनीं तें चि करा ॥ ४ ॥

॥ २१२८ ॥

वाचे विठ्ठल नाहीं । तो चि प्रेतरूप पाहीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥ ध्रु ॥
न बैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ॥ २ ॥
जातां कांटाळे देउळा[1] । तो चि सुना मुखकाळा ॥ ३ ॥
हरिभक्तीविण । त्याचें[2] जळो शाहाणपण ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेणें । वंशा आणियेलें उणें ॥ ५ ॥

॥ २१२९ ॥

तारिलीं[3] बहुतें[4] चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाटीं ॥ ध्रु ॥
जन्म नांव[5] धरी भक्तीच्या पाळणा । आकार कारणा या च साटीं ॥ २ ॥
असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥ ३ ॥

१ पं. राउळा.—२ पं. जळो त्याचें.—३ पं. वारिलीं—४ "बहुत" हें यमकास जुळतें; पण कोणत्याही प्रतींत तसें आढळत नाहीं.—५ पं. नाम.

१ प. कौतुक वव्हार.—२ प. [illegible] —३ प. [illegible] —४ [illegible]
'जैसा' खोडून 'पाहोनी' केलें आहे.—५ दे. त. पं. वजातां.

नाहीं आह्मी खात । कांहीं कोणाचें लागत ॥ २ ॥
कळे तैसी सेवा । तुका ह्मणे करूं देवा ॥ ३ ॥

॥ २१३४ ॥

मोहरोनी चित्ता । आणूं हळू चि वरि हिता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तों हे पडती आघात । खोडी काढिती पंडित ॥ ध्रु ॥
संवसारा भेणें । कांहीं उसंती तों पेणें ॥ २ ॥
एखादिया भावें । तुका ह्मणे जवळी यावें ॥ ३ ॥

॥ २१३५ ॥

काय जाणों वेद । आह्मी [१]आगमाचे भेद ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ एक रूप तुझें मनीं । धरूनि राहिलों चिंतनीं ॥ ध्रु ॥
कोठें अधिकार । नाहीं रानट विचार ॥ २ ॥
तुका ह्मणे दीना । नुपेक्षावें नारायणा ॥ ३ ॥

॥ २१३६ ॥

धर्माचें [२]पाळण । करणें पाषांड खंडण ॥ १ ॥
॥ ध्रु ॥ हें चि आह्मां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥ ध्रु ॥
तीक्षण [३]उत्तरें । हातीं घेउनि बाण फिरें ॥ २ ॥
नाहीं भीड भार । तुका ह्मणे साना थोर ॥ ३ ॥

॥ २१३७ ॥

निवडावे खडे । तरी [४]दळण वोजें घडे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ नाहीं तरि नासोनि जाय । कारण आळस उरे हाय ॥ ध्रु ॥

---

१ पं. आगमींचे.—२ पं. पाषांडा.—३ पं. उत्तर.—४ पं. दळणा वोज घडे ।—

निवडावें तन । सेतीं करावें राखण ॥ २ ॥
तुका ह्मणे नीत । न विचारितां नव्हे हित ॥ ३ ॥

॥ २१३८ ॥

दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ लात हाणोनियां वारी । गुंडा वाट शुद्ध करी ॥ ध्रु ॥
बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥ २ ॥
तुका ह्मणे नखें । काढुनि टाकिजेती सुखें ॥ ३ ॥

॥ २१३९ ॥

नका धरूं कोणी । राग वचनाचा मनीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येथें बहुतांचें हित । शुद्ध करोनि राखा चित्त ॥ ध्रु ॥
नाहीं केली निंदा । आह्मीं दूषिलेंसे भेदा ॥ २ ॥
तुका ह्मणे मज । येणें विण काय काज ॥ ३ ॥

॥ २१४० ॥

कांहीं जडभारी । पडतां ते अवसरीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुज आठवावे पाय । आह्मीं मोकलूनि धाय ॥ ध्रु ॥
तान पीडी भूक । शीत उष्ण वाटे दुःख ॥ २ ॥
तुका ह्मणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ३ ॥

॥ २१४१ ॥

होउनि कृपाळ । भार घेतला सकळ ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तूं चि चालविसी माझें । भार सकळ ही ओझें ॥ ध्रु ॥

१ दे. त. पं. दुसिलेंते.—२ दे. त अवश्वरी.

देह तुझ्या पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥ २ ॥
कायावाचामनें । तुका ह्मणे दुजें नेणें ॥ ३ ॥

॥ २१४२ ॥

आतां होईं माझे बुद्धीचा जनिता । अवरावें चित्ता पांडुरंगा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येथूनियां कोठें न वजें बाहेरी । ऐसें मज धरीं सत्ताबळें ॥ ध्रु ॥
अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलावें वाचे ऐसें करीं ॥ २ ॥
तुका ह्मणे हित कोणिये जातीचें । तुज ठावें साचें मायबापा ॥ ३ ॥

॥ २१४३ ॥

नित्य[1] या मनासी करितों विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें[2] जाळें उगवतां ॥ ध्रु ॥
सांपडलों[3] गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥ २ ॥
तुका ह्मणे मी तों अज्ञान चि आहें । परि तुझी पाहें वास देवा ॥ ३ ॥

॥ २१४४ ॥

दुर्बळाचे हातीं सांपडलें धन । करितां जतन नये त्यासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसी परी मज झाली नारायणा । योगक्षेम जाणां तुह्मी आतां ॥ ध्रु ॥
खातां लेतां नये मिरवितां वरि । राजा दंड करी जैनराग[4] ॥ २ ॥
तुका ह्मणे मग तळमळ उरे । देखिलें तें झुरे पाहावया ॥ ३ ॥

॥ २१४५ ॥

मागें जैसा होता माझे अंगीं भाव । तैसा एक ठाव नाहीं आतां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें गोही माझें मन मजपाशीं । तुटी मुदलेंसी दिसे पुढें ॥ ध्रु ॥

---

१ पं. सत्य मनासी. दे. नित्य मनासी.—२ पं. " हें " नाहीं.—३ त. सांपडला—४ पं. जनाराग.

पुढिलांचे मना आणि गुणदोष । पूज्य आपणांस करावया ॥ २ ॥
तुका ह्मणे जाली कोंबड्याची परी । पुढें चि उकरी लाभ नेणें ॥ ३ ॥

॥ २१४६ ॥

किती तुजपाशीं देऊं पैरिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां माझें माझे हातीं देईं हित । करीं माझें चित्त समाधान ॥ छ ॥
राग आला तरी कापूं नये मान । बाळा मायेविण कोण दुजें ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ॥ ३ ॥

॥ २१४७ ॥

लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चुकलिया काम मागतों मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥छ॥
पाय सोडूनियां फिरतों बाहेर । स्वामिसेवे चोर होऊनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हें घडलें न पाहिजे ॥ ३ ॥

॥ २१४८ ॥

पुढिलिया सुखें निंब देतां भलें । बहुत वारलें होय दुःख ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हें तों वर्म असे माउलीचे हातीं । हाणी मारी प्रीती हितासाठीं ॥ छ ॥
खेळतां विसरे भूक तान घर । धरूनियां कर आणी बळें ॥ २ ॥
तुका ह्मणे पोळी तोडोनिया घांसे । उदार सर्वस्वें सर्वकाळ ॥ ३ ॥

॥ २१४९ ॥

आतां गुण दोष काय विचारिसी । मी तों आहें रासी पातकांची ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पतितपावनासवें समागम । अपुलाला धर्म चालवीजे ॥ छ ॥

१ पं. परिहर.—२ पं. आतां माझें हातीं देईं माझें हित.—३ दे. सोडूनियां.—४ पं. बळ.—५ पं. पोळी.

घनघायें[1] भेटी लोखंडपरिसा । तरी अनारिसा न पालटे ॥ २ ॥
तुका ह्मणे माती कोण पुसे फुका । कस्तुरीच्या तुका समागमें ॥ ३ ॥

॥ २१५० ॥

कृपावंता दुजें नाहीं तुह्मां पोटीं । लाडें बोलें गोठी[2] सुख मातें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ घेउनि भातुकें लागसील पाठी । लाविसील ओंठीं ब्रह्मरस ॥ ध्रु ॥
आपुलिये पांख घालिसी पाखर । उदार मजवर कृपाळू तूं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मांकारणें गोविंदा । वागाविसी गदा[3] सुदर्शन ॥ ३ ॥

॥ २१५१ ॥

पाळिलों पोसिलों जन्मजन्मांतरीं । वागविलों करी धरोनियां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें बहु दूर वागविलें ॥ ध्रु ॥
नेदी वारा[4] अंगीं लागों आघाताचा । घेतला ठायींचा भार माथां ॥ २ ॥
तुका ह्मणे बोल करितों आवडी । अविट ते चि[5] गोडी अंतरींची ॥ ३ ॥

॥ २१५२ ॥

पांडुरंगा कांहीं आइकावी मात । न करावें मुक्त आतां मज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जन्मांतरें मज ऐसीं[6] देईं देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ॥ ध्रु ॥
वाखाणीन कीर्ती आपुलिया मुखें । नाचेन मी सुखें तुजपुढें ॥ २ ॥
करूनि कामारी दास दीनाहुनी । आपुला[7] अंगणीं ठाव मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी मृत्युलोकीं भले । तुझे चि अंकिले[8] पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २१५३ ॥

माझे अंतरींचें तो चि जाणे एक । वैकुंठनायक पांडुरंग ॥ १ ॥

---

१ पं. घणें घायीं भेटी लोखंडा परीसा ।.—२ पं. गोष्टी.—३ पं. कदा.—४ पं. अंगीं वारा.—५ पं. "चि" नाहीं.—६ दे. तैसीं.—७ पं. आपलें.—८ दे. त. अंखिले.

॥ ध्रु. ॥ जीव भाव त्याचे ठेवियेला पायीं । मज चिंता नाहीं कवणेविशीं ॥ ध्रु ॥

सुखसमारंभें संतसमागमें । गाऊं वाचे नाम विठोबाचें ॥ २ ॥

गातां पुण्य होय आइकतां लाभ । संसारबंद तुटतील ॥ ३ ॥

तुका ह्मणे जीव तयासी विकिला । आणीक विठ्ठलाविण नेणें ॥ ४ ॥

॥ २१५४ ॥

कथा दुःख हरी कथा मुक्त करी । कथा यां[1] चि बरी विठोबाची ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कथा पाप नासी उद्धरिले दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥ ध्रु ॥

कथा तप ध्यान कथा अनुष्ठान । अमृत हे पान हरिकथा ॥ २ ॥

कथा मंत्रजप कथा हरी ताप । कथाकोळीं[2] कांप कळिकाळासी ॥ ३ ॥

तुका ह्मणे कथा देवाचें हीं[3] ध्यान । समाधि लागोन उभा तेथें[4] ॥ ४ ॥

॥ १३ ॥

॥ २१५५ ॥

काय ऐसा सांगा । धर्म मज पांडुरंगा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुझे पायीं पावें ऐसा । जेणें उगवे हा फांसा ॥ ध्रु ॥

करीं कृपादान । तैसें बोलवीं वचन ॥ २ ॥

तुका ह्मणे देवा । माझें त्हदय वसवा ॥ ३ ॥

॥ २१५६ ॥

भला ह्मणे जन । परि नाहीं समाधान ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥ ध्रु ॥

कृपेचा आधार । नाहीं दंभ जाला भार[5] ॥ २ ॥

---

१ दे. त. याची.—२ पं. कळि कांपे कळिकाळासी.—३ पं. हें.—४ पं. कथे.—५ पं. फार.

तुका ह्मणे रूपे[1] । अंतराय कोण्या पावें ॥ ३ ॥

॥ २१५७ ॥

शिकविले[2] बोल । बोलें तैसी नाहीं ओल ॥ १ ॥

॥ ध्रु० ॥ आतां देवा संदेह नाहीं । वांयां गेलें यासी कांहीं ॥ ध्रु ॥

एकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नास ॥ २ ॥

बुद्धि नाहीं स्थिर । तुका ह्मणे शब्दा धीर ॥ ३ ॥

॥ २१५८ ॥

उचिताचा दाता । कृपावंता तूं अनंता ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कां रे न घलिसी धांव । तुझें उच्चारितां[3] नांव ॥ ध्रु ॥

काय बळयुक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ॥ २ ॥

तुका ह्मणे तूं विश्वंभर । ओस माझें कां अंतर ॥ ३ ॥

॥ २१५९ ॥

वांहावतों[4] पुरीं । आतां उचित तें करीं ॥ १ ॥

॥ ध्रु. माझी शक्ति नारायणा । कींव भाकावी करुणा ॥ ध्रु ॥

आह्मां ओढी काळ । तुझें क्षीण झालें बळ ॥ २ ॥

तुका ह्मणे गोडी । जीवा मातेचिया ओढी ॥ ३ ॥

॥ २१६० ॥

आतां घेई माझें । भार सकळ ही ओझें ॥ १ ॥

॥ ध्रु. काय करिसी होई वाड । आलों पोटासीं दगड ॥ ध्रु ॥

तूं चि डोळे वाती । होई दीपक सांगातीं ॥ २ ॥

तुका ह्मणे कांहीं । विचाराया चाड नाहीं ॥ ३ ॥

---

१ त. पं. रूपें.—२ पं शिकलों ते बोल । बोल तैसी. ०—३ पं. उच्चारितों.—४ दे. वाहावेतों.

॥ २१६१ ॥

असोत हे बोल । अवघें तूं चि भांडवल ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझा मायबाप देवा । सज्जन सोयरा केशवा ॥ ध्रु ॥

गोळियेले भेद । सारियेले वादावाद ॥ २ ॥

तुका ह्मणे मधीं । आतां न पडे उपाधि ॥ ३ ॥

॥ २१६२ ॥

करीन कोल्हाळ । आतां हा चि सर्वकाळ ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां ये वो माझे आई । दई भातुकें विठाई ॥ ध्रु ॥

उपायासी नाम । दिलें याचें पुढें क्षेम ॥ २ ॥

बीज आणि फळ । हें चि तुका ह्मणे मूळ ॥ ३ ॥

॥ २१६३ ॥

धनासीं च धन । करी आपण जतन ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुज आळवितां गोडी । पांडुरंगा खरी जोडी ॥ ध्रु ॥

जेविल्याचें खरें । वरी उमटे ढेंकरें ॥ २ ॥

तुका ह्मणे धाय । तेथें कोठें उरे हाय ॥ ३ ॥

॥ २१६४ ॥

अनुभवा आलें । माझें चित्तींचें क्षरलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ असे जवळी अंतरें । फिरे आवडीच्या फेरें ॥ ध्रु ॥

खादलें चि वाटे । खावें भेटलें चि भेटे ॥ २ ॥

तुका ह्मणे उभें । आह्मी राखियेलें लोभें ॥ ३ ॥

॥ १० ॥

---

१ पं. गाळियेला.—२ पं. आपणा.—३ दे. त. अंतर.

१ पं. गाळियेला.—२ पं. आपणा.—३ दे. त. अंतर.

॥ २१६५ ॥

पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तैसें मज कांगा केलें पंढरिराया । लौकिक हा वांयां वाढविला[1] ॥ ध्रु ॥
ज्वरिलियापुढें वोढिलीं[2] मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची[3] ॥ २ ॥
तुका ह्मणे मढें शृंगारिलें वरी । ते चि जाली परी मज देवा ॥ ३ ॥

॥ २१६६ ॥

बेगडाचा रंग राहे कोण काळ । अंगें[4] हें पितळ न देखतां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें चित्त मज जवळीच गोहीं[5] । तुझी मज नाहीं भेटी ऐसें ॥ ध्रु ॥
दासीसुतां नाहीं पितियाचा ठाव । अवघें चि वाव सोंग त्याचें ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी केली विटंबना । अनुभवें जना येईल कळों ॥ ३ ॥

॥ २१६७ ॥

मजपुढें नाहीं आणीक बोलता । ऐसें कांहीं चित्ता वाटतसें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ याचा कांहीं तुह्मीं देखावा[6] परिहार । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥ ध्रु ॥
कांमक्रोधें[7] नाहीं सांडिलें आसन । राहिले वसोन देहामध्यें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां जालों उतराई । कळों यावें पायीं निरोपिलें ॥ ३ ॥

॥ २१६८ ॥

सावित्रीचें[8] विटंबण । रांडपण करीतसे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय जाळावें तें नांव । अवघें वाव असे तें ॥ ध्रु ॥
कुबेर[9] नांव मोळी वाहे । कैसी पाहें फजिती ॥ २ ॥
तुका ह्मणे ठुणगुण देखें[10] । उगीं[11] मूर्ख फुंदतां ॥ ३ ॥

---

१ त. न्हावया वाढविला.–२ पं. वाढिलें मिष्टान्नं.–३ दे. त. पं. त्याची.–४ त. आग.–५ त. ग्वाही दे. 'गोही' याचें 'गोही' केलें आहे–६ दे. त. देखा.–७ दे. त. काम क्रोध.–८ दे. त. सावित्रीची.–९ दे. त. कुबिर.–१० पं. ठुणगुण देख–११ पं. उगेच. त. उगी मुखें.

॥ २१६९ ॥

न गमेसी[1] जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनी नो[2] बोलावें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ रुचिविण काय शब्द वाग्या माप । अनादरें[3] कोप येत असे ॥ ध्रु ॥

आपुलिया रडे आपुलें चि मन । दाटे समाधान पावतसें ॥ २ ॥

तुका ह्मणे तुह्मी असा जी जाणते । काय करूं रिते वादावाद ॥ ३ ॥

॥ २१७० ॥

मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध[4] । आरालिया बंद्ध[5] ठेवा आह्मां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वागवीत संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥ ध्रु ॥

गाणें गीत आह्मां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें अंगा येतें ॥ २ ॥

तुका ह्मणे किती सांगावे दृष्टांत । नसतां तूं अनंत सांनुकूळ[6] ॥ ३ ॥

॥ २१७१ ॥

एकाएकीं आतां असावेंसें वाटे । तरि च हे खोटे चाळे केले ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वाजवूनि तोंड घांतलों[7] बाहेरी । कुलुप[8] करूनी दारीं माजी वसा ॥ ध्रु ॥

उजेडाचा केला दाटोनि अंधार । सर्व हुद्देदार चेष्टाविला[9] ॥ २ ॥

तुका ह्मणे भय होतें तों चि वरी । होती कांहीं उरी स्वामिसेवा ॥ ३ ॥

॥ २१७२ ॥

काय नव्हेसी तूं एक । देखों कासया पृथक ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ मुंग्या कैंचे[10] मुंगळे । नटनाट्य तुझे चाळे ॥ ध्रु ॥

जाली तरी मर्यादा । किंवा त्रासावें गोविंदा ॥ २ ॥

---

१ दे. नमगेसी.—२ पं. न.—३ पं. आदरें.—४ दे. त. संसारसंबंधें.—५ दे. बधें.—६ दे. त. पं. सानकुळ.—७ प. घातलें.—८ पं. कल्पें.—९ पं. चेष्टविला.—१० पं. कैंचे ते मुंगळे.

तुका ह्मणे साचा । कोठें जासी ह्रुदयींचा ॥ ३ ॥

॥ २१७३ ॥

कां जी वाढविलें । न लगतां हें उगलें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ आतां मानितां कांटाळा । भोंवतीं मिळालिया बाळा ॥ ध्रु ॥

लावूनियां सेवे[1] । पळतां दिसाल बरवे ॥ २ ॥

तुका ह्मणे बापा । येतां न कळा चि रूपा ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

॥ २१७४ ॥

क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र ने[2] विचारून ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धर्म आहे वर्मा अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥ ध्रु ॥

द्रव्य आणि कन्या । येथें कुळ कर्म सोधण्या ॥ २ ॥

तुका ह्मणे पुण्य गांठी । तरि च उचितासी[3] भेटी ॥ ३ ॥

॥ २१७५ ॥

वेचावें तें जीवें । पूजा घडे ऐशा नावें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ बिगारीची ते बिगारी । साक्षी[4] अंतरींचा हरी ॥ ध्रु ॥

फळ बीजाऐसें । कार्यकारणासरिसें[5] ॥ २ ॥

तुका ह्मणे मान । लवणासारिखें लवण ॥ ३ ॥

॥ २१७६ ॥

मज नाहीं धीर । तुह्मी न करा अंगीकार ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसें पडिलें विषम । बळी देवाहूनि कर्म ॥ ध्रु ॥

चालों नेणें वाट । केल्या न पवे[6] बोभाट ॥ २ ॥

---

१ पं. सेवे.—२ पं. "न" नाहीं.—३ पं. उचिताची.—४ पं. साक्ष.—५ पं. "सरिसें" याबद्दल "सारिखें."—६ दे. त. पवा.

वेचों नेणे जीवें । तुका उदास धरिला देवें ॥ ३ ॥

॥ २१७७ ॥

तळमळी चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली ॥ १ ॥

॥ धु. ॥ वचनीं च संत पावले स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं ॥ धृ ॥

वेठीऐसा करीं भक्तिवेवसाव । न पवे चि भाव समाधान ॥ २ ॥

तुका ह्मणे कई देसील विसांवा । पांडुरंगे धांवा घेतें मन ॥ ३ ॥

॥ ४ ॥

॥ २१७८ ॥

हागतां ही खोडी । चेळण मोडवितें काडी ॥ १ ॥

॥ धु. ॥ ऐसे अनावर गुण । आवरावे काय ह्मूण ॥ धृ ॥

नाहीं जरी संग । तरी बडबडवितो रंग ॥ २ ॥

तुका ह्मणे देवा । तुमची न घडे चि सेवा ॥ ३ ॥ ॥ १ ॥

॥ २१७९ ॥

देह निरसे तरी । बोलावया नुरे उरी ॥ १ ॥

॥ धु. ॥ येर वाचेचें वाग्जाळ । अळंकारापुरते बोल ॥ धृ ॥

काचें तरी कढे । जानी ऐसें चित्त ओढे ॥ २ ॥

विष्णुदास तुका । पूर्ण धनी जाणे चुका ॥ ३ ॥

॥ २१८० ॥

खोटयाचा निकरा । येथें नव्हे कांच हिरा ॥ १ ॥

॥ धु. ॥ काय दावायाचें काम । उगा च वाढवावा श्रम ॥ धृ ॥

परीक्षकाविण । मिरवों जाणां तें तें हीण ॥ २ ॥

---

१ पं. चरण.–२ पं. ह्मण–३ पं. जाणे.

तुका पायां पडे । वाद पुरे हे झगडे ॥ ३ ॥ ॥ २ ॥

॥ २१८१ ॥

पंढरीस घडे अतित्यायें मृत्य । तो जाय पतित अधःपाता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ दुराचारें मोक्ष सुखाचे वसति । भोळी बाळमूर्ति पांडुरंग ॥ ध्रु ॥
केला न सहावे तीर्थउपवास । कथेविण दोषसाधन तें ॥ २ ॥
कालियापें भेद मानितां निवडे । श्रोत्रियांसी जोडे अंत्यजता ॥ ३ ॥
माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी । काळिमा काजळी पाववितें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेथें विश्वास जतन । पुरे भीमास्नान सम पाय ॥ ५ ॥ ॥ १ ॥

॥ २१८२ ॥

चातुर्याच्या अनंतकळा । सत्या विरळा जाणता ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे ॥ ध्रु ॥
जळो ऐसे वांजट बोल । गुणां मोल भूस मिथ्या ॥ २ ॥
तुका ह्मणे अंधळ्याऐसें । वोंगळ पिसें कौतुक ॥ ३ ॥

॥ २१८३ ॥

नयो वाचे अनुचित वाणी । नसो मनीं कुडी बुद्धि ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ ऐसें मागा अरे जना । नारायणा विनवूनि ॥ ध्रु ॥
कामक्रोधां पडो चिरा । ऐसा बरा सायास ॥ २ ॥
तुका ह्मणे नानाछंदें । या विनोदें न पडावें ॥ ३ ॥

॥ २१८४ ॥

माझिया देहाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥ १ ॥

---

१ पं. अतित्याई.—२ पं. दुराचाऱ्या मोक्षसुखाची वसति ।.—३ त. साहे.—४ पं. निवाडे.—५ दे आंतेजेता.—६ पं. येथें.—७ पं. सत्य.—८ दे. त. जाणत. पं. तया.

॥ ध्रु. ॥ इच्छितां ते मान मागा देवापासीं । असा[1] संचितासी गुंपेले[2] हो ॥ध्रु॥
देह आह्मी केला भोगाचे सांभाळीं । राहिलों निराळीं मानांमानां[3] ॥२॥
तुका ह्मणे कोणें[4] वेचावें वचन । नसतां[5] तो सीण वाढवावा ॥ ३ ॥

॥ २१८५ ॥

धरितां इच्छा दुरी पळे । पाठी सोहळे उदासा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ म्हणऊनि असट मन । नका खुण सांगतों ॥ ध्रु ॥
आमिषापाशीं[6] अवघें वर्म । सोस श्रम पाववी ॥ २ ॥
तुका म्हणे बीज न्यावें । तेथें यावें फळानें ॥ ३ ॥ ॥ ४ ॥

॥ २१८६ ॥

वेद शास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन नांवलोका[7] ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तार्किंयाचें अंग आपणा पारिखें । माजिऱ्यासारिखें वाईचाळे[8] ॥ध्रु॥
माता निंदी तया कोण तो आधार । भंगलें खापर यांचे नावें[9] ॥ २ ॥
तुका म्हणे आडरानें ज्याची चाली । तयाची ते बोली मिठेंविण ॥ ३॥

॥ २१८७ ॥

कस्तुरीचे अंगीं मीनली मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखूं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तयापरि भेद नाहीं देवभक्तीं । संदेहाच्या युक्ति सरों द्याव्या ॥ध्रु॥
इंधनें[10] तें आगी संयोगाच्या गुणें । सागरा दर्शनें[11] वाहाळ तों चि ॥ २ ॥
तुका म्हणे माझें साक्षीचें वचन । येथें तों कारण शुद्ध भाव ॥ ३ ॥

॥ २१८८ ॥

भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥

---

१ दे. आसा.—२ पं. गुंफले.—३ पं. मानामान.—४ पं. नलगे.—५ त. पं. नसता.—६ दे. त. पं. आविसापासीं.—७ पं. नावलोकावें.—८ त. वाईचळ.—९ त. याचें नांव. पं. याची नावें.—१० पं. इंधन.—११ पं. दर्शन वोहळ तो चि.

॥ ध्रु. ॥ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ ध्रु ॥

उदक अग्नि धान्य जाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥ २ ॥

तुका ह्मणे मज कळे[1] ते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥ ३ ॥

॥ ३॥

॥ २१८९ ॥

श्रीसंतांचिया माथा चरणांवरी । साष्टांग हें करीं दंडवत ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ विश्रांति पावलों सांभाळउत्तरीं । वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥ ध्रु ॥

डौरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों[2] ॥ २ ॥

तुका ह्मणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्यठेवा वोडवला ॥ ३ ॥

॥ २१९० ॥

नेणों काय नाड । आला उचित काळा आड ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नाहीं जाली संतभेटी । येवढी हानि काय मोठी ॥ ध्रु ॥

सहज पायांपासीं । जवळी[3] पावलिया ऐसी ॥ २ ॥

चुकी जाली आतां काय । तुका ह्मणे उरली हाय ॥ ३ ॥

॥ २१९१ ॥

आणीक कांहीं नेणें । असें पायांच्या चिंतनें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ माझा न व्हावा विसर । नाहीं आणीक आधार ॥ ध्रु ॥

भांडवल सेवा । हा चि ठेवियेला ठेवा ॥ २ ॥

करीं मानभावा । तुका विनंती करी देवा ॥ ३ ॥

---

१ दे. केले ते.—२ पं. उद्धरले.—३ पं. तुज जवळी पावली ऐसी.

॥ २१९२ ॥

ओंरूप माझी वाणी बोबडी उत्तरें ।
केली ते लेंकुरें सलगी पायीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करावें कवतुक संतीं मायबापीं ।
जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ॥ ध्रु ॥
आधारें वदली प्रसादाची वाणी ।
उच्छिष्टसेवनीं तुमचिया ॥ २ ॥
तुका ह्मणे हे चि करितों विनंती ।
मागेन पुढती सेवादान ॥ ३ ॥ ॥ ४ ॥

॥ २१९३ ॥

पुरुषा हातीं कंकणचुडा । नवल दोडा वृत्तिया ॥ १ ॥
ध्रु. ॥ पाहा कैसी विटंबणा । नारायणा देखिली ॥ ध्रु ॥
जळो ऐसी ब्रिदावळी । भाटबोळीपणाची ॥ २ ॥
तुका ह्मणे पाहों डोळां । अवकळा नये हे ॥ ३ ॥

॥ २१९४ ॥

वितीयेवढेंसें पोट । केवढा बोभाट तयाचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जळो याची विटंबना । भूक जना नाचवी ॥ ध्रु ॥
अभिमाना सिरीं भार । जालें खर तृष्णेचे ॥ २ ॥
तुका ह्मणे नरका जावें । हे चि जीवें व्यापार ॥ ३ ॥

---

१ दे. आरुढा.—२ दे. त. • सेवणी.—३ दे. त. मागेनि.—४ पं. पुरुषहातीं०.—५ पं. येव्हडा.—६ पं. त्याची.

येव्हडा.—६ पं. त्याची.

॥ २१९५ ॥

सेवटासी जरी आलें । तरी जालें आंधळें ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ स्वहिताचा लेश नाहीं । दगडा[1] कांहीं अंतरीं ॥ ध्रु ॥

काय परिसासवें भेटी । खापरखुंटी जालिया ॥ २ ॥

तुका ह्मणे अधम जन । अवगुण[2] चि[3] वाढवी ॥ ३ ॥

॥ २१९६ ॥

प्रायश्चित्तें देतो तुका । जातो लोकां सकळां ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ धरितील ते तरती मनीं । जाती घाणी वांयां त्या ॥ ध्रु ॥

निग्रहअनुग्रहाचे ठाय । देतो घाय पाहोनि ॥ २ ॥

तुका जाला नरसिंहीं । भय नाहीं कृपेनें ॥ ३ ॥ ॥ ४ ॥

॥ २१९७ ॥

दुर्जनाचें अंग अवघें चि[3] सरळ । नर्काचा कोथळ सांटवण[4] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ खाय अमंगळ बोले अमंगळ । उठवी कपाळ संघष्टणें ॥ध्रु॥

सर्पा मंत्र चाले धरावया हातीं । खळाची ते जाती निखळ[5] चि ॥ २ ॥

तुका ह्मणे कांहीं न साहे उपमा । आणीक अधमा वोखंट्याची[6] ॥ ३ ॥

॥ २१९८ ॥

ऐका जी संतजन । सादर मन करूनि ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ सकळांचें सार एक । कंटक ते त्यजावें[7] ॥ ध्रु ॥

विशेषता कांद्याहूनि । सेवित्या घाणी आगळी ॥ २ ॥

तुका ह्मणे ज्याची जोडी । ते[8] परवडी बैसीजे ॥ ३ ॥

---

१ पं. दगड.—२ दे. अवगुणें.—३ पं. "चि" नाहीं.—४ पं. सांटवला.—५ दे. निखळे.—६ पं. वोखट्यासी.—७ दे. त. तजावे.—८ पं. त्याची.

॥ २१९९ ॥

आज्ञा पाळुनियां असें एकसरें । तुमचीं उत्तरें संतांचीं हीं ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भागवूनि देह ठेवियेला पायीं । चरणावरि डोई येथूनचि ॥ ध्रु ॥
येणें जाणें हें तों उपाधीचें मूळ । पूजा ते सकळ अकर्तव्य ॥ २ ॥
तुका ह्मणे असें चरणींचा रज । पदीं च सहज जेथें तेथें ॥ ३ ॥
॥ ३ ॥

॥ २२०० ॥

न संडावा ठाव । ऐसा निश्चयाचा भाव ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां पुरे पुन्हा यात्रा । हें चि सारूनि सर्वत्रा ॥ ध्रु ॥
संनिध चि सेवा । असों करूनियां देवा ॥ २ ॥
आज्ञेच्या पाळणें । असें तुका संतां ह्मणे ॥ ३ ॥

॥ २२०१ ॥

उपाधीचें बीज । जळोनि राहिलें सहज ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आशा राहिली ते आतां । चाली देवाचिया सत्ता ॥ ध्रु ॥
पैराधीन तें जिणें । केलें सत्ता नारायणें ॥ २ ॥
तुका ह्मणे जाणें पाय । खुंटले आणीक उपाय ॥ ३ ॥

॥ २२०२ ॥

गोविंदावांचोनि वदे ज्याची वाणी ।
हगवण घाणी पिटपिट ते ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मस्तक सांडूनि सिसफुल गुडघां ।
चार तो अवघा बावळ्यांचा ॥ ध्रु ॥

---

१ दे. येथुनं.—२ दे. त प्राधीन.—३ पं. बावळ्याचा.

१ दे. येथुन.—२ दे. त प्राधीन.—३ पं. बावळ्याचा.

अंगभूत ह्मूण पूजितो वाहाणा ।
ह्मणतां शाहाणा येइल कैसा ॥ २ ॥
तुका ह्मणे वेश्या सांगे सवासिणी[1] ।
इतर पूजनीं भाव तैसा ॥ ३ ॥

॥ २२०३ ॥

कृतघ्याऐसें ज्याचें जिणें । संग कोणीं[2] न करीजे ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाय तिकडे हाडहाडी । गोऱ्हवाडी[3] च सोइरीं ॥ ध्रु ॥
अवगुणांचा त्याग नाहीं । खवळे पाहीं उपदेशें[4] ॥ २ ॥
तुका ह्मणे कैंची लवी । ठेंग्या[5] केवीं अंकुर ॥ ३ ॥

॥ २२०४ ॥

सर्वथा ही खोटा संग । उपजे भंग मनासी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ बहु रंगें भरलें जन । संपन्न चि अवगुणी ॥ ध्रु ॥
सेविलिया निष्कामबुद्धी[6] । मदें शुद्धी सांडवी[7] ॥ २ ॥
त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ॥ ३ ॥

॥ २२०५ ॥ ॥ ५ ॥

उपचारासी वाज जालों । नको[8] बोलों यावरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥ ध्रु ॥
दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहु मतें ॥ २ ॥
एकाएकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥ ३ ॥

---

१ पं. सुवासिनी.—२ पं. कोणें.—३ पं. गोऱ्हेवाडी.—४ पं. उपदेश.—५ त. ठेंग्या.—६ दे. निःकामबद्धी.—७ पं. सांडावी.—८ पं. नको.

॥ २२०६ ॥

मी तें मी तूं तें तूं । कुंकुंड हें लाडमी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ वचनाची पडो तुटी । पोटींचें पोटीं राखावें ॥ ध्रु ॥

तेथील तेथें येथील येथें । वेगळ्या कुंये कोण भारें ॥ २ ॥

याचें यास त्याचें त्यास । तुक्यानें कास घातली ॥ ३ ॥ ॥ २ ॥

॥ २२०७ ॥

लाडाच्या उत्तरीं वाढविती कळह । हा तो अमंगळ जातिगुण ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तमाचे शरीरीं विटाळ नि वसे । विचाराचा नसे लेश तो ही ॥ ध्रु ॥

कवतुकें घ्यावे लेंकराचे बोल । साहिलिया मोल ऐसें नाहीं ॥ २ ॥

तुका ह्मणे काय उपदेश खळा । न्हाउनि काउळा क्षेनें धुंडी ॥ ३ ॥

॥ २२०८ ॥

आतां मज देवा । इचे हातींचें सोडवा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पाठी लागलीसे लांसी । इच्छा जिते जैसी तैसी ॥ ध्रु ॥

फेडा आतां पांग । अंगीं लपवुनी अंग ॥ २ ॥

दुजें नेणे तुका । कांहीं तुह्मासी ठाउका ॥ ३ ॥

॥ २२०९ ॥

बहु वाटे भये । माझे उडी घाला दये ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ फांसा गुंतलों लिगाडीं । न चले बळ चरफडी ॥ ध्रु ॥

कुंटित चि युक्ति । माझ्या जाल्या सर्व शक्ति ॥ २ ॥

तुका ह्मणे देवा । काममोहें केला गोवा ॥ ३ ॥ ॥ ३ ॥

---

१ पं. कुंकड.—२ पं. वचनासी पडे तुटी ।—३ पं. येथील तेथें तेथील येथें ।—४ पं. तुकानें.—५ " कळ " ( भांडण ) असतें तर यमकास जुळतें.—६ हे. खातें.

॥ २२१० ॥

विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें । वोंगळ चि सखें वोंगळाचें ॥ १ ॥
॥ध्रु.॥ नये पाहों कांहीं गोऱ्हवाडीचा अंत । ह्मणी ठाका[2] संत दुर्जनापें ॥ ध्रु ॥
भेंसळीच्या बीजा[3] अमंगळ गुण । उपजवी सीण दरुषणें ॥ २ ॥
तुका ह्मणे छी[4] थू जया वरीं धन । तेथें तें कारग कासयाचें ॥ ३ ॥ ॥ १ ॥

॥ २२११ ॥

चोंवळलें[5] काय न करी बडबड । न ह्मणे फिकें गोड भुकेलें तें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उमजल्याविण न धरी सांभाळ । असो खळखळ जनाची हे ॥ ध्रु ॥
गरज्या न कळे आपुलिया चाडा । करावी ते पीडा कोणा काई ॥ २ ॥
तुका ह्मणे भोग भोगितील भोगें । संचित तें जोगें आहे[6] कोणा ॥ ३ ॥

॥ २२१२ ॥

आपुला तो देह आह्मां उपेक्षीत । कोठें जाऊं हित सांगों कोणा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ कोण नाहीं दक्ष करितां संसार । आह्मीं हा विचार वमन केला ॥ ध्रु ॥
नाहीं या धरीत जीवित्वाची चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥ २ ॥
तुका ह्मणे असों[7] चिंतोनियां देवा । मी[8] माझें हा हेवा सारूनियां ॥ ३ ॥
॥ २ ॥

॥ २२१३ ॥

चाकरीवांचून । खाणें[9] अनुचित वेतन ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ धणी काढोनियां निजा । करील ये कामाची[10] पूजा ॥ ध्रु ॥
उचितावेगळें । अभिलाषें तोंड काळें ॥ २ ॥
सांगे तरी तुका । पाहा लाज नाहीं लोकां ॥ ३ ॥

---

१ पं. त. वोंगळासी सखें वोंगळ चि !.–२ पं. टाका.–३ त. वीर्या.–४ पं. त. चीथू०.–५ पं. चळलें.–६ पं. नाहीं.–७ पं. असें. ८ पं. मी हें माझा हेवा०.–९ पं. खावें.–१० पं. कामेची.

॥ २२१४ ॥

बरें सावधन । राहावें समय राखोन ॥ १ ॥
॥ धृ. ॥ नाहीं सारखिया वेळा । अवघ्या पावतां अवकळा ॥ ध्रु ॥
लाभ अथवा हानी । थोड्यामध्यें च भोवनी ॥ २ ॥
तुका ह्मणे राखा । आपणा नाहीं तोंचि वाखा ॥ ३ ॥ ॥ २ ॥

॥ २२१५ ॥

काय करूं जी दातारा । कांहीं न पुरे संसारा ॥ १ ॥
॥ धृ. ॥ जाली माकडाची परि । येतों तळा जातों वरी ॥ ध्रु ॥
घालीं भलते ठायीं हात । होती शिव्या बैस लात ॥ २ ॥
आदि अंतीं तुका । सांगे न कळे झाला चुका ॥ ३ ॥

॥ २२१६ ॥

धर्म तो न कळे । काय झांकितील डोळे ॥ १ ॥
जीव भ्रमले या कामें । कैसीं कळों येती वर्में ॥ ध्रु ॥
विषयांचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ॥ २ ॥
तुका ह्मणे लांसी । माया नाचविते कैसी ॥ ३ ॥

॥ २ ॥

॥ २२१७ ॥

दुर्जनाची जोडी । सज्जनाचे खेंटर तोडी ॥ १ ॥
॥ धृ. ॥ पाहे निमित्य तें उणें । धांवे छळावया सुनें ॥ ध्रु ॥
न ह्मणे रामराम । मनें वाचे हें चि काम ॥ २ ॥
तुका ह्मणे भागा । आली निंदा करी मागा ॥ ३ ॥

---

१ पं. सखा.

॥ २२१८ ॥

शादीचें तें सोंग । संपादितां राजा व्यंगे[1] ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ पाहा कैसी विटंबना । मूर्खा अभाग्याची जना ॥ ध्रु ॥

दिसतें तें लोपी । झिंज्या वोढुनियां पापी ॥ २ ॥

सिंदळी त्या सती । तुका ह्मणे थुंका घेती ॥ ३ ॥

॥ २ ॥

॥ २२१९ ॥

भक्त म्हणऊनि वंचावें[2] जीवें । तेणें शेण खावें काशासाटीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ नासिले अडबंद कौपीन ते[3] माळा । अडचण राउळामाजी केली ॥ध्रु॥

अंगीकारिले सेवे घडे[4] अंतराय । तया जाला न्याय खापराचा ॥ २ ॥

तुका ह्मणे कोठें तर्गो येती घाणीं । आहाच ही मनीं अधीरता ॥ ३ ॥

॥ १ ॥

॥ १२२० ॥

गयाळाचें[5] काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ चित्ता न मिळे तें डोळां सलों येतें । असावें परतें जवळूनि ॥ ध्रु ॥

न करावा संग न बोलावी मात । सावधान चित्त नाहीं त्यासी ॥ २ ॥

तुका ह्मणे दुःख देतील माकडें । घालिती सांकडें उफराटें ॥ ३ ॥

॥ २२२१ ॥

बहु बरें एकाएकीं । संग चुकी करावा ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ ऐसें बरें जालें ठावें । अनुभवें आपुल्या ॥ ध्रु ॥

सांगावें तें काम मना । सलगी जना नेदावी ॥ २ ॥

तुका ह्मणे निघे अगी । दुजे संगीं आतळतां ॥ ३ ॥ ॥ २ ॥

---

१ दे. वेंग.—२ पं. वंचावें तें जावें.—३ त. हे.—४ दे. "घडे" नाहीं. त. "घडे" याबद्दल "जरी" —५ पं. गहिल्याचें.

अलकापुरीं स्वामी कीर्तनास उभे राहिले तेव्हां कवित्वाचा निषेध करून लोक बोलिले कीं कवित्व बुडवणें तेव्हां कवित्व बुडवून पांच दिवस होते॥ लोकांनीं फार पीडा केली कीं संसार- हीं नाहीं व परमार्थही बुडविला आणीक कोणी असते तें जीव देतें मग निद्रा केली ते अभंग ॥ २०॥

॥ २२२२ ॥

भूतबाधा आली घरीं । हें तों आश्चर्य गा हरी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाला भक्तीचा कळस । आले वैसतीसी दोष ॥ छ ॥
जागरणाचें फळ । दिली जोडोनि तळमळ ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा । आहाच कळों आली सेवा ॥ ३ ॥

॥ २२२३ ॥

नाहीं जों बेचलों जिवाचिया त्यागें । तोंवरी वाउगें काय बोलों ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ जाणिवलें आतां करी ये उद्देश । जोडी किंवा नाश तुमची जीवें ॥ छ ॥
ठायींचें चि आलें होतें ऐसें मना । जावें ऐसें वना दृढ जालें ॥ २ ॥
तुका ह्मणे मग वेचीन उत्तरें । उद्देशिलें खरें जाल्यावरी ॥ ३ ॥

॥ २२२४ ॥

करूं कवित्व काय नाहीं आतां लाज । मज भक्तराज हांसतील ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ आतां आला एका निवाड्याचा दिस । सत्याविण रस विरसला ॥ छ ॥

१ पं. अभंगाच्या वह्या उदकांत बुडवून, पांच दिवस उगेच राहिले; तेव्हां छळवादी येऊन फिरोन निषेधाच्या गोष्टी बोलिले. श्रीसन्मुख तेरा दिवस निद्रा केली ते अभंग १९ करून, मग निद्रा केली. अलकापुरीं स्वामी कीर्त० ॥ कवित्वाचा निषेध के० ॥ लोका० ते० ॥ २ पं. दे. त. वसतीस.—३ पं. नये.—४ पं. जाणवलें.—५ पं. ठायीं च.—६ दे. त. उद्देसिलें.— ७ दे. त. कवि काय आतां नाहीं लाज।—८ पं. विसरला.

अनुभवाविण कोण करी पाप । रिते चि संकल्प लाजलावे[1] ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥ ३ ॥

॥ २२२५ ॥

नाहीं आइकत तुह्मी माझे बोल । कासया हें फोल उपणूं भूस ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ येसी तें करीन बैसलिया ठाया । तूं[2] चि बुझावया जवळी देवा ॥ ध्रु ॥
करावे ते केले सकळ उपाय । आतां पाहों काय अझुनि वास ॥ २ ॥
तुका ह्मणे आला आझेसी सेवट । होऊनियां नीट पायां पँडों[3] ॥ ३ ॥

॥ २२२६ ॥

नव्हे तुह्मां सरी । येवढें कारण मुरारी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मग जैसा तैसा काळ । दाट सारावा पातळ ॥ ध्रु ॥
स्वामीचें तें सांडें । पुत्र होतां काळतोंडें[4] ॥ २ ॥
शब्दा नाहीं रुची । मग कोठें तुका वेची ॥ ३ ॥

॥ २२२७ ॥

केल्यापुरती आळी । कांहीं होते टाळाटाळी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ सत्यसंकल्पाचें फळ । होतों[5] न दिसे चि बळ ॥ ध्रु ॥
दळणांच्या ओव्या । रित्या खरें मापें घ्याव्या ॥ २ ॥
जातीं उँखळें[6] चाटूं । तुका ह्मणे राज्य घाटूं ॥ ३ ॥

॥ २२२८ ॥

आतां नेम जाला । या च कळसीं विठ्ठला ॥ १ ॥

---

१ पं. लाजवावे.–२ पं. तुझी बुझावया०.–३ पं. पडें.–४ पं. काळें तोंड.–५ पं. हें तों.–६ पं. उखळ.

॥ ध्रु. ॥ हातीं न धरीं लेखणी । काय भुसकट ते वाणी ॥ ध्रु ॥
जाणें तेणें काळ । उरला सारीन सकळ ॥ २ ॥
तुका ह्मणे घाटी । चाटू कोरडा शेवटीं ॥ ३ ॥

॥ २२२९ ॥

पावावे संतोष । तुह्मीं यासाटीं सायास ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ करीं आवडी वेंचनें[1] । पालटूनि क्षेणक्षणें[2] ॥ ध्रु ॥
द्यावें अभयदान । भुमी न पडावें वचन ॥ २ ॥
तुका ह्मणे परस्परें । कांहीं वाढवीं उत्तरें ॥ ३ ॥

॥ २२३० ॥

बोलतां वचन असा पाठमोरे । मज भाव बरे कळों आले ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ मागितलें नये अरुचीनें हातां । नाहीं वरी सत्ता आदराची ॥ ध्रु ॥
समाधानासाटीं लाविलासे कान । चोरलें तें मन दिसतसां ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मां तुमचे चि फंद । वरदळ छंद कळों येती ॥ ३ ॥

॥ २२३१ ॥

काशासाटीं बैसों करूनियां हाट । वाउगा बोभाट डांगोरा हा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ काय आलें एका जिवाच्या उद्धारें[3] । पावशी उच्चारें काय हो तें ॥ ध्रु ॥
नेदी पट परी अन्नें तों न मोरी[4] । आपुलिये थोरीसाटीं राजा ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां अव्हेरिलें तरी । मग कोण करी दुकान हा ॥ ३ ॥

---

१ पं. वचन.—२ दे. पं. क्षणक्षण.—३ दे. उधारें पं. उदारें.—४ दे. त. मरी.

॥ २२३१ ॥

माझा मज नाहीं । आला उबग तो कांहीं ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ तुमच्या नामाची जतन । नव्हतां थोर वाटे सीण ॥ ध्रु ॥

न पडावी निंदा । कानीं स्वामीची गोविंदा ॥ २ ॥

तुका ह्मणे लाज । आह्मां स्वामीचें तें कांज ॥ ३ ॥

॥ २२३२ ॥

कांहीं मागणें हें आह्मां अनुचित । वडिलांची रीत जाणतसों ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ देह तुच्छ जालें सकळ उपाधी । सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे ॥ ध्रु ॥

शब्द तो उपाधि अचळ निश्चय । अनुभव हा काय नाहीं अंगीं ॥ २ ॥

तुका ह्मणे देह फांकिला विभागीं । उपकार अंगीं उरविला ॥ ३ ॥

॥ २२३३ ॥

मागितल्यास कर पसरी । पळतां भरी वाखती ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय आह्मी नेणों वर्म । केला श्रम नेणतां ॥ ध्रु ॥

बोलतां बरें येतां रागा । कठीण लागा मागेंमागें ॥ २ ॥

तुका ह्मणे येथें बोली । असे चाली उफराटी ॥ ३ ॥

॥ २२३४ ॥

असो तुझें तुजपाशीं । आह्मां त्यासी काय चाड ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ निरोधें कां कोंडूं मन । समाधान असोनी ॥ ध्रु ॥

करावा तो उरे आट । खटपट वाढतसे ॥ २ ॥

तुका ह्मणे येउनि रागा । कां मी भांगा मुकेन ॥ ३ ॥

---

१ दे. उबेग.–२ त. तुझ्या.–३ पं. "हा" नाहीं.–४ पं. उभविला.–५ त. पं. पसरी कर.–६ पं. विरोधें.–७ पं. विभागा.

॥ २२३५ ॥

आहे तें चि पुढें पाहों । वरें आहों येथें चि ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ काय वाढवूनि काम । उगा च श्रम तृष्णेचा ॥ ध्रु ॥

स्थिरावतां ओघीं वरें । चाली पुरें पडेना ॥ २ ॥

तुका ह्मणे वळितां मन । आह्मां क्षण न लगे ॥ ३ ॥

॥ २२३६ ॥

सांगा दास नव्हे तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनि ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ कोणासाटीं केली प्रपंचाची होळी । या पायां वेगळी मायबापा ॥ ध्रु ॥

नसेल तो दावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटे ॥ २ ॥

तुका ह्मणे आह्मां आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं दुजें कांहीं ॥ ३ ॥

॥ २२३७ ॥

अनन्यासी ठाव एक सर्वकाजें । एकाविण दुजें नेणे चित्त ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ न पुरतां आळी देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ॥ ध्रु ॥

लेकराचा भार माउलीचे शिरीं । निढळ तें दुरी धरिलिया ॥ २ ॥

तुका ह्मणे किती घातली लांवणी । समर्थ होउनी केवढ्यासाटीं ॥ ३ ॥

॥ २२३८ ॥

स्तुती तरि करूं काय कोणापासीं । कीर्ती तरि कैसी वाखाणावी ॥ १ ॥

॥ ध्रु. ॥ खोटबा तंव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो भ्रम वरि वरा ॥ ध्रु ॥

---

१ पं. तुजविण ।—२ पं. सर्वकाज ।—३ पं. काय करूं.—४ दे. त. कीर्त.

ह्मणवावें त्याची खुण नाहीं हातीं । अवकळा फजिती सावकाशें ॥ २ ॥
तुका ह्मणे हेंगे तुमचें माझें तोंड । होऊनीयां लंड आळवितों ॥ ३ ॥

॥ २२३९ ॥

कांहीं च न लगे आदि अवसान । बहुत कठीण दिसतसां ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ अवघ्याच माझ्या वेचविल्या शक्ती । न चलेसी युक्ती जाली पुढें ॥ ध्रु ॥
बोलिलें वचन हारपलें नभीं । उतरलों तों उभीं आहों तैसीं ॥ २ ॥
तुका ह्मणे कांहीं न करावेंसें जालें । थकित चि ठेलें चित्त उगें ॥ ३ ॥

॥ २२४० ॥

रूपें[2] गोविलें चित्त । पायीं राहिलें निश्चित ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ तुह्मी देवा अवघे चि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥ ध्रु॥
जाली इंद्रियां विश्रांति । भ्रमतां पीडंत[3] ते होतीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥ ३ ॥

॥ २० ॥

*स्वामींनीं तेरा दिवस निद्रा केली. मग भगवंतें येऊन समाधान केलें कीं, कवित्व कोरडें आहे तें काढणें उदकांतून.

॥ २२४१ ॥

थोर अन्याय केला तुझा अंत म्यां पाहिला ।
जनाचिया[4] बोलासाटीं चित्त क्षोभविलें ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ भागविलासी केला सीण अधम मी यातिहीन ।
झांकूनि लोचन दिवस तेरा राहिलों ॥ ध्रु ॥

---

१ पं. सावकाश.—२ पं. रूपीं गोवियेलें चित्त ।—३ पं. पीडित होती.—४ पं. जगाचिया.
* त. स्वामींनीं तेरा दिवस निद्रा के० ते० ॥७॥ पं. अभंग करून तेरा दिवस निद्रा केली. उदकांत वह्या बुडविल्या त्या कोरड्या निघाल्या; तेंव्हा अन्याय ह्म० अ०.

अवघें घालूनियां कोडें तानभुकेचें सांकडें ।
योगक्षेम पुढें तुज करणें लागेल[1] ॥ २ ॥
उदकीं राखिले कागद चुकविला जनवाद[2] ।
तुका ह्मणे ब्रीद साच केलें आपुलें ॥ ३ ॥

॥ २२४२ ॥

तूं कृपाळू माउली आह्मां दीनांची साउली ।
न संरित[3] आली बाळवेशें जवळी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ माझें केलें समाधान रूप गोजिरें सगुण ।
निववीलें मन आलिंगन देऊनी ॥ ध्रु ॥
कृपा केली जना हातीं पायीं ठाव दिला संतीं ।
कळों नये चित्तीं दुःख कैसें आहे तें ॥ २ ॥
तुका ह्मणे मी अन्यायी क्षमा करीं वो माझे आई ।
आतां पुढें काई तुज घालूं सांकडें ॥ ३ ॥

॥ २२४३ ॥

कापो कोणी माझी मान सुखें पीडोत दुर्जन ।
तुज होय सीण तें मी न करीं सर्वथा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ चुकी जाली एकवेळा मज पासूनि चांडाळा ।
उभें करोनियां जळा माजी वह्या राखिल्या ॥ ध्रु ॥
नाहीं केला हा विचार माझा कोण अधिकार ।
समर्थासी भार न कळे कैसा घालावा ॥ २ ॥

१ पं. तुज कारणें लागले.—२ पं. जनापवाद.—३ (संवृत.?) त. संवरीत. पं. स्वरित.

गेलें होऊनियां मागें नये बोलों तें वाउगें ।
पुढिलिया प्रसंगें तुका ह्मणे जाणावें ॥ ३ ॥

॥ २२४४ ॥

काय जाणें मी पामर पांडुरंगा तुझा पार ।
धरिलिया धीर काय एक न करिसी ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ उताविळ जालों आधीं मतिमंद हीनबुद्धि ।
परि तूं कृपानिधी नाहीं केला अव्हेर ॥ ध्रु ॥
तूं देवांचा ही देव [1]अवघ्या ब्रह्मांडाचा जीव ।
आह्मां दासां कींव कां भाकणें लागली ॥ २
तुका ह्मणे विश्वंभरा मी तों पतित चि खरा ।
अन्याय दुसरा दारीं धरणें बैसलों ॥ ३ ॥

॥ २२४५ ॥

नव्हती आलीसी सासुरीं अथवा घाय पाठीवरी ।
तो म्यां केला हरी एवढा तुह्मां आकांत ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ वांटिलासी दोहीं ठायीं मजपाशीं आणि डोहीं ।
लागों दिला नाहीं येथें तेथें आघात ॥ ध्रु ॥
जवि घेती मायबापें थोड्या अन्यायाच्या कोपें ।
हें तों नव्हे सोपें साहों [2]तों चि जाणीतलें ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपावंता तुज ऐसा नाहीं दाता ।
काय [3]वाँणूं आतां वाणी माझी [4]कुंटली ॥ ३ ॥

---

१ पं. सकळ.—२ पं. त्वां.—३ पं. वाणूं तुज आतां.०—४ पं. खुंटली.

॥ २२४६ ॥

वर्षावकेला.

तूं माउलीहून मयाळ चंद्राहूनि शीतळ ।
पाणियाहूनि पातळ कल्लोळ प्रेमाचा ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ देऊं काशाची उपमा दुजी तुज पुरुषोत्तमा ।
ओंवाळूनि नामा तुझ्या वरूनि टाकिलों ॥ ध्रु. ॥
तुवां केलें रे अमृता गोड त्या ही तूं परता ।
पांचां तत्त्वांचा जनिता सकळ सत्तानायक ॥ २ ॥
कांहीं न बोलोनि आतां उगा च चरणीं ठेवितों माथा ।
तुका ह्मणे पंढरिनाथा क्षमा करीं अपराध ॥ ३ ॥

॥ २२४७ ॥

मी अवगुणी अन्यायी किती ह्मणोन सांगों काई ।
आतां मज पायीं ठाव देईं विठ्ठले ॥ १ ॥
॥ ध्रु. ॥ पुरे पुरे हा संसार कर्म बळिवंत दुस्तर ।
राहों नेदी स्थिर एके ठायीं निश्चळ ॥ ध्रु. ॥
अनेक बुद्धीचे तरंग क्षणक्षणां पालटती[१] रंग ।
धरूं जातां संग तंव तो होतो बाधक ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां अवघी तोडीं माझी चिंता ।
येऊनि पंढरिनाथा वास करीं ह्रदयीं ॥ ३ ॥ ॥ ७ ॥

॥ प्रथम भाग समाप्त. ॥

---

१ पं. पालटे.